मुंबई इलाख्याचे प्रसिद्ध गव्हरनर

नामदार

# मौन्टस्टुअर्ट एल्फिन्स्टन साहेब

# यांचें चरित्र.

श्रीगजानन.

ग्रंथसंपादक व ग्रंथप्रसारक मंडळीची ग्रंथमाला
ग्रंथ ५० वा.

मुंबई इलाख्याचे प्रसिद्ध गव्हरनर

# ना० मौन्टस्टुअर्ट एल्फिन्स्टन साहेब यांचें चरित्र.

( पूर्वार्ध )

लेखक
कृष्णाजी बल्लाळ गोडबोले,
संस्कृत गद्यरामायण, अनाथ पांडुरंग, विद्यमान एतद्देशीय राज्ये, संस्थानें व जहागिरी यांचा इतिहास, राबिन हुड इत्यादि पुस्तकांचे कर्ते.

प्रकाशक
दामोदर सांवळाराम आणि मंडळी,
प्रिंटर्स, पब्लिशर्स व कमिशन एजंट्स–ठाकुरद्वार–मुंबई.

सन १९११ इ.

हें पुस्तक नंबर ४३४ ठाकुरद्वार रोड, मुंबई येथे इंदुविजय कंपनीच्या
'इंदुप्रकाश' छापखान्यांत दामोदर सांवळाराम यंदे यांनी
मालकाकरितां छापिलें.

समर्पण.

नामदार श्रीमंत राजश्री

नारायणराव बाबासाहेब घोरपडे

इंचलकरजीसंस्थानाधिपति,

यांस

त्यांच्या विद्वत्ता, विद्याप्रसारौत्सुक्य, विद्वज्जनादरबुद्धि,

इत्यादि गुणांच्या गौरवार्थ

हें पुस्तक

"पत्रं पुष्पं फलं तोयं" ह्या वचनास अनुसरून

त्यांची अनुज्ञा घेऊन

परमादरानें आणि अत्यंत नम्रतेनें

अर्पण केलें आहे.

कर्ता

कृ. व. गोडबोले.

# प्रस्तावना.

युरोपियन लोक हिंदुस्थानांत प्रथम व्यापाराकरितां येऊन बरेच दिवसांनीं थोडा थोडा मुलुख मिळवून त्यांत अधिकार चालवूं लागले. पुढे येथच्या लोकांस युरोपियन तऱ्हेची कवाईत शिकवून तयार केलें असतां त्यांचे सहाय्याने आपल्यास मोठें राज्य स्थापन करतां येईल ही कल्पना प्रथम फ्रेंच मुत्सद्दी डुप्ली याचे मनांत आली. त्याप्रमाणें करूं लागून त्याणें थोड्याच काळांत बराच मुलुख आपल्या ताब्यांत आणला. तें पाहून इंग्रजांनीं त्याचाच कित्ता गिरवण्यास सुरवात केली. इंग्रज आणि फ्रेंच हे युरोपांत एकमेकांचे शेजारी असून प्रतिस्पर्धी होते, तोच प्रकार हिंदुस्थानांत ही सुरू झाला. अखेर दक्षिण-हिंदुस्थानांत फ्रेंचांचें प्राबल्य झाले होतें ते नाहींसें करून इंग्रज वरचढ होऊन बसले. व्यापार हा आपला मुख्य उद्देश असला तरी तो करतां करतांनाच राज्यप्राप्ति होत आहे तर तिकडे जास्त लक्ष दिलें पाहिजे असें मनांत आणून त्यांणीं राज्य स्थापण्यास सुरवात केली होती. बंगाल, मद्रास, व मुंबई ह्या तीन ही इलाख्यांत त्यांचीं पहिल्यापासून ठाणी होतीं आणि त्यांवर निरनिराळे अम्मलदार होते, ते एकमेकांपासून फार दूर होते तरी ते सर्व एका वरिष्ठाचे हुकमात असावे असें ठरून कलकत्त्याचा गव्हरनर हा जरी हिंदुस्थानच्या अगदीं एका टोंकास होता तरी त्यास मुख्य करून गव्हरनर जनरल असे त्याचें अभिधान ठेवण्यांत आलें व बाकीच्या दोघांनीं त्याच्या हुकुमाप्रमाणें वागावे असें ठरलें. राज्यप्राप्तीचा मार्ग एकदां सांपडल्यावर तें सारखें वाढत चालले तरी बंगाल व मद्रास या इलाख्यांत त्याचा जो विस्तार झाला त्या मानानें मुंबई इलाख्यांत तसा झाला नाहीं. त्यावेळीं दक्षिणेत मराठे प्रबळ होते. त्यांच्या दरबारांत गृहकलह पेटला तेव्हां राघोबादादाचा पक्ष धरून आपला पाय शिरकवण्याचा त्यांनीं यत्न केला परंतु तो सफळ झाला नाहीं. तो नाद तेव्हां सोडून द्यावा लागला तरी सवाईमाधवरावाचे कारकीर्दीत पुण्यांत त्यांच्या वकिलाची नेमणूक झाली. तेव्हांपासून तेथची स्थिति खरी कशी आहे तें हळु हळु समजूं लागलें. सवाईची कारकीर्द लौकरच संपली आणि बाजीराव राज्यपदारूढ झाले त्याबरोबर सारा रंगु पालटला. नानाफडणीस स्थानभ्रष्ट होतांच मराठ्यांची राज्यसत्ता विलयास जाऊं लागली. मग ती आतां अगदीं नामशेष केव्हां होणार एवढेंच पहाण्यावर आलें.

मराठे प्रबळ होऊं लागले तेव्हां त्यांणीं मुसलमानांच्या मुलखांत राजरोस शिरून ढवळाढवळ करतां येण्याला चौथ, सरदेशमुखी, घासदाणा, इत्यादि हक्क संपादन केले तसे इंग्रजांनीं आमच्या राजेरजवाड्यांच्या दरबारांत आपला प्रवेश होण्याला त्यांच्या पदरीं आपली पलटणें नोकरीस ठेवण्याची युक्ति काढली. ह्या नोकरांना पगार देणाराला आपल्या इच्छेप्रमाणें त्यांना काम सांगतां येत नसे. त्याचा अनुभव खड्यांच्या लढाईत निजामाला चांगला आला तेव्हांच तो संतापला. टिपू मोडूं नका आणि इंग्रज जोडूं नका अशी मराठी दरबारांत म्हण पडलेली होती ती स्मरून किंवा अन्य कांहीं कारणानें असो, परंतु बाजीराव इंग्रजांचीं पलटणें चाकरीस ठेऊन घेण्यास नाकबूल होते एवढें खरें आहे. त्याच्या पदरीं पलटणें बांधावीं हा गव्हरनर जनरलाचा फार हेतु होता आणि तेवढें कार्य करण्याविषयीं पुण्याच्या रेसिडेंटाला त्याचा अगदीं तगादा लागला होता. परंतु तो दूरदृष्टि असल्यानें असे उतावळे होऊं नका, इष्टकार्यसिद्धि आपोआप होणार आहे, दम धरा असें म्हणत होता. अखेर त्याच्या म्हणण्याप्रमाणेंच झालें.

त्या रेसिडेंटाच्या हाताखालीं एल्फिन्स्टन साहेबाची नेमणूक होऊन तो प्रथम पुण्यास बाजीरावाच्या अमदानींत गेला. नंतर थोडक्याच दिवसांत बाजीराव पळून वसईस गेले आणि परत आले तेव्हां त्यांजबरोबर तो होता. नंतर जें रण माजलें त्यांत होता. नंतर भोसले व शिंदे यांच्या दरबारीं रेसिडेंट होऊन मग काबुलची वकिली करण्यास गेला. तें काम करून परत आल्यावर पुनः तो जो पुण्यांत आला तो पेशवाईची समाप्ति होऊन पेशव्यांचें राज्य मुंबई-इलाख्यात सामील होईपर्यंत तेथेंच होता. महाराष्ट्राची, त्यांतील लोकांची आणि साऱ्या मराठे दरबारांची माहिती त्याला उत्कृष्ट प्रकारची झालेली होती. महाराष्ट्रावर त्याचें खरें प्रेम बसलें होतें व त्याचें त्यानें कल्याण केलें. पेशवाई एल्फिन्स्टन साहेबानें बुडविली असा पुष्कळ लोकांचा समज आहे परंतु तो सर्वांशीं खरा नाहीं. ती बुडण्यास बाजीरावच बहुतेक मुख्य कारण झालें असें ह्मणावें लागतें. एल्फिन्स्टन साहेबाचे रोजनामे, पत्रें, खलितें, वगैरे लेख जसे बाहेर आले आहेत तसे त्याच वेळचे पेशवेदप्तरचे कागद, सरदार जाहागीरदार, शेटसावकार, वकील, वतनदार, धर्माधिकारी, वगैरे दरबाराशीं बराच निकट संबंध असणारे लोक, आप्तइष्ट व इतर घरंदाज लोक, यांचे

त्यांचा यांचा मेळ किती व विरोध किती, व त्यांत विश्वसनीय किंवा संभवनीय काय, याचा नीट विचार करून लिहील तर त्या कालाचा खरा इतिहास तयार होईल. परंतु तसें घडणें तूर्त तर असंभवनीय दिसत आहे. तरी आम्ही आमच्या सर्व महाराष्ट्रीय वाचकांस अशी सविनय प्रार्थना करतों कीं, त्यांनीं हताश होऊं नये. पेशवाई कशी बुडाली, एल्फिन्स्टननें बुडविली कीं बाजीरावानें बुडविली, तें आतां आह्मांला पाहून काय करावयाचें आहे, बुडाली खरी, पुनः व्हावयाची नाहीं हें खरें, मग व्यर्थ काथ्याकूट कां करा असें ह्मणूं नये. इतिहासाची–खऱ्या इतिहासाची–अत्यंत अवश्यकता आहे, सत्यान्वेषण झालें पाहिजे, एवढें ध्यानांत धरून आपल्या हातानें होईल तितका यत्न करीत असावें. तो अगदींच निष्फळ होईल असें नाहीं. तसा योग येईपर्यंत सध्या जे ग्रंथ उपलब्ध आहेत त्यांवरून जें काय दिसत आहे तें स्वीकारलें पाहिजे.

पेशवाईची समाप्ति, मुंबई इलाख्याचा विस्तार आणि त्याची राज्यव्यवस्था कशा प्रकारें चालावी याचा विचार, यांशीं एल्फिन्स्टनसाहेबाचा फार निकट-संबंध होता. राज्य मोठें असो किंवा लहान असो, तें सुरळीत चालण्याला बरेवाईट, सर्वांस सारखे लागू असे, कांहीं तरी कायदे पाहिजेत. एल्फिन्स्टन साहेब गव्हरनर होण्यापूर्वी मुंबईस कायदे नव्हते ह्मटले तरी चालेल. ते प्रथम त्याणें केले. तसेंच प्रजेस विद्याध्ययन करण्याची सोय त्याणेंच करून दिली. तो बरेच दिवस गव्हरनर असल्यानें सारा इलाखा दोनवार फिरून त्याची स्थिति त्याणें स्वतः पाहिली आणि कोणत्या भागाची काय अवस्था आहे, ती सुधारण्याला काय केले पाहिजे, याचा नीट विचार करून त्याप्रमाणें केलें. तेणेकरून प्रजेस सुख झालें, त्याचा लौकिक झाला आणि त्याचें नांव अजरामर झालें. त्याची किर्ति अद्यापपर्यंत लोक गात आहेत. त्याच्या योग्यतेचा दुसरा कोणी गव्हरनर अद्याप झाला नाहीं असें लोकमत आहे. त्याची कारकीर्द संपण्याची वेळ आली, आणि तो जावयास निघाला तेव्हां सर्व लोकांस वाईट वाटलें आणि त्याचें चिरकाल स्मरण रहावें ह्मणून त्यांणीं त्याचें मोठें स्मारक केलें. अशा कीर्तिमान् थोर पुरुषाचें चरित्र महाराष्ट्रीयांस स्वभाषेंत वाचावयास असणें अवश्य जाणून आह्मी हा यत्न केला आहे. तर ही अल्प सेवा आमच्या देशबांधवांनीं स्वीकारली ह्मणजे आमचे श्रम सफल झाले. Rulers of India Series मध्यें प्रसिद्ध झालेल्या त्याच्या चरित्राचें भाषांतर झालेलें आहे, मग हें दुसरें चरित्र कशाला असा कोणी प्रश्न करील, तर त्यास आमचें उत्तर

एवढेंच कीं त्याणें तें आणि हें अशीं दोनही वाचून पहावीं ह्मणजे त्याचें समाधान आपोआप होईल.

इंग्रज लोकांनीं ५००० कोसांवरून हिंदुस्थानांत येऊन येथें राज्य करीत असलेल्या हिंदु मुसमान वगैरे सर्व लहान थोर सत्ताधीशांनां क्रमाक्रमानें पादाक्रांत करून राज्य स्थापन करण्यास सुरवात केली. त्याचा अल्पकाळांत मोठा विस्तार झाल्यावर त्यावर एक मोठें गंडांतर आलें. परंतु त्यांतून निभाऊन त्यास त्यांणीं चांगली बळकटी आणली आणि याला आतां कांहीं अपाय होण्याची भीति उरली नाहीं अशी खात्री करून घेऊन त्याच्या स्वामिनीस चक्रवर्तिनीपदारूढ केलें. तिचे तिघे पुत्र इकडे येऊन प्रमुदित अंतःकरणानें परत जाऊन तिला भेटले. आतां विद्यमान राजाधिराज पंचम जार्ज महाराज आणखी बारा महिन्यांनीं पुनः इकडे येऊन आपल्या प्रियदर्शनानें प्रजाजनांस संतुष्ट करतील. आमच्या रामायण—भारत—भागवतादि ग्रंथांत आह्मी एकछत्री, चक्रवर्ती, सम्राडाधिपतींच्या गोष्टी वाचतों, परंतु नीट विचार करून पाहूं गेलें तर हिंदुस्थानदेशानें पूर्वी कधीं न पाहिलेले असे यमुनातीरीं सिंव्हासनीं विराजमान होणारे छत्रपति, सामंतचक्रस्तुत, राजाधिराजपद अन्वर्थक धारण करणारे महाराज त्यांच्याहून फार निराळे दिसतील. त्यांच्या अशा ह्या एकछत्री विस्तीर्ण राज्यस्थापनेस आरंभ झाल्यापासून आजपर्यंतचा त्याचा इतिहास फार मनन करण्यासारखा आहे. त्यांत महाराष्ट्रीयांनीं विशेष लक्ष पुरवून पहाण्यासारखें आहे. तसें पहाण्यास एल्फिन्स्टनचरित्राचें पूर्वी अवलोकन केलें असतां तें एक चांगलें साधन होईल.

फार प्राचीन—अगदीं अज्ञात—काळापासून युरोप, एशिया, आणि आफ्रिका ह्या तीन खंडांत जीं लहान मोठीं राज्यें स्थापन झालीं आणि कमी अधिक कालांतरानें लयास गेलीं त्यांचा इतिहास पाहूं गेलें तर एक गोष्ट सर्व साधारण दिसते. ती अशी कीं, राज्य स्थापन करणारे पुरुष धैर्य, बल, शौर्य, पराक्रम, साहस, मनोनिग्रह, स्वाभिमान, कुलाभिमान, देशाभिमान, श्रमसहिष्णुता, स्वामिनिष्ठा, ऐक्यबुद्धि, औदार्य, ओजस्विता, तेजस्विता, स्वार्थत्याग, दूरदृष्टि, राजकारण इत्यादि अनेक गुणांनीं मंडित असून पुढें त्या गुणांचा त्यांच्या संततीमध्यें लोप होत जात जात अखेर अगदीं अभाव झालेला आणि स्वातंत्र्य जाऊन परवशता प्राप्त झालेली. असें कशानें व्हावें ही गोष्ट

विचार करण्यासारखी आहे. हिंदुस्थानांत ईस्ट इंडिया कंपनीची भरभराट होऊं लागली, तिचें राज्य स्थापन होऊं लागलें, तिच्या नोकरांनां पुष्कळ पैसा मिळूं लागला, तेव्हां विलायतेहून १४।१५ वर्षांचीं शाळेंत जाणारीं मुलें द्रव्यार्जनोद्देशानें इकडे येऊं लागलीं. त्यांचे आईबाप त्यांनां इतकें दूर पाठवित तरी कसें हें आमच्या मायामोहजालांत गुरफटलेल्या मातापितरांनां मूल जरा दृष्टीआड झालेलें सहन होत नसल्यानें मोठें गूढ वाटतें. बरें इकडे आल्यावर आतां सारखें इवें तेव्हां १५।२० दिवसांत परत जाऊन भेटतां येईल असें तरी होतें ? ती आशाच नाहीं. तेव्हां तीं पितरें आणि बालकें एकमेकांनां पुरीं अंतरल्या सारखींच होत. त्या वयांत त्यांचा विद्याभ्यास तो कितीसा झालेला असणार आणि ते काम तरी काय करणार असे विचार कोणाच्याही मनांत येतील. परंतु पुढें पहावें तर असल्याच कितीएक बाळांच्या कृति जगास थक्क करून सोडणाऱ्या झाल्या. क्लाइव्ह, वारन हेस्टिंग्ज, मनरो, माल्कम्, मेटकाफ, एल्फिन्स्टन, ह्या विभूति सामान्य नव्हत असें ह्मणावें लागतें. आणि ह्यांच्यासारख्या आणखी कितीक व्यक्ति होत्या ह्मणून त्या सर्वांच्या परिश्रमानें इंग्लंडला हिंदुस्थानचें राज्य मिळालें. इतकी योग्यता त्यांचे अंगीं कशी आली याचा विचार करूं लागलें तर त्यांचे स्वावलंबनानें आणि स्वपरिश्रमानें असें म्हणावें लागतें. त्यांचा विद्याव्यासंग, साहस, धैर्य इत्यादि गुण आश्चर्य करण्यासारखे दिसतात.

आतां त्यांच्यावरून दृष्टि काढून त्या कालच्या आमच्या राजेरजवाड्यांकडे, त्यांच्या दरबारांकडे, त्यांच्या सैन्यांकडे, प्रजेकडे वगैरे पाहूं लागलें तर काय काय दिसतें बरें? सारेंच विपरीत. याहून आम्हीं कांहीं जास्त ह्मणत नाहीं.

एल्फिन्स्टन चरित्र चांगलें सुविस्तृत लिहिलें पाहिजे असें मनानें घेतल्यामुळें आम्हीं पुनः उद्योगास लागलों. शनैःपर्वतमस्तके या न्यायानें ग्रंथ लिहून पुरा जाहल्यावर तो डेक्कन व्हरन्याक्युलर ट्रान्स्लेशन सोसायटीकडे पाठविला. त्यांनीं पसंत करून चांगलें बक्षीस देण्याचें ठरविलें आणि अमूक मुदतींत छापून प्रसिद्ध करून दाखवावें आणि बक्षिस न्यावें असें कळविलें. अंगावर छापण्याचें सामर्थ्य नसल्यानें दुसऱ्याच्या तोंडाकडे पहाणें आलेंच. अखेर बरेच दिवसांनीं छापण्याचें काम सुरू झालें. परंतु हा पूर्वार्ध अर्धा-देखील छापून झाला नाहीं तों हातांतला घांस तोंडांत पडण्यापूर्वीं देखदेखत

नाहींसा व्हावा तसें होऊन सर्व श्रम व्यर्थ गेले ह्मणून हळहळत बसण्याचा अकस्मात् प्रसंग गुदरला होता, पण ईश्वरकृपेनें टळला. ती हकीगत अशी--शुद्ध प्रत लिहून ती छापखान्यांत देण्याकरितां मुंबईस घेऊन चाललों असतां फाल्गुन शुद्ध ११ च्या प्रफुल्लित निर्मल चंद्रप्रकाशांत शिरोळरोड स्टेशनाजवळ जवळ गेलों, तास रात्र झाली असेल नसेल, तों चोरट्यांच्या एका टोळीनें गांठून आमची गाडी लुटली. ह्या पेटींत कागदपत्र आहेत ते तुमच्या कांहीं उपयोगीं नाहींत, तेवढे द्या बाकी सारें घ्या म्हणून त्यांस सांगितलें; परंतु ते कसचे ऐकतात, सारें घेऊन गेले. त्यांणीं मारलेल्या दगडांनीं झालेल्या जखमांतूना रक्तस्राव होत असलेला बंद करण्याचा विचार पहाण्याकरितां आम्ही आधीं स्टेशन गांठलें. पोलिसास वर्दी दिली. चोरांनीं ट्रंक फोडली; कागदपत्र माळावर टाकून दिले एवढी कृपा केली. दुसरे दिवशीं कांहीं माल पोलिसास सांपडला आहे असें वर्तमान समजलें तेव्हां तो मिळण्याविषयीं यत्न आरंभला. अर्जावर अर्ज करतां करतां त्रासुन कंटाळून गेलों. मग कोल्हापुरास जाऊन डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेट साहेबांस समक्ष विनंति केली ती सफळ झाली. कागद हातीं आल्यावर लागलेंच छापण्याचें काम पुढें चालूं लागलें.

सर्व काम सन १९१० इसवी अखेर तरी पुरें होऊन जावें अशी आमची फार इच्छा होती परंतु आम्हांस छापखान्यांत हजर रहाण्याची सवड नसल्यामुळें तसें कांहीं घडलें नाहीं. एवढा पूर्वार्ध या अवधींत तयार होऊन बाहेर पडत आहे एवढेंच आम्ही विशेष समजतों. उत्तरार्ध लौकर प्रसिद्ध व्हावा म्हणून आम्ही होईल तेवढी खटपट करीत आहों.

एल्फिन्स्टन साहेब मोठा मुत्सद्दी, खरा राज्यकार्यधुरंधर, अशी त्याची जी कीर्ति गाजत आहे ती त्याच्या हातून पेशवाईचा शेवट लागला एवढ्यावरून नव्हे; तर, पुण्यास कमिशनर होऊन बसल्यावर त्याणें पेशव्यांच्या राज्याची जी व्यवस्था लाविली आणि पुढें मुंबई इलाख्याचा राज्यकारभार उत्कृष्ट प्रकारें करून सर्व खात्यांत दिवसें दिवस सुधारणा होण्याचे व मुलखाची भरभराट होण्याचे मार्ग रेखून देण्यांत जी दुर दृष्टि दाखविली त्याबद्दल होय. कमिशनर म्हणून करावयाचें होतें तेवढें काम आटोपून घरीं जावें अशी त्याची इच्छा होती. मुंबईइलाखाधिपति हें पद सहज प्राप्त होणारें नव्हतें. तें मिळण्याची त्याला कांहीं आशा नव्हती. त्याबद्दल त्याणें कांहीं खटपट केली नाहीं. त्या जागेवर

त्याचा कांहीं हक्क पोहोंचत नव्हता, परंतु कोर्ट ऑफ डायरेक्टर्सनें तेथें त्याची योजना आपण होऊन केली. त्या अधिकाराला तो सर्व प्रकारें अगदीं योग्य होता. त्याची कारकीर्द फारच नावांजण्यासारखी झाली. मुंबईनें त्याचें जें मोठें स्मारक केलें तें त्याचबद्दल. त्याच्या सर्व चरित्रांत त्याची मुंबईचा गव्हरनर असतांची कारकीर्द हाच भाग मुख्य आहे. तेव्हां तो पहाण्याची आमच्या प्रिय जिज्ञासु वाचकांस सहजच उत्कंठा लागून राहील. ती तो छापून प्रसिद्ध झाला म्हणजे पुरी होणार आहे. तेथपर्यंत, थोडा काल, दम धरावा अशी आमची त्यांस विनंति आहे.

हा ग्रंथ लिहिण्याचें मनांत आणून कामास आरंभ केल्यापासून तो सिद्धीस जाऊन हा पूर्वार्ध छापून निघेपर्यंत मध्यें फारच काळ गेला. तरी आतां तो प्रसिद्ध होत आहे, हें पाहून आम्हास संतोष वाटणें साहजिकच आहे. या कामीं आमच्या ज्या स्नेही मंडळींनीं व इतरांनीं आम्हांस साहाय्य केलें, त्यांचे आम्हीं आभार मानतों आणि त्यांस व आमच्या सर्व वाचकांस अशी विनंति करतों कीं, त्यांस यांत लेखक-प्रमाद, मुद्रण-दोष, वगैरे जें कांहीं न्यून दिसेल, त्याबद्दल कृपा करून सुचना करावी, म्हणजे पुढील आवृत्तींत तें दूर करण्याची तजवीज करण्यास बरें पडेल.

मुंबई, तारीख १<br>माहे जानेवारी सन १९११ } कृ. ब. गोडबोले.

# अनुक्रमणिका.



# एल्फिन्स्टनचरित्र.

## भाग १ ला.

## उपोद्घात.

ईस्ट इंडिया कंपनीच्या राज्यांत मुलकी खात्यांत पुष्कळ नोकर होऊन गेले, परंतु त्यांत धि ऑनरेबल मौंट स्टूअर्ट एल्फिन्स्टन् साहेबांहून अधिक लोकप्रिय असा कोणी झाला नाहीं. मराठेशाईतील गडबड मोडून पश्चिम हिंदुस्थानांत जेव्हां इंग्रजी अम्मल बसवून नवी व्यवस्था लावण्याचा प्रसंग आला, तेव्हां प्रथम वकिलीच्या कामावर असतांना व पुढें राज्य-कारभार करण्याच्या कार्मी त्यानें ह्या मुलखावर आपली छाप चांगलीच बसविली. तो मनाचा थोर व न्यायी होता आणि त्यानें विद्येस चांगलें उत्तेजन दिलें, अशी मुंबई इलाख्यांत इंग्रजलोक व आमचे लोकही त्याची अद्याप कीर्ति गात आहेत. त्यानें जो हिंदुस्थानाचा इतिहास लिहिला, त्यावरून ग्रंथकारांतही त्याचें नांव चिरस्थायी होऊन राहिलें आहे. तो कांहीं पूर्णायुषी नव्हता, परंतु बराच दीर्घायुषी होता; असें ह्मणण्यास हरकत वाटत नाहीं. त्याच्या वयाला ८० वर्षे होऊन गेल्यामुळें हिंदुस्थानभर इंग्रजी अम्मल कसा बसला तो बहुतेक सारा प्रकार त्याला पहावयास सांपडला. इसवी सन १७७९ मध्यें ह्मणजे वॉरन् हेस्टिंग्ज साहेब कलकत्त्यास पहिला गव्हरनर जनरल झाला त्यावेळीं जन्मास येऊन इ. स. १७९६ मध्यें

१५४–२०००

ह्मणजे टिप्पू पुरा पराजित होण्यापूर्वी, त्याचें हिंदुस्थानांत आगमन झालें. ड्यूक ऑफ वेलिंग्टन ह्या नांवानें जगद्विख्यात असलेल्या महावीराचा कीर्तिध्वज इ. स. १८०३ मध्यें समरांगणीं जेव्हां प्रथम फडकला, तेव्हां हा त्याच्या घोड्याबरोबरच आपला घोडा भरधांव सोडीत होता. पुढें त्याला पूर्ण अधिकार मिळाला, तेव्हां पुण्यास पेशव्यांचीं सारीं कारस्थानें बिघडून टाकून त्यांच्या फौजांचा त्यानें पराभव केला आणि त्यांचें सारे राज्य घेतलें.

मुंबई इलाखा पहिला अगदीं लहान होता, तो एल्फिन्स्टन साहेबाच्या हातानें विस्तार पावला आणि त्याची राज्यव्यवस्था कशी असावी तेंही त्यानेंच ठरविलें. तो घर सोडून जो एकदां इकडे आला, तो सतत तीस वर्षांहून कांहीं अधिक काळपर्यंत एकसारखी मोठ्या परिश्रमानें नोकरी बजाऊन स्वदेशीं परत गेला आणि मग बाकी राहिलेले आयुष्य स्वस्थपणें क्रमीत होता. कंपनी सरकारच्या पदरीं काम केलेली जी मंडळी होती, तींत हा चांगला माहितगार आणि शहाणा अशी त्याची ख्याति होती आणि पुष्कळ कामांत सरकार त्याचा अभिप्राय घेत असे. शिपायांचें भयंकर बंड झालें तें मोडून कंपनीसरकाराकडे असलेला राज्याधिकार महाराणीसाहेबांनीं खुद्द आपल्या हातीं घेतल्यावर पुढें सन १८५९ मध्यें त्याचें देहावसान झालें.

एल्फिन्स्टन साहेबाचें चरित्र वर्णन करावयाचें ह्मटलें ह्मणजे त्यांत दक्षिणदेशीं मराठ्याच्या राजसत्तेचा लोप होऊन इंग्रजांचा अम्मल कसा बसला तो इतिहास सहजच येतो. ह्मणून तो एक चरित्रनायक धरला तरी, एकोणिसाव्या शतकाच्या आरंभीं कंपनीसरकारच्या नोकरींत त्याच्यासारखे जे आणखी कांहीं निस्सीम भक्त होते त्यांना विसरतां कामा नये. लॉर्ड डलहौसी साहेब गव्हरनर जनरल असतांना तो आपल्या अचाट बुद्धीनें जी एक एक विलक्षण कल्पना काढी ती त्याच्या सभोंवतीं जमलेली प्रतापी मंडळी सिद्धीस नेई; त्याप्रमाणें त्यापूर्वी पन्नास वर्षे मार्किस ऑफ वेलस्ली साहेब गव्हरनर जनरल असतांना त्यानें आपल्या बुद्धिचातुर्यानें जो व्यूह रचला तो सिद्धीस नेणारी मंडळीही कांहीं सामान्य नव्हती. हिंदुस्थानांत जे इंग्रज लोक येतात त्यांत जे मोठे नशीबवान् असतात ते उदयास येतात, बाकीचे कोनाकोपऱ्यांत पडून असतात. ब्यारीक्लोज, वेब्बे, जेंकिन्स आणि आफाम ही त्या वेळची मंडळी कांहीं साधारण नव्हती; परंतु एल्फिन्स्टन साहेबाबरोबर, तो ज्या खात्यांत होता त्यात काम करून त्याच्यासारखें प्रसिद्धीस आलेले,

ह्मटले तर चार्लेस लॉर्ड मेटकाफ्, सर जॉन मालकम् आणि सर टॉमस मनरो, हे तिघेच. ह्या चौकडींतील कोणा एकाचें नांव निघालें कीं, बाकीच्या तिघांचें स्मरण व्हावयाचेंच. कारण, पुष्कळ गोष्टींत ते अगदीं एकासारखे एक होते; त्यांचें सख्य फार होतें आणि एकमेकांची योग्यता ओळखून ते परस्परांस फार मानीत असत. आपला उत्कर्ष व्हावा अशी त्या सर्वांची इच्छा होती, परंतु दुसऱ्याला मागें ढकलून आपण पुढें सरावें अशी वासना त्यांतल्या एकालाही झाली नाहीं; त्यांच्या स्नेहांत कधीं अंतर पडलें नाहीं आणि दुसऱ्यापेक्षां मी हुशार असें कोणाच्या मनांत आलें नाहीं; हा त्यांचा गुण खरोखरच वर्णन करण्यासारखा होता.

एकोणिसाव्या ख्रिस्ती शतकाच्या आरंभीं जे इंग्रजलोक कंपनी-सरकारच्या नोकरीवर होते, त्यांना ते दिवस सर्व प्रकारें अगदीं सोन्यासारखे होते. अगदीं हलक्या प्रतीच्या यःकश्चित कारकुनाला केवढ्या योग्यतेस चढतां येईल तें क्लाइव्ह आणि हेस्टिंग्ज यांनीं चांगलें निदर्शनास आणून दिलें होतें. कंपनीच्या नोकरांत लांचखाऊपणा हा एक मोठा व्याधि शिरला होता, परंतु त्याचें निदान आणि चिकित्सा होऊन उपशमही झाला आणि व्यापार हा जो त्यांचा पहिला मुख्य धंदा तो यावेळीं मागें पडला होता. गव्हरनर जनरलाच्या जागेवर इंग्लंडांतील मुत्सद्दीमंडळींतील पुरुषांची योजना होऊं लागली होती. त्याच्या हाताखालीं इकडील लोकांची चालचलणूक, भाषा वगैरे जाणणारे लोक असत; कारण, त्यांना पुष्कळ अंशीं अशांचीच मदत घ्यावी लागत असे. इकडील राजेरजवाड्यांशीं जसजसा अधिक निकट संबंध जडत चालला, तसतशी त्यांच्या दरबारीं बोलण्याचालण्याकरितां ठेव-ण्याला अधिक अधिक मनुष्यांची जरूर पडूं लागली. ही दरबारी वकील मंडळी पुढे पुष्कळच झाली आणि त्यांचें एक निराळें खातें होऊन त्यांतले कामदार फार प्रसिद्धीस येऊं लागले. त्यांना रेसिडेंट असें अभिधान प्राप्त झालें आणि वरचेवर युद्धप्रसंग येत गेल्यानें ते आपल्या कामांत फार निष्णात झाले. बंगाल व कर्नाटक हे दोन प्रांत खेरीज करून हिंदुस्थानांतील बहुतेक इतर प्रदेशांत इंग्लिशांचा प्रवेश नव्हताच म्हटलें तरी चालेल. इंग्रज केवळ अजिंक्य, असें इकडचे सारे लोक मानीत होते असें नाहीं; आणि ते ह्मणजे आपल्याला अतुलप्रतापी समजत होते असेंही नाहीं. टिप्पू आणि निजाम एक झाले, किंवा साऱ्या मराठे सरदारांची एक जूट झाली, तर कसा प्रसंग येईल

आणि काय अनर्थ घडेल याचें अनुमान करतां येत नाहीं असें त्यांना भय वाटत होतें; आणि शिवाय आणखी एक फार मोठी धास्ती पडली होती ती अशी कीं, पूर्वी शिकंदर पादशहानें एशियाखंडांत शिरून ज्याप्रमाणें प्रताप गाजविला, त्याप्रमाणें कीर्ति करण्याला आतां नेपोलियन बोनापार्ट उठला होता. तो इकडे आला तर आपली गति काय होईल, हा चिंताग्नि त्यांच्या हृदयांत अहोरात्र सारखा भडकत राहिला होता.

कंपनीच्या राज्याची अशी स्थिति असल्यामुळें तिच्या नोकरांना ईर्षेनें व झटून काम करावें लागे. त्यांची संख्या थोडी होती ह्मणून विलायतेहून कसे तरी मिळतील तितके अधिक लोक इकडे पाठवावे लागत. अशा समयीं हल्लींच्या मानानें ज्यांचें वय केवळ शाळेंत शिकत असण्याचें, अशा कित्येक इंग्रज व स्कॉच मुलांना चाकऱ्या देऊन तिकडून इकडे ढकलीत; आणि इकडचे अधिकारी येथें त्यांच्यावर जोखमाचींही कामे टाकीत. मालकम् चाकरी धरून इकडे येण्यास निघाला, तेव्हां सारा बारा वर्षांचा अगदीं कोंवळा पोर होता; आणि मद्रासेस दाखल होऊन कामावर हजर झाला तेव्हां त्याला कांहीं पुरीं चौदा वर्षें नव्हतीं. त्याचा खिलाडू, पोरस्वभाव अखेरपर्यंत कांहीं सुटला नाहीं. मेटकाफ् कलकत्त्यास जन्मास येऊन विलायतेस गेला आणि तिकडून कारकुनीची नोकरी पत्करून पंधराव्या वर्षी जन्मस्थानीं आला. एल्फिन्स्टन घरून निघाला तेव्हां त्याला पंधरावें वर्ष होतें आणि मनरोला अठरावें होतें. ह्या तिघांच्याही अंगावर थोडक्याच काळांत मोठ्या जबाबदारीचीं कामें पडलीं. नागपुरास मोठ्या कठाणसमयीं एल्फिन्स्टन साहेबाची रेसिडेंट ह्मणून नेमणूक होऊन रवानगी झाली तेव्हां त्याचें वय सारें चोवीस वर्षांचें होतें; आणि काबूलच्या दरबारीं तो वकील ह्मणून गेला तेव्हां त्याचें तिसावें वर्ष कांहीं संपलें नव्हतें. आतांसारखें तारेनें काम चालण्याचें बाजूस राहिलें, तेव्हां नुसती टपालाची सोय सुद्धां नीट नव्हती; त्यामुळें त्या तरुण वकील मंडळीला आपल्या बुद्धीच्या जोरावरच रहावें लागून पुष्कळ प्रसंगीं वरिष्ठांच्या हुकमाशिवाय कितीएक महत्वाच्या गोष्टींचा निकाल लावावा लागत असे. याप्रमाणें आरंभापासूनच त्यांच्या अंगावर जोखीम पडत गेलें असल्यामुळें ते चांगले दक्ष बनलेले असत आणि केव्हांही संकटसमय आला तर न डगमगतां त्यांतून पार पडत. खडकीच्या लढाईपूर्वी एल्फिन्स्टन साहेबावर आलेला प्रसंग कसला भयंकर होता आणि त्यांतून तो कसा पार

पडला हें सुप्रसिद्ध आहे. बाजीरावसाहेब आपल्याला फसवावयाला पहात आहेत—ते जें अफाट सैन्य जमवीत आहेत त्याचें कारण संगमावर आपल्याजवळ जी एवढीशी फौज आहे ती सहज चिरडून टाकतां यावी असा त्यांचा हेतु आहे, आपल्या शिपायांना फितूर करण्याची त्यांची खटपट चालू आहे आणि आपला प्राण घेण्याचाही डाव ते घालीत आहेत—असें त्याला पक्कें कळलें होतें. तरी तिकडे उत्तर हिंदुस्थानांत गव्हरनर जनरल जो व्यूह रचित होता त्याला यत्किंचित् विघ्न येऊं नये ह्मणून होतां होईल तेथपर्यंत निकरावर गोष्ट येऊं द्यावयाची नाहीं, असा जो त्यानें निश्चय केला होता तो सोडला नाहीं. अखेर चकमक झडली त्या दिवशीं सकाळपर्यंत शत्रूच्या मुठींत सांपडल्यासारखा राहून तो आपल्या बंगल्यांत नित्याप्रमाणें सारे व्यवहार स्वस्थपणें करीत होता.

त्याकाळच्या अँग्लो-इंडियन मंडळीमध्ये जसे बुद्धिवैभव दिसून येतें तसें शारीरसामर्थ्यही दिसून येतें. एका राजाच्या दरबारातून दुसऱ्या राजाच्या दरबारीं जावयाचे ह्मटलें ह्मणजे पुष्कळ लांब प्रवास करावयाचा असे. तो करतांना किंवा फौज घेऊन जावयाचें असे तेव्हां, ते उघड्यावर रहात; त्यामुळें छावणींत रहाणे, शिकारीकरितां जंगलांत रहाणें आणि दरबारीं राहणें ते सारखेंच समजत. मालकमसाहेबाचें धिप्पाड शरीर पाहून सारे आश्चर्य करीत. त्याला पाहिलेले लोक तो राक्षस होता असें ह्मणत. तो शिकारीचा इतका नादी होता कीं, एका समयीं तहाच्या बोलण्यांत गुंतलेला असतांना तेथून जवळच वाघ आल्याची बातमी आली, ती कानीं पडतांच तें काम तसेंच टाकून तो उठून चालता झाला असें सांगतात. औटरामसाहेब तरुण असतांना त्याच्या हाताखालीं होता, त्यानें त्याचा कित्ता वळवून मध्य हिंदुस्थानांत व्याघ्रादि हिंस्र पशु नाहींसे करून आणि त्यांतच राहणाऱ्या रानटी भिल्ल लोकांना जेरीस आणून शांतता केली. एल्फिन्स्टन साहेबानें वाघाची शिकार एकदां तरी साधावी ह्मणून पुष्कळ खटपट केली, परंतु त्याचा हेतु सिद्धीस गेलासें दिसत नाहीं. त्याला आमच्या इकडची बहिरीची शिकार आणि विलायती तऱ्हेचा पिग् स्टिकिंग् ( pig stiking ) खेळ फार आवडत असे. ह्या सर्व मनुष्यांच्या नशिबीं वकिलीच्या आणि राज्यकारभाराच्या कामांत पडण्याचें आलें, परंतु ते लष्करी खात्यांत शिरते तर समरांगणीं मोठी कीर्ति संपादते. मालकम् आणि मनरो या दोघांची कीर्ति गाजत आहे ती

कांहीं त्यांच्या पराक्रमाबद्दल नव्हे हें खरें, परंतु त्यांचा पेशा शिपाईगिरीचा होता आणि मालकम् जेव्हां आपली पलटण घेऊन महिदपूरच्या रणांगणीं चालून गेला तेव्हां घटकाभर त्याला जो आनंद झाला तसा पुनः केव्हांच वाटला नसेल. मनरोनें दक्षिणमहाराष्ट्र देश सर केला तेव्हां त्याच्याजवळ सगळें एक पलटणसुद्धां नव्हतें; ह्मणून हौस ऑफ् कॉमन्समध्यें क्यानिंग साहेबानें त्याची फार वाहवा केली. असईच्या आणि आरगांवच्या लढायांत तोफांचा धडाका चालला होता आणि गोळयांचा पाऊस पडत होता, तेव्हां एल्फिन्स्टन त्यांत कसा निर्भयपणें फिरत होता तें पाहून वेलिंग्टन त्याला ह्मणाला, गड्या चुकलास, तूं खरोखरी आमच्या खात्यांत यावयाला योग्य असून तें टाकून कारकुनी पत्करलीस; गैर केलेंस, असो. मेट्काफ् साहेबाची गोष्ट अशीच आहे. मनाचा कठोर आणि आपल्या कामांत निष्णात असा सेनापति लॉर्ड लेक पहिल्या पहिल्यानें त्याला अगदीं यःकश्चित् समजून 'कारकून बाळ' ह्मणत असे. परंतु दीगच्या किल्ल्यावर हल्ला झाला त्या प्रसंगीं त्या बाळानें त्याला आपल्या अंगचें पाणी दाखविलें, तेव्हांपासून मग त्याच्यावर त्याची मर्जी सुप्रसन्न झाली.

त्या वेळच्या कामदारांना आणखी एक मोठी सोय होती, ती आपल्याला नाहीं ह्मणून आतांचे कामदार आपल्याला कमनशिबी मानून हळहळत असतील. हल्लीं ह्यांच्यावर कामाचें सतत सारखें ओझें पडल्यानें हे जसे त्याखालीं दडपून जाऊन निस्त्राण आणि निरुत्साह होतात तसे ते होत नसत. हल्लीं एकादा प्रवास करणें झालें तर तो जितक्या दिवसांत होतो, तितके महिने तेव्हां तेवढ्याला पुरत नसत. एल्फिन्स्टन साहेबाची नेमणूक पहिल्यानें बनारसेस झाली तेव्हां तो कलकत्त्याहून तिकडे जावयास निघाला, तो दोन महिन्यांनीं जाऊन पोहोंचला. पुढें त्याची नेमणूक पुण्यास झाली. तेव्हां कलकत्त्याहून निघून तेथें पोहोंचण्याला त्याला अकरा महिने लागले. तो सरळ वाटेनें गेलाच नाहीं, हवा तसा रमत रमत चालला होता. त्यावेळीं दुसरें असें होतें कीं, एकदां जाऊन जागेवर बसलें कीं, रोजचें काम असेल तेवढें केलें ह्मणजे मग आपलें खुशाल स्वस्थ पडावयाला सांपडत असे. आतांसारखे पेट्या भरभरून कागद येत आहेत, ते वाचावे आणि रिपोर्ट करावे हा त्रास नव्हता. आतांच्या अम्मलदारांना तारेनें प्रश्न येतात, वर्तमानपत्रांतून त्यांच्या कामावर टीका चालते, पार्लमेंटांत प्रश्न निघतात आणि

सुटीच्या दिवसांत हिंदुस्थान पाहण्याकरितां युरोपांतील लोक फिरत येतात, त्यांतले कोणी भेटावयाला आले तर त्यांचें आगतस्वागत करावें लागतें. त्या वेळीं असला कांहीं एक त्रास नव्हता, त्यामुळें त्यांना पुष्कळ वेळ सांपडे आणि त्याचा पुष्कळ असामी फार चांगला उपयोग करीत. त्यांना सहज आणि चांगलें लिहितां येई; कारण, त्यांच्यावर जीं कामें पडत तीं त्यावांचून होणारींच नसत. इकडच्या भाषा त्यांना चांगल्या येत त्याचेंही कारण तेंच होतें. परंतु ते इकडे येत तेव्हां अगदीं अल्पवयस्क असल्यामुळें अर्थातच चांगले शिकले-सवरलेले नसत; असें असून पुढें विद्याव्यासंग केवढा करीत तें पाहिलें ह्मणजे मोठें आश्चर्य वाटतें. कलकत्त्याहून पुण्याला जातांना वाटेनें अकरा महिन्यांत आपण काय काय वाचले ते एल्फिन्स्टन साहेबानें लिहून ठेविलें आहे; ती लांब याद पाहिली ह्मणजे तो प्रति मेकॉले होता असें वाटतें. त्या वेळीं त्याचें वय पाहिलें तर सारें २१ वर्षांचें होतें. असईच्या लढाईनंतर सात आठ दिवसांनीं त्यानें आपल्या एका मित्राला पत्र पाठविलें होतें. त्यांत तो ह्मणतो:–" मी हल्लीं सारा शेक्सपीयर ( अर्थात् त्याचे ग्रंथ ) लक्षपूर्वक वाचीत आहें. मला जें पुस्तक मिळाले आहे तें नामी आहे; त्यांत टीप ह्मणून कशी ती मिळावयाची नाहीं आणि त्यामुळें मला कोठें कांहीं अडत नाहीं." पुढें पुढें तो बाहेर फिरावयास जाई तेव्हां त्याच्याबरोबर दोन उंट बुकांनीं लादलेले असत आणि तीं अशीं नीट व्यवस्थेनें लावलेलीं असत कीं, त्यांतून जें पाहिजे तें, पाहिजे तेव्हां, चट्कन काढून घेतां येई. एल्फिन्स्टनकृत हिंदुस्थानचा इतिहास, मालकमकृत इराणचा इतिहास, ग्र्यांटडफकृत मराठ्यांचा इतिहास, इत्यादि पुष्कळ ग्रंथ निर्माण होऊन हिंदुस्थानांतील कामदार मंडळीच्या हातून त्याकाळीं इंग्रजी ग्रंथभांडारांत बरीच भर पडली.

कंपनीसरकारच्या ह्या नोकर मंडळीला हिंदुस्थानांत ज्या सर्वांत मोठ्या जागा होत्या त्या मिळाल्या एवढेंच नाहीं; तर त्यांची विलायतेसही मोठी वाहवा झाली, हें पाहून संतोष वाटतो. कोर्ट ऑफ डायरेक्टर्सनें बाकीच्यांना बाजूस ठेऊन एल्फिन्स्टन साहेबाला मुंबईचा गव्हरनर नेमिलें. त्यावेळीं त्याचें वय ३९ वर्षांचें होतें. तो पेन्शन घेऊन घरीं बसल्यावर गव्हरनर जनरलची जागा पत्करण्याबद्दल त्याला दोन तीन वेळ आग्रह झाला परंतु तो ती नकोच ह्मणाला. ही जागा लॉर्ड टेन्मौथ आणि लॉर्ड लॉरेन्स यांच्या दरम्यान कंपनीच्या दुसऱ्या कोणत्याही नोकराला मिळाली नाहीं. मेटकॉफ बारा

महिने ॲक्टिंग गव्हरनर जनरल होता. पार्लमेंटांतील तटामुळें त्याची त्या जागीं कायमची नेमणूक झाली नाहीं. परंतु एका मोठ्या वसाहतींत कठीण प्रसंग आला, तेव्हां प्रधान मंडळीनें त्याला तेथें गव्हरनर नेमिलें. असें दोनदां झालें आणि शेवटीं लॉर्ड ही पदवी मिळून त्याची योग्य संभावना झाली. मुलकी खात्यांत काम केलेल्या कोणाही अंग्लो इंडियनाला सी. बी. (Companion of the Bath) हा किताब मिळाला नव्हता, तो प्रथम मालकम् साहेबाला मिळाला तेव्हां त्याला फार आनंद झाला. पुढे एल्फिन्स्टनच्या जागीं मुंबईस त्याची नेमणूक झाली. मनरो मद्रासचा गव्हरनर झाला. त्याला के. सी. बी. पदवी मिळाली आणि बॅरोनेट (सर) असा किताब मिळाला.

मराठेशाईचा विध्वंस करून हिंदुस्थानभर इंग्लिशांची सत्ता प्रबळ करण्यास वेलेस्ली साहेबाच्या शिक्षणानें तयार झालेल्या ज्या मंडळीनें यथाशक्ति हातभार लावला, तींतले प्रमुख पुरुष अशा प्रकारचे होते. त्यांतून महाराष्ट्राशीं ज्याचा निकट संबंध आणि त्यावर ज्याचें प्रेम बसलें होतें, महाराष्ट्रांतील आबालवृद्धांच्या तोंडीं ज्याचें नांव खिळून गेलें होतें, त्यांत ज्याची कीर्ति खचित चिरकाल राहील, त्याचें चरित्र आमच्या महाराष्ट्रीय देशबंधूस स्वभाषेत असणें अवश्य वाटेल असें समजून तें यथामति लिहितों.

---

## भाग २ रा.

# हिंदुस्थानांत आगमन.

### इसवी सन १७७९–१७९९.

नामदार मौंट स्टुअर्ट एल्फिन्स्टन साहेबाचा जन्म तारीख ६ आक्टोबर सन १७७९ इसवी रोजीं झाला. तो कोणत्या ठिकाणीं हें समजावें ह्मणून त्याचे चरित्रकार सर टी. ई. कोलब्रूक साहेब यांनीं पुष्कळ शोध केला, परंतु त्यांना त्याबद्दल कोठें कांहीं लेख मिळाला नाहीं. जन्मतिथीचा मात्र कांहीं संशय वाटत नाहीं; कारण, हैदराबाद मुक्कामीं त्यानेंच आपल्या

रोजनाम्यांत असें लिहिलें आहे:—' आक्टोबर तारीख ६. आज माझा वाढदिवस असे मला सांगितलेलें आहे. आतां मी २२ बेवीस वर्षांचा झालों.'

एल्फिन्स्टन घराण्याला स्कॉटलंडांत सरदारी मिळालेली होती. सनदापत्रें वगैरे घराण्याच्या माहितीचे कागदपत्र पुष्कळ मिळाले; त्यांत एक सनद सन १२५० मधली होती, परंतु पुढची विश्वसनीय अशी माहिती सर उइलियम डी. एल्फिन्स्टन या पुरुषापासून मिळते, मागची मिळत नाहीं. तो सन १३९७ च्या पूर्वी वारला. जनरल लॉर्ड एल्फिन्स्टन हा त्या मूळ पुरुषापासून अकरावा. त्यानें लॉर्ड रुथवेन याच्या कन्येस वरिलें, ह्या दंपत्याला आठ अपत्यें झालीं; चार पुत्र आणि चार कन्या. पुत्रांतला कनिष्ठ मौंट स्टुअर्ट. हाच आमचा चरित्रनायक होय.

ह्या घराण्याला एल्फिन्स्टन हें नांव त्याच्या गांवावरून पडलें. तो गांव ईस्ट लोथिअन प्रांतांत ट्रानेटजवळ आहे. त्यांत एक मनोरा अद्याप उभा आहे; त्याची फारशी पडापड झालेली नाहीं. तो चौदाव्या किंवा पंधराव्या शतकांत बांधलेला असावा. पुढें तो गांव सोडून एल्फिन्स्टन घराणें डंबरटनशायरमध्यें कंबरनाल्ड येथें राहूं लागलें. मौंट स्टुअर्टच्या आजाचें लग्न फ्लेमिंग्ज घराण्यांतील विग्टनच्या सहाव्या अर्लाच्या कन्येबरोबर झालें. ती बापाची एकुलती एक ह्मणून त्याची वारस झाली, तेव्हां हा गांव तिच्याबरोबर जांवईबुवांकडे आला. तिची आई लेडी मेरी कीथ ही स्कॉटलंडांतील मारिस्कलच्या अर्लाची कन्या असल्यानें त्याचाही वारसा तिच्याचकडे आला होता.

याप्रमाणें मौंट स्टुअर्टचा जन्म मातृपक्षाकडून आणि पितृपक्षाकडून स्कॉटलंडच्या इतिहासांत सुप्रसिद्ध असलेल्या कुळात झाला होता. सर उइलियम एल्फिन्स्टनचा नातू अलेक्झांडर इ० स० १४३५ मध्ये इंग्लिश आणि स्कॉच लोकांची लढाई झाली तींत पडला. सन १५०९ मध्ये अलेक्झांडर एल्फिन्स्टन ह्याला लॉर्ड ही पदवी मिळाली. तो फॉडेनच्या लढाईंत पडला. दुसरा लॉर्ड एल्फिन्स्टन पिंकीच्या लढाईत पडला. सन १५०६ मध्यें अबरडीनचें विश्वविद्यालय ज्यानें स्थापलें आणि छापण्याची कला स्कॉटलंडात ज्याने आणली तो बिशप ह्याच एल्फिन्स्टन घराण्यापैकीं होता. ह्याच घराण्यांतील आणखी एका शाखेला लॉर्ड बाल्मेरिनो अशी पदवी मिळाली. परंतु स्टूअर्ट घराण्यांतील राजांचा पक्ष धरून त्यांवर विशेष भक्ति दाखविल्या-

मुळें तींतल्या सहाव्या लॉर्डाचा शिरश्छेद होऊन तिची समाप्ति झाली. मौंट स्टुअर्टचा बाप कानड्यामध्यें ऊल्फ साहेबाच्या हाताखालीं होता. तेथें लढतांना त्याला मानेंत गोळी लागली. त्याचा एक चुलता आरमारांत नोकरीस राहिला. त्यानें फ्रेंचांबरोबरच्या लढाईत नांव करून लॉर्ड कीथ ही आपल्या घराण्यांतील गेलेली पदवी पुनः मिळविली. मौंट स्टुअर्टचा वडील भाऊ लष्करांत नोकरी धरून वाढत वाढत जनरल झाला. दुसरा भाऊ आरमारांत गेला, तोही बराच वाढला आणि अखेर चेल्सी हॉस्पिटलाचा गव्हरनर झाला. त्याचे चुलत भाऊ त्याच खात्यांत गेले आणि त्यांतले दोन बुडून मेले. ह्याप्रमाणे ह्या घराण्याचा शिपाईगिरीचा बाणा पिढीनपिढी सारखा चालत आला. त्याला अपवाद ह्मटला तर त्याचा चुलता उइलियम एल्फिन्स्टन. तो व्यापारात शिरून ईस्ट इंडिया कंपनीच्या एका गलबताचा मुख्य कामदार होऊन कांहीं दिवस मालाची ने आण करीत होता आणि मग ३३ वर्षेपर्यंत त्या कंपनीचा एक डायरेक्टर होऊन बसला होता.

आपल्या पूर्वजांच्या पराक्रमाच्या गोष्टी ऐकून आपणही त्यांच्यासारखा लौकिक मिळवावा असें मौंट स्टुअर्टच्या मनांत येई. तो सरदार कुळांत जन्मलेला होता खरा, परंतु त्याला त्या गोष्टीचा काडीयेवढा देखील गर्व नसे. मनुष्याच्या अंगच्या गुणाप्रमाणे तो त्याची योग्यता मानीत असे. तरी प्राचीन स्कॉटिश सरदार मंडळीच्या स्वभावास अनुरूप असे उद्गार त्याच्या भाषणांत व पत्रांतही येत. रणांगणीं उभें राहून पराक्रम करणाराची योग्यता फार मोठी असे तो ह्मणे. कुलपरंपरेने चालत आलेला आपला हातीं शस्त्र धरण्याचा धंदा सोडून काका दुकानदारींत शिरला हें कांहीं त्यानें चांगलें केलें नाहीं, असें तो एकदां हसत हसत, रोष मुद्रा दिसूं न देतां बोलला. लहानपणीं त्याला असे वाटे कीं, आपण शिपाईगिरी करावी. एकदा तो आपल्या एका मित्राला ह्मणाला, माझ्या मनांत सारा वेळ असें येतें कीं, आपण अशा मोठमोठ्या लढाया माराव्या कीं त्यांच्यापुढें आजपर्यंत ज्या मोठ्या मोठ्या लढाया ह्मणून प्रसिद्ध आहेत त्या तुच्छ वाटाव्या. दुसऱ्या एका प्रसंगीं तो ह्मणाला, आपण कीर्ति मिळवावी असें तरुणपणीं सर्वांना वाटत असतेंच. असो; याप्रमाणें त्याच्या अंगांत शिपाईगिरीचें पाणी खेळत होतें आणि जेव्हां प्रसंग येई तेव्हां तें चांगलेंच दिसे. कारण, त्यावेळीं कंपनीच्या नोकरीची अशीच स्थिति होती कीं, कारकुनाला केव्हां हातची लेखणी ठेऊन

तलवार धरावी लागेल याचा नेम नव्हता. शौर्य हा त्याच्या अंगीं एक उपजत गुण होता, परंतु तो त्याचें तेज पडण्याच्या मार्गास न लागल्यामुळें त्याबद्दल त्याची कांहीं कीर्ति झाली नाहीं; ज्या इतर गुणांनीं झाली ते आतां क्रमाक्रमानें वर्णन करण्यांत येतीलच.

मौंट स्टुअर्टचें बाळपण कांहीं दिवस कंबर्नाल्ड येथें व कांहीं दिवस एडिंबरो येथें गेलें. त्याचा बाप कांहीं दिवस एडिंबरो किल्ल्याचा गव्हर्नर होता तेव्हां तो त्यांतच रहात असे. त्यानें आपल्या आईला आणि बहिणींना लिहिलेल्या पुष्कळ पत्रांत कंबर्नाल्डविषयीं उल्लेख आहे. परंतु त्याचें बाळपण कसें गेलें, याविषयीं जे काय लेख मिळतात ते तो एडिंबरो येथें असल्या वेळचे मात्र. त्या किल्ल्यांत पुष्कळ फ्रेंच लोक कैदेंत ठेविलेले होते, त्यांच्याशीं तो बोलत बसे. ते राज्यक्रांतीचीं गाणीं गात तीं त्यानें पाठ केलीं होतीं आणि केंस त्यांच्यासारखे लांब राखिले होते. त्याला तीं गाणीं फार आवडत आणि तीं ह्मणत हिंडण्याची त्याला मोठी मौज वाटे. किल्ल्यांतल्या वृद्ध वृद्ध राजनिष्ठ अम्मलदारांना तें पाहून संताप येई, परंतु तो किल्लेदाराचा मुलगा पडला, ह्मणून गय करीत; नाहीं तर थपडाच देते. एकंदरींत पहातां त्यावेळीं त्याचा स्वभाव आनंदी असून त्याला थट्टामस्करी, विनोद इत्यादि प्रिय होतीं असें दिसतें.

मौंट स्टुअर्ट अकरा वर्षांचा होईपर्यंत अभ्यास घरींच करीत असे; बारावें वर्ष लागल्यावर थोडे दिवस एडिंबरो येथील हायस्कुलांत जात होता. फ्रान्सिस हारनर आणि लॉर्ड मरे हे त्या वेळचे त्याचे सहाध्यायी आणि मित्र होते. तेथून निघून तो केन्सिंग्टन येथील खासगी शाळेंत जाऊं लागला. त्या शाळेची बरीच प्रशंसा होती. हिंदुस्थानांत येण्याला निघेपर्यंत ह्मणजे सुमारें दोन वर्षें तो तींतच होता; परंतु अभ्यास झटून करीत होता असें दिसत नाहीं. त्याच्याविषयीं कांहीं असामींनीं असें म्हटलेलें आहे कीं, तो बुद्धीचा चलाख होता; कोणताही विषय असला तरी तो त्याच्या मनांत तेव्हांच भरे, परंतु तो थोडासा आळशी होता. त्याला नीट शिस्तीनें अभ्यास करावयाला नको असे; उडत उडत वाचण्याची फार हौस असे. त्याला गम्मत करावयाला आवडत असे आणि आपल्या बरोबरीचीं मुलें जमवून त्या टोळीचा आपण पुढारी होत असे.

मौंट स्टुअर्टचें अध्ययन अशा प्रकारें चाललें असतांना त्याला पंधरावें वर्ष

लागलें; तेव्हां त्याच्या बापाच्या मनांत त्याला चाकरींत गुंतवावें असें येऊन त्यानें आपला बंधु उइलियम याजकडे गोष्ट काढली. त्यानें त्याला कारकुनाची जागा देऊन बंगाल्यांत पाठवून देतो ह्मणून सांगितले. त्याला लष्करी खात्यांत शिरण्याची हौस होती असें मागें सांगितलें आहे, परंतु चुलत्यानें कारकुनीवर ढकललें ह्मणून कांहीं वाईट वाटले नाहीं असे त्यानें आपल्या आईला जें तेव्हांच ह्मणजे सन १७९५ च्या मार्च महिन्यांत पत्र लिहिलें त्यावरून सिद्ध होतें. तो ह्मणतो:—

"आई, काकानें माझी नेमणूक बंगाल्यांत केली आहे. हें तुला कळवण्याला मला फार आनंद वाटतो. गेल्या शनिवारीं त्यानें मला घरी बोलाऊन नेलें होतें आणि असें सांगितले कीं, आणखी दीड महिन्यानें आमचीं गलबतें जावयाचीं आहेत त्यांतून तुला पाठवितों. तेथपर्यंत अक्षर नीट वळीव आणि हिशेब चांगले करावयाला शीक. आतां ग्रीक पुरे....आई, तुला खरेंच सांगतों कीं, काकाने ही जागा दिली याचा मला मोठा संतोष वाटतो. कारण, लष्करी खात्यांत मोठमोठाले मान आहेत खरे, परंतु ते सारे एकीकडे आणि ही बंगाल्यांतली चाकरी एकीकडे. हिची सर त्यांना कधीं यावयाची नाहीं. परंतु मला सगळ्यांत अत्यंत वाईट वाटतें तें एवढेंच कीं, आतां निघण्याला अवकाश थोडा उरला; स्कॉटलंडांत येतां येत नाही आणि त्यामुळें तुला आणि बहिणींना भेटावयाला मिळण्याचा संभव नाहीं."

"जर माझी नेमणूक झाली तर लष्करांत जाण्याची गोष्ट कधींही माझ्या मनांत येणार नाहीं."

त्याची निघण्याची तयारी होऊन जून महिन्यांत तो गलबतावर चढला. त्यानें आपल्या आईला पत्र लिहिलें त्यांत आपण बरोबर घेतलेल्या मोठमोठ्या पुस्तकांचीं नांवें लिहिलीं. त्यांत काव्यें, नाटकें, कादंबऱ्या वगैरे ग्रंथांचा समावेश होता. त्याचा मजकूर संपल्यावर पुढें त्याच्या दादांनीं लिहिलें:— "ह्या पशूला किती सांगितलें तरी हा नीट लिहीत नाहीं आणि ह्या घाणेरड्या बुकांशिवाय लिहावयाला ह्याला दुसरा कांहीं मजकूर नाहीं."* असो. त्या

* ह्याच पत्रांत दादांनीं त्याची तसबीर पेन्सिलीनें काढून तयार होत असल्याचें लिहिलें. कोलब्रूककृत चरित्रांत आरंभीं जें चित्र दिलें आहे तें त्याच तसबिरीवरून छापलेलें आहे.

वडील दादांनीं त्याला पोर्टस्मौथ बंदरापर्यंत पोहोंचविलें. वारा प्रतिकूल असल्यामुळे लागलेंच निघणें झालें नाहीं. तेथें थोडे दिवस राहून वेरिंग्टन नामक गलबतांत बसून त्यानें हिंदुस्थानचा मार्ग धरला. त्याचा चुलत भाऊ जॉन आडाम आणि रॉबर्ट हूस्टन त्याच गलबतांत त्याच्याच खोलींत होते. ते दोघेही पुढें मोठ्या योग्यतेस चढले. आडाम कांहीं महिने ॲक्टिंग गव्हरनर जनरल झाला होता आणि हूस्टन आडिस्कोंबी येथील लष्करी पाठशाळेचा गव्हरनर झाला. मौंट स्टुअर्टला गलबत नेहमीं लागे. तशांत हें पर्यटण दूरचें पडल्यानें तो अगदीं बेजार होऊन गेला. त्यांना हिंदुस्थानांत येण्याला आठ महिन्यांवर दिवस लागले. तें गलबत सहा आठवडेपर्यंत रिओ-जानेरो येथे थांबलें आणि सुमारें तितकेच दिवस मद्रासेस राहिलें. तेथून निघून तारीख २६ फेब्रुआरी सन १७९६ इसवी रोजीं कलकत्त्यास पोहोंचलें. मद्रासचा गव्हरनर लॉर्ड होबर्ट यानें त्यांचें आदरातिथ्य फार चांगलें केलें. तेथून एल्फिन्स्टननें आपल्या आईला पत्र लिहिलें. त्यांत तो ह्मणतो:—"मला मद्रास फार आवडलें. स्वदेशांत तुझ्याजवळ भावाबहिणींत रहाण्याचा सुदैवानें योग जमता तर बरें होतें असें मला अगदीं मनापासून वाटतें. हिंदुस्थान मला प्रथम वाटलें होतें त्यापेक्षां पुष्कळ चांगलें आहे."

त्या वेळीं कलकत्त्यास सर जॉन शोअर गव्हरनर जनरल होता, (ह्याला पुढें लॉर्ड टेनूमौथ हें नांव प्राप्त झालें.) आणि सर रॉबर्ट आबरक्रांबी कमांडर इन् चीफ् होता. मौंट स्टुअर्टचा चुलता ॲडमिरल कीथ यानें त्या दोघांनाही पत्रें दिलीं होतीं; त्यांत त्या तिघांवर चांगली कृपादृष्टि ठेवण्याविषयीं लिहिलें होतें. मौंट स्टुअर्टचा भाऊ जेम्स, त्याच्यापूर्वीं दोन वर्षें इकडे आलेला होता; तो त्याला भेटण्याकरितां कलकत्त्यास गेला आणि तेथून दोघे मिळून जलमार्गानें बनारसेस जाण्यास निघाले. ते दोन महिन्यांनीं तेथें पोहोंचले. हा ४२० मैल प्रवास करण्यास त्यांना इतके दिवस लागले. पुढें कांहीं दिवसांनीं गव्हरनर जनरलाला तेथें लढाईची तयारी करण्याकरितां ह्मणून जावें लागलें तेव्हां तो सहा दिवसांत गेला.

बनारस हें त्या वेळेस इंग्लिशांचें वायव्येकडील सरहद्दीवरील ठाणें असून राजकारस्थानाची मोठी जागा होती, ह्मणून तिचें महत्व फार होतें. मौंट स्टुअर्टची नेमणूक सुदैवानें त्या ठाण्यांत, मिस्टर डेव्हिस नामक मॅजिस्ट्रेट होता त्याच्या हाताखालीं झाली. हा डेव्हिस हुशार असून विद्वान् होता. त्याला

संस्कृत भाषेचा नाद होता. हिंदु ज्योतिषशास्त्र कसें आहे ते इंग्लिश लोकांच्या नजरेस प्रथम त्यानें आणून दिलें. मौंट स्टुअर्ट त्याला फार मानीत असे. त्याचा भाऊ जेम्स तेथून जवळच मिरझापूर येथे होता. त्याचा वरिष्ठ जज्ज कोलब्रूक होता. तो मोठा विद्वान्, संस्कृतांतला पंडित अशी त्याची इंग्लिश लोकांत कीर्ति आहे. डेव्हिस साहेबाच्या हाताखालीं एड्वर्ड स्ट्राची ह्मणून एक विद्याव्यासंगी मनुष्य होता, त्याचा आणि मौंट स्टुअर्ट याचा स्नेह जमला आणि तो दिवसेंदिवस वाढत गेला.

त्या वेळीं कंपनी मुलकी खात्यांत जे नोकर ठेवी त्यांची कांहीं परीक्षा घेत नसे. विलायतेंत नेमणूक होऊन कारकून इकडे आला कीं, त्याची कोठें तरी योजना होई. मग त्याची हुशारी दिसून आली तर त्याला जबाबदारीचें काम लौकरच मिळे आणि तो योग्यतेस चढण्याच्या मार्गाला लागे. परंतु एकंदरींत ती तऱ्हा कांहीं चांगली नव्हती. कंपनीला राज्याधिकार मिळाला मात्र आणि मग तिच्या नोकरांना लौकर श्रीमंत व्हावें अशी इच्छा उत्पन्न होऊन त्यांनीं जीं कृत्यें आरंभिलीं तीं ऐकिलीं ह्मणजे अंगावर कांटाच येतो. त्यांच्या त्या घोर कर्मांमुळें कंपनीसरकारचें राज्य बुडण्याच्या घाईस आलें, तेव्हां त्यांच्यामध्यें अनीति आणि अन्याय किती वाढला असेल याचें अनुमान करावें. अल्पवयी तरुण बांडांना मोठमोठे अधिकार मिळत आणि ते मुलखात मनसोक्त लूट करीत. चाकरीस ठेवते वेळीं त्यांच्याशीं जे करार झालेले असत, ते असे विलक्षण कीं, आपल्या ह्या कृत्यांनीं चाकरी जाईल, असें त्यांना मुळींच भय वाटत नसे; आणि आपला खासगी ह्मणून त्यातल्या त्यांतच निराळा व्यापार करून, पैसा मिळविण्याला त्यांना सररहा परवानगी असे. त्यामुळें कांहीं दिवस असा कहर उसळला होता कीं, न भूतो न भविष्यति. परंतु त्याचा परिणाम काय होईल हें मनांत आणून कांहीं दूरदर्शी पुरुषांनीं तो प्रकार बंद करण्याचें ठरविलें. त्याप्रमाणें अम्मलबजावणी चालतां चालता लॉर्ड कॉर्नवालीस साहेबाच्या कारकीर्दींत बरीच सुधारणा झाली. स्वत: त्याची वर्तणूक अगदीं निर्मळ असल्यानें त्याची दहशत चांगली बसली आणि ताबेदार मंडळी बरीच नीतीनें वागूं लागली. तरी तेवढ्यानें झालें नाहीं. राज्यकारभार नीट चालण्याला आणखी पुष्कळ गोष्टी व्हावयास पाहिजे होत्या. नवीन नेमणुका होऊन विलायतेहून जे कारकून ह्मणून येत तीं अल्लड पोरें असत. त्यांना काम करतां यावें ह्मणून कांहीं दिवस तरी

शिकवून तयार करावें असें मनांत आणून लॉर्ड वेलेस्ली साहेबानें कलकत्त्यास कॉलेज स्थापन केलें. त्याची अवश्यकता दाखविण्याकरितां त्यानें जो विलायतेस खलिता पाठविला त्यांत असें म्हटलें होतें कीं, तुह्मी कारकून ह्मणून सोळा सोळा सतरा सतरा वर्षांचीं पोरें इकडे पाठवितां, त्यांचें शिक्षण कितीसें झालेलें असणार? त्यांपैकीं बरेच असामी व्यापारी कामाच्या मात्र उपयोगीं पडेल असें थोडेंसें शिकलेले, किंवा आईबापांना जड झालेले असतात; ते येथच्या हरकामीं उपयोगी कसे यावे? असो; मौंट स्टुअर्ट इकडे आला तेव्हां कंपनीच्या नोकरांत अशांचीच गर्दी फार होती. ही कंपनीला लागलेली ठोकर असें त्यांना म्हणण्याची वहिवाट पडली होती आणि त्यांत कांहीं गैर नव्हतें. त्या तरुण मंडळीने कुमार्गानें वागण्यास प्रवृत्त व्हावें अशा गोष्टी पुष्कळ असत, परतु त्यांपासून त्यांना परावृत्त करण्याचे उपाय मात्र योजलेले नव्हते.

अगदीं अल्पवयी मुलांना कंपनीसरकार मोठमोठीं कामें देई, त्यापासून जशा अनिष्ट गोष्टी पुष्कळ घडत तशा कांहीं चांगल्याही घडत. अल्पवयांतच अंगावर जोखमाचें काम, हातांत अधिकार आणि अयोग्य वर्तन करण्याकडे मन वळण्याचे प्रसंग पुष्कळ, अशा स्थितींत असून वांकड्या वाटेनें जावयाचें नाहीं असा ज्यांचा निग्रह होतो, त्यांची योग्यता थोर ह्मटली पाहिजे. ही कोणत्याही प्रकारच्या शिक्षणाने प्राप्त होणारी नसते. मौंट स्टुअर्टला पहिल्या नेमणुकीबरोबरच जी स्थिति प्राप्त झाली, ती त्याची योग्यता वाढण्यास अनुकूल होती आणि पुढें लौकरच त्याच्या बुद्धीला जी प्रगल्भता आली ती तीमुळेंच असें ह्मणावेंसें वाटतें.

बनारसेस असतांना मौंट स्टुअर्ट कालक्रमण कसें करीत असे व तेव्हांच्या इंग्लिश मंडळींची स्थिति कशी होती, याविषयीं त्याच्या रोजनाम्यांत आणि पत्रांतून पुष्कळ ठिकाणीं उल्लेख आहेत. नुकतेच नोकरीवर रुजू झालेले अल्पवयी कारकून बहुतकरून लौकरच कर्जबाजारी होत. मौंट स्टुअर्टची तीच दशा झाली आणि तींतून मुक्त होईतों पुढें पुष्कळ वर्षेंपर्यंत त्याची ओढाताण चालली होती. तो आपल्या पैशाला कधींच नीट जपला नाहीं. बनारसेस आल्यावर तो पद्धतशीर वागूं लागला आणि मग तो क्रम आमरण तसाच चालला होता. तो ग्रीक भाषेचाही अभ्यास झटून करूं लागला. त्याला एकांत स्थळीं, अगदीं एकटें, क्वचित् कोणा लेह्याला बरोबर घेऊन;

वाचीत बसणें आवडत असे. त्याच्या सन १८२० च्या रोजनामग्यांत असा लेख आहे:—" आज मला कशावरूनसें मिरझापुराजवळच्या खोऱ्यांतील गुहेचें आणि मी तींत बसून व्हर्जिल, होरेस आणि टिबलस यांचे ग्रंथ वाचीत आणि रॉसबरोबर बोलत बसे त्या दिवसांचें चांगलें स्मरण झालें. त्यावरून माझें त्या काळचें काम, वाचन आणि विचार काय होते तें आठवूं लागून सन १८११ मध्यें पुण्यास गेलों तेथपर्यंतच्या गोष्टी दोन तासपर्यंत मनांत घोळत होत्या."—फारसी भाषेचा अभ्यास त्यानें बनारसेसच सुरू केला. त्यावेळीं इंग्लिशमंडळींत दारू व जुवा या दोन व्यसनांचें प्राबल्य फार झालें होतें. त्याला त्या खेळाचा मनापासून तिटकारा होता. परिवारातली, बरोबरीची मंडळी अशा प्रकारची व्यसनी असतां, त्यांच्या संगतीस न लागतां तो वाचनांत निमग्न होऊं लागला ही गोष्ट कांहीं लहान नव्हे.

पानपतच्या लढाईत मराठ्यांचा मोठाच नाश होऊन ते अगदीं धुळीस मिळाल्यासारखे दिसत होते, परंतु थोड्याच काळांत सांवरले आणि दिल्लीच्या मोगल बादशाहाला आपल्या ताटाखालचें मांजर करून ठेऊन हवा तसा अम्मल चालवूं लागले; तेव्हां यांची पुन: खोड मोडली पाहिजे असें मनांत आणून अफगाण बादशहा झमानशहा हा हिंदुस्थानावर स्वारी करण्याची तयारी बरेच दिवस करीत होता; तो आतां खास येतो असें वाटून सन १७९६ मध्यें सर्वांना मोठी धास्ती पडली होती. तो दिल्लीस आला तर आपली धडगत नाहीं असें इंग्रजांनां वाटूं लागलें होतें. कारण, थोड्याच वर्षांपूर्वीं हेस्टिंग्ज साहेबानें अलाहाबाद प्रांत मोंगलांकडून हिसकाऊन घेऊन लखनौच्या नबाब वजिराला देऊन टाकून त्याच्याशीं सख्य केलें होतें. तेव्हां आतां उभयतांचें रक्षण झालें पाहिजे, तें कसें करावें हा विचार ठरविण्याकरितां सर जॉन शोअर लखनौस जावयास निघाला. त्याचा बनारसेस मुक्काम झाला. त्या वेळीं त्यानें मौंट स्टुअर्ट याला थोडेसें काम सांगितलें. तो वकिलीच्या कामांतला त्याचा उमेदवारीचा प्रारंभ झटलें असतां चालेल. त्यानें त्या प्रसंगास अनुलक्षून आपल्या चुलत्याला पत्र लिहिलें, त्यांत खालीं लिहिल्याप्रमाणें मजकूर आहे:—

"काबूलचा अमीर झमान शहा मोठी फौज घेऊनें सिंधूनद उतरून अलीकडे आला आहे. ती फौज म्हणज नुसते घोडेस्वार आहेत. त्यानें शीख लोकांवर हल्ला करून लाहोर घेतलें आणि आतां हिंदुस्तान घेऊन मोगल बाद-

शहास पुनः तक्तावर बसवावयाचें ह्मणतो; ह्मणून आमच्या फौजेची नीट तयारी होऊन ती कनोज येथें जाऊन दाखल झाली आहे. झमानशहास भेटून त्याचा हेतु काय आहे, तें समजून घ्यावें ह्मणून कर्नेल पामर याची रवानगी झाली आहे. अलहाबादच्या किल्ल्यांत लष्कराची कोठी ठेवण्याचा ठराव होऊन तो किल्ला ताब्यांत घेण्याकरितां जनरल पोफ्यामबरोबर दोन पल्टणें रवाना झालीं. परंतु नबाब साहेबानें त्याला किल्ल्यांत पाऊल घालूं दिलें नाहीं. तें वर्तमान कलकत्त्यास पोहोंचतांच गव्हरनर जनरल साहेब तेथून निघून सहावे दिवशीं येथें दाखल झाले. कलकत्ता, येथून पांचशें मैलांवर आहे. तेथून आह्मांला यावयाला दोन महिने लागले होते. मी काल त्याना जाऊन भेटलों. लखनौच्या रेसिडेंटाला सरकारी पत्रें जावयाचीं होतीं त्यांच्या नकला काढावयास त्यानीं मला सांगितलें. त्यांनीं त्याला असें लिहिलें आहे कीं, किल्ला आमच्या हातांत देण्याविषयीं नबाबाला तूर्त आग्रह करूं नका. मला वाटतें, झमानशहाच्या स्वारीचें मोठेंसे भय धरावयास नको आहे. आमचे सरकारी अम्मलदार कांहीं गडबडलेले नाहींत; परंतु नबाबसाहेबाकडून ह्या निमित्तानें कांहीं तरी उपटावयाला सांपडेल तर पहावें, ह्मणून ते फार भ्याल्यासारखें दाखवीत आहेत. मला वाटतें, झमानशहाची स्वारीच होणार नाहीं, तो बहुतकरून लौकर माघारा जाईल.

मौंट स्टुअर्ट बनारसेस असतांना तेथच्या इंग्लिश मंडळीवर एक भयंकर प्रसंग अगदीं अकस्मात् गुदरला; त्यांतून तो नशिबानें निभावला. तो प्रकार असाः—लखनौच्या गादीवर माझा हक्क आहे, असें ह्मणून वजीरअली भांडत होता; परंतु तुझा हक्क नाहीं असें सांगून सर जॉन शोअरनें त्याला पदच्युत करून बनारसेस आणून तेथचा रेसिडेंट मिस्टर चेरी याचे नजरेखालीं ठेविलें होतें. सन १७९९ च्या जानेवारी महिन्यांत एक दिवस तो रेसिडेंटाला भेटावयास गेला असतां, बोलतां बोलतां त्यानें अकस्मात् तलवार उपसून त्याला छाटून टाकलें. त्याचा तसा पूर्वसंकेत होता, कीं शब्दानें शब्द वाढून संतापास चढून त्यानें तें कृत्य केलें, हें कळत नाहीं. असो; त्याची तलवार निघालेली दृष्टीस पडतांच, त्याच्याबरोबर असलेल्या सर्वांनीं हत्यारें उपसलीं आणि तेथें जितके यूरोपियन अम्मलदार हजर होते; तितक्यांची कत्तल उडवून त्या ठाण्यांतले सारे गोरे ठार मारण्याच्या उद्योगास ते लागले. त्या प्रसंगीं डेव्हिस साहेबानें आपलीं मुलेंमाणसें गच्चीवर चढविलीं, आणि

आपण हातांत भाला घेऊन जिन्यांत उभें राहून मोठ्या शौर्यानें त्यांचें * रक्षण केलें. मौंट स्टुअर्ट आणि त्याचा मित्र ह्रस्टन ह्यांना तें कांहींच वर्तमान नव्हतें. लोक पळत सुटलेले दिसले, तेव्हां चौकशी करून ते दोघेही घोड्यावर स्वार होऊन निघाले; इतक्यांत कांहीं असामी त्यांच्या पाठीस लागत आले. तेव्हां ते एका उंसाच्या उंच फडांत शिरून त्यांची नजर चुकवून पार पडले.

मग दुसऱ्या दिवशीं जिकडे तिकडे बंदोबस्त होऊन शांतता झाल्यावर कालच्या दंग्यांत कांहीं मोठमोठे एतद्देशीय लोक सामील आहेत असा संशय आल्यावरून त्यांचा शोध लावून चौकशी करण्याच्या कामावर मौंट स्टुअर्टची नेमणूक झाली. ही राजकीय कामांत त्याची पहिली नेमणूक.

---

## भाग ३ रा.

# राज्यकारस्थानांत प्रवेश.

## पुण्यास पहिली नेमणूक.

### सन १८०१।२

सर जॉन शोअरच्या मागून अर्ल ऑफ् मॉर्निंगटन याची गव्हरनर जनरलच्या जागेवर नेमणूक झाली. ह्यालाच पुढे मार्किस ऑफ वेलेस्ली हें नांव पडलें. त्याच्या मनांत पुष्कळ मोठमोठे बेत घोळत होते. मुलकी खात्यांतल्या

---

* डेव्हिस साहेबाचा पुत्र सर जॉन डेव्हिस त्या वेळीं अल्पवयस्क होता. त्यानें त्या प्रसंगाचें वर्णन 'वजीर अलीखान अथवा बनारसची कत्तल' नामक पुस्तकांत केलें आहे. तें पुस्तक सन १८४४ मध्यें छापून मौंट स्टुअर्ट एल्फिन्स्टन साहेबास समर्पण केलेलें आहे. त्यावर त्या माल्याचें चित्र काढलेलें आहे. तें आतां फारसें मिळत नाहीं. हा सर डेव्हिस सन १८९० पर्यंत जिवंत होता. त्यानें चिनामध्यें लौकिक मिळविला. कंपनीची भरभराट, अखेर, व्हिक्टोरिया राणीसाहेबांचें राज्यारोहण, दिल्लीदरबारीं हिंदुस्थानची बादशाहीण हें पद धारण केल्यावेळचा थाट, व जुबिली समारंभ इत्यादि सर्व कांहीं त्यानें पाहिलें.

तरुण नोकर मंडळीला चांगलें शिक्षण देण्याकरितां कलकत्त्यास पाठशाळा स्थापावी, हा त्या बेतांपैकींच एक होता व त्याप्रमाणें त्यानें आपल्याच मुखत्यारीनें सन १८०० मध्यें ती सुरू केली. परंतु कोर्ट ऑफ् डायरेक्टर्स ह्यांना त्याचे इतर बेत जसे पसत पडले नाहींत, तसा हाही पडला नाहीं; त्यामुळें अल्पकाळांतच ती पाठशाळा बंद झाली. परंतु त्याची सूचना अगदीं फुकट गेली असें मात्र ह्मणतां येत नाहीं. हर्टफर्ड शायरमध्यें हेलिबरी कॉलेज ह्मणून सनदी नोकर ( Civil Servants ) तयार करण्याकरितां जी पाठशाळा स्थापन झाली, ती त्याच्या त्या सूचनेचें फळ होय असें ह्मटलें पाहिजे; आणि त्याला त्याचें थोडें तरी श्रेय दिलें पाहिजे. असो. त्यानें स्थापिलेल्या शाळेंत शिकण्याकरितां अगदीं प्रथम जे गेले, त्यांत मौंट स्टुअर्ट एल्फिन्स्टन होता. तेथच्या नियमांप्रमाणें ह्मटलें ह्मणजे त्याला त्या शाळेंत जावयास पाहिजे होतें असें नाहीं; कारण, त्याला चाकरीस राहून पाच वर्षें होऊन गेलीं होतीं. यावरून तो आपण होऊन विद्यार्जनाच्या हौसेनेंच गेला असावा असें वाटतें. परंतु त्याला तेथें कांहीं महिनेसुद्धां रहावयास सांपडलें नाहीं; कारण, त्याची पुण्यास नेमणूक झाली.

लॉर्ड वेलेस्लीनें सर्व राजेरजवाड्यांच्या दरबारची स्थिति नीट अवलोकन करून असें मनांत आणलें कीं, आपण आपले हेतु कारस्थानांनीं साधावे. मोठमोठ्या राजेरजवाड्यांच्या दरबारांत रेसिडेंट ठेविलेले आहेतच; आतां चांगले हुशार, तरुण मनुष्य पाहून त्यांना त्यांच्या हाताखालीं द्यावें, ह्मणजे कालेंकरून ते चांगले निष्णात होतील. हा त्याचा विचार किती दूरदृष्टीचा होता, तें पुढील इतिहास अवलोकन केला ह्मणजे दिसून येतें. असो; याप्रमाणें ठरल्यावर मग जेवढा ह्मणून उत्कृष्ट बुद्धिमान्, चलाख, धाडशी, मनुष्य दिसेल, तेवढ्याची योजना त्या खात्यांत असें होऊं लागलें. आणि तें खातें वाढत चाललें. परराज्यसंबंधीं खात्याचा चिटणीस-(foreign secretary) एडमंड स्टोन यानें स्ट्राचीस बोलाऊन नेलें आणि पुण्यास रेसिडेंटाचे हाताखालीं चिटणिशीवर तुला नेमतों असें सांगितलें. तेथें काम जास्ती पडेल वगैरे कारणांनीं तो जाण्यास अनमान करूं लागला. पुढें त्या चिटणिसानें एल्फिन्स्टन यास बोलाऊन नेऊन, तुला पुण्यास स्ट्राचीच्या हाताखालीं नेमतों. पगार ८०० रुपये मिळेल असें सांगितलें. त्यानेंही तत्काल 'बरें आहे, जातों' असें ह्मटलें नाहीं. परंतु मग ते उभयतां मित्र पुण्यास जावें न जावें ;

विचार करीत होते. एल्फिन्स्टन कचेरींतून उठून घरीं चालला असतांना वाटेंत त्याचा मित्र डेव्हिस भेटला, त्याला त्यानें सारी हकीकत सांगितली. ती ऐकून घेऊन फार न बोलतां

What pleasure, Sir, find we in life, to lock it
From action and adventure?

(Cymbeline. Act IV. Sc. 4.)

## याचें भाषांतर.

आर्या.

केलें साहस नच जरि संसारीं भोगिले न आयास ॥
कोठुनि परम सुखाचा आस्वाद मिळेल सांग जीवास ॥ १ ॥

एवढें शेक्स्पीयर महाकवीचें वाक्य त्यानें ह्मटलें. तें कर्णरंध्रांत शिरतांच एल्फिन्स्टनच्या हृदयांत उजेड पडून मनाचा निश्चय झाला. हें कविवचन त्याच्या पत्रांत व रोजनाम्यांत पुनः पुन: आलेलें आहे. त्यानें एका ठिकाणीं असें लिहिलें आहे कीं, डेव्हिसचे ते शब्द माझ्या कानांत पुष्कळ वर्षें घुमत राहिले होते.

याप्रमाणें पुण्याची जागा पतकरून कर्नेल कर्कपाट्रिक याजबरोबर एल्फिन्स्टन आणि स्ट्राची तारीख ६ मार्च रोजीं कलकत्त्याहून निघाले. तेथून पुण्यास जाऊन पोंहोंचेपर्यंतच्या त्यांच्या प्रवासाची हकीगत वाचूं लागलें आणि लोक हल्लीं कलकत्त्यास कसे केव्हांच जाऊन येतात तें मनांत आणलें, ह्मणजे ही कादंबरी आहे कीं काय असें वाटतें. एल्फिन्स्टन ह्मणतो, " आमच्याबरोबर आठ हत्ती, ११ उंट, ४ घोडे, आणि ८ बैल, हे खुद्द आमच्याकरितां; शिवाय, चाकर माणसांकरितां तट्टें व बैल, असा सरंजाम होता; त्याच्या बंदोबस्ताकरितां २० शिपाई होते; चाकर माणसें व हमाल वगैरे मिळून दीडशेंपासून दोनशेंपर्यंत होते. ”

एवढा लवाजमा त्या दोघां कारकुनांसाठींच असेल असें वाटत नाहीं. परंतु गेल्या शतकाच्या आरंभीं प्रवास ह्मटला ह्मणजे केवढा खटाटोप होता, याचें अनुमान त्यावरून होतें. असो; पुणें, कलकत्त्याच्या नैर्ऋत्येस सुमारें १५० मैल सरळ मार्गानें आहे. परंतु त्यांनीं जी वाट काढली ती विलक्षणच.

ते पहिल्यानें पूर्व बाजूच्या किनाऱ्यां किनाऱ्यानें जात जात दक्षिणेस मद्रासेपर्यंत गेले. कर्नल कर्कपाट्रिक पहिल्यापासून त्यांच्या बरोबर नव्हताच. तो दुखणेकरी पडला, मग कोणीकडून गेला नकळे. हे त्याच्या हुकमानें जात होते. " मद्रासेस जाण्याला तुह्मांला परवानगी आहे." असा त्याजवळ त्याचा लेख होता. मद्रासेहून ते जे निघाले, ते आंत वळून पश्चिमेस म्हैसूर प्रांतांत श्रीरंगपट्टणास गेले. तेथून उत्तरेकडे वळून हैदराबादेस गेले आणि पुनः पश्चिमेस फिरून ठरल्या ठिकाणास गेले. असा द्राविडी प्राणायम करीत, सुमारें दुप्पट मजल दूर, फिरत जाण्याचें कारण कोठें लिहिलेलें आढळत नाहीं.

मिदनापूर जिल्हा सोडल्यावर त्यांना पुढे कटक प्रांत लागला. तेथें भोंसल्याचा अम्मल होता. एल्फिन्स्टन ह्मणतो, इंग्रजी हद्द सोडून परमुलखांत जाण्याबरोबर आह्माला लोकांच्या वर्तनांत अंतर दिसूं लागलें. ते कांहीं उद्धट नव्हते, परंतु आमची प्रतिष्ठा राखीत नव्हते. आमचे तंबू आले काय, पहा जा ह्मटलें, तर जात नाहीं ह्मणत. वाटेत लहान लहान गढ्या लागत, त्यांवर शिबंदी लोक असत, त्यांनाही आमची खातर वाटत नसे. भोंसल्याच्या मुलखापुढे लहान लहान सरदारांचा जहागिरी मुलूख होता. अशा त्या परमुलखातून जातांना ते लष्करी थाटानें चालत आणि जेथें मुक्काम होई तेथें भाला फेकणें, तरवारीचे हात करणे, तमंचाचें निशाण मारणें वगैरे कवाईत करीत, ती पहाण्याला आसपासच्या लोकांची गर्दी जमे.

ते पुरी येथील जगन्नाथाचें प्रसिद्ध देवालय पाहून समुद्रकांठी लहान लहान देवालये पहात चालले असतां, त्यांना एका देवालयात एक फकीर भेटला, त्यानें आतां येथें इंग्रजी अम्मल होणार असे भविष्य सांगितले. एल्फिन्स्टननें असें लिहिलें आहे:—

त्यानें आह्माला इकडे या ह्मटलें, परंतु आपल्या हद्दीत पाऊन टाकूं दिलें नाहीं. आपल्या अंगणाच्या अगदीं कडेला येऊन उभा राहून तो आह्माला ह्मणाला. " ऐका. हा मुलूख तुह्मीं कधीं घेणार ? ह्याला तुह्मीं पाहिजेत. येथील हिंदु लुच्चे आहेत, परंतु तुह्मी सच्चे आहां तुह्मीं हा देश कधीं घ्याल ? " आह्मीं ह्मणालों "कधीं नाहीं." तो ह्मणाला, " होय, तुह्मी खचित घ्याल."

त्या फकिराचें भविष्य दोन वर्षांच्या आंत खरें झालें. तेथून पुढें चिलका सरोवर लागलें. त्याची शोभा पाहून एल्फिन्स्टनला मोठा आनंद वाटला. पुष्कळ वेळ फिरून मग तो समुद्राकडे पहात बसला असतां, होमर आणि व्हर्जिल ह्या

महाकवींनी केलेल्या वर्णनाचें आणि रूपकांचें त्याला स्मरण झालें. मग दुसरे अनेक विचार त्याच्या मनांत येऊं लागले. त्या दिवशींच्या रोजनाम्यांत त्यानें असें लिहिलें आहे:—अशा महाकवींचे ग्रंथ मी अगदीं थोडे वाचतों; हें मनांत आलें ह्मणजे मला वाईट वाटतें, माझें कर्ज आणि चाकरी ह्यांच्यामुळें मला फारसी आणि हिंदी शिकणे भाग पडलें आहे. ह्यांचा अभ्यास तरी मी कितीसा झटून करीत असतों आणि विचार कितीसा करीत असतों ? मी विचार करीत नाहीं आणि आपल्याला मोठा समजतों. मी जसजसा अधिक आळशी होईन आणि विचार न करितां राहीन तसतसा हा दुर्गुण वाढत जाईल. मग परिणाम काय होईल ? हा अहंपणा सोडून द्यावा, असा मीं पुष्कळ वेळां निश्चय केला; परंतु तो सर्व निष्फळ झाला हें मला स्मरतें आहे. त्याचे परिणाम माझ्या वर्तनांत मला दिसून येतात. जी गोष्ट मी ह्मणत नाहीं, ( दुसरें ह्मणतात ) तिचा मी धिक्कार करतों. ज्या बेतांशीं माझा कांहीं संबंध नसतो किंवा ज्यांत मन घालणें योग्य नसते, त्यांनां मी आडवा जातों. मी चिकित्साखोर आणि उद्धट झालों आहें. मी नेहेमी असा असतों असें नाहीं, परंतु वारंवार असा होतो."

आपल्या अंगचे दोष ज्याला कळले आणि ते टाकून देण्याचा ज्यानें निश्चय केला, तो कालांतराने तरी सुधारल्याशिवाय खचित रहाणार नाहीं.

तेथून पुढें त्यांना उत्तर सरकार मुलूख लागला. तो इंग्लिशांच्या ताब्यांत जाऊन सुमार चाळीस वर्षें झालीं होतीं; परंतु त्यांत त्यांचा अम्मल नांवाचाच होता. त्यामुळें ओढिया प्रांतापेक्षां त्यांत प्रवाशांना भय अधिक होते. तेथचा कलेक्टर ब्रौन यानें त्यांच्या संरक्षणाकरितां गोपिनाथ ह्मणून एक मराठा शिलेदार पाठविला आणि पत्रांत असें लिहिलें कीं, 'हा मुलूख अगदीं बेबंद झाला आहे; मजजवळ सरासरी याच्या बंदोबस्तापुरतें सैन्य आहे, सबब तुमच्या करितां हे नवे मराठे लोक ठेऊन पाठविले आहेत.' त्या शिलेदाराला त्यांनीं तेथची स्थिति विचारली; तेव्हां तो ह्मणाला, 'गंजमपासून दोन मैलांवर ब्रौनसाहेब आहे, त्याच्या तंबूतून चोहीं बाजूंस गांव पेटलेले दिसतात जमीनदार लोक पुंड झालेले आहेत, ते मैदानमुलूख लुटीत आहेत' ही स्थिति ऐकून ते चांगल्या बंदोबस्तानें चालले आणि कर्नाटकांत शिरले. ती मद्रास सरकारची हद्द ह्मणून तंबू वगैरे मागें सोडून ते टपालावर चालले. एका रात्रीं मच्छलीपट्टणास जात असतां क्यापटन हंट यानें त्यांचे म्याने

अडवून पाडले; कारण, त्यांच्याजवळ परवाने नव्हते. ते कोणी व्यापारी असावे असे त्याला वाटले. त्या वेळीं कंपनीचे लोक आपल्या शिवाय इतर युरोपियन व्यापारी आपल्या मुलखांत येऊं नयेत ह्मणून फार जपत. आह्मी इंग्रज, कंपनी सरकारचेच नोकर आहो, इतर कोणी लबाड मनुष्य नव्हे; अशी स्ट्राचीनें आपल्या नांवाचीं कांहीं पत्रे दाखवून त्याची खात्री केली तेव्हां त्यांची सुटका झाली.

मद्रासेस कांहीं दिवस गव्हरनराकडे राहून ते पुढें निघाले; तेव्हां कर्नल उइल्क्स यानें त्यांना नकाशे दिले आणि अशा अशा रस्त्याने जा ह्मणून सांगितले. त्याने त्यांना एका देवळांत मुद्दाम जाऊन तेथें एक मराठ्याची ह्मातारी बाई रहात असे, तिला पाहून जावयास सांगितलें. तिला शिवाजी महाराजांस पाहिलेलें आठवत होतें. त्या वेळीं शिवाजीला मरून १२० वर वर्षें झालीं होतीं; तेव्हा तिला सवाशे तरी वर्षें असतील. अशीं दीर्घायुषी मनुष्ये फार क्वचित्.

मद्रासेहून एल्फिन्स्टन एकटाच निघून बंगलुरास गेला. तिकडे एक महिनाभर फिरून नंदीदुर्ग, श्रीरंगपट्टण, कावेरीचा धबधबा वगैरे प्रेक्षणीय स्थळें पाहून झाल्यावर उभयतां मिळून हैदराबादेस जाण्यास निघाले. ह्या प्रवासांत त्याला यकृताचा विकार ( Liver ) जबर झाला. ते दुखणें त्याला जन्मभर होतेच, आणि पाऱ्याचे जालीम औषध पोहोंचल्यानें अधिक होऊन बसलें होतें.

प्रवासांत पहावयाचे काय आणि करावयाचें काय, याविषयीं त्याने आपल्या रोजनिशींत मद्रासेहून निघतेवेळीं असें लिहून ठेविलें होतें:—"मी आतां जो फिरावयाला निघालों आहे, हा फक्त देश पहाण्याच्या उद्देशाने. तर तो नीट पहातां येई अशाविषयीं बेत योजिला पाहिजे. मला फार चलाख असण्याचा आणि ठाणीं कितीही चांगली असली तरी त्यांतच न रहातां बाहेर फिरून चमत्कारिक स्थळे असतील तीं पहाण्याचा निश्चय केला पाहिजे. मी एकटा ह्मणून कोठे फिरावयाला जाण्याचा कटाळा करतां कामा नये; आणि प्रकृतीला अपाय न होतां जितकी मेहेनत करवेल तितकी केली पाहिजे. कर्नाटकांतून लौकर बाहेर जा असें फॉर्बिसने सांगितलें आहे ते विसरतां कामा नये; परंतु एकदा घांट चढून वर गेलों ह्मणजे एकादें स्थळ तेथच्या सृष्टिसौंदर्याबद्दल किंवा इमारतीबद्दल, किंवा तेथें कांहीं मोठ्या गोष्टी घडल्याबद्दल प्रसिद्ध असेल, तर तें सरळ मार्ग सोडून पन्नास मैल जरी बाजूस असलें तरी तें पहावयाला

जाण्याला मी अनमान करणार नाहीं. कोठें कोणतें धान्य पिकतें, कोणत्या प्रकारचीं झाडें होतात, आणखी काय होतें, वगैरे सारें समजून घेण्याचा मी यत्न करीन. ह्या देशांत राज्यव्यवस्था कशी आहे, वसूल घेण्याची रीत कशी आहे, न्यायपद्धति कशी आहे आणि आमच्या सरकारच्या कृतीचे परिणाम लोकांवर कसे काय घडले आहेत इत्यादि गोष्टींविषयीं मी ठिकठिकाणच्या प्रमुख लोकांशीं बोलेन. ह्या विषयांवर साधेल तितकें एतद्देशीयांबरोबर बोलेन. मी जर याप्रमाणे चाललों, श्रम, दगदग वगैरे मनात आणलें नाहीं, तर ह्या प्रवासापासून मला पुष्कळ माहिती मिळेल."

म्हैसूर प्रांतांत शिरल्यावर तेथची स्थिति पाहून त्यानें असे लिहिलें आहे:– ह्या मुलखांत पूर्वीं लागवड झालेली असून ती पुढें बंद पडली असावी असें दिसतें. हें मुसलमानांच्या कारकीर्दींत झालें असावे असे वाटतें. लोक ह्मणतात, राजाच्या अमदानींत चांगली भरभराट होती. टिपूच्या कारकीर्दीच्या आह्मी काय भलत्याच गोष्टी ऐकत होतों! तो देश सुधारतो आहे असें ह्मणत होते. तो पुष्कळ दिवस जगता तर सारा मुलूख उजाड झाला असता असें दिसतें. तळीं पूल वगैरे जीं मोठालीं कामें दिसतात, तीं सारीं हिंदूंचीं आहेत."

श्रीरंगपट्टण येथें कर्नल आर्थर वेलेस्ली हा म्हैसूरच्या चाकरीस ठेवलेल्या (subsidiary) फौजेवर मुख्य अम्मलदार होता, त्यानें एल्फिन्स्टनचें आदरातिथ्य केलें. पुढें जगत्प्रसिद्ध झालेल्या त्या वीराची आणि त्याची ही पहिलीच भेट. थोड्याच वर्षांनीं त्या उभयतांचा विशेष निकट संबंध झाला, ही हकीगत यथास्थळीं येईलच. टिपू मेला आणि त्याच्या फौजेची वाताहत झाली. पुढें तींतले पोटासाठीं भटकूं लागलेले पुष्कळ शिपाई जमवून धोंडजी वाघानें पुंडावा मांडला; तेव्हां त्याच्यावर कर्नल वेलेस्लीची नेमणूक झाली. त्या वाघाच्यामागे सुमार तीन महिने लागून त्यानें त्याची शिकार कशी केली, ती हकीगत एल्फिन्स्टनाला खुद्द त्याच्या तोंडून ऐकावयास मिळाली.

श्रीरंगपट्टणाहून निघाल्यावर ते उभयतां मित्र हलक्या हलक्या मजला करीत हैदराबादेस दाखल झाले, आणि तेथें तीन महिने राहिले; परंतु त्यांनीं अमूक एक सरकारी काम केलें असा कांहीं कोठें उल्लेख नाहीं. एल्फिन्स्टन फारसी ग्रंथ वाचीत असे आणि शिवाय मराठीचा अभ्यास पद्धतशीर करूं लागला. परंतु एकंदरींत त्याचें वाचन उडत उडत होतें. कदाचित् प्रवासांत असल्यामुळें तें तसें असेल. त्याच्या रोजनिशींतील पुढील उतारा पहाण्यासारखा आहे.

तारीख ६ आक्टोबर:—आज माझा वाढदिवस असें मला सांगितलेलें आहे. आतां मी बेवीस वर्षांचा झालों. गेल्या वाढदिवसापासून आजपर्यंतचा काळ किती मौजेनें गेला ! आक्टोबरपासून मार्चपर्यंत मी अभ्यासांत वेळ घालविला, परंतु मागच्या वर्षी बनारसेस असतांना एकांतवास आणि उदासीनता असतां जसा अभ्यास झाला तसा या वेळांत झाला नाहीं. मार्च महिन्यापासून मी प्रवास करीत आहें, तो फार आनंदायक वाटतो आहे. निरानिराळे सुंदर देखावे पहावयाला सांपडत आहेत आणि नवी नवी चांगली मंडळी भेटते आहे, त्यामुळें कंटाळा येत नाहीं. येथें आल्यापासून माझी प्रकृति चागली आहे आणि मी स्वस्थ आरामांत आहें.

आतां मनाची स्थिति पहातां गेल्यावर्षीच्या ह्या दिवसापासून आजपर्यंत कांहीं गोष्टींत मी खचित सुधारलों आहें आणि बाकीच्यांत बिघडलों आहें. परंतु एकंदरीत पहातां मला वाटतें, मी सुधारलों आहें. गेल्या आक्टोबरपासून मी इतकीं पुस्तकें* वाचलीं.

त्या काळच्या राज्यकारस्थानांतल्या गोष्टींत एल्फिन्स्टन हैदराबाद येथे प्रथम बोलूं लागला. निजामाच्या दरबारांतून फ्रेंचांचे समूळ उच्चाटण नुकतेंच झाले होतें, तें कसें करतां आलें हा रेसिडेन्सींत जमलेल्या मंडळींच्या भाषणांत सहजच मुख्य विषय असे. निजामानें इंग्रजांचीं दोन पलटणें आपल्या चाकरीस ठेवून घ्यावीं असा पूर्वी तह झाला होता; त्याप्रमाणें तीं त्याच्याकडे होतीं; परंतु त्यांशिवाय आणखी १५००० फौज फ्रेंच अम्मलदार ठेऊन त्यांच्याकडून त्यानें तयार करविली होती. तिचा सेनापति रेमॉंड ह्मणून होता.

---

* असें ह्मणून एल्फिन्स्टननें सुमारे चाळीस पंचेचाळीस पुस्तकांचीं नांवें लिहिलीं आहेत. आमच्या मराठी वाचकांस तीं वाचून तेवढ्यावरून कांहींच अनुमान नीटसें करतां येणार नाहीं; याजकरितां तीं कोणत्या प्रकारचीं होतीं, तेवढें सांगतों.—त्यांत पूर्वेकडील देशांच्या इतिहासाचा भाग पुष्कळ होता, गुलिस्तान बोस्तान वगैरे फारसी पुस्तकें होतीं; ग्रीक व इटालियन व्याकरणें होतीं; ग्रीक व लाटिन कवींचे ग्रंथ होते; इंग्रजी नामांकित ग्रंथकारांचे ग्रंथ पुष्कळ होते; त्यांत महाकाव्यें व नाटकें, निबंध, वगैरे गहन विषय होते. कादंबऱ्यांचीं नांवें दिलेलीं नाहींत, त्या किती वाचल्या याची संख्याच नाहीं, असा शेवटीं एकच शेरा मारलेला आहे.

इंग्रजांबरोबरच्या तहनाम्यावर सही होण्यापूर्वी नुकताच तो मरून त्याच्या जागी पेरान ह्मणून आला होता. परंतु त्याची योग्यता रेमाँडपेक्षां फार कमी होती, ह्मणून इंग्रजांचा डाव साधला. त्यांचा रेसिडेंट मेजर कर्कपाट्रिक ह्मणून होता, त्याचें वजन चांगले होते. परंतु त्या वेळीं मालकम् साहेब तेथे स्वतः हजर होता. त्यानें त्या प्रसंगीं मोठे धैर्य दाखवून वकिलीच्या कामांत चांगली कीर्ति मिळाविली होती. त्याने तो तहनामा मोठ्या हुशारीनें करून घेतला. क्यापटन हेमिंग ह्मणून रेसिडेंटाच्या हाताखालीं होता, त्याने ती हकीगत एल्फिन्स्टनला सांगितली, तेव्हां त्याची फार तारीफ केली. एल्फिन्स्टन ह्मणतो:—

"क्यापटन हेमिंगबरोबर गार्डीतून मी फिरावयास गेलों. आमची फौज निजामानें चाकरीस ठेऊन घ्यावी ह्मणून जो प्रथम तह झाला, त्याविषयीं बोलणें झालें. निजामाजवळ कांहीं दिवस तरी आपली फौज जाऊन राहिल्यावाचून टिपूच्या वाटेस फारसे जावयाचे नाही असा लॉर्ड वेलेस्लीनें निश्चय केला होता. कांहीं दिवस फौज ठेवतां यावी एवढाच त्याचा हेतु होता. मेजर कर्कपाट्रिक ह्मणाला, कांहीं दिवस कां, त्याच्या गळयांत मी ती कायमची बांधतों आणि तिच्या पगाराबद्दल रक्कमही वाढवितों. निजामाचा दिवाण अजीम-उल्-उमराव याच्याशीं त्याचे सख्य, त्याचे स्वतःचे दरबारांत वजन चांगलें, दिवाणाचा आमच्याकडे ओढा विशेष, आणि रेमाँडचा उद्धटपणा व पेरॉनचा सुस्तपणा निजामाच्या लक्षात चांगला होता, त्यामुळें त्याला बोलल्याप्रमाणें करून दाखवितां आलें. दरबारांत दिवाणाच्या उलट पक्षाचे लोक होते त्यांनां वळविण्याची त्याला मेहेनत पडली. फ्रेंच फौजेचा आह्मांला कदाचित् मोड करतां येणार नाहीं, असें दिवाणाला भय होतें; ह्मणून त्याची समजूत घालण्याची ही खटपट करावी लागली."

निजामाच्या दरबारीं इंग्रजांचें वजन पडून छाप बसावी ह्मणून लॉर्ड वेलेस्लीनें तत्काळ जे खरमरीत उपाय योजले, त्याबद्दल त्याची मोठी तारीफ करणें योग्य आहे. रेमाँड मेल्यावर त्याची जागा आपल्याला मिळावी ह्मणून फ्रेंच अम्मलदार आपआपसांत पुष्कळ भांडूं लागले; तेव्हां आपली फौज चाकरीस ठेवण्याचा ठराव करून घेण्यास ही संधि चांगली आहे, असें मनांत आणून त्यानें त्याप्रमाणे लागलेंच केलें. तवढा तहनामा होतांच इंग्रजांची थोडीच फौज—सारी चार पलटणें !—ताबडतोब जाऊन हैदराबादेस दाखल-

झाली, आणि मग गोळीबार वगैरे कांहीं एक गडबड न होतां त्या मोठ्या थोरल्या भयंकर फ्रेंच फौजेस फांटा मिळाला.

याप्रमाणें हैदराबादेकडची काळजी अगदीं नाहींशी झाली आणि पुढें लौकरच म्हैसूरच्या वाघाची शिकार झाली तेव्हां दक्षिणेंत इंग्रजाचें वर्चस्व अगदीं पुरें झालें. मग त्यांनीं आपली नजर लागलीच मराठेशाईवर फिरविली; आणि पुण्यांत धुमाकूळ माजण्याची वेळ आली. एल्फिन्स्टनचें त्याच्या मित्रमंडळींशीं बोलणें झालें, त्यावरून पेशवे दरबाराविषयीं त्याचा प्रथम ग्रह कसा झाला असावा, तें पुढील लेखावरून कळेल:—मेजर हेमिंग ह्मणाला, “ मराठे मोठे हुशार आहेत; ते आमची फौज चाकरीस ठेऊन घेण्यास कबूल होणार नाहींत. पेशव्याच्या मनांत ब्राह्मण सरदारांच्या हाताखालींच कांहीं पलटणें तयार करवावीं असें आहे. मला वाटतें, शिंदा आपल्याहून बलाढ्य झाला आहे; हें पाहून पेशव्याला चैन पडत नसावें. शिंद्याची शक्ति वाढली आहे. ही त्यानें कवाईत शिकवून पलटणे तयार केल्यामुळें, अशी त्याची खात्री झाली असावी. युरोपियनांनीं शिकवून तयार केलेल्या फौजेशीं सामन्याला उभें रहाण्याला तशीच शिकलेली फौज पाहिजे, ती त्यांच्यावाचून दुसऱ्याला तयार करतां येणार नाहीं, अशी त्याची खात्री झाली, ह्मणजे शिंद्याच्या फ्रेंच फौजेशीं लढण्याला आपल्याजवळ इंग्रजी फौज बाळगावी असें त्याच्या मनांत येईल. आह्मी आपली फौज पुण्यांत ठेवण्याची खटपट चालवली तर ती चालूं देऊं नये अशी सध्या शिंद्याची स्थिति नाहीं. पेशवा त्याला भितो आहे हें ठीक आहे. तुह्मी भिऊं नका, मजपासून तुह्मांला अपाय होणार नाहीं असले कांही सांगून तो त्याला निर्धास्त न करो ह्मणजे झालें. ’

हैदराबादचा रेसिडेंट मेजर कर्कपाट्रिक ह्यानें कांहीं मुसलमानी रीत, रिवाज उचलले होते. अठराव्या शतकांत बऱ्याच इंग्लिश लोकांना इकडचे वारे लागलें होतें; त्यांपैकींच तो होता. त्यानें निजामाच्या इराणी दिवाणाच्या मुलीशीं लग्न लाविलें होतें. एल्फिन्स्टन आणि स्ट्राची हैदराबादेस जाऊन पोहोचले आणि त्यांनीं आपण आल्याचें त्याच्याकडे सांगून पाठविलें, तेव्हां त्यानें त्यांच्याकडे आपला चोपदार पाठवून तुमची तब्येत कशी आहे, कांहीं खाल्लेंत कीं नाहीं, वगैरे शोध घेतला. एल्फिन्स्टननें त्याच्यापासून कांहीं शिकावें असा तो मनुष्य नव्हता. त्यानें त्याच्याविषयीं असें लिहिलें आहे:—

मेजर कर्क पाट्रिक देखणा मनुष्य आहे. त्याचें वय सुमार ३५ आहे; परंतु तो तिशीच्या उमरीचा दिसतो. त्यानें मिशा राखलेल्या आहेत, केंस डोक्याबरोबर छाटले आहेत आणि नखें मेंदी लाऊन रंगविलीं आहेत; बाकी तो इंग्लिश मनुष्यासारखाच आहे. तो अवळपघळ बोलणारा आहे, आणि दुसऱ्याला खूष करण्याविषयीं झटणारा आहे; पण स्वतःविषयींच्या लांब लांब गोष्टी सांगतो आणि बोलतांना जितक्या मुद्रा करतां येतील आणि डोळ्यांनीं हावभाव करतां येतील तितके करतो. तो मला एक घोडा देऊं लागला; मी मला नको ह्मणून सांगितलें. तेव्हां तो ह्मणाला, मी तुमच्याबरोबर तो पाठवून देतों, मग तुह्मीं त्याचें काय पाहिजे तें करा. त्याच्या रीतिभाति चमत्कारिक आहेत, तसें भाषणही तऱ्हेवाईक आहे. त्यानें आपल्या हुक्काबारदाराची विलक्षण गोष्ट सांगितली. तो ह्मणाला, तो मला फसवून चोरी करून येथून निघून विलायतेला गेला आणि तेथे मी सिल्हेटचा राजा आहें, असें सांगून ज्याला त्याला फसवीत होता. पिट्ट साहेब * त्याला भेटावयाला गेला होता; यॉर्कच्या डयूकानें त्याला मेजवानी केली आणि आमच्या राजानें त्याची भेट घेतली."

"दुसऱ्या दिवशीं हे रेसिडेंट साहेब भोजनसमयीं भलतें भलतेंच बडबडूं लागले. ते ह्मणालें आमच्या सरकारच्या मनांत आपली फौज निजाम साहेबांच्या चाकरीस ह्मणून ठेवावयाची आहे, ही गुप्त गोष्ट सरकाराकडून आह्मांला कळण्यापूर्वीच येथच्या दरबारांत समजली होती. तें बोलणें संपल्यावर मग इऱ्यांच्या उत्पत्तीविषयीं मोठ्या डौलानें बोलून आणि होमरविषयीं घाणेरडें बोलून त्यानें आपलें भाषण संपविलें."

त्या वेळीं साऱ्या हिंदुस्थानांत हैदराबादच्या दरबारचा डामडौल विशेष होता. ( हल्लीं देखील येथचाच थाट मोठा आहे ) परंतु निजाम अगदीं ह्मातारा होऊन त्याची शक्ति क्षीण झाल्यामुळें राज्यरक्षण करण्याला जे उपाय करावयाला पाहिजेत, ते करण्याचें त्याच्या अंगीं सामर्थ्य नव्हतें. पुढें दोन वर्षांनीं तो मेलाच. एल्फिन्स्टन त्याला जाऊन भेटला त्या प्रसंगाचें त्यानें वर्णन केलें आहे. तें असें:—

"तारीख १४ सप्टंबर—दरबाराला गेलों. मेजर कर्क पाट्रिकनें मोठ्या थाटाची स्वारी काढली. तींत कित्येक हत्ती, दरबारची एक पालखी, कोतवाल

* इंग्लंडचा मुख्य प्रधान.

घोडे, निशाणें आणि गोंडे बांधलेल्या लांब लांब काठ्या वगैरे होत्या. पायदळाच्या दोन कंपन्या आणि स्वारांची एक तुकडी होती. शहर भिकार दिसलें. चार मिनारसमोर एक कमान आहे, तींतून ती इमारत चांगली दिसली. पुष्कळ चौक ओलांडून अखेर आह्मी निजाम होता, त्या चौकांत गेलों. सर्व दरवाजांवर हत्यारबंद शिपाई होते. त्यांत कांहींना दाढ्या होत्या. एक दोन असामींच्या डोक्याला पोलादी शिरस्त्राणें आणि हातात दस्तान्या होत्या. कांहीं असामी फार विचित्र दिसत होते. अखेरच्या दरवाज्यांत जाऊन पोहोंचलों तों तेथें दिवाण अजिम–उल–उमराव भेटला. त्याने आह्माला आलिंगन दिलें आणि त्या चौकांतून एका दिवाणखान्यांत नेलें. तेथें निजामसाहेब बसले होते. त्यांच्यापुढें जाऊन मी नजर धरली. ती कशी धरावी तें कर्कपाट्रिकच्या मुनशीने मला दाखविले आणि मागून एका मनुष्यानें मला दाबून किती हवें होतें तितके वांकविलें. हुजूरांनीं हास्यपूर्वक नजर स्वीकारली; मी मागें सरलों आणि लवून सलाम केला. मग लगेच एका ह्यातान्या, मर्जीतल्या कुणबिणीनें आह्माला जवळच्याच एका लहानशा खोलींत नेलें. तींत कांहीं चांगलीं घड्याळें आणि आरसे होते. मग आम्ही दरबारांत परत आलों आणि हुजूरच्या उजव्या बाजूस जमिनीवर बसलों. निजाम मसनदीवर साधी पांढरी स्वच्छ चादर घातलेली होती तीवर बसला होता त्याचा जामानिमा लोंकरी आणि किनखाबी असून तो झग्यावरून शाल पांघरला होता. त्याच्या उजव्या हाताला वायूचा विकार झालेला आहे; तो त्याने झग्याच्या आत धरला होता. त्याच्या डोक्याला टोपी होती, आणि तीवरून शालीचे दोन वेढे दिलेले होते. ती शंकूसारखी दिसत होती, त्याच्या राज्यांत सर्वांत थोर सरदार शमस–उल–उमराव, तो त्याच्या मागे बसला होता. तो अंगाने सडपातळ आहे, व त्याची मुद्रा गंभीर आहे. दरबारांत आणखी पुष्कळ लोक होते, त्यांत कांहीं उभे व कांहीं बसले होते. पुष्कळ बायका उभ्या होत्या. कांहींसा आमच्या मद्रासी शिपायांच्या तऱ्हेचा पोषाख केलेल्या बायका दरवाज्यापुढें पहारा करीत होत्या आणि तसल्याच सुमार वीस किंवा तीस समोरच्या पहारेकऱ्यांच्या खोलीपुढें रांगेनें उभ्या केलेल्या होत्या. त्या खोलींत मागल्या बाजूस आणखी पुष्कळ बायका बसलेल्या होत्या. निजामानें आह्माला पुष्कळ घड्याळें आणि कांहीं चमत्कारिक यंत्रें दाखविलीं; त्यांतलीं कांहीं फार बीभत्स होतीं. मेजर कर्क पाट्रिक अगदीं एत-

देशीयाप्रमाणे, त्या प्रसंगास जसें योग्य तसें वागला. निजामानें त्याला, स्ट्राचीला आणि मला शिरपेंच दिले; ते घेऊन आह्मीं अगदीं लऊन सलाम केले; मग त्यानें सर्वांना सुपारी दिली तेव्हां आह्मी पुनः तसेच सलाम केले. तेथून उठल्यावर आह्मी बाहेरच्या बाजूच्या एका खोलींत गेलों आणि दिवाणाबरोबर बोलत राहिलों. ती खोली जकीऱ्याची होती आणि आमच्याभोंवती चाकरमाणसांची गर्दी झाली होती. दिवाण पुष्कळ बोलला. त्याचा पोशाख अगदीं साधा होता. त्याच्या कमरेला सोन्याचा पट्टा होता, त्यांत एक पेषकबज होतें, आणि त्याच्या दाबाला हिरे जडलेले होते. त्या मर्जीतल्या ज्ञात्याच्या बायकोबरोबर तो सलगीचें भाषण करीत होता. शेवटीं आह्मीं उठून आलो. जरी आह्मीं इतका वेळ मांड्या घालून बसलो होतो, तरी मी कंटाळलों नाहीं ”

ही भेट जाहल्यावर पुढें एका महिन्याहून अधिकच एल्फिन्स्टनचा मुक्काम हैदराबादेस होता; परंतु त्याच्या रोजनाम्यांतील पत्रे फाटून गेलीं असल्यामुळें तो पुण्यांत येऊन दाखल होईपर्यंतची हकीगत कळण्यास मार्ग नाहीं. असो. तो सन १८०२ च्या अव्वलीस पुण्यास आला आणि पुढें लौकरच पेशव्यांची गादी डळमळूं लागली. अखेर तिचा शेवट त्याच्या हातानें लागला, त्यामुळें मराठ्यांच्या इतिहासाशीं त्याचें नाव खिळून राहिले आहे. दक्षिणेंत त्याचा लौकिकही मोठा आहे. लोक अद्याप त्याची कीर्ति गातात. मार्किस ऑफ वेलस्लीनें त्याची नेमणूक केली, त्याप्रमाणें तो कामावर रुजू झाला. परंतु तो महाकारस्थानी जो अद्भुत व्यूह रचित होता, त्यापासून एक एक केवढालें महत्कार्य साधावयाचें होतें तें त्याच्या लक्षांत आलें नव्हतें. हैदराबादेस असतांना त्या दरबारांतून फ्रेंचांचें उच्चाटन कां झाले हें त्याला कळलें, परंतु जें खरें तत्व कळावयास पाहिजे होतें, तें पुण्याचा रेसिडेंट कर्नल ( पुढें सर ) बारीक्लोज याची गांठ पडून त्याच्याशीं संघट्टन झालें तेव्हां कळलें. मग तो वेलेस्ली साहेबाचे हेतु सिद्धीस जावे म्हणून झटूं लागला. कर्नल क्लोज हैदराबादच्या रेसिडेंटापेक्षां फार निराळ्या प्रकारचा मनुष्य होता. तो मद्रासच्या लष्करापैकीं होता. म्हैसूरच्या राज्याची व्यवस्था लावण्याच्या कामीं त्यानें झटून मेहेनत केली; ती पाहून लॉर्ड वेलेस्लीचा त्याजवर विश्वास बसला होता. त्याची योग्यता एल्फिन्स्टननें तेव्हांच ओळखली आणि त्याच्या बरोबर तो अनेक विषयांवर बोलूं लागला. त्यानें रोजनाम्यांत असें लिहिलें आहे.—

कर्नल क्लोज किती मोकळ्या मनाचा, सरळ आणि समंजस आहे ! मी त्याच्याशीं सख्य करण्याला झटावें तसा झटत नसतों.......कर्नल क्लोज बरोबर बर्कविषयीं बोललों. त्याचे ग्रंथ त्याला आवडतात. त्यानें त्याच्या Reflections ( विचार ) पकीं कांहीं भाग वाचले. त्याची भाषा सुंदर आहे, परंतु त्यानें जीं विधानें केलीं आहेत तीं मला अगदीं खोटीं वाटलीं.........पोपच्या होमर-मधील कांहीं स्थळांवर बोलणें निघालें. मी कांहीं बोललों नाहीं, मुकाट्यानें पुस्तक काढून तें मूळग्रंथाशीं ताडून पाहिलें. होमरचें नांव निघालें म्हणजे मला नेहमी मोठा आनंद होतो आणि स्फुरण येतें. दुसऱ्या कोणत्याही कवींचे ग्रंथ वाचतांना मला तसा आल्हाद वाटत नाहीं, आणि मनावर तसा ठसा उठत नाहीं.........गुणांनीं प्राचीन लोक श्रेष्ठ, कीं अर्वाचीन श्रेष्ठ, असा बोलतां बोलतां वाद निघाला. मी प्राचीनांचा पक्ष घेऊन त्यांचे पराक्रम थोर असे स्थापित केले. डेस्चोरो माझा प्रतिपक्षी झाला होता. त्यांचें वक्तृत्व थोर असेंही मी स्थापित केलें. कर्नल क्लोजनें उलटपक्ष उचलला होता."

पुण्यांस गेल्यावर एल्फिन्स्टननें आपल्या रोजनाम्यात स्वत:विषयीं ज्या गोष्टी लिहिल्या आहेत त्यांत मुख्यत: स्वभावाच्या चाचल्याविषयीं पुष्कळ दोष दिलेले आहेत, त्या लेखांवरून पहातां असें दिसतें कीं, तो केव्हां केव्हां उन्म-त्तपणानें आणि दिमाखानें वागत असे. परंतु हे दुर्गुण सोडून देण्याचा निश्चय करून नीट वागण्याविषयीं तो सारखा झटूं लागला. त्याचें खाणें पिणें नेहमीं अगदीं बेताचें असे. त्या नेमस्तपणाला आरंभ याच वेळेपासून झालेला असावा त्यावेळच्या चालीकडे पाहिलें तर रंगेलपणानें वागण्याकडे मंडळीचा कल विशेष असे. अशा स्थितींत आपला निश्चय कायम राखण्याला त्याला मनाचा निग्रह चांगलाच करावा लागला असेल. रोजनाम्यात असे लेख आहेत:–कर्नल क्लोजकडे भोजनास गेलों. भोजन झाले. माझी तब्येत गेली. मी मोठमोठ्यानें बोलूं लागलो, आणि लॉर्ड वेलेस्लीविषयीं अयोग्य भाषण केलें. त्याचा आपला निकट संबंध आहे, असें आपण समजतों; असें क्लोज साहेब म्हणतो. हें मला माहीत असून त्याच्यापुढें त्याच्यावर असें तोंड सोडणें अयोग्य आहे, हें एक-सारखें माझ्या मनांत येत होतें. त्राशिकपणामुळें मी वहावलों. काल रात्रीं नीज आली नव्हती त्यामुळें त्राशिक झालों होतों.'

तारीख २ फेब्रुवारी–भोजन केलें. गाढवासारखा वादविवाद केला. असें केल्याशिवाय माणसाला राहवणार नाहीं ?

तारीख ४ मार्च. भोजन केलें. आपला स्वभाव सुधारावा ह्मणून मी वाईन ( wine ) दारू सोडून दिली आहे. तेव्हांपासून गुणावह आहे किंवा कसें हें पहावें ह्मणून आतां दारू पिऊन कसें होतें, तें पहाण्याचा निश्चय केला. मी क्लारेट ( claret ) पुष्कळ प्यालों, परंतु झिंगण्यासारखी प्यालों नाहीं. तिनें आपलें काम नीट केलें, परंतु मी वाद केला नाहीं.

तारीख ५ मार्च. उपहाराच्या वेळेस मौजेचें संभाषण झालें. मग मी वेरिंग आणि फुसेल यांजबरोबर मोठ्यानें कडकून वाद केला. मी अविचाराचें, उद्धट, मगरूर बोललों. बरें, तें असो. मी जेव्हां मगरूरपणा दाखवितों, तेव्हां लोकाना अतिशय संताप येत असावा. मी थोडेच शब्द बोलून आपल्या प्रतिपक्षाचें मत तुच्छ करून उडवून देतों आणि मग त्याच्याकडे तिरस्कारानें पाठ वळवितों. असा आपल्याला हलकेपणा आणणें किती वाईट आहे ? पुण्यास आल्यापासून मी आज हा तिसऱ्यानें असा वागलों.

मी येथें आल्यापासून वाईन अगदी थोडी प्यालो. पाणी मात्र वाईन घालून पीत असें; परंतु आतां मी वाईन अगदीं थोडी पिईन किंवा मुळींच पिणार नाहीं. मला दारू सोडून देण्याचे मुख्य कारण आपलें मन स्वाधीन राहावें हें आहे. मी फाजील प्यालों, म्हणजे नेहेमीं चिरडखोर होतों. मीं आपली उल्हासवृत्ति राखण्याविषयीं फार जपलें पाहिजे. मला कोणी फारसें विचारीत नाहीं, असें मनात येऊन माझी वृत्ति पालटते. हे किती वाईट आहे! ह्या दुर्गुणामुळें मी आतां अगदीं तंटेबाज आणि संतापी होण्याची वेळ आली आहे. मी आहे त्यापेक्षां वाईट दिसू लागलो आहें. माझ्या मनाच्या उलट कोणी बोललें म्हणजे मी संतापतो.

फाल्गुन मासीं रंगपंचमीच्या दिवशींचा त्याचा लेख असा आहे:— गोपाळरावांकडे गेलों, थोडा नाच आणि गाणें झाल्यावर गुलाल आणि अबीर उधळला; तेव्हां धांदल आणि मौज झाली. कलावंतिणींनीं आम्हांला हळूच गुलाल गोटे मारले. त्यांची ती लीला मला आवडली. मग रंग सुरू झाला, त्यानें आम्हीं अगदीं भिजून चिंब झालों. मग पुनः नाच सुरू झाला. मला पूर्वीपेक्षां नाच अधिक आवडूं लागला आहे; मग पुण्यांतला नाच विशेष चांगला असतो म्हणून, किंवा मला त्याची संवय लागत चालली आहे म्हणून तें नकळे. तेथून परत आल्यावर मी खिन्न झालों. नेहमीं कांहीं तरी खऱ्या किंवा कल्पित कारणानें माझें मन अस्वस्थ होतें.

एल्फिन्स्टन तारीख ११ फेब्रुआरी रोजीं श्रीमंतांच्या भेटीस गेला. तेव्हां निजामाचा दरबार नुकताच पाहून आलेला असल्यामुळें त्याच्यापुढें पेशव्यांचा दरबार कांहींच नाहीं असें त्याला वाटलें. तेथचा मुसलमानी डामडौल त्याच्या नजरेंत भरला होता, परंतु मराठी साधेपणाची खरी योग्यता तो उत्तरोत्तर नीट समजूं लागला. आपल्या भेटीची हकीगत त्यानें अशी लिहिली आहे:—

" आह्मी एका मोठ्या थोरल्या दरवाजानें चौकांत गेलों. तेथून पुढें एक भिकार जिना चढून वर गेलों. आणि कांहीं सामान्य खोल्या ओलांडून दरबारच्या दिवाणखान्यांत गेलों. तो मोठा तीन दालनी होता. त्याच्या शेवटास, जरा अलीकडे, मसनद घातलेली होती आणि तिच्या उजव्या बाजूस मराठे सरदार बसलेले होते. त्यांतल्या कोणाचा पोषाक वाईट नव्हता, परंतु एकदेखील एतद्देशीय सभ्य गृहस्थासारखासुद्धां दिसला नाहीं. त्यांनीं रेशमी रंगित जरीबुट्टेदार पोषाक केले होते. सर्वांजवळ तलवारी होत्या; आणि पुष्कळांनीं दस्तान्या चढवल्या होत्या. गोपाळरावानें आह्मांला नेऊन मसनदीच्या डाव्या बाजूस बसविलें. कांहीं वेळानें पेशवे आले आणि मी, वेरिंग व ह्यामिल्टन यांच्या भेटी झाल्या. एकेकाचें आलिंगन होऊन आह्मी आपल्या जागेवर येऊन बसल्यावर बाजीरावानें आह्मांला चिमाजीआप्पास भेटविण्याविषयीं खूण केली त्याला भेटून आह्मीं बसलों. कर्नल क्लोजनें बाजीरावाला आपली तब्बीयत कशी आहे ह्मणून विचारलें. त्याला उत्तर देऊन, तुमची कशी आहे, असें त्यानें उलट विचारलें. मग कर्नल क्लोजनें मला सूचना केल्यावरून त्याच्याप्रमाणें मी बाजीरावास कुशल प्रश्न केला आणि त्यानें मला केला. थोडा वेळ बसून तेथून उठून आह्मीं दुसऱ्या एका चांगल्या खोलींत गेलों. तेथें बाजीराव, चिमाजीआपा, गोपाळराव, कर्नल क्लोज, मी, आणि........इतकीच मंडळी होतों. सदाशिवरावाप्रकरणीं बोलणें निघून पुष्कळ शुष्क कानगोष्टी झाल्या. कर्नल क्लोजनें उद्यां आपण आणि चिमाजीआपा संगमावर यावें असें त्यांस सांगितलें. मग बाकीच्या गृहस्थांना आंत बोलाविलें. ते बसले होते, त्याच क्रमानें एक एक उठून आले. खोली भरली. मग लागलीच अत्तर पानसुपारी झाली आणि आह्मीं निघून आलों. पेशवा रूपानें फार सुंदर आणि प्रौढ आहे, अकडबाज नाहीं. तो गोपाळरावाजवळ थोडें बोलला; आमच्याजवळ मुळींच बोलला नाहीं. तो सुरेख, प्रौढ आणि साधा

मनुष्य आहे. तो एकदां एक क्षणभर गोपाळरावाजवळ पुष्कळ हावभावयुक्त बोलला. त्याचें तोंड कांहींसें चमत्कारिक दिसतें, तरी त्याचा चेहेरा चांगला आणि प्रौढ आहे. चिमाजीआप्पा सुरूप मनुष्य नाहीं. दिसण्यांत कुरूप आहे. तेथून परत आल्यावर आह्मी बिलियर्ड खेळलों, जेवलों, खेळलों. मी पुष्कळ थकलों होतों."

---

## भाग ४.

# मराठ्यांबरोबरचा महासंग्राम.

### इ. स. १८०२—१८०३.

गव्हरनर जनरल, मार्क्विस आफ् वेलेस्ली, खुद्द आपल्या कचेरींत नवीन येणाऱ्या मंडळींतले निवडक निवडक उमेद्वार ठेऊन घेऊन, त्यांची हुशारी पाहून, त्यांच्या नेमणुका राजकीय खात्यांत करीत होता; तेव्हां त्यानें काय काय कारस्थानें मांडलीं होतीं आणि हिंदुस्थानांतील मोठमोठ्या प्रबळ राज्यांची स्थिति कशी होती, तें आधीं सांगितलें ह्मणजे पुढील इतिहास लक्षांत येण्यास बरें पडेल; सबब तसें करूं.

औरंगजेबाच्या कारकीर्दींत मोंगल बादशाहीची सत्ता आणि वैभव शिखरास पोहोंचलें होतें, अशा समयीं शिवाजी महाराजांनीं केवढाले पराक्रम केले आणि मराठ्यांच्या राज्याची स्थापना कशी केली, हें महाराष्ट्रीयांस सांगावयास पाहिजे असें नाहीं. एल्फिन्स्टन आपल्या इतिहासांत ह्मणतो, त्याच्यासारखा, किंवा बरोबरी तितका पराक्रमी, असा दुसरा पुरुष महाराष्ट्रांत जन्मास आला नाहीं. त्याच्या उभयतां पुत्रांच्या कारकीर्दींत त्याच्या वेळची राज्याची स्थिति राहिली नाहीं; परंतु मराठ्यांच्या अंगांत स्वधर्म आणि स्वराज्य यांच्या संरक्षणाचें जें वारें संचरलें होतें, त्याच्या योगानें त्यांनीं मुसलमानांस त्राहि त्राहि करून सोडलें. पुढें त्याच्या नातवाच्या वेळीं पेशवे मुख्य प्रधानपद पावले. त्यांची सत्ता फार जलद वाढली आणि हिंदुपदपादशाहीची खरी स्थापना त्यांच्या हातून झाली.

पेशव्यांच्या कारकीर्दींत मराठे अल्प काळांत फार प्रबळ झाले; परंतु पानपत येथील घोर प्रसंगानें त्यांचा अगदीं चुराडा उडून गेला. त्यांतून सांवरून

ते पुनः लौकरच पूर्वस्थितीस आले, परंतु पेशव्यांच्या पदरचे सरदार हळूहळू त्यांना डोईजड होऊं लागले आणि मोंगल बादशाहीची अखेर जशी वाताहत झाली, तसाच प्रसंग ह्या हिंदुपदपादशाहीवर शेवटच्या बाजीरावाच्या कारकीर्दीत गुजरला. त्यास आरंभ रावबाजी इ. स. १७९६ मध्यें प्रधानपद पावले त्याच वेळेस, किंवा त्याच्या पूर्वींच झाला होता ह्मटलें तरी चालेल.

खरा राज्याधिकार हातांतून गेला, तरी त्याचें सोंग कांहीं काळपर्यंत मागें रहात असतें. असें आशियांत होतें आणि युरोपांत नाहीं असें नाहीं; दोहींकडचा प्रकार एकच. दिल्लीची गादी बुडण्याची वेळ आली, तेव्हां तिचे चाकर ह्मणविणारे बादशहाला मुळींच जुमानीनासे झाले होते; परंतु मुलूख जिंकणे, अधिकार चालविणें, तहनामे करणें, वगैरे जे हवे तें त्याच्या नांवावर करीत आणि राज्योपभोग घेत. तीच तऱ्हा मराठेशाईची झाली. शिवाजीच्या पणतूपासून पुढचे राजे नांवाचे छत्रपति महाराज होते. पेशवे सारें राज्य त्यांच्या नांवानें चालवीत; आपण गादीवर बसतांना प्रधानपदाच्या अधिकाराची वस्त्रें त्यांच्याकडून आणून घेत; बाह्यात्कारी त्याची मानप्रतिष्ठा चांगली राखीत; परंतु त्यांना काडीची सत्ता चालवूं देत नसत; महाराजांच्या अंगांत थोडें पाणी दिसले किंवा ते जरा हालचाल करूं लागले ह्मणजे त्याचे हातपाय अधिक जखडून टाकीत. पुढें तीच पाळी पेशवाईवर आली. मराठेशाईतल्या साडेतीन शहाण्यांतला उत्कृष्ट मुत्सद्दी नानाफडणीस खरा राजकार्यधुरंधर पुरुष, ह्मणून त्यानें नारायणरावाच्या पश्चात् पेशवाईचा डोला डळमळूं लागलेला सांवरून धरला. परंतु तो एकअंगी पडला. त्याच्या अंगांत जसें शहाणपण होतें तसें थोडे शौर्य आणि धैर्य असतें तर तो पाहिजे तर गादी बळकवता; परंतु त्याचा अभाव पडल्यामुळें शिंदे होळकरादिक बलाढ्य सरदारांना भिऊन वागावे लागलें, आणि अखेर रावबाजीच्या कपट प्रयोगांनीं त्याचा नाश झाला.

नाना इ. स. १८०० च्या मार्च महिन्यांत वारल्यापासून दौलतराव शिंद्याचें प्राबल्य विशेष झालें. तो पुण्यांत पुष्कळ दिवस मोठी थोरली फौज घेऊन बसला होता, परंतु होळकर त्याच्यावर उठला आणि जय मिळवूं लागला तेव्हां आपल्या राज्याचें संरक्षण करण्याकरितां तो लगबगीनें उठून चालता झाला. बाजीराव त्याला भीत होता, परंतु तो गेला तेव्हां त्या भयांतून अनायासें मुक्त झाला. एल्फिन्स्टन पुण्यांत आला, तेव्हां थोडे दिवस तो

अगदीं स्वतंत्र होता, परंतु मुलूखभर फौजा फिरत असल्यानें राज्याची दुर्दशा होत होती आणि त्याचा अधिकार अगदीं निस्तेज दिसत होता. नाना मेल्यावर त्यानें आपलें रूप चांगलें प्रकट केलें. जो जो सरदार आपल्याला किंवा आपल्या बापाला प्रतिकूल असल्याचें त्याला माहीत होतें, किंवा संशय होता त्याचा सूड घेण्यास त्यानें सुरवात केली. अखेर विठोजी होळकराला हत्तीच्या पायांशीं देऊन त्याचे हाल हाल होऊन प्राण गेलेला दूर खिडकींत बसून पाहून आनंद मानला, त्या योगानें त्याच्या अल्पोपभुक्त स्वातंत्र्याची परिसमाप्ति होण्याची वेळ जवळ आली.

टिपूचा पराभव होऊन तो मेला; रेमॉंडनें तयार केलेली १४००० उत्कृष्ट फौज घालवून निजामानें इंग्रजाचीं पलटणें चाकरीस ठेऊन घेऊन तो त्यांच्या मुठींत सांपडला; अयोध्येच्या नबाबानेंही त्यांनीं ह्मटला तसा तहनामा कबूल केला; अशी थोरथोरांची वाट लागली. मग उरले काय ते मराठे. त्यांत प्रबळ शिंदे आणि होळकर; ते एकमेकांचा प्राण घ्यायाला टपले होते. किती एकांच्या पाठीस बाजीराव लागला होता. तेव्हां ही संधि उत्कृष्ट आहे, आतां हिंदुस्थानांत आपलें वर्चस्व स्थापावयाचें, असा निश्चय करून लॉर्ड वेलेस्लीनें निजामाप्रमाणें मराठ्यांच्या पदरीं आपलीं पलटणें ठेऊन देण्याची खटपट जारीनें चालविण्याचें मनांत आणलें. त्याचे विचार त्याच्या हाताखालच्या अम्मलदारांना—खुद्द त्याचा बंधु, आर्थर वेलेस्ली यालाही—पसंत नव्हते; परंतु त्यानें जें एकदां मनांत आणलें तें सिद्धीस नेलेंच नेलें. इतकें आग्रहास पडण्याचें कारण त्यावेळेस युरोपांत फ्रेंच लोक फार प्रबळ झाले होते. त्यांच्या शस्त्रास्त्रांपेक्षां त्यांच्या मतांना साऱ्या दुनियेंतले ब्रिटिश मुत्सद्दी अधिक भीत होते. शिंदे, होळकर, वगैरे पुष्कळांनीं फ्रेंच लोक चाकरीस ठेऊन त्यांच्या-कडून पुष्कळ पलटणें तयार करविलीं होतीं; अशा संधीस जर नेपोलियन इकडे आला तर त्याला आयतीच सारी सामुग्री सिद्ध मिळून तो इंग्रजांचा अगदीं निःपात करील असें त्याला फार मोठें भय पडलें होतें; ह्मणून साऱ्या रजवाड्यांतून फ्रेंचांना काढून तेथें आपलें वर्चस्व करून ठेवावयाचें हा त्यानें ध्यास घेतला होता. प्रथम सामोपचारानेंच कार्य साधल्यास पहावें, ह्मणून त्यानें शिंदे, नागपूरकर भोसले, आणि पेशवे, यांजकडे वकील पाठवून खट-पट करून पाहिली परंतु कोणीच वळले नाहींत. तेव्हां आतां युद्ध आरंभून आपला हेतु सिद्धीस न्यावा लागणार असें त्याला वाटूं लागलें आणि तो त्या

तयारीसही लागला. निजामाप्रमाणें पेशव्याजवळ पलटणें चाकरीस ठेवण्याचें बोलणें कर्नल क्लोजमार्फतच चाललें होतें व बाजीरावाच्या मनांत तें मान्य करावयाचें आलें होतें, परंतु वेलेस्लीनें ज्या अटी घातल्या होत्या त्या इतक्या जबर होत्या कीं, कोणत्याही राजानें आतां दुसरा कांहीं इलाज उरला नाहीं, असा कठीण प्रसंग दिसल्यावांचून त्या मान्य केल्याच नसत्या. तिकडे लॉर्ड वेलेस्लीला अगदीं घाई सुटली. तव्हां क्लोज साहेबानें सांगितलें कीं, असें उतावीळ होऊन कांहीं उपयोग नाहीं; जरा दम धराल तर तुमचा हेतु अनायासें सिद्धीस जाईल.

लॉर्ड वेलेस्लीनें परदरबारीं वकील पाठवून तहाचें बोलणें चालविलें होतें, त्याविषयीं एल्फिन्स्टनच्या रोजनाम्यांत पुष्कळ ठिकाणी उल्लेख आहेत. त्या विषयावर कर्नल क्लोजबरोबर त्याचें बोलणेंही होई. क्लोज ह्मणे आमच्या राज्याचें संरक्षण व्हावें, ह्मणून वेलेस्लीनें मोठाच बेत योजला आहे हें खरें; परंतु सध्यांच्या त्याच्या कृतीवरून त्याचा हेतु राज्य वाढविण्याचा दिसतो. तो असें करील असा मला संशय देखील आला नव्हता. मराठ्यांबरोबर लढाई करावी असें मनांत आणील तर तोच एक आणील, दुसरा कोणी आणणार नाहीं. तो सुद्धां अशा भयंकर कृत्यांस राज्य वाढविण्याच्या इच्छेनें प्रवृत्त होणार नाहीं.

इ. स. १८०१ च्या एप्रिल महिन्यांत विठोजी होळकराचा वध झाला. ते वर्तमान यशवंतरावास कळलें, तेव्हां संतप्त होऊन त्यानें सूड घेण्याची प्रतिज्ञा केली. परंतु हिंदुस्थानांत लढाईंत गुंतल्यामुळें त्याला कांहीं तत्काळ त्या कामास लागतां आलें नाहीं. तरी सवड साधतांच मी पुण्यास येतों, असें त्यानें सांगून पाठविलें; आणि १८०२ च्या आक्टोबर महिन्यांत पुण्यावर चाल केली. त्याचा दक्षिणेकडे मोर्चा फिरला; असें वर्तमान कळल्याबरोबर बाजीराव घाबरला आणि त्यानें शिंद्याला बोलाविलें; त्याला स्वतःस येतां आलें नाहीं, परंतु त्यानें फौज पाठवून दिली. ती होळकराच्या आधीं आठ दिवस दाखल होऊन पुण्यासरशी तळ देऊन राहिली. बाजीरावानें होळकराला निघून जाण्याला हुकूम केला, परंतु त्यानें कांहीं तो मानला नाहीं. त्याचा हेतु भावाला मारल्याबद्दल सूड घ्यावयाचा एवढाच नव्हता; त्याच्या मनांत बाजीरावाला कैद करून आपल्या ताब्यांत ठेऊन मग त्याच्या नांवावर हवें तें करावयाचें होतें. थोडे दिवस बोलण्या चालण्यांत जाऊन अखेर

तारीख २५ आक्टोबर रोजीं तुमुल युद्ध झालें. यशवंतरावानें मोठा पराक्रम करून उत्तम जय मिळविला; तेव्हां बाजीराव घाबरून पळत सुटला. इंग्रजांनीं आपल्यास मदत करावी असें त्यानें बोलणें लाविलें होतें; परंतु ते कांहीं मान्य होईना. तेव्हां तुमचीं सहा पलटणें, मी ठेऊन घेतों; आणि त्यांच्या खर्चाबद्दल पंचवीस लक्षांचा मुलूख देतों, असें सिंहगडावरून क्लोज साहेबास सांगून पाठवून तो महाडास गेला. येथून मला घेऊन चला असें मुंबई सरकाराकडे सांगून पाठवून होळकराच्या भीतीनें पळत पळत तो रेवदंड्यास गेला. तेथून गलबतांत घालून त्यांनीं तारीख ६ दिसेंबर रोजीं त्याला आपल्या घरांत नेलें. याप्रमाणें हें सावज शिंदेहोळकरांच्या हातून निसटून इंग्रजांच्या तोंडांत अचानक जाऊन पडलें. क्लोज साहेबानें ह्मटलें होतें त्याप्रमाणेंच झालें.

बाजीरावा बरोबर बोलणें लाऊन कांहीं तरी ठराव करावा ह्मणून यशवंतराव होळकरानें क्लोज साहेबाला सुमार महिनाभर ठेऊन घेतलें; परंतु कांहीं नियमांत आलें नाहीं. क्लोज मुंबईस निघून गेला आणि बाजीराव रेवदंड्याहून वसईस दाखल होतांच त्यास भेटला. लागलीच बोलण्यास सुरुवात होऊन तारीख ३१ दिसेंबर रोजीं वसईच्या तहनाम्यावर सही करून देऊन बाजीरावानें आपलें स्वातंत्र्य गमाविलें. इतकेंच नव्हे, हिंदुपद पादशाही पालथी घालण्यास इंग्रजांस जसें हवें तसें साहाय्य दिलें ह्मटलें तरी हरकत नाहीं. असो. त्याला पुण्यांत नेऊन गादीवर बसविण्याचा करार करून इंग्रजांनीं त्याजपासून पाहिजे ते करार करून घेतले. त्यांत मुख्य त्यानें कोणत्याही परदरबाराशीं परभारें कांहीं बोलूं नये, जें बोलणें असेल तें आपल्या द्वारें झालें पाहिजे, हा होता. सारें मराठें मंडळ ज्याला आपला यजमान ह्मणत होतें, सातच वर्षांखालीं जे सारे मिळून निजामाला रडवून पुण्यांत जयजयकार करीत आले, त्यांच्याशीं त्याला बोलण्याची बंदी ह्मणजे त्यांची लहानसान अप्रतिष्ठा नव्हे, ती ते मुकाट्यानीं सहन करतील असें वेलेस्लीला वाटलें नाहीं. त्यानें सैन्याची तयारी चांगली चालविली. बाजीरावालाही मग वाईट वाटूं लागून त्यानें शिंद्याला आणि भोसल्याला लौकर दौड करून पुण्यास येण्याविषयीं गुप्तपणें पत्रें पाठविलीं. † त्याप्रमाणें त्यानीं दक्षिणेचा मार्ग धरला. होळकर पुणें लुटून माळव्याकडे निघून गेला. गव्हरनर जनरलानें बाजीरावास पुण्यास

† त्यांच्या नकला पेशवाई बुडाल्यावर बाजीरावाच्या दप्तरांत सांपडल्या.

नेऊन गादीवर बसविण्याची सर्व तयारी केली. निजामाच्या हद्दीवर पुष्कळ सैन्य जमवून परांड्याजवळ त्याचा तळ दिला. दक्षिणेकडून ऑर्थर वेलेस्ली यास सुमारे १०००० फौज घेऊन धांवत पुण्यास जाण्यास सांगितलें. त्याप्रमाणे तो टांकोटाक निघाला आणि शेवटची ६० मैलांची एक मजल ३२ तासांत मारून तारीख २० एप्रील रोजीं पुण्यास दाखल झाला. मग बाजीराव वसईहून निघून तारीख १३ माहे मे रोजीं पुन: स्वस्थानीं आले.

शिंदे व भोंसले आपल्यास अनकूल व्हावे ह्मणून वेलेस्लीनें त्यांच्याशीं तहाचें बोलणें लावलें होतें, परंतु ते त्यानीं मान्य केलें नाहीं. तेव्हा होळकराने त्याना मिळूं नये ह्मणून वेलेस्लीने त्याची मनधरणी चालविली. तो वळत होता, परंतु ते बाजीरावाला बरे वाटेना ह्मणून तितकेंच राहिले. आतां घोर संग्राम केल्यावांचून भागत नाहीं असें पाहून वेलेस्लीनें मोठी तयारी चालविली होती. तहाच्या बोलण्यांत जेवढा वेळ गेला तेवढा त्याच्या उपयोगींच पडला. हिंदुस्थानांत ठिकठिकाणीं ठेविलेली इंग्रजांची फौज ५०००० होती. दौलतराव शिंदे आणि रघोजी भोंसले यांची फौज त्यांच्या दुप्पट, सुमार एक लाख होती. होळकराने आपल्याला सामिल व्हावें ह्मणून त्यानीं बरीच खटपट केली, परतु तो वळला नाहीं. शिंद्याची फौज फ्रेंचांनीं कवाईत शिकविलेली जय्यत होती, तिच्यामागें कमांडर-इन्-चीफ लॉर्ड लेक याने लागून तिचा पिच्छा पुरवावा असें ठरले. त्याच्याजवळ सुमार १६००० फौज होती. दक्षिणेकडील फौजेचे आधिपत्य जनरल ऑर्थर वेलेस्ली याजकडे होते. त्याच्या मदतीस जनरल स्टीव्हेन्सन वगैरे सरदार होते. त्यांच्याजवळ सुमार तितकीच फौज होती. ते शिंदे व भोंसले यांच्याशीं सामन्याला दक्षिणेंत राहिले, आणि कांहीं फौज भोंसल्याच्या ताब्यांतील ओरिसा प्रांतावर चालून गेली. याप्रमाणें जिकडे तिकडे तयारी होऊन तहाचीं बोलणीं चाललेलीं राहिलीं आणि तारीख ६ आगस्ट रोजीं लढाई करण्याचा निश्चय होऊन त्याप्रमाणे पुकारा झाला. मग जे एक एक घोर संग्राम झाले त्यांत इंग्रजांनाच जय येत गेला आणि थोड्याच दिवसांत शिंदे व भोंसले यांच्या त्या प्रचंड सेनेचा पुष्कळ नाश होऊन ते अगदीं दीन झाले, आणि त्यांना इंग्रजांनीं जसे ह्मटले तसे तह मान्य करावे लागले. त्यांत त्यांचा पुष्कळ मुलूख जाऊन ते अगदीं बलहीन झाले. पुन: इंग्रजांबरोबर लढाइला उभे रहाण्याचें सामर्थ्य त्यांच्यांत उरलें नाहीं. अशी त्यांची दुर्दशा उडाल्यावर मग होळ-

कराला स्फुरण आलें. तेव्हां जयश्री कांहीं वेळ त्याच्याकडे वळली. ती कांहीं इंग्रजांच्याच निशाणांना खिळून राहिली नाहीं. कर्नल मान्सन पराभूत होऊन मध्य हिंदुस्थानांतून माघारा फिरला, तेव्हां होळकरानें त्याचा पाठलाग करून दुर्दशा केली. भरतपूरचा मातीच्या तटाचा किल्ला घेण्याकरितां लॉर्ड-लेक त्याला वेढा घालून बसला आणि पुनः पुनः हल्ला करीत होता; परंतु आंतील लोकांनीं त्याचें कांहीं चालूं दिलें नाहीं. तेव्हां तो हताश होऊन तेथून निघून गेला. ह्या गोष्टींनीं इंग्रजांच्या शौर्याबद्दल गाजलेल्या कीर्तीला कमीपणा आला. तेणेंकरून इंग्रज कांहीं अजून अजिंक्य झाले नाहींत असें लोक सहजच बोलूं लागले. तिकडे राजपुतान्यांत रजपूत राजेरजवाड्यांना आणि इतर दोस्त ह्मणविलेल्या लहानसान सरदारांना हातचे सोडून होळकराला आणि त्याच्या पेंढाऱ्यांना त्यांना मनसोक्त लुटूं दिल्यामुळें इंग्रजांच्या वचनावर भरंवसा ठेऊन राहणें बरें नाहीं असेंही लोक ह्मणूं लागले. परंतु याप्रमाणें इंग्रजांच्या तलवारीची आणि शब्दाची मातब्बरी कमी झाली ती लॉर्ड वेलेस्ली हिंदुस्थान सोडून निघून गेल्यावर.

मराठे उदयास येऊं लागले तेव्हां मुसलमानी अमलांत राजरोस शिरून धुमाकूळ घालण्यास आधार चौथ, सरदेशमुखी, घास दाणा, हे हक्क त्यांनीं जागोजाग प्रथम बसविले; तसें लार्ड वेलेस्लीनें त्यांच्या राज्यांच्या संरक्षणाकरितां ह्मणून इंग्रजी पलटणें त्यांच्या पदरीं बांधून त्यांना जागच्या जागीं बसवावयाचें, आणि रेसिडेंट हे त्यांच्यावर पहारेकरी ठेवावयाचे, ही अद्वितीय युक्ति काढली. त्याच्या त्या युक्तीनें सारे जागच्या जागीं पिंजऱ्यांत कोंडल्यासारखे झाले. त्याला महाकारस्थानी ह्मटलें तें याकरितां. बाजीराव त्याच्या पाशांत सांपडला, तेव्हांपासून एल्फिन्स्टनचा संबंध कोणाशीं कसा येत गेला, आणि महाराष्ट्राच्या स्वातंत्र्यनाशनाटकाचीं सूत्रें त्यानें कशीं कशीं हालविलीं तें सहज लक्षांत यावें ह्मणून हा एवढा लांबलचक प्रस्ताव केला. आतां आपल्या प्रधान विषयास अनुसरूं.

यशवंतराव होळकर दक्षिणेंत यावयास निघाला, तेव्हांपासून बाजीरावास गादीवर बसवून त्याच्या संरक्षणाकरितां इंग्रजांनीं शिंदे व भोंसले यांजबरोबर लढाई सुरू केली तेथपर्यंत ज्या मोठमोठ्या गोष्टी घडल्या, त्यांचे वर्णन एल्फिन्स्टन करता तर तें फार उत्कृष्ट झालें असतें. परंतु त्याचा रोजनामा इ० स० १८०२ च्या मार्च महिन्याच्या अखेर जो मध्येंच बंद झाला, त्याला

न १८०३ च्या अखेर आरगांवच्या लढाईपर्यंत पुन: टांक लागलाच नाहीं. ासें कां झालें असेल तें असो. बाजीराव पुण्यांतून पळाला आणि क्लोज ाहेब त्याच्या मागून घांट उतरला, तेव्हां एल्फिन्स्टन त्याच्याबरोबरच होता. ढें बाजीराव पुनः गादीवर आला, तेव्हां तो क्लोजबरोबर माघारा आला, ाणि लढाई सुरू होईपर्यंत पुण्यांत होता. मध्यंतरीं मुंबईस आणि वसईस ासतांना थंडीच्या दिवसांत त्याची प्रकृति यकृत् ( Liver ) होऊन बरीच ाघडली होती. लढाई सुरू करण्याचें ठरलें, तेव्हां जनरल वेलेस्ली अहमद- गरच्या किल्ल्यापासून चार कोसांवर होता. त्यानें तो किल्ला आधीं सर ारण्याचें मनांत आणलें. त्याच्या हाताखालीं माल्कम् साहेब पोलिटिकल ,जंट होता. मोहिमेस सुरवात होणार, इतक्यांत तो आजारी पडला म्हणून ाच्या जागीं एल्फिन्स्टनची नेमणूक झाली. तो आजारीच होता, तरी पण ण्याहून तसाच निघून तारीख १० आगस्ट रोजीं कामावर दाखल झाला. ाचा मित्र माल्कम् त्यापूर्वींच निघून गेला असल्यानें त्याची गांठ पडली नाहीं. ापल्याला काम काय करावें लागणार, हें माल्कमला विचारून त्यापासून ाला समजून घ्यावयाचें होतें. कारस्थान प्रकरणांत वेलेस्लीचा त्याच्यावर ारंवसा असे आणि तो त्याचा विचार घेत असे. गव्हरनर जनरलाचाही त्याच्या- र तसाच विश्वास होता. त्याच्या जागेवर नेमणूक झाली म्हणून वरिष्ठाची ागलीच तशी मर्जी होते असें नाहीं, आणि शिवाय पोलिटिकल एजंटानें ाम अमुकच करावयाचे असें ठरलेले नव्हतें. म्हणून त्याला काळजी वाटली ासली तरी ती लवकरच दूर झाली. त्याचा दुसरा मित्र मेट्काफ हिंदुस्थानांत ानरल लेकजवळ पोलिटिकल एजंट होता. त्याच्यापेक्षां तो दैववान होता. ारण, वेलेस्लीजवळ गेल्यापासून तो त्याच्यावर कृपाच करूं लागला, आणि ाश्वास टाकूं लागला. त्यानें त्याला कामही फार सांगितलें नाहीं. फारसी, ाराठी आणि हिंदुस्थानी भाषांत कोणाशीं बोलणें झालें तर तें काम आणि ाखबार खात्याचे काम त्याच्याकडे होतें. हें बातमीखातें त्यावेळीं फार मोठें ाव्हतें. त्याला काम फार पडत असल्याचें दिसत नाहीं. ह्या थोड्याच ादवसांच्या, परंतु फार गाजलेल्या, प्रसिद्ध मोहिमेंत त्याचा जो काळ गेला तो ााला जसा आनंददायक वाटला तसा बहुधा पुढे कोणताच वाटला नसेल. ाुढें म्हातारपणीं तो वारंवार असें म्हणत असे कीं, युद्धप्रसंगांत माझा प्रवेश ाा थोर ड्यूकाच्या ( वेलेस्लीच्या ) हातानें झाला होता.

अहमदनगरचा किल्ला मोठा बळकट अशी चांदबिब्बीनें तेथें पराक्रम केल्यापासून त्याची फार किर्ति होती. परंतु वेलेस्लीनें त्याला वेढा घालून तोफांचा भडिमार सुरू केला तेव्हां त्याच्यापुढें आंतील फौजेला टिकाव धरवला नाहीं. तारीख १२ रोजीं किल्लेदारानें तो त्याच्या स्वाधीन केला. तारीख १७ रोजीं एल्फिन्स्टननें आपला मित्र स्ट्राची यास तेथून पत्र पाठविलें, त्यावरून त्याला तें नवीन काम कसें वाटलें, विद्याव्यासंगाची आणि ज्ञानार्जनाची केवढी हौस होती तें दिसून येतें. त्या दिवशीं पेठ्यांत फिरून तेथच्या कबरा, मशिदी, बागा वगैरेंची स्थिति पाहून काय वाटलें तें लिहून तो पुढें ह्मणतोः—मला काल आपल्या कामाचा मासला कळला. बातमी काढण्याकरितां २० हरकारे माझ्या स्वाधीन झाले. जनरल साहेबाला भेटण्याकरितां गोखला आला होता तेव्हां मी दुभाषाचें काम केलें आणि कोल्हापूरच्या राजाला एक पत्र जावयाचें होतें त्याचें मराठींत भाषांतर केलें. मीं आपले सारें काम केलें; तें कांहीं चांगलें झालें नाहीं याचें तुह्मी अनुमान करालच. परंतु मी तें स्वस्थपणानें आणि जपून केलें. गोखल्याबरोबर बोलतांना मी दोन ठिकाणीं अडलों. shell ह्याला मराठींत काय ह्मणावें तें मला कळेना आणि ' महताब ' ह्याला इंग्रजींत काय ह्मणावें ते कळेना. माझे डोळे बरे आहेत परंतु बरगडी फार दुखत आहे. तलवारीशिवाय कांहीं विकावयाला आलें नाहीं. मी पुस्तकांचा शोध केला. एक आरबी नमाजाचें पुस्तक आलें होतें असें मला कळलें. तें एका प्रसिद्ध दरवेशाचें होते, तें त्याला परत मिळालें. आमच्या फौजेनें किल्ल्यावर हल्ला केला तेव्हां आह्मी तो नऊ घटकांत घेऊं असें त्यानें भविष्य सांगितलें होतें.

अहमदनगर सर झाल्यानें पेशव्यांच्या मुलखावर हल्ला होण्याची भीति उरली नाहीं. शत्रू अजिंठ्याचा घांट चढून गेले. तेव्हां आतां निजामाच्या मुलखाचें संरक्षण करावें आणि साधल्यास त्यांना सामन्याला उभें रहावयास लावावें असा बेत करून वेलेस्ली औरंगाबादेस गेला. तें कळतांच ते दुसरीकडे वळले. त्यांचा बेत हैदराबाद लुटण्याचा आहे अशी आफवा ऐकून तो पुनः माघारा फिरला. असा सुमार एक महिना त्यांनीं हुलकावण्या दाखविण्यांत घालविला. तो त्यांना गांठावयास पहात होता, परंतु त्यांनीं आसपास पेंढाऱ्यांच्या मोठमोठ्या टोळ्या पसरविल्या होत्या त्यामुळें ते कोठें आहेत हें कांहीं त्याला नीट कळेना. परंतु अखेर निजाम हद्दींत जाफराबादेपासून दहा मैलांवर

एका लहानशा नदीच्या कांठी असई म्हणन खेडें आहे तेथें त्यांचा तळ असल्याचें त्याला समजलें. त्यांची फौज ३०००० विन कवाइती आणि १०००० कवाईत शिकलेले स्वार होते आणि १०० तोफा चांगल्या तयार होत्या. एल्फिन्स्टननें पाठविलेले हरकारे बातमी घेऊन येत आणि दोन अडीच लाख फौज असावी, लाखांत तरी कमी नाहींच, असें सांगत तें ऐकून वेलेस्ली हंसे. त्याच्याजवळ सारी ४५०० फौज होती; पैकीं गोरीं तीन पल्टणें, एक स्वारांचें आणि दोन पायदळांची होती. स्टीव्हेनसन त्याच्यापासून आठ मैलांवर होता. परंतु तो मदतीस येण्याची वाट न पाहतां शत्रूवर हल्ला करण्याचा निश्चय करून तो चालून गेला. लढाई मोठ्या निकाराची झाली. मराठ्यांच्या तोफखान्याचा भडिमार सारखा चालला होता आणि तशांत तो स्वारांना आणि शिपायांना उभे करून पुढे घेऊन जाऊन पुनः पुनः शत्रूवर तुटून पडत होता. एक दोन वेळ मराठ्यांना जय येतो असें वाटलें. वेलेस्ली शिवाय अन्य कोणी सेनापति असता तर इंग्रजांचा पराभव होतच होता. परंतु त्याने घोडेस्वार, पायदळ, तोफखाना वगैरे पाहिजे तेथें तेथें नेऊन, त्यांना धीर देऊन स्फुरण आणलें; आणि जेथे तेथें आपण पुढें होऊन जय मिळविला. मराठ्यांची अगदीं धांदल उडाली आणि ते आपला तो एवढा थोरला तोफखाना सारा टाकून पळाले. इंग्लिशांना जय आला परंतु त्यांचा नाश फार झाला. एका गोऱ्या पलटणांत ५०० शिपाई होते त्यांत सारे १०० उरले, ४०० ठार झाले. त्यांच्या एकंदर फौजेपैकीं मेले व जखमी मिळून एक तृतीयांशावर कमी झाले.

मराठ्यांबरोबर इंग्रजांनीं पुष्कळ लढाया केल्या, परंतु त्या सर्वांत ते हिचें महत्व फार मानतात, आणि दरसाल सपटंबरच्या २३ व्या तारखेस लष्करी अम्मलदार तत्स्मरणार्थ मेजवानी करून जयघोष करतात. एल्फिन्स्टननें आपला मित्र आडाम ह्याला पत्र लिहिलें त्यांत तो म्हणतो, आजपर्यंत हिंदुस्थानांत आम्ही ज्या लढाया मारल्या त्या सर्वांत ही फार भयंकर असें सर्वांचें मत पडतें. हिच्यासारखा रक्तपात एक कडलूरच्या लढाईत झाला म्हणतात, परंतु तींत आमची फौज निदान १२००० होती आणि त्यांतले मेले व जखमी झाले मिळून सारे ६०० मनुष्य.

एल्फिन्स्टन हुकूम होतांच स्वारींत जाऊन रुजू झाला परंतु त्याची प्रकृति कांहीं लौकर सुधारली नाहीं. बरेच दिवस तो अगदीं पडून होता; जरा उभें

राहिलें, चाललें, खोकलें, हंसलें, कुशीस वळलें, मोठ्यानें श्वास सोडला, किंवा सरळ बसलें कीं, जी कळ येई ती अगदीं असह्य होई. त्याच्या औषधांत पारा होता, त्यामुळें आपल्याला आतां वेड लागेल, अशी त्याला भीति पडली होती. ( कारण मनुष्यानें पारा घेतला असला, आणि त्याला ऊन लागलें ह्मणजे वेड लागतें असें लोक ह्मणत. ) तो असा पडलेला होता, तरी प्रत्येक मुक्कामाहून आपल्या मित्रांना झाल्या हकीगतीचीं सविस्तर पत्रें लिही. लढाईच्या दिवशीं मराठे असईस आहेत अशी कांहीं वेलेस्लीला बातमी नव्हती. तो ११ मैल मजल मारून येऊन उतरत होता, इतक्यांत ते पांच चार मैलांवर आहेत असें समजलें. त्याबरोबर पुन: स्वार झाला आणि सर्वांना चला म्हणाला. एल्फिन्स्टन त्याच्या पाठीशीं मेण्यांत होता, तो जरा गडबड दिसतांना बाहेर पडला आणि घोड्यावर चढला. त्यापूर्वी एक महिन्यांत त्याचा रिकिबीला पाय लागला नव्हता. तो अव्वलपासून अखेरपर्यंत वेलेस्ली-च्या बाजूला अगदीं हजर होता. त्या दिवशीं घोड्याच्या किंवा वरच्या राउताच्या अंगाला अगदीं धक्का लागला नाहीं असे वेलेस्लीबरोबरच्या दहा असामींपैकीं दोन निघाले; एक तो आणि दुसरा क्यापटन कनिंगह्याम. पुढें तारीख २७ रोजीं लढाईच्या सविस्तर हकीकतीचें त्यानें आपल्या मित्राला पत्र लिहिलें, त्याच्याबरोबर एक नकाशा जोडून सेनापतीनें पलटणें कशीं कोठे नेलीं वगैरे खुलासा करून दाखविला. त्यावरून सेनेची रचना त्याच्या कशी ध्यानांत भरली तें नीट दिसून येतें. लढायांचा इतिहास लिहिणारांना त्याचा लेख फार उपयोगाचा आहे. हुबेहुब वर्णन करण्याची त्याची शैली कशी होती तें दाखविण्याकरितां एक उतारा देतों.

" गोळ्यांचा वर्षाव चालला असतां आमची फौज पुढें सरली. शत्रूंच्या आरोळ्या चाललेल्या ऐकूं येत इतके जवळ आह्मी गेलों तेव्हां जनरल साहे-बानें घोडा फिरविला. घोडेस्वार मागें होते त्यांना बोलावावयाला त्यानें पाठ-विलें होतें, ते येत होते तिकडे तो गेला आणि अगदीं भरधांव घोडा सोडून कर्नल म्याक्सवेल याजजवळ जाऊन त्याला पायदळाची उजवी बाजू संभाळावयास सांगून तसाच दौडत माघारा आला. जातांना आणि येतांना, दोन्ही वेळ तोफांचा भडिमार काय विचारावा ! तो खुद्द भुताचा. ( Devil's own ही मला मिळालेली खुबीदार ह्मण आयरिश लोकांची आहे. ) त्यानें आमच्या मंडळीचे तीन घोडे जमीनदोस्त झाले. आमच्या पुढें

एक शिपायांची रांग उभी होती तिच्याकडे तो घोडा टाकीत निघाला आणि आह्मीही त्याच्याकडे फार जलद निघालों. इतक्यांत तिकडून आमच्यावर एक तोफ सुटली. आह्मी सरासरी गोळीच्या टप्याच्या बाहेर होतों. त्याला कोणर्जे ह्मणालें, " साहेब, हे शत्रूकडचे लोक. " तें ऐकून तो " असें का ! हाआ, ड्याम्मी Ha damme. खरें रे खरें " असें ह्मणून माघारा फिरला. ( त्याची ती तसें बोलण्याची तऱ्हा तुह्माला माहीत आहेच. ) "

" लढाई आटोपल्यावर मी फिरत फिरत ७४ व्या पलटणीची जेथें कत्तल उडाली ती जागा पहावयास गेलों. ती मेलेल्या आणि जखमी झालेल्या लोकांनीं अगदीं भरून गेली होती. त्यांत आमचे आणि शत्रूकडचेही अम्म-लदार होते. काळोख पडल्यानंतर तेथून जवळच्या असईगांवांत मला जनरल वेलेस्ली आढळले. ते आपण चांगला पराक्रम करून मोठा जय मिळविला ह्मणून गर्वानें फुगून डौल मिरवीत नव्हते. ती रात्र त्यांनीं जमिनीवर पडून काढली. त्यांच्या शेजारीं एक अम्मलदार गोळ्यानें पाय तुटून जाऊन विव्हळत पडलेला होता. आणि दुसरा एक तेथून दहा हातांवर मरून पडलेला होता. मला थोडासा रसा मिळाला आणि पाणी मिळालें; त्यांत रक्त मिसळ-लेलें होतें परंतु ते त्या काळोखांत दिसलें नाहीं. मी उघड्यावरच पडून निजलों; जपून होतों त्यामुळे थंडी झाली नाहीं. "

रणांगणीं जनरल वेलेस्लीबरोबर राहिल्यानें एल्फिन्स्टनला त्याचें तेथचें सारें वर्तन पहावयास सांपडलें आणि त्याची त्याच्यावर भक्ति बसली. त्यानें आड्यामाला पत्र पाठविलें त्यांत असें लिहिलें आहे:—

' हा जय मिळाल्याबद्दल सेनापतीची खचित मोठी प्रशंसा होईल. तिला तो अगदी पात्र आहे, अशी माझी खात्री आहे. तो सर्व प्रसंगीं आपला जीव अगदीं धोक्यांत घालीत होता, आणि ज्या ठिकाणीं तोफांचा अतिशय भडिमार चालत होता त्या ठिकाणीं अत्यंत निर्धास्तपणें फिरत होता असें ह्मटलें तर त्यांत कांहीं विशेष सांगितलें असें नाहीं; कारण, कोणीही युरोपीयन तसें न करतां राहिलेला मला दिसला नाहीं. ( आणि लोक तरी दुसरें कांहीं करीत असतील असें मला वाटत नाहीं. ) परंतु जेव्हां अत्यंत काळजी वाटण्यासारखा मोठा कठीण प्रसंग होता तेव्हां तो इतका शांतपणें आणि स्वस्थ चित्तानें हुकूम फर्मावीत होता कीं, कोणी ह्मणता तो आपल्या फौजेची पहाणी करीत होता किंवा कवाईत घेत होता. "

लढाईनंतर दहा दिवस वेलेस्लीच्या सैन्याचा मुक्काम त्या रणांगणींच होता. एल्फिन्स्टनच्या तंबूंत पुष्कळ अम्मलदार त्याला भेटावयाला येत आणि अनेक तऱ्हांच्या गोष्टी चालत; त्या मुख्यत्वें त्या लढाईच्या संबंधाच्या असत. तरी त्यांतल्या त्यांत वेळ सांपडे तेव्हां तो शेक्स्पीयर वाची. त्याचीं सारीं नाटकें अगदीं नीट लक्ष लाऊन वाचण्यास त्यानें सुरुवात केली होती. त्याच्या लेखाचा एक मासला वर दिला आहे. एथें दुसरा देऊं. त्यानें स्ट्राचीला तारीख ३ आक्टोबर रोजीं पत्र लिहिलें त्यांतील हा उतारा आहे.

'रोमचा एक बादशहा ( व्हिटेलिअम ) ह्मणत असे मला शत्रूच्या प्रेताचा वास आवडतो. ते खरें असले तर त्याची ती आवड विलक्षणच ह्मटली पाहिजे. त्याच्या त्या आवडत्या सुगंधाचा आह्माला तर वीट येऊन गेला आहे. मला एकवार जिवंत शत्रूचा वास आला तर पुरेल. काल संध्याकाळीं मी लढाई झाल्या ठिकाणी फिरावयास गेलो होतों. तेव्हां अंधार पडला होता आणि अभ्र आलें होते. मी घोड्यावरून एकटाच फिरलो आणि प्रेतांच्या राशी पडलेल्या पाहिल्या. काही प्रेतें वाळून शुष्क झालीं आहेत. त्यांचीं स्वरूपें अजून कायम आहेत, परंतु तोंडें कोळशासारखीं काळीं ठिक्कर पडलीं आहेत. कांहीं अजून फुगलेलीं आहेत, आणि त्यांवर फोड आलेले आहेत. घारी आणि (adjutants) गिधाडें ( कलकत्त्यांतल्यापेक्षा सुद्धां मोठालीं ) यांची चंगळ चालली होती. कांहीं ठिकाणीं कुत्रीं प्रेतें फाडफाडून खात होतीं आणि साऱ्या मैदानभर ओरडत फिरत होती. मी एक काळा कुत्रा पाहिला, तो एका प्रेताच्या मांसाचे मोठमोठे लचके खूप जोरानें ओढून काढीत होता. तो फार भयकर दिसत होता. त्यानें माझ्याकडे पाहिलें देखील नाहीं. मला तो सारा देखावा भयंकर आणि मोठा चमत्कारिक वाटला. अखेर मला पुष्कळ भय वाटूं लागलें—तें धास्त पडण्यासारखें, परंतु वाईट वाटण्यासारखें नव्हतें —आणि तशांतच संध्याकाळच्या तोफेचा धाडकन् आवाज झाला, तेणेंकरून त्या स्थळाला अधिकच उग्ररूप आलें. त्यांतून, ऐकतों तर माझ्या डोक्यावरून गोळा सोसावत गेला तेव्हां मला केवढें आश्चर्य वाटलें ह्मणून सांगूं? मला वाटतें ती गोलंदाजाची कांहीं तरी चूक झाली असावी."

एल्फिन्स्टननें स्ट्राचीला जनरल वेलेस्लीच्या कांहीं गोष्टी लिहिल्या आहेत, त्यांत असें आहे:–एक दिवस सकाळीं तो ह्मणाला, "असईस आमचा पराजय

होता तर असें असें झालें असतें आणि मग मी लागलाच आपल्या तंबूच्या आढ्याला दोरी अडकवून मानेला फास लाऊन घेतला असता." माझ्या टेबलावर Selecta Graeca ग्रीक ( नवनीत ) पुस्तक होतें तें उचलून घेऊन त्यानें कांहीं मिनिटें ग्रीक वाचलें. मी कायसें काम करीत होतों. तो लॅटीन भाषेच्या रचनेविषयींही बोलला. तो ह्या अभियुक्त भाषांत प्रवीण असला तर आश्चर्य आहे........( निजामाच्या आणि पेशव्यांच्या राज्यांना राज्यें आणि त्यांच्या दिवाणांना युरोपांतल्या राजांच्या प्रधानांसारखे प्रधान म्हटलें म्हणजे तो हंसतो. ) ( मी त्याच्या उलट प्रतिपादन केलें आणि त्याचें म्हणणें गैर आहे, असें सिद्ध करून दाखविलें. ) "

असईच्या लढाईनंतर शिंदे व भोसले यांचा पाठलाग करण्याचें काम स्टीव्हेन्सनला सांगून त्यांना पेशव्यांच्या आणि निजामाच्या मुलखांत शिरून उपद्रव करूं देऊं नये ह्मणून वेलेस्ली स्वतः इकडून तिकडे मागें पुढे फिरत राहिला. तेव्हां कुचाची तऱ्हा कशी असे, मुक्काम झाला म्हणजे दिवस कसा जात असे, वगैरे एल्फिन्स्टनने तारीख १५ नोव्हेंबर रोजीं स्ट्राचीला लिहिलेल्या पत्रांत सविस्तर मजकूर आहे. तो असाः—

छावणी देवतना, ता. १५ नोव्हेंबर.

छावणीच्या दिवसाची तऱ्हा पहा. साडेचार वाजतां सारे उठतात. भेरखसू वाजूं लागतात आणि मी उठतों आणि माझा तंबू पाडूं लागतात तो पोषाक करतो. पुढच्या बाजूला जातों आणि क्वारटर मास्टर जनरलच्या तंबूला जातों, आणि पेलाभर चहा घेतो. तेथें कामदार मंडळी जमते त्यांच्याबरोबर गप्पा मारतों. चांगलें उजाडेपर्यंत असें चालतें. सारे जमले असें कळण्याकरितां कांहीं वाजतें आणि जनरल साहेब बाहेर येतो. त्याच्या तंबूपुढे टेबल मांडलेलें असतें, तेथें जाऊन आम्ही न्याहारी करतों. एकीकडे गप्पा चाललेल्या असतात. आज थंडी फार पडली आहे, म्हणून आम्ही आपले लांब पायघोळ झुबले घातले आहेत. साडेसहा वाजतां किंवा जरा आगें मागें, आम्ही घोड्यावर बसून बाहेर जातों आणि जेव्हां शिकार नसेल तेव्हां एकमेक मिळून जातों असें नाहीं. जनरल साहेब बहुतकरून ज्या बाजूला धुरळा असेल त्या बाजूस चालतो म्हणून त्याच्याबरोबर कोणी रहात नाहीं. आतां आम्ही नेहमीं कर्नल वालेसला जाऊन मिळतों आणि असेंच सुमार एक मैल

दूर वाजूनें जातों, आणि दहा बारा वाजेपर्यंत मुक्कामाच्या जागेला जाऊन पोहोंचलों म्हणजे खुर्च्या आल्या असल्या तर सारे त्यांवर, नाहीं तर जमिनीवर बसतों. जनरल साहेब बहुतकरून खालीं बसतो. तंबू ठोकून झाला म्हणजे आम्ही आंत जातों आणि तो गालीच्यावर बसतो. उपहाराची तयारी होईपर्यंत आम्ही गप्पा मारीत बोलत बसतों. उपहार झाला म्हणजे आम्ही आपापल्या तंबूंत जातों. दोन वाजेपर्यंत मी आपल्या हरकाऱ्यांची व्यवस्था लावणें, रोजनामा लिहिणें, पर्फेग्राफ, लिसिअस, वाचणें, तुह्मांला आणि आडामला पत्रें लिहिणें वगैरे कामें करतों; केव्हां केव्हां भाषांतर करतों, आणि केव्हां केव्हां जनरलाबराबर राजकीय विषयांवर किंवा गुप्त गोष्टी बोलतों. मग दोन तीन वाजतां मी एक पाव खातों आणि दोन ग्लास पोर्ट दारू पाण्यांत मिसळून पितों. संध्याकाळ झाला म्हणजे मी स्मश्रु करवितों आणि मग अगदीं काळोख पडेपर्यंत हुजूरच्या तंबूंच्या रांगेपर्यंत आसपास फिरतों. मग पोषाक करून भोजनास जातों. तेथें आह्मी सर्व आपल्या कुचाच्या वगैरे गोष्टी बोलतों; कोणी आपल्या मागल्या लढायांच्या, ह्या लढाईच्या, राजदरबारांच्या आणि राजकीय विषयांच्या गोष्टी बोलतात. नऊ वाजतां तेथून सारे उठतों आणि मग क्वार्टर मास्टर जनरल, ब्रिगेडीचा मेजर आणि मी एकत्र बसून उद्यां कूच करावयाचें कीं नाहीं तें ठरवितों. मग मी आपल्या मेण्यांत जातों. ह्या सर्व गोष्टींपासून मला मोठें सुख वाटत आहे. मंडळीचा सहवास, अभ्यास, काम, लढाई आणि साहसप्रसंग ह्या सर्वांचा मला अनुभव घडला आणि तो आवडला."

याप्रमाणें दक्षिणेंत प्रकार चालला होता आणि तिकडे हिंदुस्थानांत लेक साहेब एकावर एक लढाया करून सारखा जय मिळवीत सुटला होता, त्यामुळें आतां लढाई संपेल असें वाटत होतें. आतां तहाचें बोलणें लावावें असें शिंद्याच्या मनांत येऊन चुकलें होतें. परंतु भोसल्याच्या अंगांत अद्याप दम होता त्यामुळें एल्फिन्स्टनला रणांगणीं आणखी कांहीं चमत्कार पहावयास सांपडला. असईच्या लढाईनंतर दोनच महिन्यांनीं, तारीख २९ नोव्हेंबर रोजीं, वऱ्हाडांत आरगांव नांवाच्या लहानशा खेड्याजवळच्या विस्तीर्ण मैदानांत शत्रूशीं पुनः सामना झाला. बहुतेक फौज रघोजीच्या भावाच्या हाताखालीं

शिकवून तयार केलेल्या कवायती पलटणांपेक्षां हे आरबच अधिक उपयोगी पडत होते. ) शिंद्याकडचे स्वार पुष्कळ होते. वेलेस्ली आणि स्टीव्हेन्सन ह्या दोघांच्या फौजा एक झाल्या होत्या. लढाईला आरंभ बरीच संध्याकाळ झाल्यावर झाला. एल्फिन्स्टन मागच्याप्रमाणें वेलेस्लीबरोबरच होता. मराठ्यांच्या तोफखान्यानें आरंभाला मोठीच गर्दी उसळून दिली. ( तेव्हां शिपायांचीं जीं पलटणें असईस गोळ्यांचा सारखा वर्षाव चालला असतांना जागेवरून काडी इतकीं हाललीं नाहींत त्यांची त्रेधा उडाली आणि तीं सैरावैरा धावूं लागलीं. ) इतक्यांत वेलेस्ली तेथें आला आणि त्यानें त्यांना धीर देऊन पुन: नीट उभीं करून लढावयाला लाविलें. तो अगदीं न डगमगतां शत्रूच्या पलटणाजवळ गेला आणि कांहीं वेळानें माघारा येऊन एल्फिन्स्टनकडे वळून म्हणाला, " रात्र पडण्यापूर्वीं त्या तोफा घ्यावयाला आम्हांला वेळ सांपडेल. " एक गोरें पलटण आरबांबरोबर लढूं लागलें आणि खुद्द वेलेस्ली मद्रासी स्वारांचीं पलटणें घेऊन मराठे स्वारांवर चालून गेला. ते त्यांच्यापुढें फारसे उभे ठरलेच नाहींत. सूर्यास्त होण्यापूर्वींच मराठ्यांनीं अगदीं पळ काढला. इंग्लिशांचा नाश अगदीं थोडा झाला. वेलेस्लीनें असें लिहिलेलें आहे कीं, आम्हांला जर एक तास दिवस सांपडता, तर आमच्या हातून एक मनुष्य सुटलें नसतें. आरंभीं शत्रूकडील तोफखाना सुरू होतांच आमचे शिपाई घाबरून जाऊन त्यांची धांदल उडाली, तसें झालें नसतें तर तेवढा वेळ सांपडत होता. "

स्वारांचा हल्ला कसा होतो तें एल्फिन्स्टनला असईस पहावयास सांपडलें नव्हते. ती संधि त्याला येथे मिळाली. त्या प्रसंगाचें वर्णन त्यानें असें केलें आहे:—

' तोफांचे गोळे पडून त्यांनीं आमच्या घोड्यांच्या पायांखालचा धुरळा उसळत होता. यावेळीं मी अगदीं संकटांत सांपडून थोड्यांत निभावलों असें झालें नाहीं. मी अगदीं निर्धास्त होतों; केव्हांही कचरून मागें सरलों नाहीं. आणि अगदीं निकराच्या प्रसंगीं गोळी किती जवळून गेली ह्मणून पर्वा बाळगिली नाहीं. लोक कसे दिसतात हें पहाण्याकडे माझें लक्ष सारा वेळ होतें. प्रत्येक गृहस्थ शिकारींत घोडा टाकतांना जसा बेफिकीर असतो तसा दिसत होता. आमच्या तोफा सुरू झाल्यानें आमच्या लोकांना धीर मोठा आला. करोल स्वारांचा हल्ला झाला, तेव्हां त्यांनीं पहिल्यानें कांहीं वेळ तलवार

चालविली आणि मग आपले तमंचे (pistols) काढले. मी थांबून आपल्या तमंचांत बार भरले. मग मला पायच्या माणसांशिवाय दुसरें कोणी दिसलेंच नाहीं. त्यांना धक्का लावणें हें मला कांहीं योग्य वाटलें नाहीं. खरोखर, दाणादाण होऊन घाबरून गेलेल्या आणि आतां पळावें, कीं लढावें तें सुचेनासें झालेल्या स्वारांवर हल्ला करण्यांत कांहीं मोठें शौर्य नाहीं.'

एल्फिन्स्टन ह्या रणांगणीं असा फिरत असतां एक दोन वेळ त्याचा घोडा अनावर होऊन त्याला घेऊन शत्रूंमध्यें शिरला. परंतु तेथें त्याच्यावर कोणीं शस्त्र उचललें नाहीं, हें त्याचें सुदैव नव्हे तर काय? दुसऱ्या दिवशीं सकाळीं तो रणांगणीं फिरावयास गेला असतां एका तोफेखालीं एक मनुष्य मांडींत गोळी लागून पडलेला त्याच्या दृष्टीस पडला. त्यानें त्याला उचलून आपल्या तंबूंत नेलें. तो चांगला जवान ब्राह्मण होता. त्याला बरा करून त्यानें आपल्या जवळ ठेऊन घेतलें. एल्फिन्स्टन हिंदुस्थान सोडून जाईपर्यंत त्याच्याच जवळ तो राहिला. त्याचें नांव तुळाराम.

आरगांवच्या प्रसंगानें लढाई संपलीच म्हणावयाची. मग रणांगणीं शस्त्र घेऊन कोणी उभा राहिला नाहीं. शिंदे आणि भोसलेही इंग्रज सांगतील त्या अटी कबूल करून तह करण्यास राजी होते. परंतु गाविलगडचा किल्लेदार हट्टास पडला आणि आपण लढणार म्हणाला. तेव्हां एल्फिन्स्टला लढाईतला हाही प्रकार पहण्याची संधि अनायासें मिळाली. भोंसल्याकडून वकील आलेला होता आणि त्याच्याबरोबर रोज तहाचें बोलणें चाललेलें होतें. म्हणून ह्याला अगदीं फुरसत नसेल असें कोणालाही वाटेल. तसें होतें, तरी त्याच्यानें हल्ला करणाऱ्या लोकांबरोबर गेल्याशिवाय राहवेना. तें काम त्याच्या वरिष्ठाकड नव्हतें. वेलेस्लीबरोबर तट पाडण्याच्या तोफा नव्हत्या म्हणून त्यानें स्टीव्हेन्सनला ती कामगिरी सांगितली होती; त्याची परवानगी घेऊन तो गेला. त्याच्या अंगावर कांहीं लष्करी लोकांसारखा पोषाख नव्हता, त्यामुळें हा कोणी तरी शत्रूकडचा युरोपीयन आहे असें समजून कोणा इंग्रजानेंच त्याला गोळी घातली असती; परंतु मागच्याप्रमाणें ह्या प्रसंगींही सुदैवानें त्याला कांहीं एक इजा झाली नाहीं.

गाविलगड, तापी आणि पूर्णा ह्या दोहों नद्यांच्यामध्यें जी डोंगरांची रांग आहे तींतल्या एका सुळक्यावर आहे. त्याची उंची ३५०० फूट आहे.

आरगांव त्याच्या नैर्ऋत्येस २० मैलांहून अधिकच आहे आणि एलिचपूर आग्नेयीस सुमारें १२ मैल आहे. त्याच्यावर हल्ला कोणीकडून, कसा करावा तें उभयतां जनरलांनीं ठरवून ते एलिचपुराहून दोघे दोहोंबाजूंनीं मारा करण्यास निघाले. त्यांना तोफा वर नेण्याला फारच प्रयास पडले. फौज नेण्यालासुद्धां कितीएक ठिकाणीं रस्ता करावा लागला. किल्ल्यासभोंवतालच्या वनश्रीचा देखावा फार रमणीय आहे, त्याचें आणि किल्ला सर होईपर्यंतच्या रोजच्या हकीकतीचें वर्णन एल्फिन्स्टननें आपल्या रोजनाम्यांत अगदीं तपशीलवार केलें आहे, तें फार मनोरंजक आहे. त्यानें आपल्या एका मित्राला पत्र लिहिलें आहे त्यांत तो ह्मणतो, " तारीख ९ रोजीं क्याप्टन जॉन्सन पश्चिमेच्या दरवाजाच्या अगदीं जवळ गेला. दरवाजा सारा ८०० यार्ड पुढें राहिला. तो उघडाच होता. त्यांतून किल्ल्यापासून ३०० यार्डांच्या आलीकडे त्याला अशी एक जागा दिसली कीं, तेथून तटाला भगदाड पाडतां येईल. तेथें पाणी, सामान, आश्रय, वगैरे जें हवें तें होतें आणि किल्ल्याच्या आंतली बाजू चांगली दिसत होती. " " ह्या किल्ल्यांतले लोक सुस्त, अगदीं कवडीच्या लायकीचे, कांहीं कामाचे नव्हते. ते जर किल्ला लढवते, तर आमचें पुष्कळ सैन्य कामास आल्यावांचून तो सहसा आमच्या हातीं आला नसता. त्यांनीं जर गोळी चालविली असती किंवा छापा घातला असता, तर ते जनरल वेलेस्ली आणि कर्नल स्टीव्हेन्सन ह्या दोघांनाही ठार मारते किंवा कैद करते; आणि जर कर्नल हालिबर्टनच्या छावणीवर गोळी किंवा बाण टाकते तर त्यांना पुष्कळ लोक मारतां येते. " असो—अखेर किल्ला सर झाला त्यादिवशींची हकीगत त्यानें दिली आहे ती अशी:—

किल्ल्यावर चढाई करून फौजेचें आधिपत्य कर्नल केनीनें स्वीकारावें आणि पीरपट्टी दरवाजावर चालून जावें; कर्नल डेसीनें डाव्याबाजूकडून हल्ला करावा आणि कर्नल लेंगनें दुसरीकडून हल्ला करावा; असा बेत ठरल्याचें मला समजलें. त्यावेळीं आमच्या कामदार मंडळींचा असा समज होता कीं, किल्ल्याला जीं तीन खिंडारें पडलीं होतीं त्यांच्या मागें तिसरा तट आहे. तो जीर्ण झाला असल्यानें त्याला भोकें पडलीं आहेत, परंतु तो उभ्या कड्यावर आहे. त्याच्यावरून गेलें ह्मणजे पुढें कांहीं अडचण नाहीं. मग डोंगरापलीकडे खोऱ्यांत वेणीसिंग आपली फौज घेऊन आहे, तिच्याशीं काय लढावें लागेल तेवढेंच, आपण त्या डोंगरावर गेलों ह्मणजे तेथें सारी फौज एका जागीं

जमवावयाची आणि त्याचा पुरा मोड केल्याशिवाय फुटून लहान लहान टोळ्या करावयाच्या नाहींत.

कर्नल केनी आणि डेसी मोर्चांत बसले होते, तेथें जाऊन मी केनीला ह्मटलें, आतां जो हल्ला व्हावयाचा त्यांत तुह्मी आपली टोळी घेऊन पुढें होणार असें मी ऐकिलें आहे. मला परवानगी द्याल तर मी तुमच्या टोळीबरोबर येतों. त्यानें मान हालविली आणि बरें आहे ह्मटलें. तयारी होऊन हुकूम होतांच तो निघाला. आह्मी आपल्या तलवारी म्यानांतून काढल्या. तमंचे कंबरेच्या पट्टयांत, किंवा हातरुमाल कंबरेला गुंडाळून त्यांत अडकविले आणि मोर्चाच्या मागून जाऊन तटाच्या खिंडाराकडे चाल केली. कर्नल जान्सन यानें एका बिचाऱ्या पाटलाला धरून आणून आपल्या बरोबर चालविलें होतें. आमच्या मागून ९४ पलटण आलें. आह्मी पुढें चाल करीत होतों ती गुपचुप, विचारानें आणि गंभीरपणानें करीत होतों. खिंडारांतून आह्मांला आंत येऊं देऊं नये ह्मणून आंतले लोक आपली अगदीं शिकस्त करतील असें सर्वांना वाटत होतें. परंतु आह्मी अगदीं तटाजवळ गेलों तरी त्यांनीं एक देखील बार केला नाहीं. तें पाहून मला आश्चर्य वाटलें. आमची तोफ आमच्या डोक्यावरून गोळे टाकीत होती. आह्मी खिंडाराशीं पोहोंचलों आणि तेथें थांबून एका सार्जंटच्या हाताखालची टोळी पुढे ढकलली. तिचें नांव (Forlorn hope) " जिवावर उठलेली " ठेविलें होतें. तिच्या मागून आह्मी निघालों आणि धांवत जाऊन दुसरें खिंडार गांठलें आणि जयघोष केला. पुढें लौकरच फौज आंत शिरली. मग जिवावर उठलेले आणि न उठलेले यांत भेद राहिला नाहीं, सारेच मिळाले. शत्रूकडचे जे लोक लढण्याला उभे राहिले, त्यांना बागनेटांनीं भोंसकून मारलें. परंतु बहुतेकांनीं धांव ठोकून पळ काढला आणि उजव्या बाजूनें जाऊन एका चिंचोळ्या खोऱ्यांतून शिरून तिकडे एक दरवाजा होता तो गांठला. त्याचें नांव कूलदरवाजा. तिकडून कर्नल चामर्स ७४ वी अर्धी पलटण घेऊन वर येत होता; त्यानें त्यांना अडविलें. इकडून ९४ वी त्यांच्या पाठीवर गेली. त्या दोघींनीं खालून आणि वरून गोळ्यांचा वर्षाव सुरू केला तेव्हां भयंकर कत्तल उडाली. त्यानंतर आह्मी पुढें जावयास निघालों आणि पहातों तर खरा किल्ला तो कांहीं हा नव्हे; ही टेंकडी निराळी आणि तो निराळा. तें पाहून आह्मांला आश्चर्य वाटलें, आमच्यापुढें एक खोल दरी असून तिच्या पलीकडे दुहेरी तट आणि मजबूत दरवाजे दिसत

होते. तें पाहून फौज थबकली आणि तिच्यावरचे अम्मलदार तिला शिस्तीनें उभी करूं लागले. परंतु कर्नल केनी अगदीं एकटा असल्यासारखा दरवाज्याजवळ जाऊन ठेपलेला दृष्टीस पडला. त्याला पाहतांच गोऱ्या शिपायांनीं खालची वाट धरली आणि सारे त्याच्याशीं जाऊन भिडले. पहिला तट एका कड्याला जाऊन मिळालेला होता. युरोपीयन शिपाई हळू हळू मोठ्या प्रयासानें एक एक वर चढूं लागले. त्या तटाच्या पलीकडे एक अरुद खडकाळ रस्ता होता. त्याच्यावर एक उभा कडा, खडक होता आणि दुसरा तट आणि दरवाजा होता. पहिला तट चढून जे गेले हाते, त्यांना पुढें तो उलटून जावयास पाहिजे होतें; परंतु तट अगदीं उभा आणि उंच असल्यामुळें जाणें अशक्य होतें. गोरे लोक भेटाकुटीनें वर चढत असतां शत्रूंनीं तटावरून तोफांचा मार सारखा चालविला. इतक्यांत आमचे लोक खिंडारांतून आंत शिरले आणि शत्रूंच्या समोरचा डोंगर व्यापून त्यांनीं त्यांवर बंदुक सुरू केली. त्या गोळीबारानें सारें खोरें असें दणाणून गेलें कीं, त्याची नीट कल्पनासुद्धां करतां येणार नाहीं. अखेरीस आमचे लोक आंत गेले आणि त्यांनीं पहिला दरवाजा उघडला. मग उंच उंच शिड्या टेंकडीवर नेऊन त्या दुसऱ्या तटाला लावल्या. शत्रु तटावरून पळाले. आह्मीं आंत घुसलों आणि किल्ला आमच्या हातीं आला. जान्सन आणि मी या दोघांनीं असें मनांत आणलें कीं, कांहीं लोक जमाकरून जिकडून जनरल वेलेस्ली आपली फौज घेऊन येत होता त्या दरवाजाकडे जावें. तसें करण्याला आह्मांला कांहीं आयास पडले नाहींत. कारण, अम्मलदार वगैरे ज्याला ज्याला आह्मीं तो बेत सांगूं तो बरें ह्मणे. त्या दरवाज्याच्या रस्त्याचा माहीतगार एक कैदी बरोबर घेऊन आह्मी निघालों, परंतु लौकर जाणें होईना; कारण, मग दुसरीच अडचण येऊन उभी राहिली. दर दर पावलाला मंडळीचें मन चलबिचल होऊं लागलें. कोठें शत्रू आडवे येत, कोठें लूट मिळण्याची संधि दिसे; कोठें पाणी दृष्टीस पडे; तें किंवा दुसरें कांहीं चमत्कारिक दिसलें कीं, पाय तिकडे घेई. परंतु आणखी मंडळी जमवून जेमतेम किल्लेदाराच्या घराशीं गेलों आणि तेथें आमची गति खुंटली. त्याच्या दारापुढें एक युरोपीयन जखमा लागून पडलेला होता. त्याचे डोकें मानेखालच्या टेंकणावरून मागें पडलें होतें आणि तें धडापासून बहुतेक सोडवलेलें होतें. आमच्या सभोंवार जिकडे तिकडे कांहीं माणसें मेलेलीं आणि कांहीं मरत पडलेलीं होतीं. एका बाजूला एक अम्मलदार कोणी तरी येऊन

ह्या किल्लेदाराला उचलून फांशीं द्यारे ह्मणून ओरडत होता. तेव्हां तो फांशीं जात होता, परंतु मी ह्मटलें त्याला मारूं नका; किल्ल्यांत द्रव्य कोठें आहे तें त्याला माहीत असेल तसें दुसऱ्याला असणार नाहीं. त्याला आह्मीं कर्नल लेंग ह्याच्या हवालीं केलें. तो त्याला खजिन्याकडे नेणार होता, परंतु तित-क्यांत तो पळाला; पण पुढें प्राणास मुकला. अखेर आह्मीं पीरपट्टी दरवाज्या-जवळ गेलों; आमचें पलटण आंत आलें आणि भोंसल्याचें निशाण उपटून टाकून तेथें आह्मीं आपलें रोंवून जयघोष केला.

जेव्हां मी तटाला पडलेल्या खिंडाराजवळ गेलों तेव्हां मला असें वाटलें कीं, मी मोठ्या संकटांत शिरतों आहें. परंतु माझ्या मनाचा पक्का निश्चय झाला असल्यामुळें मी कशालाही भ्यालों नाहीं. किल्ल्यावर हल्ला करण्याला निघा-लेली ती टोळी पाहून मला होमरच्या ( ईलियडच्या ) तिसऱ्या सर्गांतील आठव्या व नवव्या पंक्तींचें स्मरण झालें. त्या अशा—†

एकदां खिंडारांतून मनुष्य पार पडून गेलें ह्मणजे त्याला स्फुरण चढत असतें आणि आतां पुढें कसा जाईन असें होऊन दुसरें कांहीं सुचेनासें होतें.

गाविलगड घेण्यांत आमचे मेले व जखमी झाले असे युरोपीयन ५३ आणि सुमार १०० शिपाई ( नेटिव ) होते. शत्रूकडचे लोक अतिशय मेले. ते शानदार, सुंदर, उंच, हिंदुस्थानी आहेत. त्यांचा सेनापति बेणीसिंग मेलेल्यांत आहे. अशी गाविलगडची हकीगत झाली."

गाविलगड तारीख १५ दिसेंबर १८०३ इसवी रोजीं सर झाला. दुसऱ्या दिवशीं मेजर माल्कम लष्करांत येऊन दाखल झाला आणि तहाचें बोलणें होऊन तें निश्चयांत आलें. तहनामा लिहिण्याचें काम त्या रात्रीं एल्फिन्स्टन-च्या तंबूंतच चाललें होतें. मुनशी लिहीत होते आणि तो मध्यें मध्यें वरचे-

---

† मूळांत ह्या पंक्ति एल्फिन्स्टननें ग्रीकमध्यें लिहिलेल्या आहेत.

The Greeks went in silence, breathing strength
Resolved in their hearts to support one another.

याचा अर्थ.

ग्रीक लोक मुकाट्यानें गेले, आमची शक्ति कशी आहे ते दाखवूं असें ते मनांत ह्मणत होते आणि एकमेकांचें संरक्षण करावयाचें हा त्यांच्या मनाचा निश्चय होता.

वर उठून त्यांच्यावर नजर ठेवीत होता. दुसऱ्या दिवशीं संध्याकाळीं भोसल्याच्या वकीलाची त्यावर सही झाली. शिंद्याबरोबर तहाचें बोलणें चाललें होतें, तेंही निश्चयांत येऊन तारीख ३० रोजीं तहनामा पुरा झाला. त्या तहाला सुरजी अंजनगांवचा तह ह्मणतात.

ह्याप्रमाणें शिंदेभोंसल्यांनीं आरंभलेल्या महासंग्रामाचा शेवट त्यांना फार अनिष्ट असा झाला. दोघांतून एकाच्याही अंगीं धाडस नव्हतें; त्यांना अनुभवही नव्हता. लढाई अमुक तऱ्हेनें करावी असा त्यांचा निश्चयही ठरेना. एकदां शिंदा ह्मणे माझीं पलटणें आणि तोफखाना जय्यत आहेत, हीं घेऊनच लढूं. एकदां भोंसला ह्मणे तसें कांहीं नको, आपली जुनी रीत आहे, तीप्रमाणें गनिमी कावा करावा तेंच बरें. अशाखालीं त्यांच्यानें नेटानें पाहिजे होतें तसें लढणें झालें नाहीं आणि पुष्कळ मुलूख सोडून देऊन त्यांना निस्तेज होऊन बसावें लागलें.

एल्फिन्स्टनच्या चरित्रांतल्या ह्या अत्यंत धामधुमीच्या भागाची याप्रमाणें परिसमाप्ति झाली. चार साडेचार महिन्यांच्या अवधींत त्याला अगदीं निकराच्या दोन लढायांत आणि दोन मोठाल्या किल्ल्यांच्या बिकट वेढ्यांत शिरून पुढें थोड्याच काळांत साऱ्या भूमंडळावर ज्याची कीर्ति पसरली त्या महावीराचें युद्धकौशल्य पहावयास सांपडलें आणि आपल्या आंगचें धैर्य आणि उत्साह दाखवून त्याची मर्जी सुप्रसन्न करून घेतां आली; ती इतकी कीं, तो सेनापति त्याला ह्मणाला, तूं मुलकी खात्यांत शिरलास ही चूक केलीस; आमच्या या लष्करी खात्यांत शिरतास तर बरें होतें. तो त्याचा चिटणीस ह्मणून बरोबर होता खरा, परंतु त्याच्यावर तो फार काम पडूं देत नसे; जे खलिते वगैरे पाठवावयाचे असत ते नेहमीं आपणच लिही आणि कोणाशीं तहाचीं बोलणीं बोलावयाचीं असत, तींही आपणच बोले. तरी त्यानें त्याला चिटणिशीच्या जागेचा पगार देवविला. शिवाय क्याप्टनांबरोबर लुटींतल्या द्रव्याचा हिस्सा व बक्षीस देवविलें.*

---

* त्याला याप्रमाणें पैसा देण्याबद्दल वेलेस्लीनें गव्हरनर जनरलाकडे शिफारस केली होती, ती मान्य होऊन जबाब आला तेव्हां त्यानें एल्फिन्स्टनकडे त्याचा उतारा पाठविला आणि पैसा पदरीं पडण्यास कशी तजवीज करावी तेंही सुचविलें. त्याच पत्रांत त्यानें आणखी मजकूर लिहिला तो असा—

तहनामा पुरा होऊन गेल्यावर दुसऱ्या दिवशीं सकाळीं मेजर माल्कम एल्फिन्स्टनबरोबर बोलूं लागून ह्मणाला, नागपूरच्या रेसिडेंटाच्या सेक्रेटरीची जागा रिकामी आहे. तिजवर तुह्मी जाता का ? तो ह्मणाला मला ती नको. मला लष्करांत रहाणेंच आवडतें. त्यावर माल्कम ह्मणाला, पेन्शे येईपर्यंत कोणी तरी गेलें पाहिजे. कदाचित् तुह्मांला आणि मला, दोघांनाही जावें लागेल. एलफिन्स्टन ह्मणाला तुम्ही जात असाल तर तुमच्याबरोबर मी आनंदानें येतों. पुढें जनरल वेलेस्ली त्याला म्हणाला तुम्हाला शिंद्याकडे किंवा भोसल्याकडे मी पाठविणार, आवडेल तिकडे जा; परंतु पुढें रेसिडेंट होण्याचें संधान कोणीकडे असेल तें मनांत आणा. त्यावर त्यानें उत्तर दिलें जेथें काम पुष्कळ असेल तेथें मी जाईन. कायम कोठें व्हावयाचें तें पुढचें पुढें पहातां येईल. मग आणखी बरेंच भाषण होऊन त्या दोघांनींही त्याला सांगितलें, नागपुरास जा. तेथून बढती लौकर होईल. त्यावर तो कांहीं बोलला नाहीं. खरें ह्मटलें तर त्याच्या मनांतून तेथें जावयाचें नव्हतें. त्यानें आपल्या मित्राला पत्र लिहिलें त्यांत तो म्हणतो मला तिकडे कां जाऊं नयेसें वाटतें हें तुह्मांला सांगण्याचीसुद्धां लाज वाटते, परंतु सांगतों. मला रिकामपणांत,

कर्नेल मान्सनचें माघारें फिरणें, पराभव, दुर्लौकिक आणि दुर्दशा, हें सर्व तुम्हीं ऐकिलेंच असेल. तो अखेर कसा तरी आग्ऱ्यास येऊन दाखल झाला. बरोबर असावी तितकी सामुग्री नसतां उगाच फार दूर गेलें आणि होळकरासारखा शत्रु पाठीवर घेऊन माघारें फिरलें तर केवढें संकट गुदरतें आणि कसा अनर्थ ओढवतो, याचें उदाहरण पाहिजे असल्यास कर्नेल मान्सन आणि त्याचें तें सैन्य हें आहे. त्यानें होळकरावर एकदम हल्ला केला असता तर फार बरें झालें असतें. तसें करता तर बहुधा लढाईचा शेवट लागता. निदान त्याला धडपणें माघारें येतां येतें. पण ही आपली तुमच्या आमच्या मधली गोष्ट; ही बाहेर फोडावयाची नव्हे. कारण, उत्तरेकडे अलीकडे ज्या कांहीं गोष्टी घडल्या त्यांसंबंधानें माझें मत काय आहे तें बाहेर पसरावें हें मला अगदीं बरें वाटत नाहीं. माझी इच्छा एवढीच आहे कीं, त्यांच्या योगानें जे आमचे नुकतेच शत्रु होते त्यांना पुनः शस्त्र उचलण्याला हुरूप न येवो.

मला वाटतें, कर्नेल मान्सनच्या पळाची गोष्ट तुम्ही रामचंद्राला सांगावी हें बरें. ती सांगतांना असें बोलावें कीं, त्याच्याजवळ फौज थोडी होती, ती घेऊन तो फार दूर गेला आणि मागें पाठबळ नाहींसें झालें त्यामुळें असें घडलें..................इत्यादि.

मंडळींत, बायकांत, असावें अशी इच्छा उत्पन्न होऊं लागली आहे. तेथें मला अगदीं एकटें एकीकडे पुष्कळ दिवस रहावें लागेल याचें भय वाटतें. आतां आपली नेमणूक होणें मला आवडतें हें खरेंच आहे. मग रेसिडेन्सी आणि ती रिकामी होईपर्यंत चिटणिशी हें बक्षीस मिळणार, याचेंच भय वाटतें. या पत्रांतला बहुतेक मजकूर फक्त तुह्मींच पहावयाचा. दुसऱ्या कोणीं पाहिला तर त्याला तो हास्यास्पद वाटेल आणि माझी आत्मश्लाघा पाहून वीट येईल. ह्या पत्रांत कांहीं गोष्टी अशा आहेत कीं, त्या कागदावर लिहितांना आणि तो टपालांत टाकतांना माझा थरकांप होत आहे. थोड्या मंडळींत असलें तर अभ्यास करावयाला आणि सुखानें व तत्वान्वेषण करीत रहावयाला सांपडतें; परंतु रेसिडेन्सीमध्यें तसें नाहीं. तऱ्हेतऱ्हेचे लोक येऊन नाचतात आणि त्रास होतो. परंतु माझ्या नशिबीं काय आहे तें आतां लौकरच कळेल. माल्कम साहेबांची प्रथम भेट झाली तेव्हांपासून ते मजवर कृपा करीत आहेत. त्यांनीं माझी शिफारस करून मला बोलवावयाला पाठवून नगरास नेवविलें, याबद्दल मी त्यांचा फार आभारी आहें.

तारीख २० रोजीं वेलेस्लीनें त्याला जाण्याची तयारी करावयास सांगून म्हटलें, तुमच्याबरोबर एक शस्त्रवैद्य ( Surgeon ) पन्नास शिपाई, तुह्माला आवडेल तो एक अम्मलदार आणि ह्मैसूर रिसाल्यांतले पन्नास स्वार देतों. यावरून तो त्याच्यावर किती प्रेम करीत होता तें दिसून येतें. त्याला कायमची जागा मिळावी अशी त्याची इच्छा होती ह्मणून त्यानें गव्हरनर जनरलाकडे त्याची मोठी शिफारस केली. त्यानें पत्र लिहिलें तें असें:—

" आतां मिस्टर एल्फिन्स्टन यांविषयीं नामदार साहेबांस लिहावयाचें; तर त्या गृहस्थांविषयीं मला आपल्याला निदान इतकें कळविलें पाहिजे कीं, ते मजजवळ आल्यापासून मला अतीशय मदत झाली आहे. त्यांना मराठी भाषा चांगली येते; मराठेशाईतील दरबारांची माहिती आणि अनुभव आहे; त्यांचे एकमेकांशीं संबंध कसे आहेत व ब्रिटिश सरकाराशीं आणि त्यांचे दोस्तांशीं संबंध कसे आहेत हें माहीत आहे; ह्या मोहिमेंत इकडच्या भागांत जितक्या लढाया झाल्या आणि जितके वेढे पडले तितक्या साऱ्यांत ते हजर होते. ज्या काय गोष्टी घडल्या त्या साऱ्या त्यांना माहीत आहेत आणि तसेच माझे सर्व विषयांवरचे विचार माहीत आहेत; ह्मणून मी आपल्याकडे त्यांची शिफारस करितों. "

# भाग ५ वा.

## नागपूर, सन १८०३–१८०७.

जनरल वेलेस्लीच्या शिफारसीनें एल्फिन्स्टनला अगदीं पूर्ववयांत—चोविसावें वर्ष पुरें होऊन पंचविसावें लागतें आहे तोंच—नागपूरची रेसिडेन्सी ह्मणजे कंपनीसरकारच्या नोकरांना ज्या जागा मोठ्या प्रतिष्ठेच्या वाटत होत्या, त्यांपैकीं एक मिळाली. तिचा पगार महिना ३००० रुपये होता. मिस्टर वेब्बे ह्मणून मद्रासच्या मुलकीखात्यांतील, पुष्कळ दिवस राज्यकारस्थान खात्यांत काम केलेला मनुष्य होता, त्याची त्या जागेवर कायमची नेमणूक झालेली होती. परंतु तो शिंद्याच्या दरबारीं रेसिडेंट होता. तिकडून बहुधा इकडे येणार नाहीं, असें वेलेस्लीचें अनुमान होतें, तें एक तऱ्हेनें खरें झालें. तो वर्षाच्या आंतच तेथेंच मरण पावला. एल्फिन्स्टनची नेमणूक त्याचा सेक्रेटरी ह्मणून झालेली होती, परंतु तो येईपर्यंत रेसिडेंटीचें काम यानेंच करावयाचें होतें. पंचविशीच्या आंत एवढी बढती झाली ह्मणून एल्फिन्स्टन कांहीं गर्वानें ताठला नाहीं. पुण्यास क्लोज साहेबाच्या हाताखालीं त्यानें कांहीं दिवस उमेदवारी केली आणि आतां पुढच्या पायरीवर गेला ह्मणावयाचें. पुनः पुण्यास आल्यावर त्यानें जें नांव मिळण्याचें काम केलें तें करण्याची योग्यता संपादन करण्यास तो येथून हळू हळू शिकूं लागला.

तारीख २३ दिसेंबर रोजीं दरबार भरून भोंसल्याबरोबर झालेला तहनामा सही शिक्यानिशीं पुरा होऊन आलेला घेण्याचा समारंभ झाला व तन्निमित्त तोफांची सरबत्ती झाली. दुसऱ्या दिवशीं नवीन नेमलेल्या रेसिडेंट साहेबांस आपल्या जागेवर जाण्यास हुकूम मिळाला. मग नाताळचा सण आनंदानें करून तारीख २८ रोजीं मित्रमंडळीचा निरोप घेऊन ते जावयास निघाले.

जनरल वेलेस्लीची छावणी सोडून जातेवेळीं एल्फिन्स्टनला वाईट वाटलें. त्यानें असें लिहिलेलें आहे:—'मी ह्या लष्करांत आल्यापासून मोठ्या आनंदांत आहें. लष्करी लोक आणि त्यांची राहण्याची रीत मला आवडते. जनरल वेलेस्लीच्या हाताखालीं काम करूं लागलें ह्मणजे त्याच्याविषयीं पूज्यबुद्धि उत्पन्न झाल्यावांचून रहावयाची नाहीं. माझ्या मनाचा असा ग्रह झाल्यानें

मला आपलें काम आवडूं लागलें. ह्या लष्करांत माझे दिवस आनंदांत गेले. ह्यांचें मला नेहमीं स्मरण राहील.'

जनरल वेलेस्लीनें त्याला हुकूम दिला, त्यांत कामासंबंधानें असें लिहिलें होतें:—उभय सरकारांमध्यें आतां जो स्नेह झाला आहे, हा उत्तरोत्तर अधिक दृढ होत जावा असें राजेसाहेबांकडून बोलणें आल्यास ब्रिटिश सरकारची हीच मनापासून इच्छा आहे अशी त्यांची खात्री करण्याविषयीं झटावें. तह-नाम्यांत ठरलेलीं कलमें अमलांत आणण्याकडे नीट लक्ष पुरवावें. राजानें जो मुलूख सोडून देण्याचा करार केला आहे तो ताब्यांत देण्यास त्याचे कामदार व सरदार दिवसगत लावतील हें लक्षांत ठेऊन जे तसें करतील त्यांच्या नांवाचे राजाजवळ लेखी हुकूम मागावे व तहनाम्यांत जो मुलूख सोडून देण्याचें ठरलें आहे, त्यास जर कांहीं उपद्रव लागेल तर जनरल वेलेस्ली साहेबांस तें अगदीं पुरवणार नाहीं; ते उसनें फेडतील, असें बजा-वून सांगावें.'

आतां आपल्यावर पडणारें काम हलकें नाहीं, जोखमाचें आहे हें एल्फि-न्स्टन नीट जाणून होता. मालकम् साहेबाला नेहमीं पुढची आशा फार असे आणि एतद्देशीय लोकांच्या वचनांवर विश्वास ठेवावा असें त्याचें मन त्याला सांगत असे. एल्फिन्स्टनचा स्वभाव तसा नव्हता. त्याला आपल्या कर्तृत्वा-विषयीं खात्री नसे आणि राजकीय गोष्टी केव्हां कशा घडतील याचा नियम नाहीं असें वाटे. मराठ्यांबरोबर नुकतेंच झालेलें युद्ध संपून जे तह झाले आहेत, ते कांहीं टिकावयाचे नाहींत, हें तो पक्कें समजून होता. पुनः लढाई उपस्थित होईल म्हणून तो नेहमीं सिद्ध असे, तरी तो प्रसंग जेथपर्यंत टळेल तेथपर्यंत टाळावा यांतच अत्यंत शहाणपणा आहे असें त्याला वाटत होतें. अखेर निकरावर येऊन हत्यार उचलावें लागलेंच तर निकाल कसा होईल याविषयीं त्याला काडीइतकी शंका नव्हती. परंतु त्याकाळींसुद्धां इंग्रजी राज्याचा विस्तार फार जलद होणें बरें नाहीं, असें त्याला वाटत होतें असें दिसतें

नागपूरच्या भोंसल्यांचा मूळपुरुष शिवाजी महाराजांच्या पदरच्या सरदारां-पैकी होता. ह्या घराण्याचें मध्य हिंदुस्थानांत ठाणें पडल्यापासून त्याची सत्ता दिवसेंदिवस वाढत गेली आणि अखेर एकोणिसाव्या शतकाच्या मध्यास नर्मदेपासून गोदेपर्यंत व अजिंठ्याच्या घांटापासून बंगालच्या उपसागरापर्यंत साऱ्या मुलखावर त्याचा अम्मल चालूं लागला. मग तेथून बंगाल्यांत एकाबर

एक स्वाऱ्या होऊं लागल्या. तेथें इंग्रज नुकतेच उदयास येऊं लागले होते, त्यांच्याशीं कटकट होऊं लागली. परंतु क्लाइव्ह आणि हेस्टिंग्ज ह्या दोघांनींहि त्यांच्याशीं स्नेह संपादला. भोंसले पुण्याच्या राजकारणांत फारसें मन न घालतां बाजूसच रहात; तें इंग्लिशांच्या फार पथ्यावरपडे. रघोजी भोंसला सन १७८८ मध्यें गादीवर बसला. तो बराच हुशार होता. त्यानें थोड्याच काळांत नर्मदेच्या बाजूस राज्य वाढविलें. परंतु त्याच्या अंगांत हिम्मत कमी आणि युद्धचातुर्य मुळींच नव्हतें, त्यामुळें तो आपल्या शेजारच्या कोणा राजाच्या वाटेस फारसा न जातां, रंग पाहून ठाकठिकीनें रहात असे.

वसईचा तह झाल्यावर त्याच्या दरबारांत लढाई करावी ह्मणणाऱ्या पक्षाच्या मंडळीचें प्राबल्य झालें आणि तो शिंद्याला सामील झाला. परंतु लढाईचा परिणाम विपरीत होऊन त्याचे उत्तम उत्तम प्रांत होते ते गेले तेव्हां प्रसंग पाहून वागण्याची आपल्या घराण्याची रीत सोडून दिल्याबद्दल त्याला फार वाईट वाटलें आणि त्यामुळें तो नेहेमीं अगदीं खिन्न असे. अशी एल्फिन्स्टन त्याच्या दरबारीं गेला तेव्हां तेथची स्थिति होती.

एल्फिन्स्टन वेलेस्लीच्या छावणींतून निघाला, तो तारीख ३० रोजीं रघोजीच्या छावणींत जाऊन दाखल झाला. राजा आपला मानमरातब कसा काय ठेवील हा विचार त्याच्या मनांत घोळत होता. आपली भेट केव्हां कशी होईल वगैरे शोध करण्याकरितां त्यानें त्याच्याकडे आपल्या मुनशीला पाठविलें आणि त्याला सांगितलें, पूर्वी कोलब्रूक साहेबाची भेट कशी झाली तो तपास कर आणि त्याप्रमाणेंच माझी व्हावी असें ठरीव. त्या दिवशींच्या त्याच्या रोजनाम्यांत असा लेख आहे:—माझ्या आदरसत्काराविषयीं मी फार जिकीर करीत बसणार नाहीं. अवश्य तेवढा झाला ह्मणजे पुरे. तो कमजास्त करण्यांत राजाचें कांहीं कार्य साधत असल्यास साधूंदे; तेणेंकरून त्याचा संतोष होईल. माझी पदवी वगैरे कांहीं अद्याप ठरलेलें नाहीं, तेव्हां वेळेची भेट होईल तिला माझ्या भेटीचा दाखला लावतां येणार नाहीं. तो गव्हरनर जनरला-कडून यावयाचा आहे. मुनशी राजाकडून जाऊन आला. त्याला चोबदाराकडून अशी बातमी लागली कीं कोलब्रूकनें नजर धरली होती. त्याला पोषाख मिळाल्याचें रामचंद्ररावानें सांगितलेलें मला स्मरतें. उद्यां दिवस वाईट आहे ह्मणून भेट होत नाहीं. नजर धरावी कीं नाहीं आणि पोषाख घ्यावा कीं नाहीं. ह्याचा मी पुष्कळ विचार केला आणि अखेर असें ठरविलें कीं:

ह्यांत आपल्याला कमीपणा येतो असें न ह्मणतां होतां होईल तेथपर्यंत हें टाळावयाचें. '

मग त्याप्रकरणीं आणखी वाटाघाट होऊन भेट ठरली. तो आपल्या लव्याजम्यानिशीं रघोजीच्या तंबूंत गेला. नेहेमींच्या वहिवाटीप्रमाणें त्याचें स्वागत झालें. आपल्याबरोबर तह झाला, येणेंकरून जनरल साहेबांस संतोष वाटला असें तो बोलला. त्यावर राजेसाहेबांस तसाच संतोष वाटतो, असें श्रीधर पंडितानें उत्तर केलें. मग इतर गोष्टी झाल्या, त्यांत तुह्मी जेवतां केव्हां, चहा केव्हां पितां वगैरे रघोजीनें त्यास विचारिलें. पुनः दोन दिवसांनीं तो भेटीस गेला, तेव्हां राजानें पहिल्यासारखा समारंभ केला नाहीं. दोन तीन मर्जींतल्या मनुष्यांशिवाय इतर कोणाला जवळ ठेविलें नाहीं. चाकर माणसें खुशाल आंत बाहेर जात येत होतीं आणि कनाथीवरून डोकीं घालून आंत पहात होतीं.

एल्फिन्स्टन भोंसल्याच्या छावणींत दाखल होतांच निजामच्या हद्दींतल्या गांवांतले दोन वकील त्याच्या भेटीला गेले, आणि भोंसला आमच्या गांवांवर जुलूम करतो लुटतो आहे, याचा बंदोबस्त करा असें ह्मणूं लागले. तेव्हां आतां राजेसाहेबांची भेट झाली ह्मणजे मी विचार करतों; असें सांगून त्यानें त्यांना वाटेस लाविलें. त्याला प्रथम ह्याच प्रकारचीं कामें करावीं लागलीं, परंतु त्यांत कांहीं फारशी अडचण आली नाहीं. निजामाचे आणि भोंसल्याचे गांव एकाला एक लागून असे पुष्कळ होते; एका प्रांताच्या वसूलावर दोघांचाही हक्क होता; वर्धेच्या पूर्वेकडील कांहीं मुलखावर निजाम आपला हक्क सांगत होता आणि भोंसल्याचे कामगार आपला सांगत होते. त्या सर्व प्रकरणांची नीट चौकशी करावयास पाहिजे होती; त्या बहुतेक कामांत राजा अगदीं सरळ वागला. एल्फिन्स्टनला कांहीं जड गेलें नाहीं. एका कामांत तक्रार पडली, परंतु त्यानें नेटानें दटावलें तेव्हां दरबार ढिलें पडलें.

एल्फिन्स्टनला जें काय कठीण काम पडलें तें तहनाम्यांत ठरलेलीं सारीं कलमें उलगडून गेल्यावर मग पुढचें. आमचा वकील (रेसिडेंट) तुमच्या दरबारीं राहिला पाहिजे असा ब्रिटिश सरकारनें जो आग्रह धरला होता त्यांत त्याचा हेतु उभयतांचें सख्य रहावें एवढाच नव्हता; पुढें बिघाड येईल तर त्याचा बंदोबस्त ठेवावा हाही होता. एल्फिन्स्टनला दिलेल्या हुकमांत असें फर्माविलेलें होतें कीं, भोंसला विश्वासघातकी आहे हें प्रसिद्ध आहे; त्याचें नुकसान फार झालेलें आहे, तेव्हां गमावलेल्या मुलखांतला कांहीं परत मिळव-

ण्याच्या आशेनें तो पुनः लढाईला प्रवृत्त होईल; ह्मणून दरबारांत काय काय चालतें याची नक्की बातमी काढीत असावें; शिंदे होळकरांचे वकील येतील जातील, त्यांवर चांगली नजर ठेवावी आणि राजाची फौज किती आहे, तिची व्यवस्था कशी आहे वगैरे माहिती बिनचुक मिळवावी. त्याला हेंच मोठें जड वाटलें. कारण ही खरी माहिती फक्त कारभारी मंडळीकडून मिळावयाची आणि त्याद्वारानें उद्योग करावा तर कारस्थान मांडलें पाहिजे. तें त्याच्या स्वभावाला नको होतें. परंतु त्याला कांहीं खटपट करावी लागली नाहीं; सहज कार्य होऊं लागलें. कारभारी मंडळीपैकीं कांहीं असामींनी तो मार्ग दाखवून दिला होता. यशवंतराव रामचंद्र, भोंसल्याचा कारभारी, ज्याच्या मार्फत तहाचें बोलणें ठरलें आणि तहनाम्यावर ज्यानें सही केली, तोच 'मी आपल्या पुष्कळ उपयोगीं पडेन, मजकडून चाकरी घ्यावी' असें जनरल वेलेस्लीला ह्मणत असे. त्यानें गव्हरनर जनरलाकडे त्याची शिफारस केली आणि हा तुह्मांला माहिती देण्याच्या कामीं चांगला उपयोगीं पडेल असें एल्फिन्स्टनला ही लिहिलें. जयकिसनराम ही बातमी काढण्याच्या कामीं चांगला उपयोगीं पडेल असें ही त्यानें सुचवून ठेविलें. रेसिडेन्सीमध्यें त्याच्यामार्फत नेहमीं बोलणें *चालत असे. तरी पण एकंदरींत मराठी दरबारांतली विश्वास ठेव-

*जनरल वेलेस्लीनें त्याला पत्र पाठविलें त्यांत असें लिहिलें होतें:—बातमी मिळवण्याकरितां तुह्मांला जें करावेंसें वाटेल तें करा अशी मी तुह्मांला विनंति करितों. जयकिसनराम तुह्मांला माहिती देईल किंवा तपास करून बातमी काढून आणील असें तुह्माला वाटलें तर तुह्मी गव्हरनर जनरलाकडे शिफारस करितों असें त्याला सांगा आणि त्याप्रमाणें करा.

ह्या शिफारसीचा अर्थ काय तें पुढें थोड्याच दिवसांनीं लिहिलेल्या दुसऱ्या पत्रावरून स्पष्ट कळतें. त्यांत तो ह्मणतोः—रामचंद्रराव निघून जाण्यापूर्वी माझ्याकडून चाकरी घ्यावी असें ह्मणाला, ह्मणून त्याच्याबद्दल तुह्मांला लिहितों. तो धूर्त दिसतो आणि मोठमोठ्या प्रकरणीं ठराव करण्याच्या कामांत राजानें त्याला बोलावयास पाठविलेलें आहे खरें त्याला वर्षास ६००० रुपये नेमणूक करून द्यावी अशी मी गव्हरनर जनरलाकडे शिफारस केली आहे. तो तुह्माला चांगली, उपयोगीं पडेल, अशी बातमी देईल असें मला

त्यासारखी बातमी मिळणें कठीण होतें. जेव्हां कोलब्रूक रेसिडेंट होता, तेव्हां रघोजीचा भाऊ व्यंकोजी याच्याजवळ सर्व कारस्थानाचें बीज होतें, आणि दरबारच्या स्थितीबद्दल ज्याला जसें वाटेल तसें रेसिडेंटाला कळविणारी मंडळी कांहीं थोडी नव्हती. आतांचा हा तह झाल्यावर पुन: लढाईच्या प्रसंगांत पडावयाचें नाहीं असा रघोजीनें निश्चय केला होता त्याप्रमाणें सहा महिनेपर्यंत तो वागला यांत कांहीं संशय नाहीं. परंतु जेव्हां पुन: लढाई सुरू होऊन शिंदा विथरल्यासारखा दिसूं लागला, तेव्हां इकडे ही चलबिचल होऊं लागून एल्फिन्स्टनला पुष्कळ काळजी उत्पन्न झाली.

एल्फिन्स्टननें नागपुरास असतांना स्ट्राचीला अनेक विषयांवर पुष्कळ पत्रें लिहिलीं. तीं चांगलीं मनोरंजक आहेत. भोंसलेदरबार कशा प्रकारचें होतें तें पुढील मजकुरावरून चांगलें कळतें. तो ह्मणतो:—

हें दरबार पुण्याच्या दरबाराप्रमाणेंच साधें आहे. राजा ह्मातारा, स्थूल, काळा, पन्नाशीच्या वयाचा आहे. तो फार जड दिसतो आणि त्याची मुद्रा खिन्न दिसते; परंतु शांत, सभ्य चालीचा आहे. मन्याबापू तरुण, सुरूप, तीस वर्षांचा आहे. तो उल्हासवृत्ति आणि गोड बोलणारा आहे. श्रीधरपंडित उंच, सडसडीत, चाळिशीच्या वयाचा मुत्सद्दी आहे. तो फारशी बोलतो. तो फार नम्र आणि सभ्य आहे. यशवंतराव जनरल वेलेस्लीबरोबर भोंसल्याचा वकील असतो; त्याचा पुतण्या जयमोहनराव एक मेहमानदार असल्यासारखा आहे. तो हांजी हांजी करणारा, परतु सभ्य आहे. तो माझ्याकडे रोज येतो. येथून नागपूर ६० मैल राहिलें आहे. राजा एक दिवसा आड मजल करतो. काल त्याच्या छावणीच्या शेजारच्या गांवचा पाटील मजकडे आला आणि ह्मणाला, आमच्या महाराजांची फौज आतां आमचा गांव लुटील. तुमचा एक इंग्रजी शिपाई द्या ह्मणजे आमच्या गांवाचें संरक्षण होईल. मला वाटतें, पैसा देऊन जिन्नस घेणारा साऱ्या स्वारींत मी एकटाच आहें. आणि त्यामुळें मला पैसा फार पडतो. काल मला शंभर रुपये लागले. बाकीचे लोक अगदीं होळकराच्या लष्करासारखें करतात. जातात, शेतें लुटतात; घरांचीं छपरें उडवून देतात आणि हवें तें घेतात. वर्धा नदीपासून येथपर्यंतचा मुलूख वैराण, खडकाळ, जंगली, नापीक आहे. राजाचे लोक ह्मणतात, त्याचा बाकीचा मुलूख सारा अशाच तऱ्हेचा आहे.'

लुटारू लोकांनीं राजाचा कांहीं मुलूख लुटून फस्त केला, लोक मारले, असा अनर्थ चालवला; तेव्हां त्यांना शिक्षा करा असें मीं यशवंराव रामचंद्राला सांगितलें. त्यानें मला जें उत्तर दिलें तें किती मजेदार, ह्या लोकांच्या खुशामतीपणाचें आणि हिंदुस्थानी रीतीचें कसें अगदीं हुबेहुब चित्र आहे पहा! तो ह्मणाला, इंग्रज अशा गुन्ह्याबद्दल लोकांना ठार मारतात हें मला माहीत आहे; परंतु कोणाचा जीव घ्यावयाचा ह्मटलें ह्मणजे राजेसाहेबांच्या अंगावर कांटाच येतो. एकदां ते बाहेरून जाऊन आले आणि पाय धुवावयास बसले असतां हुजऱ्यानें अगदीं सळसळीत पाणी पायांवर ओतलें; तेव्हां त्याला आणि त्याच्यावरच्या जमादाराला ठार मारावें असें सारेजण ह्मणूं लागले. परंतु आमच्या महाराजांनीं कांहीं तसें केलें नाहीं; त्यांनीं दोघांनाही क्षमा केली. पुनः एकदां असेंच झालें. त्यांना पाणी हवें होतें ह्मणून त्यांनीं लोटा उचलला आणि पहातात तर त्यांत पाण्याबद्दल तूप भरलेलें. मग तो ठेवणाराला लागलेंच बोलाऊन आणलें आणि सारेजण ह्याला आतां ठार मारा ह्मणू लागले. आमच्या बक्षीचा भाऊ पांडुरंगराव तर त्याचा तेथच्या तेथेंच जीव घ्यावयास उठला. परंतु राजेसाहेब ह्मणाले. " सोडा; जाऊंदे त्याला. माणूस मारावयाचें सोपें, परंतु जिवंत करावयाचें कठीण आहे. " राजाच्या दोघां चाकरांच्या ह्या दोन गुन्ह्यांची दरवडयाशीं आणि खुनांशीं तुलना, चाकराच्या चुकीबद्दल जमादाराचा प्राण घ्यावयाचा विचार, तो प्रसंग, तुपाची गोष्ट, तो देखावा, मुत्सद्यांचा रोष, राजाचें थोरपणाचें भाषण, सारेंच किती मजेदार आहे बरें! अशा गोष्टींची कोणाला कल्पना तरी करितां येईल.? "

जमीनदारांबरोबरचे तहनामे मुकरर करून देण्यास व निजामाच्या मुलखावर त्यानें जे लपून छपून हल्ले केले—आणि ते मीं शाबीत करून दिले—त्यांबद्दल नुकसान भरून देण्यास मी सांगतों आहें त्यावर तो जें स्वस्थपणें नकाराचें उत्तर देतो त्यानें, दुसऱ्या कांहीं कामांत असाच प्रकार आहे त्यानें, आणि अखेर ह्या लोकांनीं माझ्याशीं असाच मगरूरपणा चालविला आहे त्यानें मी अगदीं संतापून गेलों आहें. संबळपूरच्या जमीनदारांबद्दल राजानें टाळाटाळ चालविली आहे. एकदां एक, एकदां एक, संदिग्ध, असें बोलूं लागला तेव्हां मीं श्रीधरपंडिताला पत्र लिहिलें आणि राजाचा उद्देश काय आहे तें लेखी कळलें पाहिजे ह्मटलें. त्यानें राजाच्या भाषणासारखाच तोंडी जबाब पाठविला. मीं पुनः लेखी जबाब पाठविण्यास लिहिलें त्यावर त्यानें

लिहिलें तुमच्या मागच्या चिटीचा जबाब यशवंतरावाबरोबर तोंडीं पाठविला होता; पुन: तेंच लिहिता. आज मी तुळशी बागेंत मेजवानीस जातों आहें; उद्यां राजेसाहेब यशवंतरावाच्या येथें मेजवानीस जावयाचे आहेत. तर आतां परवां यशवंतरावाबरोबर तोंडीं जबाब पाठवून देऊं. "

जनरल वेलेस्लीनें एल्फिन्स्टनला नेहेमी बातम्या काढीत राहण्याविषयीं सांगितलें होतें आणि त्या काढण्याचे मार्गही दाखवून दिले होते; त्याप्रमणें तो तें काम करीत होता. त्याविषयीं त्याचे लेख असे आहेत.—

माझे बातमी काढण्याचें काम कांहीं नीट चालत नाहीं. आतां हरकारे मला खुद्द आपल्या हाताखालीं घेतले पाहिजेत. कारण मन्यारा मूर्ख आणि निःकाळजी आहे. नागोजीरावाला मी सांगितलें होतें तितक्या गोष्टींची त्यानें जी बातमी आणली ती सारी खोटी आहे. मग इतर गोष्टींची खरी असेल कशावरून ? संदुरंग* ( ? ) याला कांहीं कळत नसावें किंवा तो सांगत नाहीं असें असावें. मला स्वतःला बातमी काढण्याचें बुद्धिकौशल्य काहीं नाहीं. लष्कराबरोबर असतांना हें काम माझ्या हातून नीट झालें नाहीं आणि आतांतर तितपतही होत नाहीं. परंतु निश्चयानें केल्यास काय हवें तें होईल. माझा मोठा दोष हा आहे कीं माझ्या अंगीं हवा तितका धीटपणा नाही आणि एतद्देशीयांच्या बुद्धीवर व इमानावर मी फार भरंवसा ठेवितों. जयकिसनरामाला पैसा दिलातर तो आपल्या यजमानाच्या गुप्त गोष्टी आनंदानें मला सांगेल; मग त्याला तेणेंकरून अपाय होण्यासारखा असला तरी तो तें मनांत आणणार नाहीं. त्याच्याविषयीं मला कांहीं शंका नाहीं. मी त्याला पैसा दिला तर तो मला खोट्या बातम्या सांगेल. परंतु त्यांतून आपण तारतम्यानें घ्यावयाचें तेवढें घ्यावें, फसूं नये. कसेंही असो, आतां ह्या मनुष्याशीं अधिक लगत ठेविली पाहिजे आणि बातमीविषयीं अगदीं मोकळेपणाने बोललें पाहिजे. "

तो स्ट्राचीला एका पत्रांत ह्मणतो,—बातमी मिळवण्याकरितां मनुष्याला न्यायानें कोठपर्यंत जातां येईल ( काय काय कृत्यें करतां येतील ) तें सांगा. मला वाटतें आपल्या देशाच्या नाशाकरितां काय काय बेत चालले आहेत आणि ते चालूं न देण्याविषयीं आपण काय केलें पाहिजे, एका पक्षावर येणारें संकट कसें टाळावें आणि दुसऱ्या पक्षाचा नाश खचित होणार तो

* हें नांव चमत्कारिक दिसतें. मुळांत Sundoo Rung ( ? ) असें लिहिलेलें आहे.

५-१५४-२०००

होऊं नये ह्मणून काय करावें, एवढेंच पहाण्याचा त्याचा उद्देश असेल तर त्याला फार दूर जातां येईल. ( त्यानें हवें तें करावें ).

तो आणखी ह्मणतोः—बातमी काढण्याचें काम कांहीं नीट चालत नाहीं. ती मिळवण्याविषयीं हरएक उपाय योजला पाहिजे असें दिसतें. कारण त्या मनुष्याच्या ( राजाच्या ) स्वभावावरून असें खचित वाटतें कीं, तो कटांत शिरून आह्माला दुसऱ्या लढाईच्या पेंचांत आणील. त्याचीं कारस्थानें जर आह्माला कळलीं तर मला असें खचित वाटतें कीं, फारसा प्रयास न पडतां तीं मोडून टाकतां येतील. परंतु जर कळलीं नाहींत तर आह्माला लढाई करावी लागेल आणि तींत त्याचा नाश होईल. '

आणखी पहा—( बातमी मिळवली पाहिजे. ) असें आहे तरी आमची बातमी मिळवण्याची जी तऱ्हा आहे ती मला पसंत नाहीं. गुप्तपणें आणि आडमार्गानें कोणतीही गोष्ट करण्याचा मला तिटकारा आहे आणि जी गोष्ट मी केली असें कबूल करण्याला मी खुषी नसेन ती करण्याचा तिरस्कार आहे. राजाच्या सैन्याची स्थिति कशी आहे आणि त्याच्या दरबारांत काय काय कारस्थानें चाललीं आहेत यांची मी चौकशी करीत असतों असें त्याला कळलें आणि त्यानें मला विचारलें तर काय सांगावें ? मला तें कबूल केलें पाहिजे. मग त्याला असें सांगावें कीं, जिकडे तिकडे अगदीं सामसूम असतां मध्येंच अकस्मात् तुह्मी आमच्यावर युद्धाचा भयंकर प्रसंग आणलात, आणि आतां जर आह्मी तुमची पैरवी ठेविली नाहीं तर आपल्या देशाच्या कल्याणाला जपण्याची आह्माला अक्कल नाहीं असें होईल. '

तो पुनः ह्मणतो—आपण नेहमीं अगदीं उघडपणें वागलें पाहिजे हें मला विसरतां कामा नये. मी जर कपटानें वागेन तर आपल्या आणि आपल्या राष्ट्राच्या अब्रूला बट्टा लावीन आणि इतकें होऊन अखेर कदाचित मला हवें तें साध्य होणार नाहीं. याजकरितां वकीलीच्या कामांत नेहेमी हें ध्यानांत ठेविलें पाहिजे कीं मनस्येकं वचस्येकं करणाराला विषकुंभः पयोमुखः *असें मानून लोक त्याचा तिरस्कार करतात. "

---

* येथें मुळांत त्यानें ईलियडच्या नवव्या सर्गातील एक पद्य लिहिलें आहे. त्याचें भाषांतर—That man is as hateful as the gates of Hades who conceals one thing in his heart while he utters another असें आहे.

एल्फिन्स्टन नागपुरास इ. स. १८०४ च्या आरंभापासून १८०८ च्या एप्रिल महिन्यापर्यंत होता. त्यांत अखेरच्या वर्षी रजा घेऊन कलकत्त्यास जाऊन आला. हा काळ हिंदुस्थानांत मोठ्या धामधुमीचा होता. इंग्रजांना मोठी काळजी वाटत होती. परंतु त्या गडबडीचा नागपुराशीं कांहीं प्रत्यक्ष संबंध नव्हता. तितक्या अवधींत चार गव्हरनर जनरल झाले. मार्किस आफ् वेलेस्लीची कारकीर्द पुरी होऊन तो गेला आणि लॉर्ड कार्नवालीस पुनः आला. तो दोन महिन्यांनीं वारला आणि त्याच्या जागीं सर जार्ज बार्लो आला. त्यानें कांहीं कीर्ति मिळविली नाहीं; उलटा इंग्रजांच्या नांवाला कमीपणा आणला. मग लॉर्ड मिंटो गव्हरनर जनरल होऊन आला. राजेरजवाड्यांबरोबर तह करून आपलें वर्चस्व त्यांच्याकडून कबूल करवावें आणि साऱ्या देशात इंग्रजांचें प्रभुत्व गाजवावें असा जो लॉर्ड वेलेस्लीनें बेत केला होता तो त्याच्या मागून आलेल्या मंडळीनें फिरवून टाळला. तो हा देश सोडून जाण्यापूर्वीच त्यानें वाढविलल्या राज्याला उतरती कळा लागली. मराठ्यांबरोबरच्या महायुद्धांत रणांगणीं इंग्रजांना मोठाले जय मिळून त्यांची कीर्ति पुष्कळ झाली खरी, परतु तेव्हांपासूनच ओहोटी लागली ह्मटलें तरी चालेल. शिंदे आणि भोसले यांनीं आपला पराजय झाला असें कबूल करून पुष्कळ मुलुख सोडून देऊन तह केले, परंतु इंग्रजांचीं पलटणें चाकरीस ठेऊन घेण्यास ते कबूल झाले नाहींत. निजाम आणि पेशवे यांची स्थिति काय झाली तें त्यांना दिसत होतें आणि ह्या कृतीनें त्यांच्यासारखे आपणही स्वातंत्र्यास मुकूं हें ते समजून होते.

दौलतराव आणि रघोजी इंग्रजांबरोबर लढण्यास सिद्ध झाले; तेव्हां यशवंतराव होळकरानें आपल्यास सामील व्हावें ह्मणून त्यांनीं पुष्कळ यत्न करून पाहिला, परंतु तो वळला नाहीं. त्यांनीं आरंभिलेल्या युद्धाचा शेवट कसा काय लागतो हें तो पहात बसला. परंतु ते हतवीर्य झालेले दिसले, तेव्हां घाबरला आणि त्यांच्याकडून घेतलेल्या मुलुखांत इंग्रजांचा अम्मल बसला नाहीं, तोंच आपण त्यांना दोन हात दाखवावे असें मनांत आणून उठला. त्याच्याजवळ फौज तेव्हांच जमली. तो पराक्रमी आणि हिम्मतवान् होता. त्यानें शिंद्याबरोबर स्वतः लढाया मारल्या होत्या आणि त्याच्या अंगांत मराठी वीरांचें पाणी खेळत होतें.

पूर्वीं मराठ्यांनीं जेव्हां आपलें राज्य स्थापलें तेव्हां ते मोठमोठ्या मजला करून दूरदूरच्या स्वाऱ्या करीत. त्यांच्या सैन्यांत मोठा भरणा स्वारांचा असे. त्यांनीं अलीकडे तयार केलेल्या कवायती फौजांचा जेव्हां अगदीं पराभव झाला, तेव्हां मोठमोठ्या सरदारांचें मत असें पक्कें झालें कीं, इंग्रज प्रबळ होत चालले आहेत त्यांना हात दाखवावयाला आपली पहिली रीतच चांगली. त्यांच्या मुलखांत धामधूम उडवावी, लूट करावी, त्यांच्या पलटणांची एक-मेकाना गांठ पडूं देऊ नये; असें त्यांना जेरीस आणावें. होळकर तर हें अगदीं उघड उघड बोलूं लागला आणि त्याच्याजवळ जेव्हां पुष्कळशी फौज जमली तेव्हां तो चढाच्या गोष्टी सांगूं लागला, आणि त्यामुळें लौकरच लढाईवर येतलें. परिणामीं त्याचाच पराभव झाला हें खरें, परंतु त्यानें कर्नल मॉन्सनची दुर्दशा उडविली आणि जनरल लेक साहेबाला माझ्यानें भरतपूरचा किल्ला घववत नाहीं असें ह्मणावयास लाविलें. त्या दोन अनर्थांघातांमुळें इंग्रजांच्या शूरत्वाबद्दलच्या कीर्तीला जो उणेपणा आला, तो भरून काढण्याला त्यांना बरेच दिवस लागले. त्यांनीं त्याच्याबरोबर जो तह केला, तो परिणामीं त्या दोहीं पराभवांपेक्षां अधिक अनर्थावह झाला. त्याचा होता तितका मुलूख कायम राहून शिवाय राजपुतान्यांतले प्राचीन घराणेदार राजेरजवाडे, ज्यांनीं इंग्रजांना मदत केली होती, ते त्यांनीं हातचे सोडल्यामुळें त्याच्या दाढेंत सांपडले. आपल्या वैऱ्याचा असा वरचष्मा झालेला पाहून शिंदा सहजच धुसफूस करूं लागला. त्याच्या लष्कराबरोबर जेंकिन्स साहेब रेसिडेंट होता. त्याला त्यानें कैद केलें आणि टार मारील असेंही वाटलें, इतका तो बिथरला होता. तरी अखेर इंग्रजांनीं त्याला कांहीं मुलूख परत देऊन संतुष्ट केलें. दक्षिणेस वेलूरच्या काळ्या फौजेनें बंड करून आपल्यावरचे बहुतेक गोरे अंमलदार टार मारले. कर्नल गिलेस्पीनें अर्काटाहून धांवत जाऊन तें तेव्हांच मोडलें हें खरें, परंतु त्याचें नुकसान फार झालें. हैदराबादेसही तसेंच होत होतें. तेथच्या पलटणांनीं बिथरून गोरे लोकांस मारण्याचा बेत केला होता, परंतु तो उमगल्यामुळें तेथचा बंदोबस्त झाला. याप्रमाणें इंग्रजांना चोहोंकडून थोडा अनिष्ट काळ आला होता.

ह्या सर्व गोष्टी नागपुरास कळल्या, तेव्हां एल्फिन्स्टन साहेबाचें वजन कमी झाल्याशिवाय राहिलें नाहीं. त्यामुळें त्याची उमेदही कमी झाली. रघोजी त्याचें बोलणें मनावर घेईनासा झाला, आणि पत्रांना टाळाटाळीचे तोंडीं जबाब

मिळूं लागले. दरबारांत लढाई करावी म्हणणाऱ्या पक्षाचें पुनः वर्चस्व दिसूं लागलें; आणि राजानें तहनाम्याप्रमाणें सोडन दिलेला मुलूख जबरीनें परत घेण्याचा आव घातला. एल्फिन्स्टन साहेबानें ती सारी हकीकत गव्हरनर जनरलाकडे लिहून पाठविली आणि तुमच्या अशा वर्तनानें परिणाम वाईट होईल असें दरबारास कळविलें. मग गव्हरनर जनरलाकडून लिहून आल्यावरून त्यानें राजाला असें कळविलें कीं, चोवीस तासांच्या आंत यादीवर सही करून दिलीत तर बरें आहे, नाहींतर लढाई सुरू करूं. तारीख १३ एप्रील सन १८०५ रोजीं त्यानें स्ट्राचीला पत्र पाठविलें, त्यांत तो ह्मणतो:— असा प्रसंग होळकराच्या स्वारीच्या वेळेशिवाय कधीं आला नसेल. परंतु सारें नीट पार पडलें आणि माझ्या धैर्याबद्दल मला गव्हरनर जनरलाकडून शाबासकी मिळाली.

मग लार्ड वेलेस्लीनें त्याला आपलीं पलटणें भोसल्यानें चाकरीस ठेऊन घेण्याविषयीं उद्योग करून पहाण्यास लिहिलें. त्याप्रमाणें त्यानें बरीच खटपट केली. तुमच्या राज्यावर शत्रू आला तर रक्षण कसें होईल वगैरे बोलून पाहिलें. राजानें व कारभारी मंडळीनें तें सारें खरें ह्मटलें; परंतु फौज ठेऊन घेण्याचें मात्र कबूल केलें नाहीं. तरी लार्ड वेलेस्लीनें एल्फिन्स्टन साहेबाविषयीं असें लिहून ठेविलें:—या प्रकरणीं वाटाघाट करण्यांत रेसिडेंटाची हुशारी आणि चातुर्य पुष्कळच दिसून आलें; असा गव्हरनर जनरल—इन्—कौन्सिल यांचा अभिप्राय आहे.

रघोजीच्या आणि त्याच्या भावाच्यासंबंधानें एल्फिन्स्टन साहेबानें असें लिहिलें आहे:—"होळकराकडून राजाकडे नुकताच वकील आला आहे. त्याच्या भावानें पांच महिन्यांखालीं होळकराकडे वकील पाठविला होता, तो परत आला आहे. नानासाहेब आमच्या सरकारचा उघड उघड शत्रु आणि आमच्या शत्रूचा मित्र असून त्याला त्यानें चाद्यास जाऊं दिलें. तें त्याचें ठाणें आहे. तेथें तो आज गेला, याचें मला आश्चर्य वाटतें. कारण, चांदा आणि बऱ्हाणपूर यांच्या दरम्यानच्या मुलखांत तो मोठी फौज जमवीत आहे. असें करणें चांगलें नाहीं असें मी बजावलें आहे. त्यांतल्या कांहीं लोकांनीं आमच्या मुलुखांतले २८ गांव जाळले. इकडे राजाचा भाऊ मला एकावर एक सभ्यपणाचे निरोप पाठवीत होता. अलीकडे पुष्कळ दिवसांपासून आह्मी चारचौघांत एकमेकांना भेटत नाहीं. तरी घोड्यावरून बाहेरें जाऊं, तेव्हां सहज रस्त्यांत

भेट व्हावी आणि कुशल प्रश्न व्हावे असें त्यानें सांगून पाठविलें. आपला मोठा सज्जनपणा दाखविण्याकरितां त्यानें मला चार शिकारी कुत्रीं ( gray hounds ) पाठविलीं, त्यांतलें ( १ ) पिल्लू पिसाळून आज सकाळीं मेलें. ( २ ) एकाच्या अंगावर आश्वलासारखे केंस आहेत आणि रंगही तसाच आहे. त्याचा स्वभाव गाढवासारखा आहे. ( ३ ) एक बिन शेपटाचें आहे—तो बिन डोक्याचें पाठविता तरी कांहीं हरकत नव्हती.—आणि ( ४ ) एक फार चांगली कुत्री आहे. तिला मखमची किनखापाची झूल घातलेली आहे. मला असा संशय येतो कीं, होळकर आपल्या मुलखावर हल्ला करील, असें ह्मातान्या रघोजीला भय पडलेलें आहे; ह्मणून त्यानें ही बतावणी चालविली आहे. होळकराला त्याच्या भावाची उत्कंठा माहीत असल्यामुळें त्याच्या हाताखालीं पथक देऊन तो त्याला आपल्याकडे पाठवील आणि इकडे आह्माला तो आपल्याजवळ भांडून गेला असें सांगेल. असें वाटण्याचा संभव आहे. कदाचित् रघोजीच्या मनात असें खरेंच करावयाचें असेल. कसेंही असो, त्यानें आपल्या भावाला जर आपल्या हातांतून निसटून पार होऊं दिलें तर तें त्यालाच जाचेल; बहुधा निदान अर्ध्या राज्याला मुकावें लागेल. कारण, आपण स्वतंत्र व्हावें असें धाकट्या भावाच्या मनांत फार दिवसांपासून आहे. ”

लॉर्ड वेलेस्लीला काढून त्याच्या जागीं लॉर्ड कार्नवालीस याची नेमणूक झाली, तें एल्फिन्स्टनसाहेबाला बरें वाटलें नाहीं. त्यासंबंधानें तो ह्मणतोः—“लॉर्ड वेलेस्लीला काढणें योग्य आहे असें मला वाटत नाहीं. आतां राज्यकारभारांत जी उलटापालट होईल, ती मनांत येऊन मला कंप सुटतो. कारण, ती झाली ह्मणजे सारे मराठे उठून आमच्यावर येतील. लॉर्ड वेलेस्लीची तह करण्याची इच्छा उघड दिसूं लागल्यामुळें आधींच परिणाम फार वाईट झाले आहेत. आह्मांला जर ह्या लोकांची मनधरणी करावयाची असेल, तर त्यांचा मुलूख त्यांना परत दिला पाहिजे; दुसरा कांहीं उपाय चालणार नाहीं. आणि जर तो मुलूख आह्मांला हातांत ठेवावयाचा आहे, तर त्यासाठीं लढलेंच पाहिजे. एकच गोष्ट असणें आणि नसणें हें अशक्य आहे. हा अगदीं उघड उघड सिद्धांत आहे. परंतु ह्याचें आणि ह्याच्या आनुषंगिक सिद्ध गोष्टींचें अज्ञान हेंच राज्यकारभारांतील बहुतेक चुकांचें मूळ बीज आहे, असें मला वाटतें. परंतु आतां पुरे. जळो तो विषय. मला त्याचा वीट आला आहे. ”

"मला चांगल्या आधारावरून असें कळलें आहे कीं, लॉर्ड कार्नवालीस मुलूख सोडून देऊन तह करण्याला उत्सुक झाला आहे. भरतपुरास फजिती उडण्यापूर्वी असें केलें असतें तर ठीक होतें. ती संधि उत्तम होती. त्या वेळेस शत्रु आमच्या मुठींत सांपडले होते, आणि आमची कीर्ति मोठी झाली होती, असें मला तेव्हां वाटत होतें आणि आतांही वाटतें. परंतु आतां जयाच्या आणि कीर्तीच्या बदला आम्हांला ठेंच लागलेली ध्यानांत धरून कुरकुरत बसावें लागत आहे. आमच्या राज्यव्यवस्थेसारख्या व्यवस्थेला अफाट मुलूख जिंकून घेणें किती घातक आहे हें लोकांप्रमाणें मलाही कळत आहे. आम्हीं मुळीं लढाईच्या फंदांत पडलों नसतों तर बरें होतें; परंतु आतां पाऊल मागें घेणें शक्य आहे असें मला वाटत नाहीं. आम्ही घेतलेला सारा मुलूख शत्रूंनां परत दिला तर ते प्रबळ होतील, परंतु शत्रुत्व कमी होणार नाहीं. आपला पराभव झाला म्हणून ते संतप्त आहेत, आणि आतां आम्हीं त्यांना जें औदार्य दाखवावयाला जाऊं त्यानें त्यांना आपल्याला लागलेला कलंक काढून टाकण्यास संधि दिल्यासारखें होईल."

शिंदे होळकरांबरोबर लढाई चालली होती तोंपर्यंत रेसिडेंटाला नेहेमीं अगदीं सावध रहावें लागत होतें व केव्हां केव्हां भोंसल्याबरोबर कित्येक महत्वाच्या गोष्टींबद्दल बोलावें लागत होतें. त्याच्याबरोबर तह झाल्यावर मग तादृश काम नव्हतें. परंतु मग पेंढाऱ्यांचें भय उपस्थित होऊन तें दिवसें-दिवस वाढत चाललें तेव्हां त्यांच्यावर नजर ठेवणें आलें. दक्षिणेंत पेंढाऱ्याचा उपद्रव फार दिवसांपासूनचा होता. महाराष्ट्रांत लहान थोर गांवाभोंवताले दाट लागलेले निवडुंगाचे फड किंवा बरे वाईट दगड मातीचे तट अद्याप दिसतात. ही अडचण हवी कशाला, असें अलीकडील लोकांना वाटतें व ते नाहींसे करण्याचा उद्योगही थोडा बहुत चालू आहे. परंतु पेंढाऱ्यांच्या वेळीं गांवाच्या संरक्षणाला ते फार उपयोगीं पडत होते; थोरले बाजीराव साहेब हिंदुस्थानांत स्वाऱ्या करूं लागले, तेव्हां त्यांनीं पेंढाऱ्याची पीडा तिकडे ढकलली. पुढें शिंदे होळकरांनीं त्यांना हातीं धरलें; त्यामुळें ते प्रबळच होत गेले. शिंदेशाई पेंढार आणि होळकरशाई पेंढार अशीं त्यांना नावें पडलीं. शिंदे-होळकरांबरोबर तह होऊन ते जेव्हां स्वस्थ बसले, तेव्हां ह्यांचा आश्रय तुटला. मग त्यांनीं स्वतंत्रपणें आपणच लूट मांडली. त्यांचें मुख्य ठिकाण मध्यहिंदुस्थान. तेथून त्यांच्या मोठमोठ्या टोळ्या निघून दक्षिणदेशीं ह्या समुद्रापासून

त्या समुद्रापर्यंत टोळांच्या झुंडीसारख्या फिरत आणि गरीब बिचाऱ्या शेतकऱ्यांना तलवारीच्या धारेवर धरून लुटीत आणि घोडीं लादून वाऱ्यासारखे पार होत. इंग्रजसरकारच्या सुस्तीमुळें त्यांच्या उपद्रवानें दाक्षिणदेश दहा वर्षें अगदीं बेजार होऊन गेला. ते असे धीट झाले होते कीं, राजेरजवाड्याच्या फौजा तर त्यांच्या डोळ्यांना मुळीं दिसतच नव्हत्या आणि इंग्रजांचें सैन्य जरी एकादे वेळीं त्यांच्या वाटेवर असलें, तरी त्याला देखील ते जुमानीत नसत. त्यांचीं घोडीं मोठालीं पाठाळें नसत, तट्टेंच असत; परंतु तीं कांहीं विलक्षण मजबूद आणि हवी तेवढी मजल मारणारीं असत. एल्फिन्स्टन साहेब ह्मणतोः—"त्यांच्या कांहीं टोळ्या नागपुरापासून सोळा मैलांवरून गेल्या; परंतु आतां मला ते आले असा आरडा ओरडा ऐकण्याची संवय पडून गेली आहे, ह्मणून मी फारशी काळजी करीत नाहीं; नीट सावध असतों आणि त्यांची बातमी ठेवीत असतों. ते केव्हां केव्हां अशा जबर मजला करीत असतात कीं, कोणाला खरें सुद्धां वाटणार नाहीं. वालेस साहेब ह्मणतोः—" ते उमरावती लुटावयाला गेले तेव्हां मध्यें कोठें मुक्काम न करतां सहा दिवस आणि सहा रात्री सारखे चालत होते, तरी दमले नाहींत. त्यांची दौड आणि नेट असा कांहीं विलक्षण कीं, उमरावतीहून त्यांना हांकून लावलें त्याच दिवशीं त्यांच्यातलीच एक टोळी तेथून साठ मैलांवर बोझार शहरावर जाऊन पडली; आणि डोंगरांतून आपल्या ठिकाणावरून निघाल्यापासून आठ दिवसांच्या आंत वर्धेच्या पश्चिमकांठचा सारा मुलूख, वारणीकोट्यापर्यंत, ह्मणजे सरासरी चांद्याच्या समोरपर्यंत लुटून पुनः तेथें माघारी गेली. त्यांचा जमाव ५००० स्वार आणि २००० पायदळ लोक एवढा मोठा होता.—त्यांतल्या कांहीं टोळ्या पूर्वेस अगदीं कुईपर्यंत ह्मणजे नागपुरापासून आग्नेयीस पंधरा मैलांवर येऊन ठेपल्या; तेव्हां दरबार आणि सारें शहर असें घाबरून गेलें कीं सांगतां सोय नाहीं. मला वाटतें, इतकें घाबरण्याचें कांहीं प्रयोजन नव्हतें. पेंढाऱ्यांच्या मनांत असतें, तर ते शहर खुशाल लुटते. परंतु त्यांची इच्छा तशी असल्याचें मुळींच दिसलें नाहीं."

सन १८०६ च्या फेब्रुआरींत पेंढारी पुनः नागपुराजवळ आले. तारीख ७ रोजीं शहरांत मोठी गडबड उडाली. दुसऱ्या दिवशीं एल्फिन्स्टन साहेबानें स्ट्राची साहेबाला पत्र लिहिलें, त्यांत मजकूर असा आहेः—मागें पेंढाऱ्यांबद्दल लिहिलें, त्यावर पुढें काय झालें तें मला माहीत नाहीं. परंतु उत्तरेस त्यांच्या दोन टोळ्या जमल्या आहेत. त्यांतली एक चपऱ्याजवळ सेवनी

येथे आहे. त्यांच्यापुढें आपला कांहीं निभाव लागावयाचा नाहीं, असें राजानें मला सांगून पाठविलें. तो ह्मणतो:—यावेळीं तुह्मीं मदत केली नाहीं तर शहराची धडगत दिसत नाहीं. ते लुटून फस्त करतात. आह्मांला तर मदत देतां येत नाहीं. त्याना हांकून लावण्यापुरतें सामर्थ्य त्याच्या आंगांत नसावें, इतका तो बलहीन झाला आहे असें मला वाटत नाहीं; परंतु निराश होऊन रडत न बसतां किंवा त्यांची कशी तरी समजूत करावयाला न लागतां हिम्मत धरून लढण्यास उभा राहील तर! काल मी शिकारीला गेलों होतों आणि पांच जोड पाणलावे ( Snipe ) पाडले. येथें आल्यापासून हेच प्रथम. पुढें पारवे मारण्याला निघालों, इतक्यांत एक म्हैसुरी स्वार भरधांव येऊन मला सांगूं लागला कीं, पेंढारी येऊन शहरांत शिरले. मी तसाच घोडा टाकीत परत आलों आणि पहातों तर रस्त्यावरले सारे गांव घाबरून गेले आहेत आणि लोक एकत्र जमून घरदार सोडून चालले आहेत. येथें येऊन पहातो तर पेंढारी नाहींत; राजाचेच कांहीं स्वार घाईघाईनें धांवत आलेले पाहून लोक घाबरले आणि गलबला चालला आहे. मग मी एका टेंकडीवर जाऊन गम्मत पाहूं लागलों. होळकर पुण्यांत शिरला, तेव्हां देखील लोक असे घाबरले नव्हते. कितीएक दुकानांची लूट झाली. लोक अजून देखील स्वस्थचित्त झाले नाहींत. काल रात्रीं कारभारीमंडळीनें मला सांगून पाठविलें कीं, सेवनी येथें १०००० पेंढारी जमले आहेत, अशी बातमी आली आहे. मला वाटतें ते बहुतकरून इकडे येणार नाहींत. राजालाही तसेंच वाटत असावेंसें दिसतें. तो आपलें सैन्य शहरांत आणतो आहे. तें वेळेवर आलें तर मग पेंढारी शहरावर येणार नाहींत. माझी इच्छा तेवढीच आहे. कारण, तसा प्रसंग आला तर माझ्या इतक्या पुस्तकांचें रक्षण कसें होईल हें एक, आणि दुसरें माझ्याजवळ सरकारी माल पुष्कळ आहे त्याचें रक्षण कसे होईल हे भय मला पडलें आहे. यांतलें कांहीं गेलें तर हल्लींच्या सरकाराकडून भरून मिळेल, अशी बहुधा आशा धरावयास नको. नाहीं तर मला पेंढारी आलेले पहावयाला नको आहेत असें नाहीं. कारण, त्यांच्या नांवानें जी धांदल उडवलेली पाहिली तींत मला कांहीं ध्यावयासारखें दिसलें तर प्रत्यक्षांत तसें अधिकच असेल.”

तरी एकंदरींत पाहतां भोंसल्याच्या दरबारीं एल्फिन्स्टन साहेबाचा काळ शांततेंत गेला. परंतु तो तरुण असून त्याची उमेद मोठी आणि आपल्या लोकांच्या

मंडळींत असण्याची हौस फार असल्यामुळें त्याला अगदीं उदासवें वाटे. त्या वेळीं नागपूर शहर इंग्रजांच्या ठाण्यापासून फार दूर असल्यामुळें आपला एकादा जुना मित्र किंवा कोणी वाटसरू तरी सहज केव्हां भेटेल अशा आशा सुद्धां नसे. त्यामुळें त्याला तेथें रहाण्याचा कंटाळा येऊन गेला आणि दुसऱ्या एकाद्या दरबारीं बदलून जावें किंवा आपल्या मित्राबरोबर विलायतेस जावें अशी इच्छा फार झाली. त्याला कालक्रमण करण्याचीं साधनें दोनच होतीं; एक वाचन आणि दुसरें शिकार. वाचनाची गोडी त्याला किती होती हें मागें एकदां सांगितलेंच आहे. नागपुरास त्यानें प्रथम इंग्रजी काव्यें वाचण्यास सुरुवात केली आणि त्यांच्या गुणदोषांबद्दल तो आपला मित्र स्ट्राची साहेब यास एकावर एक पत्रें लिही. तोही त्याच्याच सारखा विद्याव्यसनी होता. तो उत्तरास उशीर लावीत नसे. एल्फिन्स्टन फारसी कवींचे ग्रंथही वाचीत असे; आणि आपला मित्र जेंकिन्स साहेब, शिंद्याच्या लष्करांतला रेसिडेंट, याला त्यांच्याविषयीं लिहीत असे. परंतु ते सारें भ्रमोत्पादक असल्यामुळें त्याच्या मनावर अपायकारक परिणाम घडूं लागला, मनाला अधिकच उदासीनता येऊं लागली, ह्मणून त्यानें ते वाचण्याचें सोडून दिलें. तो आपल्या मित्राला ह्मणतो—त्यांच्या वाचनानें मन उदास होत असतें असें मी नेहमीं म्हणत असतों, हें तुह्मांला माहीत आहेच.—ग्रीक भाषेचा अभ्यास त्यानें बनारस येथें असतांनाच सुरू केला होता, तो तो लढाईंत गेला तेव्हांदेखील बंद पडला नव्हता; आणि आतां त्यानें तो चांगलाच चालविला. त्या भाषेंतले पुष्कळ ग्रंथ त्यानें वाचले. त्यांत होमर कवीचें म्हाकाव्य ईलियड आणि थुसिडिडीस याचा प्रख्यात इतिहास हे त्याला फार आवडत असत. त्या भाषेचा अभ्यास कठीण होता, परंतु त्याला जी मित्रमंडळी भेटे, ती व विशेषतः जेंकिन्स आणि क्लोज साहेब हे त्याला उत्तेजन देत; त्यामुळें त्याला उमेद येई. असा त्याचा वाचनक्रम चालला असतां विलायतेहून एक पुस्तकांची पेटी आली; तींत वॉल्टर स्कॉटचें The Lay of the last ministrel हें काव्य आलें. तें वाचून त्याला फारच आनंद झाला. पुढें पुष्कळ पत्रांत त्यानें त्यांतलीं अवतरणें दिलीं आहेत.

एल्फिन्स्टन साहेबाची रोजनामा लिहिण्याची वहिवाट पहिल्यापासून होती. वर्षांस नवी वही सुरू करतेवेळीं तीवर तो आरंभीं आपल्याला प्रिय असेल त्या काव्यांतलें एक चांगलेंसें वचन लिही. त्यांत तो आपली रोजची सारी

हकीकत लिहून ठेवीत असे; परंतु कामासंबंधीं किंवा राजकीय प्रकरणीं गोष्टी बहुधा लिहीत नसे. कांहीं दिवस रोजनामा अगदीं बंद असे, परंतु त्याविषयीं त्याला मग वाईट वाटे. नागपुरास गेल्यावर कांहीं दिवस रोजनामा चालू नव्हता. तो पुढे सन १८०५ च्या अखेरीस सुरू झाला. त्यांत तो ह्मणतो:—माझा जो काळ इतका संतोषानें गेला आणि ज्याविषयीं ह्या एकांतवासांत मला वारंवार वाईट वाटेल असें मला खचित वाटतें, त्याची रोजची हकीगत मीं नीट लिहून ठेविली असती तर बरें होतें.—पुढें एक दिवस तो लिहितो:—आज पर्जन्य पडत असल्यामुळें मी विचार करीत बसलों आणि आपले मागचे रोजनामे काढून वाचूं लागलों. सन १८०३ च्या अवलीस माझ्या अंगांत किती चलाखी आणि मला किती हौस होती, हें पाहून मला आश्चर्य वाटलें आणि आतां त्यांतला कांहीं अंश सुद्धां उरला नाहीं ह्मणून वाईट वाटलें. यांत खरे असें आहे कीं, दुसऱ्या लोकांचे अभिप्राय कळले ह्मणजे आपल्या मनावर जे कांहीं बरे वाईट परिणाम होत असतात, तो संस्कार मी इतके दिवस एकीकडे पडल्यामुळें माझ्या मनाला मुळींच नाहींसा झाला आहे. शिवाय, माझी महत्वाकांक्षा पूर्ण होण्याला मार्गच नाहींसा झाला आहे. माझी जागा एकादें मोठें कृत्य करून दाखविण्यासारखी नाहीं. बुद्धि चालवण्यासारख्या खेळांची सुद्धां येथें सोय नाहीं, त्यामुळें मला बहिरीच्या आणि कुत्र्याच्या शिकारीचा नाद धरावा लागला आहे. ह्या क्षुल्लक गोष्टी मनुष्याच मन वाजवीपेक्षां फाजील वेधीत असतात. तरी मी आपला सगळा वेळ त्यांत जाऊं देत नाहीं; वाचतों आणि विचार करतों.

आपलें वाचन अगदीं निर्वेधपणें चालावें ह्मणून एल्फिन्स्टन साहेबानें नागपुरापासून कांहीं मैलांवर कन्हन (Canhan) नदीवर एक बंगला बांधला आणि सारें काम आटपून तो तेथें जाऊन बसत असे, त्याचें नांव Falconer's hall (बहिरीवाल्याचा दिवाणखाना) असें त्यानें ठेविलें होतें. तेथून त्यानें स्ट्राची साहेबाला एक पत्र लिहिलें, त्यांत खालीं लिहिल्याप्रमाणें मजकूर होता.

मी आलीकडे एकीकडेशी एक जागा बांधली आहे, तेथें कांहीं दिवस राहिलों आहें. येथें मी कामाचें तोंड देखील कसें तें पहात नसतों. युरोपांत पाठवायाचीं पत्रें लिहितों, तिकडून आलेलीं मागलीं पत्रें वाचतों, तुमचीं जुनीं पत्रें वाचतों, व केव्हां केव्हां ग्रीक अभ्यास वगैरे करतों. कामाचें अगदीं नांव

घेत नाहीं. अशा तयारीनें आज युरोपांत पाठवावयाचीं पत्रें लिहीत आणि घराविषयीं विचार करीत बसलों होतों. त्यावेळीं एक दोन तास मला जसा आनंद झाला होता तसा केव्हांच झाला नसेल. घरचीं सर्व सुखें आणि ज्या मनुष्यांना पाहून आतां फार दिवस झाले, त्यांच्याबरोबर विशेष स्थळीं फिरलेलें, तेव्हां झालेलीं भाषणें, सकाळचें फिरणें, उन्हाळ्यांतली संध्याकाळची मनोहर शोभा आणि कांहीं स्थळांची विशेष शोभा मला आठवते ती, इत्यादि गोष्टींचें मला स्मरण झालें. तेव्हां मला कोणी सहज पाहिलें असतें तर मी मोठ्या सुखांत निमग्न झालेला आहें असें त्याला वाटलें नसतें. कारण मी आपल्या बिछान्याच्या खोलींत दार लाऊन बसलों होतों आणि सारख्या अश्रुधारा सोडीत होतों. परंतु मला इतका आनंद झाला होता कीं, त्याचें मला वर्णन करता* येत नाहीं. अखेर मला दुःखाच्या गोष्टी स्मरूं लागल्या आणि खरोखर रडें आलें. कांहीं मित्रमंडळी मेली त्यांबद्दल आणि तसेंच तेथें असतांना जो काल गेला आणि ज्या सुखदुःखाच्या गोष्टी घडल्या त्यांचें नांव पुनः घ्यावयास नको ह्मणून वाईट वाटलें. आप्तमंडळीच्या वियोगाचें दुःख तुह्मीं पुष्कळ अनुभावलें आहे, परंतु आई मेली, बाप मेला, मग भावाबहिणींना कोणी पुसणारें नाहीं ह्मणून तीं चार चोहींकडे गेलीं ह्मणजे केवढें दुःख होतें, आणि सारीं एका ठिकाणीं होतीं तेव्हां केवढी शांतता आणि किती सुख होतें, सगळीं एकत्र असण्याचें मूळ तें नाहींसें झालें, आतां पुनः सर्व एका घरांत कधींच जमणार नाहीं, असें मनांत आलें ह्मणजे किती वाईट वाटते, तें तुह्मांला काय कळणार ? आतां कदाचित असें असेल कीं हें आपल्या गृहस्थितीचें चित्र मी पाहिलें तेव्हां अगदीं लहान होतों ह्मणून मला तें इतकें सुंदर दिसलें; आणि तसें असलें तर तो भ्रम नाहींसा झाल्यावर मग तें पुनः दिसण्याचा प्रसंग आला नाहीं हें सुदैवच समजलें पाहिजे. आपले कोणी आप्त इष्ट मेले ह्मणजे रडण्याची चाल आहे, ह्मणून रडावयाचें अशा मताच्या, लुच्चा, मूर्ख-लोकांपैकीं कोणाच्या हातांत हें पत्र सांपडलें तर ते मला खचित वेडा ठरवितील. तें असो; माझी मरण पावलेली आप्त इष्ट मंडळी मला फार प्रिय असली तरी ह्या चालीस अनुसरून रडावें असें माझ्या मनांत येत नाहीं.

* जगन्नाथराय पंडितांनीं रसगंगाधरामध्यें हें निःसीम आनंदाचें लक्षण असें लिहिलें आहे तें पहावें.

परंतु मला आपल्या मनाच्या कोमलतेबद्दल अभिमान वाटतो; आणि मी जितका निर्दय प्राणी आहे असें मला वाटत होतें तितका नाहीं, हें पाहून आनंद होतो. ह्या देशांत आल्यानें मनावर भयंकर परिणाम घडतात. येथें जर कोणाशीं स्नेह जोडला नाहीं तर मनाला कशाचाच ओढा लागत नाहीं, आणि आपली सदयता वगैरे मनोधर्म दाखविण्यास संधीच येत नाहीं; तेणेंकरून मन सुस्त होतें, आणि मनुष्य थंड एकलकोंडा आणि उदास होतो."

याप्रमाणे नागपुरास असतांना एल्फिन्स्टन आपला काळ एकांतस्थळीं अभ्यासांत आणि विचारात घालवीत होता. तेथें क्लोज साहेबाची संगति त्याला आवडे. वेलेस्लीसाहेबानें त्याला पाहिजे तो अम्मलदार बरोबर देतो ह्मणून सांगितलें होतें त्याप्रमाणे त्यानें ह्यास मागून घेतलें होते. त्याचें वाचनाशिवाय करमणुकीचें दुसरें साधन शिकार हें होतें. आमच्या इकडची बहिरीची शिकार त्याला आवडत असे. शिवाय कुत्र्यांकडून जनावरें मारवणे व पाखरें मारणें हे खेळ होते.

तो पुण्याहून निघाला तेव्हां त्याची प्रकृति बिघडलेली होती, ती सुधरत जाऊन लढाईची धानधूम संपेपर्यंत चांगली होती, पुढे भोंसल्याच्या स्वारींत दाखल होऊन नागपुरास जात असतांना वाटेत बिघडली व तेथें जाऊन राहिल्यावर मध्ये मध्ये बिघडत असे. नागपुरास जात असतांना ती बिघडली तेव्हां त्याने असें लिहिलेलें आहे—" मला वाचावयाला वेळ नाहीं, आणि मी पुण्यांत असतांना जशी भयंकर स्थिति झाली होती तशी हळू हळू होत चालली आहे. मला अंगांत तरतरी आणली पाहिजे आणि वाचलें पाहिजे; जर वाचले नाहीं तर विचार केला पाहिजे; परंतु रिकामें आळसांत वेळ घालवीत बसतां कामा नये." त्याला केव्हां केव्हां अगदीं उदास वाटत असे. त्यानें स्ट्राची साहेबाला पाठविलेल्या पत्रांत त्याविषयीं पुष्कळ उल्लेख आहेत, आणि त्याच्या पुढच्या पुढच्या रोजनाम्यांत पुष्कळ ठिकाणीं तसे लेख आहेत. त्याला जी उद्विग्नता येत असे तिचें कारण केव्हां केव्हां त्याच्या शरीरप्रकृतीचें अस्वास्थ्य हें असे; परंतु त्याच्या मनाची स्वाभाविक तऱ्हाच तशी होती हें मुख्य कारण होय आणि कित्येक वेळ त्याला अत्यानंदाचें भरतें येऊन गेलें ह्मणजे मागाहून असें होई. अशीही आधींच सारी सिद्धता होती आणि तशीच त्याला एक वाईट खोड होती त्यामुळें तीं कारणें बळावत गेलीं. त्याला अशी संवय होती कीं उगाच कांहीं तरी कल्पना करीत

बसून मनाला हवें तिकडे पाहिजे तसें भडकूं द्यावयाचें. त्यामुळें तो भलत्या भलत्या तरंगांत अगदीं गर्क होऊन जाई. पुढें त्याचें त्यालाच वाईट वाटे आणि मी अगदीं मूर्ख आहें असें आपल्याशींच ह्मणे आणि आतां ही संवय अगदीं सोडून द्यावयाची असा निश्चय करून तो त्या उद्योगास खरोखर मनापासून लागे. त्यानें एका पत्रांत असें लिहिलें आहे कीं मी आतां फारसी कविता वाचण्याचें सोडून दिलें आहे; कारण ती अस्पष्ट संदिग्ध कल्पनांनीं भरलेली असते; ती वाचल्यानें मनावर अहितकारक परिणाम होतात आणि तेणेंकरून माझी नेहमींची उदासीनता अधिकच वाढते.

तो एकांतवासांत रहात असे तेही त्याचें मन उदास होण्याला एक कारण झाल्यावांचून राहिलें नाहीं, परंतु तो मनांत भलत्या भलत्या कल्पना आणून त्यांत अगदीं गढून जात असे, तसें करतां ना ह्मणजे त्याच्या मनाची स्थिति इतकी बिघडली नसती.

त्या प्रकरणीं लिहितांना तो स्वतः असें ह्मणतो—मला महिना ३००० रुपये मिळूं लागल्यापासून मी अनिष्ट गोष्टी मनांत आणण्याचें अगदीं सोडून दिलें आहे; त्यामुळें आतां बरें आहे. नागपुरास आल्यापासून मी फार उद्धट आणि निर्दय झालों आहें. याचें कारण माझ्या चाकरीची जी तऱ्हा आहे ती असावी असे मी ह्मणतों, तींत मला पुष्कळ अंशीं सारासार विचारानें वागावें लागतें आणि सभ्यतेचे विचार बाजूस ढकलावे लागतात. परंतु मला वाटतें सारा दिवस शिकारींत, खाण्यांत आणि पाचकळ बोलण्यांत वगैरे घालवावा अशी जी असभ्यपणानें वागण्याची रीत आहे तीच विशेषतः या गोष्टीस कारण असावी."

नागपुरास बरेच दिवस गेल्यावर व प्रकृति बिघडल्यामुळें, एल्फिन्स्टनसाहेबाच्या मनांत रजा घेऊन कलकत्त्यास जावें असें आलें, आणि त्यानें एक वर्षाची रजा मागितली. आपला मित्र अडाम साहेब याला त्यानें त्याविषयीं पत्र लिहिलें त्यांत तो ह्मणतो " माझी प्रकृति खरीच बिघडली आहे. येथच्या कामावर कोणाला नेमावें याची मोठीशी काळजी नको. येथें पडणारें काम एकादें पोर देखील करील. क्लोजसाहेबाला नेमलें तर तो कठीण प्रसंगीं देखील करील. दक्षिणेंतून येणाऱ्या कोणाहीपेक्षां तो चांगलें करील. " असो. अखेर रजा मंजूर होऊन आली आणि त्याच्या जागीं जेंकिन्स साहेबाची नेमणूक झाली. त्या उभयतांचें सर्व प्रकारें साम्य होतें. एल्फिन्स्टनसाहेब

रजा भरून परत आल्यावर दोघांनीं बसून ग्रीक भाषेचा अभ्यास परीक्षेला जाणारे उमेदवार आस्थेनें करतात तसा चालविला. पुढें कांहीं वर्षांनीं पुनः त्यांची गांठ पुण्यास पडली तेव्हांही त्यांनीं तोच क्रम चालविला. जेंकिन्स साहेब आला तेव्हां एल्फिन्स्टनसाहेब त्याला भेटण्याकरितां पुढें कोइलवाड्यास गेला. परंतु त्यानें डोणेवाड्यास मुक्काम केला होता. तेथे एक वाघ होता त्यानें १७ मनुष्यें मारली होतीं. त्याची शिकार करावी ह्मणून त्यानें एल्फिन्स्टन साहेबासच पुढें बोलाविलें. तो लागलाच गेला. तीच उभयतांची प्रथम भेट. त्यांनीं वाघाचा शोध पुष्कळ केला, परंतु तो कांहीं सांपडला नाहीं. एक लहानसा वाघ दिसला त्यावर त्यांनीं गोळ्या घातल्या. ते हत्तीवर बसून गेले होते. हत्ती घाबरून पळत सुटले, पुढें पाऊल टाकीतना. तेव्हां लाईड साहेब उंटावर बसला. एल्फिन्स्टनसाहेबाला उंट मिळाला नाहीं ह्मणून तो माघारा फिरला. इंग्लिश लोकांच्या शिकारींत ही गोष्ट प्रथमच घडली ह्मणून हिची प्रसिद्धी आहे. वाघाचा एक पेटा मेला परंतु थोरला वाघ कांहीं मिळाला नाहीं ह्मणून सारे माघारे आले. तें पाहून त्या गांवचा एक शिकारी ह्मणाला चला मी वाघ दाखवितों. त्यानें बोलल्याप्रमाणें अगदीं जाळी जवळ जाऊन वाघ दाखविला. तो फार मोठा असून त्याच्याकडे धीटपणानें पहात स्वस्थ उभा राहिला. एल्फिन्स्टन साहेबाला त्याचें तोंड आणि पुढचे पाय मात्र दिसले. लॉइड साहेबानें गोळी घातली परंतु ती कांहीं लागली नाहीं; वाघ निघून गेला. दुसऱ्या दिवशीं पुनः त्याचा शोध करीत ते हिंडले, परंतु तो दिसला नाहीं. मग ते नागपुरास गेले. तेथें कामासंबंधानें व दप्तरासंबंधानें उभयतांचें पुष्कळ बोलणें झालें. एल्फिन्स्टन साहेबानें राजाचा निरोप घेतला आणि आपल्या प्रिय बंगल्याचें दर्शन घेतलें तेव्हां तेथें क्लोजसाहेबाबरोबर स्वस्थपणानें घालविलेल्या दिवसांचें त्याला स्मरण झालें.

मग सन १८०७ च्या जानेवारीच्या २७ व्या तारखेस तो कलकत्त्यास जाण्यास निघाला आणि भोंसल्याच्या राज्याच्या ईशान्येकडील परगणा जो छोटा नागपूर त्यांतून सरळ मार्गानें चालला. हा प्रदेश अगदीं जंगली आणि त्यांत चोरवडाही फार होता ह्मणून बंदोबस्ताकरितां स्वार, शिपाई वगैरे अवश्य तितका सरंजाम त्यानें बरोबर घेतला होता; आणि आपल्या करमणुकीकरितां पुष्कळ पुस्तकेंही घेतलीं होतीं.

अलीकडे पेंढारी ह्या जंगली मुलखांत शिरले होते. नागपुरापासून तीन मजलांवरच्या एका गांवच्या पंडिताला त्यांनीं नागविलें होतें. त्यानें आपली हकीगत एल्फिन्स्टन साहेबाला सांगितली. तो ह्मणाला, पेंढारी तूमोहर गांवाजवळ आले अशी बातमी आली तेव्हां मी आपली चीजवस्त घेऊन जंगलांत पळालों. दुसऱ्या दिवशीं त्यांनीं येऊन त्या गांवचे कांहीं लोक कैद केले आणि माझा शोध केला. मी लपलों होतों तेथें येऊन त्यांनी मला गांठलें आणि माझा ५००० रुपयांचा विषय आणि एक मूल नेलें. मग मी फकीर होऊन त्यांच्या मागें विनवणी करीत लागलों. अखेर कृपा करून त्यांनीं मला मूल परत दिलें."

एल्फिन्स्टन साहेब जात जात खैरगड, रतनपूर, उदेपूर, छोटानागपूर ह्यांवरून बरद्वान प्रांतांत गेला. मग तेथून डांकमार्गानें कलकत्त्यास गेला. वाटेनें रोजनामा लिहीतच होता; त्यांत त्या मुलखाचें स्वरूप आणि त्यांतल्या जंगली लोकांची स्थिति याविषयीं लेख आहेत. त्या लोकांच्या भाषांविषयीं व त्या कोणकोणत्या ठिकाणीं चालतात याविषयीं त्यानें विशेष चौकशी केली. जगांतल्या सर्व भाषांच्या गुणदोषांचें सामान्य निरीक्षण करण्यास लागणारीं साधनें जमवावीं असें रशियांतल्या कांहीं विद्वान मंडळीनें मनांत आणून तो उद्योग सुरू केला होता. तेथच्या राणीनें तो विषय हातीं घेतला होता. सर जेम्स म्याकिंटॉश ह्मणून एक विद्वान गृहस्थ होता तो त्या कामीं मन:पूर्वक श्रम करीत होता. त्याच्या सूचनेवरून एल्फिन्स्टन साहेब डोंगरी लोकांच्या भाषा व त्यांचे पोटभेद यांचा शोध करीत होता. कांहीं आठवडे रोज खपून त्यानें कांहीं कोश तयार केले आणि ते सर जेम्स याजकडे पाठविले. तेव्हांपासून त्या विषयाकडे त्याचें लक्ष लागलेलें होतें ह्मणून त्यानें हा उद्योग केला असवा. परंतु त्यानें तयार केलेले कागद शिल्लक राहिले नाहींत, कोठें गहाळ झाले; ही दुर्दैवाची गोष्ट होय. पुढें तें काम हिस्लॉप नामक एका पाद्रीनें तडीस नेलें. मराठ्यांचा अम्मल जुलमी होता अशाबद्दल त्याच्या रोजनाम्यांत लेख आहेत. नागपुरापासून तो फार दूर गेला नाहीं तों एका गांवचा पाटील त्याच्याकडे येऊन स्वारांकरितां घास, दाणा वगैरे सरकार लोकांकडून घेतें व त्यांना नागपुरांत नेऊन इमारतींच्या कामावर लावतें आणि त्या बद्दल कांहीं देत नाहीं असें सांगूं लागला.

रतनपुरापासून तीन मजला तिळकाव्या येथें त्याला पुनः तशीच रड ऐकूं आली. तो ह्मणतो—खेडेगांवचे लोक माझ्याशीं मोकळेपणानें बोलतात आणि उपयोगी पडतात. मागले सरदार मोडले त्यांबद्दल व मराठ्यांच्या जुलमाबद्दल ते निःशंकपणानें बोलतात. ते फार गर्विष्ठ व उद्धट आणि तुमची भेट होण्याला किंवा तुमच्याशीं अघळपघळ बोलण्याला अडचण पडत नाहीं असें ते मला अनेक वेळ बोलले. मी त्यांना त्यांच्या सरकारच्या उलट बोलण्याला केव्हांही फूस देत नाहीं हें खरें, परंतु माझ्या जवळ राजाचे हरकारे किंवा दुसरे कोणी उभे असले तरी ते बोलण्यास भीत नाहींत.

एल्फिन्स्टन साहेबाला शिकारीचा नाद लागलेला असल्यामुळें त्या जंगली मुलखांतल्या लोकांशीं तो त्या विषयावरही बोले. पांच मजला पुढें गेल्यावर परतगांव येथें त्याला असें कळलें कीं, त्या मुलखांतल्या लोकांना एक वेळ मराठे आणि पेंढारीही पुरवते, परंतु जे चार पायांचे शत्रु उठले होत त्यांच्यापुढें त्यांचा टिकाव लागेनासा झाला होता. जवळच्या एका गांवचा पाटील आपलीं मुलें बरोबर घेऊन त्याला भेटावयाला आला; त्यानें कांहीं फरमासही आणली होती. त्यानें सांगितलें "इकडे रानरेड्यांचा उपद्रव फार आहे. त्यांचे कळपाचे कळप येऊन शेतांचा फडशा पाडतात. आम्ही मजबूत आवारें करतों, परंतु ते तीं मोडून आंत घुसतात. एकेक कळप पांच पांचशांचा असतो आणि त्यांतले दहा बारा जरी गोळया घालून मारले, तरी बाकीचे भीत नाहींत. त्यांना मारण्याचेंही कठीण आहे. कारण, तीर तर त्यांवर चालतच नाहीं. तोड्याच्या बंदुकीच्या पांच चार गोळ्यांनीं वाघ सहज मरतो, परंतु ही स्वारी तितक्याही खाऊन खुशाल निघून जाते. यांच्या उपद्रवामुळें पुष्कळ गांव ओसाड पडले आहेत." साधारण रेड्यांपेक्षां हे फार मोठे असतात. अशीच एक दुसरी जात आहे तिला गोर म्हणतात. गोर (Gore) मध्यें आणि रेड्यांमध्यें अंतर म्हटलें तर गोराचे खूर रेड्यांच्या खुरांपेक्षां लांब असतात.

तेथून पुढें एल्फिन्स्टन साहेब उदेपुरास गेला, तेथच्या गोंड राजाचा मुलगा त्याला भेटावयाला गेला. त्याच्यांबरोबर तो वाघ मारण्याच्या गोष्टी बोलला. त्यांत त्याला असें कळलें कीं, महुना ह्मणून एक लहान विषारी वनस्पती आहे, तिनें विषदिग्ध* केलेल्या तीरांनीं गोंड लोक वाघ मारतात.

* मनुस्मृतींत विषदिग्ध बाण सांगितलेले आहेत; ते असेच कांहीं असावें.

६–१५४–२०००

ती ते तीरांत अडकवितात. वाघाला त्या तीराची जखम झाली ह्मणजे थोड्याशा तासांनीं तो मरतो. लढाईंत सुद्धां ते तसलेच तीर मारते, परंतु त्यांना खर्च फार येतो ह्मणून तसें करीत नाहींत. प्रत्येक असामीजवळ तसला एक एक तीर असतो, कांहीं असामींजवळ दोन असतात. येथल्या चांगल्या तिरंदाजाला पन्नास पावलांपलीकडे निशाण मारतां येत नाहीं.

तेथें त्याला असें कळलें कीं, आपला मार्ग सोडून थोडेसें दूर, कांहीं वर्षांपूर्वीं एका शेतांत एक मोठा झरा अकस्मात् वाहू लागलेला आहे; त्याला लोक नवी नर्मदा म्हणतात आणि तेथें मोठी यात्रा जमते. तें स्थान पहाण्याचें मनांत आणून तो लागलाच तिकडे वळला. खेरगडाहून सरळ गेलें तर तें बरोबर सोळा मैल आहे. तेथले लोक त्याला गोंडी एक कोस म्हणतात. सुमारें सहा फूट लांब, पांच फूट रुंद आणि आठ फूट खोल, असें एक कुंड असून त्यांतून मोठ्या जोरानें कारंजासारखें पाणी वर येत आहे व त्याबरोबर रेती येत आहे आणि दोन अडीच हात रुंद असा प्रवाह पडून तो भरून चालला आहे, असें त्यानें पाहिलें. तेथें दोन बैरागी बसलेले होते. आणखी पुष्कळ लोक होते, परंतु त्याला कोणी फारशी हरकत केली नाहीं; पाण्यांत हात घालूं दिला. त्यानें एका गोसाव्याला पैसे देऊन त्याला तळाशीं बुडी मारून तेथची रेती आणावयास सांगितलें. ती पाहून पाण्याला केव्हां गंधकाचा वास येतो का? अशी त्यानें चौकशी केली. थोडा वास येत असतो, रात्रीं पाणी ऊन असतें आणि दिवसा थंड असतें, हा प्रवाह सुरू होऊन तीन वर्षें झालीं, पहिल्यानें झरा लहान होता, मग पुढें पुढें मोठा होत गेला असें सर्वांनीं सांगितलें. त्या गोसाव्यांनीं त्याच्या मूळ उत्पत्तीची हकीकत सांगितली. ते म्हणाले, 'एक मुलगा म्हशी हांकीत होता, त्यानें काळें वस्त्र पांघरलेला एक मनुष्य जमिनीवर बसलेला पाहिला. त्यानें हातांत एक कांसव धरलें होतें आणि त्याच्या खालून थोडेसें पाणी वहात होतें. त्या मुलानें जवळ जाऊन पहातांच त्या मनुष्यानें तें कांसव मारलें, त्याबरोबर पाण्याचा प्रवाह एकदम सुरू झाला आणि तो मनुष्य तेथच्या तेथें दिसेनासा झाला.'

हें स्थळ खेरी गांवाजवळ आहे. त्याला नवें अमरकंटक ( आम्रकंटक ) असें ह्मणतात आणि तेथें वर्षांतून तीन जत्रा भरतात.

कलकत्त्यास पोहोंचून एल्फिन्स्टन साहेब तेथच्या मंडळींत शिरला तेव्हां

त्याला अत्यंत आनंद झाला. नवीन गव्हरनर जनरल लॉर्ड मिंटो यानें लेव्ही भरली तींत त्याची प्रथमची भेट व ओळख झाली. उभयतांच्या कुळांत पिढ्यानुपिढ्या वैमनस्य चालत आलेलें होतें; परंतु मिंटोनें त्याचें स्वागत चांगलें केलें. तरी एल्फिन्स्टन साहेबाच्या मनांत वैरभाव जागृत होता असें त्याच्या लेखावरून दिसतें. ( ईस्ट इंडिया कंपनीच्या ) चेअरमनचे तुह्मी भाईबंद अहा का असें लॉर्ड साहेबांनीं विचारलेलें त्याला पुरवलें नाहीं. तो त्याला Gibby Elliot किंवा the Laird of Stobbs असें ह्मणे.

एल्फिन्स्टन साहेबाला बायकामंडळींत बसणें आणि त्यांच्याशीं बोलणें चालणें फार आवडत असे. तें सुख त्याला सहा वर्षांत मिळालें नव्हतें, तें कलकत्त्यांत आल्यावर मिळालें; तेव्हां त्याला आनंदसागरांत बुडाल्यासारखें झालें. एका रात्रीं मेजवानीला जाऊन आल्यावर दुसऱ्या दिवशीं त्यानें आपला मित्र स्ट्राचीसाहेब याला पत्र लिहिलें त्यांत ती हकीगत लिहून तो पुढें ह्मणतो—किती पुष्कळ बायका, आणि काय तें हसणें खिदळणें आणि किती नटणें मुरडणें ! मी त्यांत ह्मणजे स्वर्गसुखांत होतों आणि गिबी इलियटाला ठार मारण्याचें केव्हांही मनांत आणलें नाहीं. '

लॉर्ड मिंटोविषयीं त्याचा ग्रह कांहीं वाईट नव्हता. त्याचा सभ्यपणा त्याला चांगला वाटला; तो लोकप्रिय होईल असेंही वाटलें, परंतु तो पत्रांत असें ह्मणतो—बारलोजवळ त्याचें जें भाषण झालें त्यावरून तो त्या * लुच्या येरड्यासारखाच डामडौली होईल असें वाटतें.

---

* एल्फिन्स्टन साहेबानें आपल्या पत्रांत हें विशेषण हलकटपणानें मार्क्विस ऑफ वेलेस्लीला पुष्कळ ठिकाणीं लावलेलें आहे. त्याच्या राज्यकारस्थानांची टर उडवून त्यावर त्यानें एक ग्रीक भाषेंतला चुटका लागू केला आणि स्ट्राची साहेबाला जें अगदीं प्रथम पत्र पाठविलें त्यांत तो लिहिला. तें पत्र त्यानें त्याला जाळून टाकावयास लिहिलें होतें. असईची लढाई झाल्यावर त्याचें मत पालटलें आणि मग तो वेलेस्लीच्या मताचा पुरस्कर्ता, त्याचा अगदीं भक्त बनला. तो राज्यकारभार सोडून विलायतेस जावयास निघाला, तेव्हां त्याच्या कारकीर्दीची मोठी तारीफ करून वर्तमानपत्रांत छापण्याकरितां त्यानें एक स्तुतिपर लेख लिहिला. वेलेस्ली साहेब जातेवेळीं मानपत्रें घेणार नाहीं असें प्रसिद्ध झालें तेव्हां त्यानें त्याच्यावर एक कवन केलें आणि त्यांतल्या कांहीं

## भाग ६ वा.

### शिंद्याचें लष्कर. सन १८०८.

एल्फिन्स्टन साहेब कलकत्त्यास कालक्रमण कसें करीत होता याजबद्दल कांहीं लेख नाहींत, परंतु त्यानें आपल्या मित्रास पाठविलेल्या तेवढ्या पत्रावरून अनुमान होतें. त्याच पत्रांत तो ह्मणतो, माझ्या रजेला मुदत नाहीं; ह्मणजे दिसेंबरमध्यें रस्ते चालू होत तेथपर्यंत तर रजा आहेच. त्याप्रमाणें तो दिसेंबरमध्यें निघून गलबतांतून जाऊन मच्छलीपट्टणास उतरला. तेथून डांकमार्गानें हैदराबादेस गेला आणि तेथून गोंवळकोंड्यास गेला. तेथपासून रोजनामा आहे, त्यांत वाटेनें लागणाऱ्या मुलखाचें व त्याच्या स्थितीचें वर्णन आहे. तो ह्मणतो, जागोजाग गांव उद्ध्वस्त जाहलेले दिसतात. गोदावरीच्या दोहीं बाजूस, मुदनूरपासून गोवळकोंड्यापर्यंत असें आहे. पुढें कांहीं शेती-भाती दिसते. देशांत स्वस्थता नाहीं. दरवडेखोरांच्या टोळ्या जिकडे तिकडे हिंडत असतात. त्यांचे मुख्य असतात त्यांना नाईक म्हणतात; त्यांचा उपद्रव फार आणि निजामसरकारचा जुलूम त्यांच्याही पेक्षां जबर, अशामुळें कांहीं सुधारणा होत नाहीं.

एल्फिन्स्टन साहेबाला कांहीं कोणी दरवडेखोरांनीं लुटलें नाहीं, परंतु चोरांनीं गांठलें. ते गांवोगांव आहेतच, परंतु त्या मुलखांत विशेष होते. तो ह्मणतो—" इकडचे लोक पटाईत चोर अशी त्यांची ख्याती आहे आणि ती त्यांनीं आह्मांला खरी करून दाखविली. एकलारा येथें चोरांनीं त्याच्या तंबूंत शिरून कांहीं जिन्नस नेले. त्यांचा तपास लावण्याकरितां त्यानें गांवांत

---

[ मागील पृष्ठावरून पुढें चालू. ]

पंक्ती मासल्याकरितां आपल्या मित्राकडे पहाण्यास पाठविल्या. म्हैसूरच्या राज्याची स्थिरस्थावरता झाल्यानें त्यांतील लोकांस फायदे झाले आणि त्यानें जें चांगलें वाष्टर्य केलें त्याच्या योगानें मराठ्यांचा कमकुवतपणा प्रथम निदर्शनास आला असें त्यांत वर्णन केलें होतें. मराठे मंडळ हें एक मोठें धिप्पाड भूत असून त्यावर जेव्हां नीट शिस्तवार हल्ला झाला तेव्हां तें पार कोणीकडच्या कोणीकडे नाहींसें झालें असें वर्णन केलें होतें.

पाटलाकडे स्वार पाठविले. पाटील वेशीबाहेर येईना ह्मणून ते जबरीनें आंत जावयास निघाले, त्याबरोबर आरडाओरड होऊन ढोल वाजतांच शेतांतून वगैरे चोहींकडून लोक जमले आणि गोफणगुंड्यांचा मार सुरू करून त्यांनीं साऱ्यांना पळवून लाविलें. एक स्वार जखमी झाला. नांदेडास साहेबाचा एक घोडा चोरांनीं नेला.

भोंसल्याच्या राज्याच्या हद्दीवर करजा येथें कर्नल डव्हटन साहेबाची छावणी होती तो निजामाकडे जी फौज होती तींत होता. त्याची भेट झाली, तींत हैदराबादेस मागच्या वर्षीं जेव्हां शिपायांचीं पलटणें बिथरलीं होतीं तेव्हांची सारी खरी हकीगत त्याला कळली. शिपायांनीं दाढ्या अशा राखाव्या, मिशा अशा राखाव्या, वगैरे गोऱ्या अम्मलदारांनीं कांहीं नियम केले होते, आणि ते सक्तीनें बजाऊं लागले तेव्हां आतां हे आह्माला बाटवणार असा त्या शिपायांचा समज होऊन ते बंडाला प्रवृत्त झाले. अगदीं वेलूरच्याप्रमाणें होत होतें, परंतु ती बातमी फुटली त्याबरोबर उमजून अम्मलदारांनीं ते नियम रद्द केले तेव्हां त्यांची समजूत झाली.

तेथून कांहीं मजला पुढें गेल्यावर नागपुराहून जेंकिन्स साहेब व आणखी कांहीं मंडळी त्याला भेटण्याकरितां निघून आली होती त्यांची गांठ पडली. ते सारे मिळून उमरावतीवरून एलिचपुरास गेले; तेथें कांहीं दिवस राहून तेथून नागपुरास गेल. असें वांकडें जाण्याचें कारण त्यावेळीं भोसल्याच्या मुलखांत पेंढाऱ्यांचा उपद्रव फार झाला होता. ते रेसिडेन्सीच्या अगदीं जवळ गेले होते. रघोजी चांद्याहून नागपुरास यावयास निघाला होता तो त्यांना भिऊन माघारा गेला. ते दक्षिणेकडे चांद्याइतके दूर गेले नाहींत. नाचणगांवावरून उत्तरेकडे वळले आणि बाहादूर नेवला परगण्यांतून बरहामपुराकडे गेले. एलिफन्स्टन घोड्यांचे आणि मेण्यांचे टप्पे ठेऊन उमरावतीस जाऊन पोहोचला. त्याच दिवशीं चारपांच हजारांची एक टोळी त्याच वाटेनें गेली. त्याचा तंबू वगैरे सामान चाललें होतें तें त्यांनीं लुटलें, आणि तीन उंट आणि कांहीं माणसें धरून नेलीं. पुढें हळू हळू तीं सुटून एलिचपुरास दाखल झालीं. एका असामीला त्यांनीं मलकापुरापर्यंत नेलें होतें. त्याचे हाल वगैरे कितपत झाले ती एलिफन्स्टन साहेबानें चौकशी केली, तेव्हां त्यांतल्या चांगल्या हुशार मनुष्याच्या तोंडून त्याला असें कळलें कीं, पेंढाऱ्यांना लोक जितके क्रूर आणि दांडगे समजतात तितके कांहीं ते

मुळींच नव्हते. त्यांनीं कोणा एकालाही ह्मणमार केली नाहीं. एल्फिन्स्टन साहेब कोठें आहे अशी त्यांनीं चौकशी केली. कांहीं ह्मणाले, त्याला धरूं; बाकीचे ह्मणाले, इंग्रज आह्मांला चाकरीला ठेवतील तर त्यांच्या पदरीं राहूं.

नबाब सलाबतखान ह्मणून एलिचपुरास निजामाचा तालुकदार होता, त्यानें उमरावतीस जाऊन एल्फिन्स्टन साहेबाला आपल्या येथें बोलाऊन नेलें आणि त्याचें आदरातिथ्य उत्तम केलें. रोज मेजवानी आणि रात्रीं मध्यान्हीपर्यंत नाच चालत असे. सकाळीं सूर्योदयापासून दहा बारा वाजेपर्यंत बहिरीचीं वगैरे शिकार होत असे. याप्रमाणें कांहीं दिवस पाहुणचार झाल्यावर तो तेथून निघाला तेव्हां त्याला वाईट वाटलें. एकंदरींत त्याला हिंदूंपेक्षां मुसलमानांचा सहवास अधिक आवडत असे. सलाबतखानानें त्याला आपल्या हद्दींतून पार होईपर्यंत पोंचवियाला एक हजार स्वार, एक पलटण आणि चार तोफा बरोबर देऊन फत्तेजगखानास पाठविलें, त्याजबरोबर तीन मजला जाऊन चौथीला ते तंबू ठोकणार होते, इतक्यांत पेंढारी जवळ आले अशी बातमी आली तेव्हां मग न थांबतां त्यांनीं नागपूर गांठलें. ती मजल तीस मैलांवर झाली. पेंढारी नागपुराजवळून गेले तेव्हां रेसिडेन्सीपासून दीड मैलावरचीं घरें त्यांनीं जाळलीं होतीं. एल्फिन्स्टन साहेब ह्मणतो:—ते जर पुनः आले तर आह्मी आपलें आणि आपल्या तटवास्यांचें संरक्षण करूं; परंतु आमचे बंगले आणि माझीं पुस्तकें आणि चाकर माणसें यांचा काय दशा होईल नकळे. शहरांतले लोक ह्या नित्य काळजीनें अगदीं हलाकीस आले आहेत. असो—जेंकिन्स साहेब उन्हाळाभर तेथेंच रहाणार होता. त्याला सगळ्या भाषा उत्तम येत होत्या. त्याच्याबरोबर तो इटालियन काव्यें वगैरे ग्रंथ वाचूं लागला.

एल्फिन्स्टन साहेब नागपुरास येऊन महिना दीड महिना झाला नाहीं तोंच त्याला शिंद्याच्या लष्करांत जाण्याचा हुकूम आला. कारण तेथें मर्सर साहेब रेसिडेंट होता तो दुखणेकरी पडला होता. तो तिकडे जावयास एप्रील अखेर निघाला. तेव्हां त्यानें स्ट्राची साहेबाला असें लिहिलें—मला नवे मुलूख आणि नवे लोक पहावयास सांपडतील, नवीन तऱ्हा दिसतील, त्यांपासून थोडी माहिती होईल ह्मणून बरें वाटतें. प्रकृतीबद्दल काळजी वाटते. कारण तिकडे उन्हाळा फार. शिंद्याच्या लष्करांत रहाणें मला मुळींच आवडणार नाहीं; कारण त्या मनुष्याचा मला तिटकारा आलेला आहे; आणि इंग्लिश

रेसिडेंटाची तेथें जी शोभा रहाणार आहे तिचें मला फारसें कौतुक वाटत नाहीं. पुण्यामध्यें त्यानें जीं असंख्यात अनन्वित कृत्यें केलीं तीं मी प्रथम ऐकिलीं तेव्हांपासून त्याच्याविषयीं मला अप्रीति उत्पन्न झालेली आहे, हें ध्यानांत ठेवा. होळकराबरोबरच्या लढाईच्या अखेर त्यानें जी आमची अप्रतिष्ठा केली, तीमुळें तो मला अगदीं आवडेनासा झाला, आणि मी जो त्याच्याकडे जातों आहें तो त्याच्याशीं वागण्यांत विचारानें मला आपला राग आंवरून धरतां येईल कीं नाहीं, हें पहाण्याकरितां जातों. कॉलिन साहेबाचा तो तिरस्कार करीत होता, तरी त्याला वाटत होतें कीं, शिंदा आपल्याला फार मानतो. यावरून पाहिलें तर त्याची रीतभात चांगली असावी असें दिसतें. माल्कम् साहेब तर त्याच्यावर अगदीं फिदा झालेले होते, तुह्मी त्याच्यावर प्रीति करणारेच आहां; आणि जेंकिन्स साहेबाला तरी तो स्वतःला आवडत नाहीं असें नाहीं................

आतां मला नागपूर सुटल्यासारखेंच आहे; परंतु शिंद्याकडे रहाणें आवडत नाहीं. तर पुण्याची किंवा दिल्लीची जागा रिकामी होईल तेव्हां बहुधा मिळेल. परंतु मी आपला तुह्मांला ह्मणून मनांतली गोष्ट सांगतों. फ्रेंच लोक इराणच्या शहाच्या मदतीनें हिंदुस्थानावर हल्ला करण्याच्या विचारांत आहेत हें तुह्मी ऐकिलेंच असेल. ह्या भयामुळें आतां तिकडे वकील रवाना होतील, तर माझी त्यांत योजना होईल तर खटपट करून पहा असें मी आड्याम साहेबाला लिहिलें आहे. तें काम जिवावरचें आहे ह्मणून तिकडे पाऊल घेणारे कोणी फारसे निघणार नाहींत, परंतु माझी नेमणूक होईल तर मी हौसेनें जाईन. कारण, गेलों तर माझ्या अंगांत कठीण प्रसंगांत शिरण्याची कांहीं तरी धमक राहील आणि माझा कांहीं तरी उपयोग होण्याची आशा राहील. येथें राहून तसलें कांहीं घडण्याचें नांवच नको."

एल्फिन्स्टन साहेब जबलपुरावरून सागरावरून असा गेला. त्या प्रवासाची हकीगत त्यानें स्ट्राची साहेबाला लिहून पाठविली. ती अशी:—

मी आणखी चार दिवसांनीं शिंद्यांच्या लष्करांत पोहोंचेन. हा मे महिन्यांतला इकडचा कडक उन्हाळा, तरी मी सुखानें चाललों आहें. तुह्माला असाच प्रसंग आला तर असेंच जातां यावें ह्मणून मी काय करतों तें सांगतों. मी अर्धी दिवसाची रात्र आणि रात्रीचा दिवस करीत असतों. सकाळीं आठ नऊ वाजतां उठतों, उपहारकरून रोजनामा लिहितों. आणि आसपासचा मुलुख

कसा काय आहे याची चौकशी करतों. मग शिंद्याचे आणि भोंसल्याचे सरदार येतात त्यांच्या भेटी घेतों. नतर सुमार तीन वाजेपर्यंत वाचीत बसतों. मग पोषाक करून भोजन करतों आणि चार वाजतां एका झाडाखालीं खुर्ची टाकून सभोंत्या चार वाळयाच्या तट्या लाऊन बसतों. तेथून पांच वाजतां उठून चालूं लागतों तो काळोखपडेपर्यंत हत्तीवरून मुलुख पहात जातों. मग घोड्यावर बसतों तो ११, १ किंवा ५ वाजेपर्यंत १२, १६ किंवा २२ मैल अशी मजल असेल तसा, बहुधा एक व जेपर्यंत चालतों. मग तंबू ठोकून शेईपर्यंत खाना खातों आणि नंतर निजतों मी आपल्याबरोबर दोन उटांचें ओझें होईल इतकीं पुस्तकें घेतलीं आहेत आणि तीं अशा कौशल्यानें रचलीं आहेत कीं, चांगलीं बंदोबस्तानें राहून त्यांतून जें पाहिजे तें पाहिजे तेव्हां काढतां येतें. आलों ह्यांत रामटेकपर्यंत मुलुख सुपीक, मैदान आहे; तेथून तीस मैल मोहगांवपर्यंत अगदीं जंगल, डोंगराळ. घांट वगैरे आहेत. वस्ती क्वचित्. वाघ पुष्कळ आहेत. ते अगदीं जवळून जातात, तेव्हां किती धीट झालेले आहेत पहा. पुढच्या भागात लागवड चांगली आहे.

नर्मदा उतरलें ह्मणजे लागलेंच भलतीकडे अंतर दिसूं लागतें. तो देश, ते लोक, ती भाषा, वगैरे सारेंच दक्षिणेंतल्यापेक्षां अगदीं निराळें. मुलुख सपाट, रमणीय, फार सुपीक, कोठें पड नाहीं. मध्यें मध्यें गांव आणि आंब-राया लागलेल्या. घरें फार नीटनेटकीं आणि कौलारू. लोक अगदीं बनारस येथल्यासारखे, आणि भाषा तीच बोलतात. जबलपुरास मराठी फौज आहे आणि कांहीं मराठे रहिवाशी झालेले आहेत.

नर्मदेपासून ३० मैलांवर आह्मी कोनी घांट चढून गेलों. तो फार बिकट आहे. पुढें खडक आणि जंगल लागतें. त्यांतून जातां जातां सागर प्रांत लागतो. हें खरें हिंदुस्थान. जमीनदार लोक ह्मणाला भेटावयाला येतात आणि आमच्या मराठे स्वारांनां गांवांत आलेत तर गोळ्या घालूं असें दटाऊन सांगतात. सागर प्रांताचें जुनें मुख्य शहर रेहली येथें काल आमचा मुक्काम होता. तें फार सुंदर शहर आहे, आाण सोनार नदीवर खरा किल्ला आहे. आतां आह्मी शिंद्याच्या लष्कराच्या हद्दींत आलों. त्याची छावणी तीन महिने येथें होती. तो गढेकोटच्या राजाला छळीत बसला होता. त्याचा परिणाम तुमच्या लक्षांत येईलच. मला तर होळकर पुण्यास आला होता तेव्हां आस-पासच्या मुलखाची जी स्थिति झाली होती ती येथें दिसते. येथपर्यंतच्या

प्रवासांत मी आनंदांत होतों. आतां इस्तकबाल, दरबार, इत्यादि कटकटी माझ्या मागें लागणार. मला शिंद्याबरोबर अजमिरास जावयास सांपडलें तर बरें होईल. तेथून आग्रा, दिल्ली, मुरशिदाबाद, कलकत्ता ह्या मार्गानें मी नागपुरास जाईन.—परंतु तेथे परत जाणें होईल तर—कारण, आतां फ्रेंचांच्या स्वारीचें जें काहूर उठतें आहे त्यांत वकिलीखात्यांतला एकून एक मनुष्य जागेवरून हालून २५०० मैल दूर जाऊन पडेल त्यांत मी बलख येथें पडेन. खरोखर नागपुरास जाण्यापूर्वी कलकत्त्यास जावें अशी माझी फार इच्छा आहे."

एल्फिन्स्टन साहेब सागर येथें पोहोंचला तेव्हां तें शहर आणि किल्ला पाहून त्यानें स्ट्राची साहेबाला असें लिहिलें—ह्या शहराचा घेर चार मैल आहे. हें उंचवट्यावर असून फार सुंदर दिसतें. किल्ला आहे तो आपला नांवाचा. तट खूप उंच आहे, परंतु त्याच्या सभोंवता खंदक नाहीं. शिंदा पुष्कळ दिवस वेढा घालून बसला होता परंतु त्याच्यानें कांहीं तो घेणें झालें नाहीं. अखेर त्यानें किल्लेदाराला दगलबाजीनें धरलें. त्या लुच्चयाच्या घोर कृत्यामुळें शहराचा फार नाश झाला आहे. अर्धे खरोखर पडलें आहे. शहराचें संरक्षण करून आपला लौकिक पुनः स्थापण्याला आह्मांला पायदळाच्या तीन तुकड्या आणि स्वारांच्या दोन तुकड्या इतकी सुद्धां फौज लागली नसती. ज्या जागेवर जेंकिन्स साहेबाला लुटलें तीवर मी आतां आहें. शिंदा येथून तीस मैलांच्या आंत आहे."

ह्या वेळीं मध्य हिंदुस्थानांत पेंढाऱ्यांचा उपद्रव अतिशय झाला होता हें खरें, परंतु त्यांच्यापेक्षां त्या मुलखाचे राजे ह्मणवणाऱ्या मराठ्यांच्या त्रासानें तो अगदीं उठवणीस आला होता. मोंगल बादशाही खालावल्यापासून ह्या प्रदेशाला त्यांचा जितका त्रास सोसावा लागला तितका दुसऱ्या कोणत्याही प्रदेशाला लागला नसेल. वर्षांतून कांहीं दिवस राजांच्या स्वाऱ्या मुलुखगिरी-वर ह्मणजे वसूल घेण्याकरितां फिरत आणि रयत लोकांना तलवारीच्या धारेवर करून ऐन जिनसी वसूल घेत. त्या बिचाऱ्यांना शांततेच्या सुखाची ओळख नाहींशी झाली होती. एल्फिन्स्टन साहेबाला चोहींकडे अशी स्थिति दिसत होती. मुलूख चांगला सुपीक, परंतु पिकावा कसा? गांवच्या गांव वैराण झालेले आणि शहरें अर्धीं अर्धीं उद्ध्वस्त झालेलीं पाहून त्याला वाईट वाटलें. शिंद्यांची हद्द सोडून भरतपूरच्या दुर्जनसाल जाटाच्या मुलखांत तो गेला तेव्हां त्याची स्थिति अगदीं निराळी दृष्टीस पडली. उत्तर हिंदुस्थानांत जाट

लोक शेती करणारे उत्तम अशी त्यांची ख्यातीच आहे. त्यांचे गांव तटबंदिस्त होते.

सागरच्या आलीकडे ढाणू येथें शिंद्याची छावणी तीन महिने होती. एल्फिन्स्टन साहेबाचा मुक्काम तेथेंच आला; तेव्हां तेथची स्थिति दिसली ती त्यानें लिहून ठेविली आहे. तो ह्मणतो—हा गांव मोठा आहे. जमीनदाराचें घर सुंदर चांगलें तटबंदी आहे. त्याच्या जरा पश्चिमेस बेसाव नदीच्या कांठीं शिंदा उतरलेली जागा दिसते आहे. त्याच्या तंबूच्या आणि स्वयंपाकाच्या जागेभोंवत्या घातलेल्या लहान लहान भिंती अजून उभ्या आहेत. जागोजाग पडलेल्या कचऱ्यांतून धूर चालला आहे. आसपासच्या मुलखाचा देखावा अगदीं अनुरूप आहे. उघड्या बोडक्या, खडकळ टेंकड्या, गांव धूळीस मिळालेले, झाडांवर फांदी नाहीं, आणि गांवांभोंवतालच्या आवाराच्या खुणा तेवढ्या राहिलेल्या; छावणीच्या जागेसभोंवार उटांचीं आणि गुरांचीं हाडें, पडलेलीं.—शिंद्याच्या तंबूजवळून आह्मी गेलों तेव्हां त्याच्या सोईकरितां लोकांचे असे हाल झालेले, त्यांचीं शहरें ओसाड पडत चाललेलीं, त्यांतल्या लोकांना त्याच्या हुकूमानें कैदेंत ठेऊन त्यांचा छळ चाललेला, आणि तो हलकटपणाच्या खेळांत आणि ख्यालीखुशालींत, चैनींत निमग्न झालेला ऐकून त्या दुष्टाविषयीं आह्माला तिटकारा आणि किळस आल्यावांचून राहवेना.'

तारीख २२ मे रोजीं एल्फिन्स्टनसाहेब शिंद्याच्या लष्करांत जाऊन पोहोंचला. मर्सर साहेब रेसिडेन्सींतील मंडळी बरोबर घेऊन त्याला सामोरा जाऊन आपल्या तंबूत घेऊन गेला. शिंद्याकडून गोपाळराव आणि आत्माराम भास्कर सामोरे जावयाचे होते, परंतु त्यांच्या दारांत धरणें बसलें होतें ह्मणून त्यांना जातां आलें नाहीं. एल्फिन्स्टन साहेबानें त्यास धरण्याची हकीकत आपल्या रोजनाम्यांत लिहिली आहे ती अशीः—शिंद्याच्या फौजेंतले सारे मराठे अगदीं बिथरले आहेत. ते कितीएक दिवसांपासून पगार मागत आहेत. आज त्यांनीं त्याला जेऊं दिलें नाहीं, तेव्हां त्यानें याकुबाचीं पलटणें बोलाऊन आणून आपल्या तंबूसभोंवार बसविलीं आणि त्यांच्यावर तोफा रोखल्या. आपल्या बाजारांतल्या सावकारांच्या संरक्षणाचीही त्यानें तजवीज केली आहे. याप्रमाणें सारा बंदोबस्त झाल्यावर तो दुसऱ्या एका तंबूंत जाऊन सारा दिवस खुषमस्कऱ्या मंडळीबरोबर गंजिफा खेळत बसला होता. ह्या धरण्यामुळें तूर्त माझी भेट होण्याचें लांबलें.

तें घरणें मोठ्या प्रयासानें तिसऱ्या दिवशीं उठलें. बहुतेक मराठे लष्करां-तून निघाले; आम्ही दक्षिणेंत जातों ह्मणाले. मरसर साहेब ह्मणतो शिंदा बहुतकरून त्यांना जाऊं देणार नाहीं, समजूत करून माघारे फिरवाल. त्यांचा जमाव लहान नाहीं. ते २०००० आहेत. कोणी म्हणतात ३०००० आहेत. शिंद्यानें आपला मामा, कुलाब्याचा बाबूराव आंग्रे, याला कारभार दिला; त्यामुळें त्याचे पहिले कारभारी आत्माराम भास्कर आणि गोपाळराव भाऊ नाखुष झाले आणि त्यांनीं मराठ्यांना चिथवून पगारासाठीं अडून बसावयाला सांगितलें असें म्हणतात. त्यांच्याजवळ पैसा आहे, परंतु ते कांहीं देत नाहींत. आंग्र्या ह्मणूं लागला त्यांच्याजवळून चोपून घ्यावा; परंतु शिंद्यानें सांगितलें तसें करावयाचें नाहीं. कारण, केलें तर लोक मला होळकर ह्मणतील. येथचे सारे लोक असें म्हणतात कीं, शिंदा अतिशय गरीब आणि दयार्द्र मनुष्य आहे; परंतु फार आळशी पडला, त्यामुळें खुद्द त्याच्या राज्यांत त्याचें कांहीं महत्व नाहीं. तो आपण होऊन कांहीं करीत नाहीं, कारभारी सांगेल तसा वागतो.'

शंभर वर्षांपूर्वी शिंद्याच्या नांवाचा मोठा दरारा होता; त्याचा अधिकार थोर, त्याची संपत्ति अपार, त्याची अक्कल मोठी, त्याच्यापुढें हिंदुस्थान थरथर कांपत होतें; मुसलमान, रजपूत, इंग्रज, सारे त्याला नमून होते, असा लोकांचा अद्याप समज आहे परंतु त्या गोष्टी पाटील बावाला ( महादजीला ) लागू होत्या, दौलतरावाला नव्हे. पाटीलबावांनीं दिल्लींत पाहिजे तें केलें, इंग्रज त्यांच्या वाटेस फारसे गेले नाहींत. त्यांचें सारें ऐश्वर्य दौलतरावाला प्राप्त झालें, परंतु लागलीच इंग्रजांशीं व होळकराशीं गांठ पडली तेव्हां जो कठीण प्रसंग आला त्यांतून पार पडण्याला जी अक्कल आणि हुशारी हवी होती ती त्या बिचाऱ्याच्या अंगीं नव्हती, ह्मणून त्याची अशी दुर्दशा झाली. एल्फिन्स्टन साहेब लष्करांत गेल्यावर आठ दिवसांनीं त्याची भेट झाली. तीविषयीं त्यानें असें लिहिलें आहे:—" The meeting was stupid " ह्मणजे त्या भेटींत कांहींच अर्थ नव्हता. दौलतरावाच्या स्वरूपाविषयीं त्यानें असें लिहिलें आहे.—शिंदा ३१ वर्षांच्या वयाचा आहे परतु तो सुमार २३ चा असावा असा दिसतो. तो उंच नाहीं परंतु सुदृढ आणि बांधेसूद आहे. त्याचें स्वरूप भव्य नाहीं, आणि तोंडवळा कांहींसा माले लोकांसारखा आहे तरी एकंदरींत त्याचा चेहेरा पाणीदार आणि मनोहर आहे. हा राजा आहे असें माहीत

नसणाऱ्या एकाद्या मनुष्यानें त्याला पाहिलें तरी तो जवान, फांकडा मराठा आहे असें त्याला वाटेल. त्यानें पाचेची आणि मोत्यांची बहुमोल, पुष्कळ पदरी कंठी गळ्यांत घातली होती त्याच्या कानांत उंची मोत्यें होतीं '

शिंद्यास कायमचें ठाणें फार दिवस नव्हतें. तो बहुतकरून लष्कर बरोबर घेऊन बारा महिने हिंडतच असे. एल्फिन्स्टन साहेब त्याच्याकडे गेला त्यापूर्वी थोडे दिवसांखालींच ग्वाल्हेर त्याला मिळाली होती, परंतु तो तेथें कायमचा राहू लागला नव्हता. ह्मणून दक्षिणेंतून शिंद्याकडे जाणारे लोक लष्करांत जावयाचें असें ह्मणत. अद्याप देखील तीच ह्मण कायम आहे. एल्फिन्स्टन साहेबानें आपल्या बहिणीला पत्र पाठविलें त्यांत तें लष्कर कसें होतें, दरबारची स्थिति कशी होती, वगैरे सविस्तर लिहिलें होतें. आतांच्या काळच्या आह्मां लोकांस असें लष्कर आणि शिंद्याची असली स्वारी, हें कांहीं पहावयास मिळणारें नाहीं; त्याची कल्पनाच केली पाहिजे. सबब तें पत्रच खालीं देतों, तो ह्मणतोः—

एक ऐसपैस जागा तयार करून तिच्या सभोंवार कनाथी लावलेल्या आहेत, आणि ह्या वाडाच्या आंत पुष्कळ तंबू ठोकलेले आहेत; त्यांत शिंदा आणि त्याच्या कुटुंबाचीं माणसें आहेत. त्या वाडाच्या बाहेर, सभोंवार दरबारची मडळी, सर्व चाकर माणसें, लवाजमा, कवायती पायदळ आणि बिनकवायती घोडेस्वार मिळून लहानशी फौज, वाणी उदमी वगैरे व्यापारी आणि शहरांतून असणारे सर्व प्रकारचे इतर लोक, असे सारे मिळून १५०००० लोक एका ठिकाणीं जमलेले आहेत. त्यांची गर्दी, खेंचा खेंची झालेली आहे, आणि ज्याला जेथें वाटला तेथें त्यानें आपला लहान थोर, कसला असेल तसला तंबू ठोकला आहे. त्यामुळें अनेक तऱ्हाच्या डेरे राहुट्यांची सरमिसळ झालेली आहे. एकीकडे एक मोठा रस्ता सोडून त्याच्या दोहीं बाजूस तंबूंतून सर्व प्रकारच्या जिनसांचीं दुकानें मांडली आहेत. अशा प्रकारची ही मराठी लष्कराची छावणी आहे. ह्या वर्णनावरून तिचें स्वरूप काय मनांत येईल तें आण. ह्या गोंधळाचें ह्याहून चांगलें मनांत भरे असें वर्णन मला करतां येत नाहीं. आतां ह्या लष्कराचा तळ हालला आणि हे दीड लाख लोक दुसरीकडे जावयास निघाले ह्मणजे त्यांचे ते डेरे, राहुट्या; तंबू, पालें, तट्टें, वगैरे सारें जडभारी सामान लादून हत्ती, घोडे, उंट, बैल, तट्टें, वगैरे एकांत एक मिळून हवीं तशीं चालतात तेव्हां १५ मैल लांब

आणि दोन तीन मैल रुंद अशी त्यांची लांबण लागते. हा त्यांच्या कुचाचा मासला सांगितला. राज्यव्यवस्थेचा गोंधळ गोटांतल्या आणि कुचाच्या गोंधळाच्या वरच्या प्रतीचा आहे. मी येथें आलों तेव्हां फौजेपैकीं कांहीं लोक आपला पगार मिळावा ह्मणून सरकारच्या दारांत धरणें धरून बसले होते. कारभारी मंडळीला त्यांच्याबरोबर उपाशीं रहावें लागलें, परंतु खुद्द शिंद्याला जेवण्याखाण्याला त्यांची बंदी नव्हती. त्याला त्यांनीं हवें तसें वागण्याला मोकळीक दिली. परंतु आपल्या दरबारची आणि राज्याची स्थिति काय आहे हा विचार तो मनात मुळींच आणीत नव्हता. सारा दिवस आनंदांत, चैनींत, मर्जीतल्या मंडळीबरोबर खुशाल गंजिफा खेळत घालवीत होता. अशामुळें एक आठवडा माझी भेट झाली नाहीं. त्यानंतर झाली तेव्हां त्यानें जो डामडौल आणि थाट केला होता आणि दरबारची जी टापटीप ठेविली होती तेवढीच नुसती पहाणाराला त्याचे शिपाई बिथरले होते आणि त्यांनीं धरणें धरलें होतें ही गोष्ट खरी वाटली नसती. परंतु पुढें पंधरा दिवसांनीं ते पहिल्यापेक्षां अधिक बिथरले. अगदीं बंडच झालें आणि लढाईपर्यंत मजल ठेपली होती. याप्रमाणें शिंदा साऱ्या हिंदुस्थानभर फिरत असतो. तो केव्हां आपल्या राज्यांत वसूल घेत असतो आणि केव्हां आसपासच्या कमजोर राजेरजवाड्यांना लुटीत असतो. केव्हां पर्जन्यकाळीं एका ठिकाणीं मुक्काम करतो. कोठें एकाद्या किल्ल्याला वेढा घालून बसतो आणि कोठें लढाई करतो.'

तारीख २ जुलै रोजीं त्यानें धरण्यासबंधानें असें लिहिलें आहे—काल एक विशेष गोष्ट घडली. कांहीं सरदार शिंदेमहाराजांपुढें धरणें धरून बसले. त्यांत भगवंतराव भिसे प्रमुख होता. महाराज संतापून त्याला ठार मारतों ह्मणाले, तेव्हां भगवंतराव ह्मणाला "स्वस्थ बसा; आह्माला मारा." शिंद्यानें रागाऊन याला पैसे द्या आणि छावणींतून हांकून लावा' असा हुकूम केला. तो ह्मणाला मी जात नाहीं. शिंद्यानें त्याला हांकून लावण्याकरितां फौज उभी केली; परंतु तो कांहीं भ्याला नाहीं. महाराज माझें काय करणार, लष्करांत मला अनुकूल असे माझे मित्र त्यांच्यापेक्षां किती अधिक आहेत हें त्यांना कोठें माहीत आहे, असेंच बोलत राहिला. सारा दिवस बाजार बंद होता. दुकानांच्या आणि तंबूंच्या संरक्षणाकरितां जागोजाग स्वारांचे पहारे उभे होते. भिशाला पैसे मिळाले आणि तो व ८०० स्वार समजत पडून गेले. मग शांतता झाली.'

तारीख २० जून रोजीं शिंदा आपल्याबरोबर एल्फिन्स्टसाहेबाला बहादूर-पूर येथें वाघाच्या शिकारीला घेऊन गेला. त्यावेळीं एल्फिन्स्टन यानें स्वतः बंदुक धरली नाहीं. परंतु शिकार पाहून त्याला संतोष वाटला. शिंदा निशाण कसें मारतो वगैरे पाहून त्यानें त्याची तारीफ गेली. तेथें मान, अदब, वगैरे कांहीं फारसें नव्हतें. लोक शिंद्याजवळ जाऊन मोकळ्या मनानें बोलत होते. जंगलांत वाघ कोठें बसला आहे तें पहाण्याकरितां कांहीं असामी पायांनीं हिंडत होते त्यांचा धीटपणापाहून एल्फिन्स्टन साहेबाला फार आश्चर्य वाटलें. शिंद्याच्या पहिल्या गोळीनें वाघ जखमी होऊन जाळींत जाऊन दबून बसला, दुसऱ्या गोळीबरोबर उडी घालून बाहेर आला आणि घडपडून दरडीवरून घसरून खालीं नाल्यांत जाऊन पडला. वाघ मेला ह्मणजे त्याच्या मिशा जाळीत असतात, तशा जाळून, त्याला एका हत्तीवर घालून, तो हत्ती आपल्या पुढें चालवीत, शिंद्याची स्वारी सायंकाळीं आपल्या गोटांत परत आली.

लष्करांत रेसिडेंट असतांना एल्फिन्स्टन साहेबाला फारसें कांहीं काम नव्हतें. कारण त्या वेळचे रेसिडेंट, पोलिटिकल एजंट, त्यांचे असिस्टंट, हे आतासारखे नसत, ते ज्या दरबारांत असत त्याचा राज्यकारभार कसा असला, त्यांत अगदीं झोटिंग पादशाही चालली असली, तरी त्यांना तिकडे पहावयाचें नसे. तसेंच परराज्यांशीं त्यांचे संबंध कसे आहेत, काय चाललें आहे, तें दिसत असलें तरी त्यांत तोंड घालावयाचें नसें; ब्रिटिश सरकारचें प्रत्यक्ष कांहीं नफानुकसान असलें तर मात्र बोलावयाचें असे. लॉर्ड वेलेस्ली गेल्यावर त्याचे डाव उलथून पडल्यामुळें जयपूरच्या राज्यास इंग्रजांची मदत नाहींशीं झाली तेव्हां मराठे तें खावयाला उठले. शिंद्यानें त्यावर आपली फौज नुकतीच पाठविली होती, आणि होळकर ह्मणूं लागला त्यानें इकडे पाऊल घालण्याचें कारण नाहीं ते दोघे एकमेकांचे हाडवैरीच होते. त्यामुळें बहुतकरून त्यांची लवरच लढाई जुंपेल असें दिसत होतें तरी त्यांना उगाच दोन गोष्टी सांगाव्या हें आपलें काम आहे असें सुद्धां एल्फिन्स्टन साहेबाला वाटलें नाहीं. मग मध्यस्थी करण्याचें नांव कशाला हवें.

एल्फिन्स्टन साहेब शिंद्याच्या दरबारीं बसून काळ काढीत होता परंतु त्याचें सारें मन दुसरीकडे गुंतलेलें होतें. तारीख १ जुलै रोजीं त्याला आड्याम साहेबांचें पत्र आलें, त्यांत तुमची बहुधा काबूलच्या वकिलीवर नेमणूक होईल असें लिहिलेलें होतें. तें वाचल्यापासून तर त्याला तिकडे

केव्हां जाईन असें झालें. त्याविषयीं तो ह्मणतो–हें काम मी मागितलें हें योग्य केलें. तें मिळावें ह्मणून अगदीं आशाळभूत होण्यासारखें त्यांत दुसरें कांहीं नाहीं; फक्त येथच्यापेक्षां निराळें आहे, कठीण आहे, आणि संकटाचें आहे. अफगाण लोकांचें मन वळवून, त्यांना आपल्याकडचे करून घेऊन फ्रेंचांशीं लढण्याला ते उभे राहतील असें करण्याला जितका दृढ निश्चय, कुशाग्रबुद्धि, आणि गोड भाषण करण्याची शैली पाहिजे तितकी माझ्या अंगीं आहे असें मला वाटत नाहीं. परंतु आपण उपयोगीं पडावें अशी मला फार हौस आहे, इच्छा आहे, आणि त्यामुळें जो आपण होऊन संकटांत शिरतो तो मेहेनतीनें त्यांतून पारही पडेल असें माझें मन ह्मणतें.'

नवीन गव्हरनर जनरल लॉर्ड मिंटो याजकडून आपली नेमणूक होईल असा त्याला भरंवसा वाटेना. तो ह्मणतो, "हा आपला गरीब, नम्र, संभावित चांगल्या मनाचा मनुष्य आहे खरा, परंतु राज्यावर संकट आलें असतां त्याचें निवारण करण्याला जें शहाणपण आणि हिम्मत हवी लागत असते ती ह्याच्या अंगीं दिसत नाहीं. हा संशयखोर, मनाचा भित्रा, सर्वांना खुष करावयास पहाणारा आणि एकादी गोष्ट अंगावर घेऊन करणारा नव्हे, असा दिसतो. आतांच्या सारख्या प्रसंगीं असलें करणें घातक आहे. राज्यकर्ता जो असतो त्याला आपल्याला करावयाचें आहे काय हें स्पष्ट ठरवतां आलें नाहीं, जें करावयाचें असेल तें कसें करावें तो बेत धाडसपणानें करतां आला नाहीं, आणि बेत ठरल्यानंतर तो नेटानें, झटपट, पार पाडतां आला नाहीं, ह्मणजे त्याचा नाश झालाच असें समजावें. आतां ही लार्ड मिंटोची गोष्ट असें मी ह्मणत नाहीं; परंतु एकादा गव्हनर सर्व प्रकारचे बेत ऐकून त्यांवर असे विचार करीत बसला समजा–इराणांत सैन्य पाठविणें बरें आहे–परंतु धोका आला तर सिंधुनदी ही आपल्या बचावाला चांगली जागा आहे–परंतु तेथें शीख लोक आहेत. आह्माला फौज तयार केली पाहिजे–परंतु केवढा खर्च येणार ? मिस्टर अ ह्मणतो तें अगदीं खरें परंतु मिस्टर बचा बेत मोहिम करावी, मिस्टर क ह्मणतो वकील पाठवून साम करावें, परंतु डचें ह्मणणें किल्ले बांधावे आणि दारू गोळा तयार करावा—तर आतां करावें कसें ?—अशा मनुष्याच्या हातून काय होणार ? खरें शहाणपण ह्मटलें तर शत्रु काय करीत आहे हें पहावें आणि त्या धोरणानें आपल्याला जें काय करणें असेल तें करावें. असो."

अखेर त्याचा हेतू सिद्धीस जाऊन तारीख १० जुलै रोजीं काबुलास जाण्या-

करितां दिल्लीस जरूर निघून जावें असा हुकूम त्याच्या हातांत पडला, तेव्हां त्याला अतिशय आनंद झाला. मग घाईघाईनें तयारी करून दुसऱ्या दिवशीं शिंद्याचा निरोप घेऊन तो निघाला. त्याचा मार्ग बुंदेलखंडातून होता. तो प्रदेश जंगली असल्यामुळें व खंडोजी नायकाच्या पेंढाऱ्यांचा उपद्रव बराच आहे अशी बोलवा असल्यामुळें तो बरोबर स्वार व शिपाई घेऊन अगदीं बंदोबस्तानें रोज ४० मैल मजल करीत चालला. तंबू वगैरे सामान टाकून त्यानें खुद्द आपल्याकरितां एक शोलदरी* आणि माणसांकरितां एक पाल मात्र घेतलें. पुस्तकांच्या पेट्या सुद्धां टाकल्या. त्या मुलखांत लोक नेहेमीं सावध राहत असत; जो तो गांवाजवळून चालला ह्मणजे आपआपल्या तटांवर बंदुका घेऊन उभे रहात, अमूक वाटेनें जा ह्मणून सांगत, वाट सोडून चाल्लेत तर गोळ्या घालूं ह्मणत आणि बार दाखवीत. तो ह्मणतो—आमचीं कोणी माणसें मार्गे राहिलीं ह्मणजे त्यांना ते लुटीत, तरी एकंदरींत ते लोक कांहीं वाईट नव्हते. आह्माला वाटाडचेबरोबर देण्याला कोणीही नाहीं ह्मटलें नाहीं.

एल्फिन्स्टन साहेब पांचव्या दिवशीं आग्र्यास पोहोचला आणि त्याला पुढें जाण्याची घाई फार होती तरी तेथच्या इमारती पहाण्याकरितां एक दिवस राहिला. तेथचा किल्ला आणि मोतीमशीद त्याला फार चांगलीं वाटलीं. ताजमहाल पहाणारे सारे लोक त्याची फार फार प्रशंसा करतात, परंतु त्याला कांहीं तो इतका चांगला वाटला नाहीं. शिकंदराबाद येथें अकबराची कबर आहे ती त्यानें भक्तिपूर्वक पाहिली तिचा संगमरवरी चौथरा त्याला जितका चांगला वाटला तितके इतर भाग वाटले नाहींत.

तो आग्र्याहून निघून दिल्लीस गेला आणि मग तेथें त्याचा मुक्काम बरेच दिवस झाला. मेटकाफ् साहेबाची आणि त्याची तेथें भेट झाली, ती प्रथमच असें दिसतें. सौम्य, चांगल्या स्वभावाचा हुशार, धाडशी, हवें तें काम करण्याला समर्थ आणि कबूल असें त्यानें त्याचें वर्णन केलें आहे. तो त्याच्याच खास्ता लाहोरास रणजित सिंगाकडे वकिलीवर जाण्याची तयारी करीत होता. दिल्लीस सीटन्साहेब रेसिडेंट होता. त्याचें मुख्य काम आंधळ्या शहा अलम बादशहाची व्यवस्था नीट ठेवावयाची हें होतें. तो नुकताच शिंद्याच्या

* एक तऱ्हेचा लहान तंबू.

हातून सुटून इंग्रजांच्या हातांत पडला होता. त्याला भेटावें असें एल्फिन्स्टन साहेबाच्या मनांत होतें. त्याविषयीं त्यानें सीटनसाहेबाला सांगितलें मी काबूलच्या दरबारीं जाणार, तेथें माझा जो मानमरातब रहावयाचा त्यास कोणत्याही प्रकारें व्यत्यय न येई अशी बादशहाच्या दरबारांत तजवीज रहात असेल तर मी त्याला भेटण्याला जाईन; नाहींतर भेटीवांचून माझें कांहीं अडलें नाहीं. आपण आतां मोठे थोर झालों असा त्याला गर्व उत्पन्न झाला होता असें दिसतें. 'उमदे मीर उद् वहै काबुल' म्हणजे काबुलाला मोठा मनुष्य चालला आहे असें तो म्हणाला.

परंतु हा त्याचा गर्व तेथच्या तेथेंच उतरला. नागपुरास नेमणूककरून तिकडे रवानगी करून देतेवेळीं जनरल वेलेस्लीनें त्याची प्रतिष्ठा चांगली ठेविली होती; बरोबर लवाजमा चांगला देऊन एक दोन असामी आपल्याला हवे ते घेण्यास सांगितलें. काबूलची वकिली म्हणजे त्यापेक्षां फार मोठें काम होतें. असें असून त्यावर पाठवितांना त्याच्या बरोबर सरंजाम कायकाय असावा कामदार कोण द्यावे तें ठरविण्याचें काम त्याच्याशीं ज्यांचा कांहीं संबंध नाहीं अशा चार गृहस्थांकडे सोपविलें होतें. त्यामुळें त्याला फार वाईट वाटलें आणि त्यानें स्टाची साहेबाला पत्र लिहिलें; त्यांत तो म्हणतो:—"हिंदुस्थानांतल्या एकुणएक रेसिडेन्सींतला लवाजमा व सरंजाम मी पाहिला आहे. असें असून खुद्द माझ्या बरोबर आतां तंबू किती असावे, खिदमतगार किती असावे वगैरेबद्दल याद सीटन साहेबांकडे देण्याला मला हुकूम झाला आहे. त्यानें एकसुद्धां रेसिडेन्सी पाहिलेली नाहीं. येवढ्या मोठ्या कामावर माझी नेमणूक झाली आहे, तेव्हां त्या संबंधाच्या साऱ्या बारीकसारीक गोष्टी माझ्या विचारानें होतील असें सहजच समजून मी एडमंडस्टनसाहेबाला पत्र लिहिलें, परंतु मला त्याचें उत्तर कांहींच मिळालें नाहीं. ज्यांचीं मी नांवें देखील ऐकिलीं नाहींत असले गृहस्थ आतां माझ्या हाताखालीं यावयाचे. माझ्याबरोबर मनुष्य कोण असावे हें, कामाची योग्यता मनांत आणून, खरें म्हटलें म्हणजे माझ्या विचारावरच सोंपवायला पाहिजे होतें. त्यांत माझा खासगी संबंध थोडाच आहे! असें असतां ज्याच्यावर कामाची सारी जबाबदारी त्याला एका शब्दानें न विचारतां त्याच्या स्वारीची तयारी करून देऊन रवानगी झाल्याचें माझें हें पहिलेंच उदाहरण होत आहे. मला जो हुकूम आला त्याचें उत्तर मी पाठविलें आहे. तें नीट वाचून पाहिलें पाहिजे. कागद वाचणारे पुष्कळ असतात, परंतु वाचलेल्याचा अर्थ समजणारे थोडेच असतात."

# भाग ७ वा.

## काबूलची वकिली. सन १८०८–१८१०

आपण अफगाणिस्थानच्या शहासुजाकडे वकिलीला जाऊन आल्याची सारी हकीगत एल्फिन्स्टन साहेबानें लिहून ठेविली आहे. तींत आधीं हिंदुस्थानसरकाराला तिकडे वकील पाठविण्याचें प्रयोजन काय पडलें तें थोडक्यांत असें लिहिलें आहे.—सन १८०८ मध्यें फ्रेंच सरकारानें इराणच्या शहाकडे जनरल गारडेन यास वकील पाठविलें, त्यामुळे व आणखी कांहीं गोष्टींवरून असें वाटू लागले कीं, आतां फ्रेंच लोक एशियाखंडांत रण माजविणार. तेव्हां त्यांना इकडे येण्याला मार्गच मिळूं देऊं नये ह्मणून हिंदुस्थान सरकारानें काबूलच्या शहाशीं मैत्री करून तह करावा असें मनांत आणलें आणि त्या कामावर माझी योजना करून रवानगी केली. ”

" फ्रेंचांचा बादशहा नेपोलियन यानें सारें युरोपखंड ग्रासलें होतें. सन १८०७ मध्यें आस्ट्रियाच्या आणि प्रशियाच्या राजांना जेरीस आणून रशियाच्या बादशहाबरोबर त्यानें मोठे युद्ध आरंभिलें. तेव्हां इराणचा शहा वगैरे जे रशियाचे शत्रु इकडे होते, त्यांकडे वकील पाठवून त्यास त्यानें वश करून घेतले. ह्मणून इग्रजांनीं तुर्कस्थानच्या सुलतानाबरोबर कटकट सुरू केली; कारण तो फ्रान्सला आणि ते रशियाला मिळाले होते. त्यांनीं मिसर देशांत सुद्धां मोहीम पाठविली परंतु त्यांस यश आलें नाहीं.

सन १८०४ व १८०५ मध्यें रशियानें इराणाबरोबर लढाया करून त्याचा पराभव केला, तेव्हां आतां पुनः युद्धप्रसंग आला तर आपली गादी साफ बुडणार असें शहाला भय पडून त्याणें नेपोलियनाकडे वकील पाठवून त्याच्याकडून मदत मिळावी ह्मणून विनवणी चालविली आणि तसेच इकडे हिंदुस्थान सरकाराकडेही वकील पाठविले. सन १८०५ आणि पुनः सन १८०६ मध्येंही फ्रान्सचे वकील त्याच्याकडे गेले होते, परंतु बोलणें जमलें नाहीं. कारण, शहाला हिंदुस्थानसरकारची आशा होती. परंतु इकडून निराशेचा जबाब मिळाला तेव्हां मग त्याणें नेपोलियनाची कांस धरण्याचें मनांत आणलें. त्यावेळीं इंग्रज जशी लहर लागेल किंवा वेळ दिसेल तसे शहाबरोबर वागत होते असें ह्मणतात तें कांहीं खोटें नव्हे. दुसरा सन १७९९ मध्यें नेपोलियन

मिसर देशावर स्वारी करतो असें दिसलें, तेव्हां घाबरून जाऊन लगेच माल-कम् साहेबाला पाठवून प्रसंगीं शहाची मदत मिळावी ह्मणून त्याचीं आर्जवें करू लागले आणि सन १८११ मध्यें त्याच्यामार्फत त्यांच्याशीं त्यांणीं तह केला. पुढें त्याच्यावर प्रसंग आला तेव्हां त्याला झिटकारून टाकून त्याच्या शत्रूला मिळाले. ह्मणून तो त्यांच्या शत्रूच्या पाठीशीं पडला, तेव्हां पुनः त्याचीं आर्जवें करून त्याला वश करून तिकडून फोडून आणावयाला पाहूं लागले. जनरल गारडेन पुष्कळ अम्मलदार बरोबर घेऊन इराणांतून हिंदुस्थानावर स्वारी करण्याच्या अगदीं तयारीनें गेला आहे, अशी बातमी पोहोंचल्याबरोबर विलायतेंतले आणि हिंदुस्थानांतले इंग्रज घाबरून गेले आणि त्यांणीं दोहींकडून दोन वकील पाठविले. त्यांचें एकमेकांशीं जमलें नाहीं. हिंदुस्थानातून पुनः माल्कमसाहेबच गेला होता. परंतु जनरल गारडेन याचें वजन चांगलेंच पडलें होतें; त्याच्यापुढें त्याचें काहींच चालेना, आणि हा वेड्यामारख्या शहाला धमकावणी देऊन निघून आला.

रशिया फ्रान्साबरोबर लढत होता त्यांत त्याचा पराभव झाला आणि तो तहास कबूल झाला. नेपोलियनानें टिलसिटच्या तहनाम्यांत त्याचे हातपाय अगदीं जखडून टाकले अशी बातमी आली तेव्हां गव्हरनरजनरल अगदीं घाबरून गेला. इंग्रजांना युरोपांत कोणी मित्र उरला नाहीं. एक इंग्लंड शिवाय करून सारा युरोप नेपोलियनानें पादाक्रांत केला, फ्रेंचांचें आणि इंग्रजांचें फार दिवसांचें वैर, टर्कीचा सुलतान आणि इराणचा शहा त्याला पूर्ण वश झालेले, तेव्हां आतां त्या वाटेनें, त्यांच्या साहाय्यानें हिंदुस्थानावर हल्ला होण्यांत कांहीं शंका नाहीं असें वाटलें. अफगाणिस्थानांतन गोमल घाटानें पंजाबांत सैन्य उतरणार इतकी तयारी झाली आहे, अशी सुद्धां बातमी पसरली.

ह्या सैन्याला पुढें येऊं देऊं नये ह्मणून गव्हरनरजनरलाने हरप्रयत्न करण्याचें मनांत आणून इराणच्या आखातावर मोहीम करण्याची तयारी केली आणि बलुची लोक, सिंधचे अमीर, पंजाबचा महाराज रणजितसिंग, काबूलचा शहा सुजाउल्मुल्क, यांणीं फ्रेंचांना मिळूं नये व आपल्या मुलखांतून त्यांना वाट देऊं नये ह्मणून त्यांना वश करून घेण्याकरितां त्यांच्याकडे वकील पाठविले. मार्किस आफ् वेलेस्लीनें हिंदुस्थानांतील राजेरजवाड्यांच्या दरबारीं फ्रेंचांचें प्राबल्य होतें तें नाहींसें करण्याचा प्रयत्न केला तो सिद्धीस जाऊन इकडे निर्भय झालें, तों ते सरहद्दीपलीकडून येण्याचा रंग दिसूं लागला तेव्हां

लॉर्ड मिंटोनें मार्गावरच्या राजांशीं साम करून त्यांचें पुढें पाऊलच पडूं देऊं नये असें करण्याचा विचार मनांत आणला. त्याप्रमाणें त्यावेळीं जे तहनामे झाले त्यांत रणजितसिंगाबरोबर जो सख्यसंबंध ठरला तो सन १८३९ मध्यें तो मेला तेथपर्यंत अव्याहत चालला होता, आणि पुढें देखील अफगाणिस्थानाबरोबरच्या पहिल्या लढाईत धामधुमीच्यावेळीं पंजाबांत इंग्रजांस साहाय्य मिळालें तें त्याचेंच फळ. रणजितसिंगानें शिखलोकांत प्रमुख होऊन स्वतंत्र राज्य नवीनच स्थापलें होतें, परंतु तो चांगला प्रबळ झाला होता. त्यानें एकदां जें वचन दिलें तें आमरण पाळलें. इतरांबरोबरचे तह कांहीं तसे टिकले नाहींत.

त्यावेळेस हिंदुस्थानसरकारचा जो पत्रव्यवहार झाला त्यावरून असें स्पष्ट दिसतें कीं, हिंदुस्थान आणि इराण यांच्यामध्यें जे मुलूख आहेत त्यांची राजकीय स्थिति कशी आहे हें हिंदुस्थानसरकाराला कांहीं माहीत नव्हतें. त्यांचें स्वरूप, हवा, पाणी, विस्तार, वगैरेची देखील माहिती नव्हती. परंतु त्याजबद्दल त्यांना कांहीं दोष देतां येणार नाहीं* आतां जी माहिती झालेली आहे तीवरून असें ह्मणतां येतें कीं, असे निरनिराळ्या प्रकारचे लोक एकत्र करून त्यांना फ्रेंचांशीं सामन्याला उभे करण्याला पाहणें ह्मणजे वाऱ्याची मोट बांधूं लागण्यासारखेंच शुद्ध वेडेपण होतें. कलकत्ताकौन्सिलांतील कांहीं सभासदांच्या ध्यानांत ही गोष्ट आली असावी. त्यांचा अभिप्राय तिकडील राजे आपल्या वकिलांचा आदरसत्कार तरी निदान नीट करतील अशी खात्री झाल्यावांचून त्यांना पाठवूं नये, असा होता. त्यावर लॉर्ड मिंटोचें मत शहासुजाचा अम्मल चांगला बसलेला आहे, हिंदुस्थानांत आमचें प्राबल्य किती आहे हें त्याला कळत आहे, तेव्हां आमच्या वकिलाची भेट तो चांगल्या प्रकारें घेईल यांत संशय नाहीं असें पडून एल्फिन्स्टन साहेबाची रवानगी करण्याचें ठरलें.

आतां काबूलच्या दरबाराची स्थिति कशी होती तें पाहू.

इराणचा बादशहा नादिरशहा मेल्यावर अहमदशहा अबदाली, दुराणी, ज्याचें नांव महाराष्ट्र तर कधींही विसरणार नाहीं, याणें अफगाणिस्थानांत आपली गादी स्थापिली. सन १७६१ मध्यें पानपतच्या मोहिमेंत त्याला जय आल्यानें दिल्लीपर्यंत मुलूख त्याच्या ताब्यांत गेल्यासारखा झाला, परंतु तो कांहीं त्यानें

---

*यापूर्वी काबुलास कायतो एक जॉर्ज फॉर्स्टर हा इंग्रज जाऊन आला होता. तो तरी वेषांतर करून गेला होता.

आपल्या स्वाधीन ठेवण्याचा प्रयत्न केला नाहीं. त्याला अति लूट मिळाली होती, ती घेऊन तो स्वदेशीं जाऊन डोंगरांत खुशाल तिचा उपभोग घेत बसला. कोहिनूर हिरा त्याच्याच जवळ होता, पुढें मराठे प्रबळ होऊन त्यांनीं खुद्द हिंदुस्थान व्यापलें तसे पंजाबांत शीखलोक प्रबळ होऊन बसले. अहमदशहा मेला आणि त्याच्या पश्चात् थोड्याच काळांत त्याच्या राज्याची वाताहत झाली. त्याच्या पुत्रांमध्यें तंटे लागून ते लढून बलहीन झाले. मग त्याचे दिवाण व सुभेदार वगैरे प्रबळ होऊन त्यांना लुटूं लागले, अहमदशहाच्या पश्चात् त्याचा जो मुलगा गादीवर बसला होता, त्याला २३ पुत्र होते. त्यांपैकीं तीन असामी इ० स० १७९३ पासून १८०३ च्या दरम्यान दहा वर्षांत त्या गादीवर बसले; आणि विशेष आश्चर्याची गोष्ट ही कीं, एल्फिन्स्टनसाहेब तिकडे गेला तेव्हां ते सारे जिवंत होते. पहिला झमानशहा, जो हिंदुस्थानावर स्वारी करणार असें ऐकून दहा वर्षांपूर्वीं सारे घाबरून गेले होते, तो त्यांतला पांचवा होता. त्याच्या एका भावानें त्याचे डोळे काढले होते, आणि तो अखेर लुधियाना येथें मेला. तेथपर्यंत इंग्रज त्याच्या पोटाला घालीत होते. दुसरा महमूदशहा. त्याला लोकांनीं काबुलांतून दोन वेळ हांकून लावल्यावर तो हिरात येथें जाऊन स्वतंत्र होऊन बसला होता. पुढें तेथेंच त्याचा खून झाला. तिसरा शहाशुजाउल्मुलुख याची दैवगति सर्वांत विचित्र होती. त्याचें नांव इंग्रजांच्या इतिहासाशीं खिळून राहिलें आहे. तो पेशावरास सुभेदार होता. तेथून १८०३ मध्यें काबुलास जाऊन गादीवर बसला. एल्फिन्स्टनसाहेब गेला तेव्हां तो गादीवर होता, परंतु त्याचें आसन डळमळूं लागलें होतें.

दुराणीचें राज्य वाढलें तेव्हां त्याचा विस्तार पुष्कळ मोठा झाला होता. त्याची सरहद्द एका बाजूस दिल्लीपासून सुमारें १५० मैलांवर सरहिंद आहे तेथून मेशेदपर्यंत ह्मणजे सुमारें मैल आणि दुसरीकडे ऑक्सस नदीपासून इराणच्या अखातापर्यंत ह्मणजे सुमारें ९१० मैल रुंद, येवढें झालीं होती. एल्फिस्टनसाहेब वकिलीला गेला तेव्हां त्यांतला बराच मुलूख गेला होता, तरी तें राज्य बलाढ्यच होतें. हल्लीं अमीराच्या ताब्यांत जितका मुलुख आहे, तितका शहाच्या ताब्यांत असून शिवाय पंजाबच्या दक्षिणेकडील सारा व पश्चिमेकडील कांहीं भाग, मुलतान, काश्मीर, व सिंधप्रांतही त्याच्या ताब्यांत होता. दिल्लीचे मोंगल बादशहा आपल्या रडकथा सांगत मराठ्यांविषयीं गाऱ्हाणीं घेऊन काबुलास जात; तसे पुढें मराठे राजे इंग्रजांच्या नांवानें रडत

तेथेंच जाऊं लागले. इंग्रजांनां फ्रेंचांचें भय पडलें, तेव्हां त्याना अफगाणिस्थानांतून इकडे येण्यास वाट मिळूं नये ह्मणून त्यांनीं शहासुजास वश करून घेण्याकरितां वकिलाची योजना केली. एवढ्या मोठ्या राजाकडे त्याला पाठवावयाचें ह्मणून त्याच्या स्वारीचा थाट त्याचप्रमाणें मोठा केला.

प्रथमत: असें ठरलें होतें कीं, एल्फिन्स्टन आणि मेट्काफ यांणीं बरोबरच निघून लाहोरपर्यंत जावे. त्याचें कारण कदाचित् असें असेल कीं, मग पुढचा रंग पाहून एल्फिन्स्टनसाहेबाला दुराणीच्या मुलखांत जाण्याचा विचार पाहिजे तसा करता यावा. परंतु पुढें तो बेत फिरला, आणि दोघांनीं दोन वाटांनीं जावें, एकमेकांशीं कांहीं संबंध दाखवूं नये असें ठरलें, आणि तें शहाणपणाचें होतें.

मग अर्थातच हिंदुस्थानावर स्वाऱ्या करण्याकरितां येण्याचा मुसलमानाचा जो नेहमीचा मार्ग तो सोडून देऊन एल्फिस्टनसाहेबाला दुसराच मार्ग काढावा लागला. दिल्लीच्या पलिकडच्या मुलखाच्या आणि सिंधुनदाच्या दरम्यान जो वालुकामय प्रदेश आहे त्यांतून तो निघाला. तो मार्ग वाळूच्या उंचसखल टेकड्यांतून असून मळलेली वाट सोडून जरा बाजूस पाऊल पडलें तर घोड्याचा पाय गुडघ्याइतका आंत शिरतो असा बिकट, परंतु त्यांत एक सोय आहे. विहिरी जरी पुष्कळ खोल, तरी लहानशा फौजेला पुरे इतकें पाणी मिळतें. एल्फिन्स्टन साहेबाबरोबरची मंडळी त्याच्या विचारानें ठरविलेली नव्हती इतकेंच, परंतु ती थोडी नव्हती. इंग्रज अम्मलदार १३ होते आणि स्वार शिपाई मिळून ४०० होते. बिकानेरच्या वाळवंटांतून ही स्वारी निघाली तेव्हां तिच्याबरोबर ६०० उंट आणि तेरा हत्ती होते. त्यांना एकामागें एक असें चालावे लागे. तेव्हां त्यांचा तांडा लागला ह्मणजे दोन मैल लांब रांग होई. याप्रमाणें जातजात रणजितसिंगाच्या मुलखांत न शिरतां त्यानें मुलतान गांठलें. शहासुजा कंदाहारास आहे असें समजलें होतें; तेथें जाण्याला हा मार्ग सरळच होता.

एल्फिन्स्टन साहेब तारीख १३ आक्टोबर सन १८०८ रोजीं दिल्लीहून निघाला. तेथून १०० मैल पुढें गेल्यावर मुलूख भयाण लागला. जिकडे पहावे तिकडे भुसभुशीत वाळूच्या टेकड्या, समुद्राच्या लाटांप्रमाणें एकीपुढें एक उभ्याच दिसत आणि त्यांच्या माथ्यावर वारें खेळत असे, तें बर्फाचा भास उत्पन्न करी. अशा त्या रखरखीत मुलखांतून त्रासून जातां जातां तो बिकानेरास पोहोंचला, तेंव्हां तेथें थोडी विश्रांति मिळाली.

राजपुताना ह्मणजे पर इलाखा, तेथें इंग्रजांचा कांहीं संबंध नव्हता, तरी तेथचे राजेरजवाडे त्यांना चांगलें मानीत होते असें दिसतें. बिकानीर मरुस्थळांत अगदीं मध्यभागीं असून तेथें तुंबळ युद्ध चाललें होतें. त्याच्या भोंवतालच्या पांच शत्रूंच्या फौजा बसल्या होत्या. एकीकडून जोधपूरचा राणा आणि दुसरीकडून पेंढाऱ्यांचा नाईक अमीरखान पठाण त्याच्यावर उठले होते. अशा प्रबळ शत्रूंनीं पाणी पाणी करीत तळमळत पाडलें ह्मणजे ते काय लढणार असें मनांत आणून त्यानें साऱ्या विहिरींचीं तोंडें बंद करून टाकलीं होतीं. स्वसंरक्षणाचा तो उपाय उत्तम होता. राजानें एल्फिन्स्टन साहेबाचें स्वागत उत्तम प्रकारें केलें. कंपनीसरकाराशीं आपण पूर्ण स्नेहभावानें वागतों हें दाखविण्याकरितां त्यानें आपल्या किल्ल्याच्या दरवाजाच्या किल्ल्या त्याच्या हातांत ठेविल्या. तो त्याचा पाहुणचार घेऊन, तेथच्या तंट्यांत कोणत्याच पक्षाकडे अंग न दाखवितां, तेथून शहाणपणानें निघून गेला.

त्या मुलखांत पेंढाऱ्यांचा उपद्रवही बराच असल्यामुळें लोक फार सावधपणानें वागत असत. कोणी छावणी सोडून दूर गेला तर त्याला अपाय होण्याचें भय असे; खुद्द एल्फिन्स्टन साहेबावरच एकदां तसा प्रसंग आला होता. त्यानें त्या मुलखांतलाच एक मनुष्य वाटाड्या काढला होता आणि पुढें दोन गोसावी मिळाले ते ठेविले होते. एखादें खेडें वाटेवर असलें ह्मणजे त्यांतले लोक स्वारी पहाण्याबरोबर ढोल वाजवीत, त्यासरसे गांवांतले सारे आपल्या निवडुंगाच्या फडाजवळ जमत आणि तोडे पेटवून उभे रहात. हे अमीरखान पठाणाच्या लुटारू टोळीपैकींच असावे असें त्यांना वाटे. एका खेड्यांतल्या लोकांनीं त्यांच्यावर गोळ्या घातल्या, परंतु त्यांचीं पांढरीं तोंडें दिसलीं आणि आह्मी तुमच्या वाटेस जाणारे नव्हे अशी त्यांनीं खात्री करून दिली तेव्हां त्यांना जाऊं दिलें. दुसऱ्या एका गांवांत लोक असेच बार भरून उभे राहिले होते; परंतु त्यांच्यांत एक ह्मातारा, वजनदार मनुष्य होता त्याच्या ते हुकमांत होते. एल्फिन्स्टन साहेब ह्मणतो, माझें गोरें तोंड पाहून त्याला संतोष झाला, आणि मी आपला हातमोजा काढला तेव्हां माझा हात घेऊन त्यानें त्याचें चुंबन घेतलें. आतां माझा जीव निर्धास्त झाला असें ह्मणून त्यानें आपल्या लोकांस स्वस्थ असावयास सांगितलें. मग त्यांनीं आह्माला एका विहिरीवर नेलें; तेथें आह्मी आपल्या घोड्यांना पाणी पाजलें."

मरुस्थानांतल्या लोकांना दूरदूरच्या देशांतल्या राज्यकारस्थानांची माहिती बरीच आहे असें पाहून एल्फिन्स्टनसाहेबाला आश्चर्य वाटलें. एका सरदारानें तर त्याला प्रत्यक्ष असेंच विचारलें कीं, आतां तुह्मी वकिलीला चाललां अहां हे फ्रेंचांबरोबर लढाईचा प्रसंग येईल ह्मणून शहाशीं सख्य करण्याकरितांच कीं नव्हे ?

एल्फिन्स्टनसाहेब तारीख १६ नोव्हेंबर रोजीं बिकानिराहून निघाला तो सवा महिन्यानें त्या वाळवंटाच्या कडेस पोहोंचला. तेथें एक झाडांची लांब रांग लागलेली होती ती त्याची हद्द असल्यासारखी होती. तिच्या पलीकडे जागोजाग झुडपें आणि हिरवींगार शेतें होतीं आणि स्वच्छ व विपुल पाण्याच्या विहिरी होत्या. तो देखावा पाहून त्याला संतोष वाटला. त्या सुपीक व आबाद मुलखांतून जाऊन सतलजनदीच्या तीरीं भावलपूरच्या तटाखालीं त्यानें छावणी दिली. ते शहर स्थापणारा भावलखान हा दुराणीचा ताबेदार होता, त्याला ही वकिलाची स्वारी शहाकडे जाण्याकरितां आपल्या मुलखांत येत असल्याचें समजलें, तेव्हां त्यानें शेंकडों उंटांवर पखाला भरून वाळवंटांत अर्ध्या वाटेवर आधीं पाणी पाठविलें, आणि एल्फिन्स्टन तेथें जाऊन पोंहोचला तेव्हां त्याचें आदरातिथ्य उत्तम प्रकारें केलें; शिधासामुग्री व सर्व प्रकारची फळफळावळ व आणखी कित्येक जिन्नस फरमास पाठविले. त्या मुलखांतल्या मोठ्या प्रसिद्ध अशा कांहीं उत्तम उत्तम सांडा त्यानें एल्फिन्स्टनसाहेबाला नजर केल्या. भावलखान चांगला हुषार मनुष्य असावा असा दिसला. त्यानें अफगाणिस्थानच्या शहाची पुष्कळ वाहवा केली. परंतु पुढें असें ह्मटलें कीं, “ मी त्याला अद्याप पाहिलेलें नाहीं आणि ईश्वराच्या कृपेनें पहाण्याचा प्रसंग न येवो; मी आपला ह्या भयाण प्रदेशांत हरणांची शिकार करून आनंदांत आहें हें ठीक आहे. मला दरबारांत जाऊन त्याच्या मागून फिरण्याची इच्छा नाहीं. ” एल्फिन्स्टनसाहेब ती नदी उतरून तारीख ५ दिसेंबर रोजीं पुढें निघाला तो तारीख ११ रोजीं मुलतानास पोहोंचला. दिल्लीपासून तेथपर्यंत ४०० मैल मजल झाली.

मुलतान हें त्या प्रांताच मुख्य शहर असून तेथें अफगाण सुभेदार असे. शहाची स्वारी कंदाहारासच आहे किंवा दुसऱ्या कोठें आहे तें पक्कें कळावें आणि अफगाण लोकांच्या टोळ्यांच्या मुलखांतून पुढें जावयाचें तेव्हां आपल्याला निर्विघ्नपणें घेऊन जाण्याला त्याच्याकडून कोणी सरदार यावा

ह्मणून एल्फिन्स्टन साहेबाला पाऊण महिना तेथेंच वाट पहात बसावें लागलें. तो तेथें पोहोंचला त्या वेळीं शहासुजा कंदाहारास होता ह्मणून एल्फिन्स्टन साहेबानें तिकडे जाण्याचें मनांत आणलें. त्याची सारी तयारी झाली, त्या मुलखांत बर्फ असणार त्यांतून जाण्याला अडचणी येतील त्या कशा कशा टाळाव्या या विषयीं अनेक बेत झाले, आणि आतां निघावयाचें इतक्यांत शहा तेथून काबुलास जाण्यास निघाला अशी बातमी आली तेव्हां तो बेत रहित झाला.

हिंदुस्थानांतून इंग्रजांकडून आपल्याकडे वकील येत आहे अशी बातमी शहासुजास वाटेंत कळली. वकील पाठविण्यांत त्यांचा हेतु काय असावा याविषयीं त्याच्या मनांत प्रथम मोठी शंका उत्पन्न झाली आणि मनाचा ग्रह विपरीत झाला. इंग्रजांचा आणि शहाचा स्नेह जमला तर तो प्रबळ होऊन आपल्याला पीडा देऊं लागेल अशी अफगाण सरदारांचे मनांत भीति उत्पन्न होऊन उभयांचें सख्य होऊं नये असें त्यांस वाटूं लागलें. शहाचेंही मन स्वस्थ नव्हतें. त्याचा भाऊ त्याला हांकून लाऊन आपण गादी मिळवावी ह्मणून प्रयत्न करीत होता. तेव्हां ह्या भाईबंदी तंट्यांत शिरून आपण लाग साधावा हा इंग्रजांचा हेतु असेल असें त्याच्या मनांत आलें. परंतु वकीलाच्या स्वारीच्या थाटाविषयीं आणि त्यानें आणलेल्या नजराण्याविषयीं फार अतिशयोक्तीच्या बातम्या उठून त्या त्याच्या कानीं गेल्यामुळें त्याला येऊं देऊन त्याची भेट सन्मानपूर्वक घेतली पाहिजे असें त्यानें ठरविलें.

मुलतानापासून पुढें ज्या मुलखांतून एल्फिन्स्टन गेला त्याला हल्लीं देरजात ह्मणतात, परंतु तेव्हां दमान ह्मणत असत. तो प्रदेश तेव्हां अगदीं जंगली होता तसाच अजून आहे. त्यांत अफगाण आणि बलुची लोकांची वस्ती आहे; परंतु त्यांपासून कोणाला कांहीं उपद्रव झाला नाहीं; उलटा त्यांचा आदरसत्कार होत होता. तारीख ७ जानेवारी १८०९ रोजीं सिंधूनद उतरून त्याच्या तीरानेंच तो वर चालला होता. थोड्याच दिवसांनीं त्यांना एक व्यापाऱ्यांचा काफला घोडे व फळफळावळ घेऊन जयपुराकडे चाललेला भेटला. त्यांत आस्ट्राखानचा रहाणारा एक ख्रिस्ती व्यापारी होता. तो तेथून निघून बुखारा, समरकंद, काबूल, वगैरे शहरें पहात आला होता. रशियापासून हिंदुस्थानापर्यंत सारे देश तो फिरला होता. त्याला रशियन व फारसी भाषा येत होत्या. त्याच्याशीं बराच वेळ बोलतां बोलतां एल्फिन्स्टनसाहेबानें ह्मटलें काबुलास शहाच्या भेटीकरितां परमुलखांतून बरेच वकील आले असतील. तेव्हां तो

ह्मणाला, 'नशीब'! ह्या अफगाण लोकांकडे कोण वकील पाठवणार ? यांच्या हातून कोणाचें बरें व्हावयाचें आहे ?, शहा आपली मान संभाळतां संभाळतां बेजार आहे. डोकें केव्हां जाईल याचा नेम नाहीं. तो दुसऱ्या राजांच्या भानगडींत कशाला पडेल ?

त्या मुलखांतील लोकांना इंग्रजांचा देश कोणता, धर्म कोणता वगैरे कांहींच माहिती नव्हती.* ते तर्कानें भलतें भलतें बोलत. त्यांच्या अंगीं अलौकिक शक्ति आहे असें त्यांना वाटे. ह्यांनीं पेट्यांत घालून मोठमोठ्या तोफा आणल्या आहेत, आणि कांहीं पेट्या कळीनें अशा केल्या आहेत कीं, त्यांतून आपो-आप बार उडतात आणि पांच सहा माणसें मरतात; परंतु त्यांना कांहीं इजा होत नाहीं. ते मेलेलीं माणसें उठवतात असें ते समजत. त्यांच्यांत अशी एक अफवा अगदीं दाट पसरली होती कीं, ह्यांनीं मुलतानास एक लांकडाचा मेंढा करून तो जिवंत करून विकला. तो ज्यानें विकत घेतला होता तो तो मारून खाऊं लागला, तेव्हां त्याला त्याचें तें कसब आणि कपट उमगलें.

सिंधूनद उलटून गेल्यावर देराइस्मायलखान येथें एल्फिन्स्टनसाहेबाचा सुमार एक महिना मुक्काम झाला. आपल्याला पुढें नेण्याकरितां शहासुजाकडून कोणीतरी सरदार येण्याची तो वाट पहात बसला होता. अखेर शहा पेशावरास येत आहे आणि त्यानें आपल्याला पुढें नेण्याकरितां एका सरदाराची नेमणूक केली आहे, असें जानेवारीच्या अखेर अखेर त्याला समजलें. त्या प्रमाणें तो सरदार शहाचे स्वार घेऊन आला, त्या बरोबर तो ता. २७ फेब्रुवारी रोजीं पुढें जावयास निघाला आणि भयाण मुलखांतून कांहीं मजला करून अखेर कुरम नदीच्या तोंडाशीं जाऊन पोहोंचला. तेथून तीन मजला मुलख मैदान असून उत्कृष्ट लागवड केलेला होता. त्यांतुन जात जात तो कालाबाघ (काराबाघ) येथें पोहोंचला. तेथें सिंधुनद अगदीं अरुंद आणि खोल झालेला आहे. दोहीं बाजूंस मोठाले डोंगर असून पात्राची रुंदी सारी ७०० सातशें हात आहे. रस्ता त्या पर्वताच्या कडेकडेनेंच गेलेला असून मिठाच्या टेंकड्यांच्या पायथ्याशीं जे खडक आहेत ते खोदून केलेला आहे. कांहीं कांहीं ठिकाणीं तो नदीपासून शंभर फुटांहून अधिक उंचीवर आहे. तें मीठ टणक, निर्मळ,

* त्यांना कोणी सय्यद, कोणी मोगल, कोणी पठाण, आणि कोणी हिंदु ह्मणत. एकानें विचारलें, वकील (एल्फिन्स्टन) ब्राह्मण कीं काय ?

स्वच्छ, आणि बरेंच शुद्ध आहे. त्यांत कोठें कोठें तांबड्या रंगाची झांक मारते आणि तांबड्या रेषा आहेत. तेवढ्या नसत्या तर ते खडक स्फटिकाचेच आहेत कीं काय असा भास झाला असता. कांहीं ठिकाणीं त्या खडकाच्या पायथ्यापासून खारे झरे वहात आहेत, त्यांचें पाणी जमिनीवर सुकून साय धरते, ती पांढरी सफेत असून चकचकत असते.

सिंधूच्या कांठचें मैदान सोडून पुढें डोंगर, दरी, खोरीं, उलटून जात जात तो कोहात येथें पोहोंचला. अफगाणिस्थानाचा खरा मुलूख त्याला दिसला. तो येवढाच. एका मजलेला डोंगर येवढे उंच आणि खोरीं इतकी खोल लागलीं कीं, त्याच्या बरोबर जो मोजणदार ( Surveyor ) होता, तो वेध घेण्याची खटपट करीत होता, परंतु त्याचें कांहीं काम चालेना; कारण भर मध्यान्हास सुद्धां सूर्य दिसेना. कोहात येथील हवा, झाडें झुडपें, फुलें, फळें, वगैरे अगदीं विलायतेंतल्या सारखीं पाहून एल्फिन्स्टनसाहेबाला मोठा आनंद झाला आणि कंबरनाल्ड येथील आपल्या घराचें स्मरण झालें.

कोहातचें हिरवेंगार मैदान सोडून स्वारी खैबरघाटानें पुढें चालली, तेव्हां त्याला पुष्कळ खैबरी लोक हत्यारबंद होऊन डोंगरावरून बसलेले आढळले. त्यांचा डोळा त्या उंटांच्या काफल्यावर होता. त्या चोरांचा नाईक पुढें येऊन कांहीं तरी चिरीमिरी मागूं लागला. परंतु स्वारीबरोबर जो अफगाण सरदार होता, त्यानें त्याला सांगितलें सारें खटले जाऊन उतरलें म्हणजे गोटांत ये, मग पाहूं. एल्फिन्स्टन म्हणतो, हत्यारबंद चोरांनीं बेधडक येऊन कांहीं तरी बक्षीस म्हणून मागावें आणि मुसाखान अगदीं एकटा असल्या सारखा, त्याच्या अंगावर भरजरी पोषाक, त्याचीं हत्यारें सोनेरी, असें असतां, त्यांच्या बंदुकींना न भितां त्यानें त्यांना कांहीं देत नाहीं म्हणून सांगावें हें पाहून काबूलच्या लोकांच्या रीतीभातीचें मला आश्चर्य वाटलं. याप्रमाणें जात जात तारीख २५ फेब्रुवारी सन १८०९ रोजीं म्हणजे दिल्लीहून निघाल्यापासून चार महिन्यांनीं एल्फिन्स्टनाची स्वारी पेशावर शहरीं दाखल झाली.

एल्फिन्स्टन साहेबाला सृष्टिसौंदर्य पाहण्याची हौस असे, ती पुरवून घेण्याची संधी तो ह्या प्रदेशांतून चालला असतां त्याला बरीच सांपडली. तो सिंधूच्या कांठानें चालला असतां तख्त-ई-सुलेमान म्हणजे सालोमनाचें सिंहासन नांवाचें ११३१७ फूट उंच शिखर आहे त्याच्या माथ्यावर जाण्याचें मनांत येऊन दोन तीन मित्र मंडळी व वाटाडे वगैरे आणखी

कांहीं लोक बरोबर घेऊन निघाला; परंतु तो हेतु कांहीं सिद्धीस गेला नाहीं. तीन तासपर्यंत सारखा चालून तो एका टेंकडावर गेला. तें फार भव्य असून तेथून चोहींकडील देखावा मोठा मौजेचा दिसत होता. तो ह्मणतो मी हैंसुस्तानांत गेलों होतों तेव्हांपासून आजपर्यंत असा मनोहर देखावा मला पाहावयास मिळाला नव्हता.

मुल्तानाहून निघाल्यावर दोनतीन दिवसांनीं गुलाम रसूलशहा ह्मणून एक सय्यद एल्फिन्स्टन साहेबाला भेटला. त्यानें त्या देशाच्या स्थितीविषयीं त्याला पुष्कळ माहिती दिली. तो पेशावरास गेला होता तेव्हां तेथच्या लोकांनीं त्याचा फार मोठा सन्मान केला. कांहीं ठिकाणीं त्याच्या दर्शनाकरितां लोकाची मोठी गर्दी होत असे. ते त्याच्या पायांवर पाणी ओतांत आणि तें चरणतीर्थ पात्रांत धरून प्राशन करीत. त्या मुलखांत सय्यदांची गर्दी आहे; असें असून लोकांची त्याच्याविषयीं इतकी श्रद्धा पाहून आश्चर्य वाटतें.

एल्फिन्स्टनसाहेबाचा कोहात येथें मुक्काम असतां अजिजउल्लाखान ह्मणून एक सरदार त्याला भेटला. त्यानें सांगितलें, दुराणीलोक आह्मावर फार जुलूम करतात; त्यामुळें कोणालाही आपल्या संपत्तीचा उपभोग घेतां येत नाहीं. मुसलमानी गप्पेचा एक मासलाही त्याच्या तोंडून त्याला ऐकावयास मिळाला. तो चांगला हुषार मनुष्य होता. तो बोलतांना लागत असे, त्याचें कारण त्यानें सांगितलें; तें असें—तो ह्मणाला, मी लहान असतांना एक दिवस भूत माझ्या दृष्टीस पडलें तेव्हां मी अगदीं घाबरून गर्भगळीत होऊन गेलों आणि माझी जीभ बाहेर पडून चांगली हातभर जमिनीवर लोळूं लागली. कांहीं वेळानें ती हळुहळु आंत गेली, परंतु तेव्हां पासून तिला हा दोष जडला.

शहासुजा गादीवर टिकेल असा भरंवसा नाहीं असें पुष्कळ लोक बोलत. कोहतचा हकीम एल्फिन्स्टन साहेबाला भेटला तो बोलतां बोलतां ह्मणाला, तुह्मी हा देश घेणार असाल किंवा शहाची मदत मागणार असाल; परंतु तुमचा एकही हेतु सिद्धीस जाणार नाहीं.

एल्फिन्स्टन दिल्लीहून निघाला तेव्हां शहासुजाकडे गेल्यावर त्याच्याशीं तह कोणत्या प्रकारचा ठरवावयाचा याविषयीं त्याला कांहीं हुकूम मिळाला नव्हता तो मागाहून येऊन मुल्तानास त्याच्या हातांत पडला असावा. परंतु त्यापूर्वीं त्यानें तेथून लार्ड मिंटोला एक भलें लांबलचक पत्र लिहिलें होतें. त्यांत असें लिहिलें होतें कीं, आपण काबुलास सैन्य पाठविणें ह्मणजे वेडेपणा आहे. कारण

पंजाबांतल्या पांच नद्या, सिंधूनद आणि मारवाडचें वाळवंट ही जी आपली पश्चिमेकडील सरहद्द आहे ती भली मजबूद आहे. ती सोडून आपण पलीकडे गेलें असतां मग तेथें फ्रेंचांना आणि आह्माला सोई किंवा अडचणी सारख्याच असणार. परंतु होतां होईल तेथपर्यंत हा देश फ्रेंचांच्या हातीं न पडे अशाविषयीं आपण झटलें पाहिजे. कारण त्यांत त्यांचा पाय शिरकून जर कां एकदां ठाणें पडलें, तर मग आमच्या मुलखावर हल्ला करण्यास त्यांना कांहींच प्रयास पडावयाचे नाहींत व उशीर लागावयाचा नाहीं; त्यांच्या मर्जीस येईल तेव्हां सहज करतां येईल आणि आमची शक्ति जरा कमी पडलेली दिसली किंवा इतर कांहीं कारणानें त्यांना जय मिळण्याचें संधान दिसलें कीं, ते तत्काळ हल्ला करतील. असें लिहून पुढें काबूलच्या दरबारांत कोणत्याही परकी राजाचें वजन फार पडलें असतां त्यापासून आपल्याला खरें भय कसें आहे तें त्यानें दाखविलें. त्यानें त्यावेळीं जें फ्रेंचांविषयीं लिहिलें तेंच आजमितीस रशियनांस लागू आहे.

तो ह्मणतो–त्या लाघवी लोकांनीं शहाकडे काबुलास वकील पाठविला तर तो गोड बोलून त्याच्या मनांत बहुधा असें पक्कें बिंबवून देईल कीं, फ्रेंचांपासून आपल्याला कांहीं इतकें भय नाहीं; इतकेंच नव्हे, इंग्रजलोक कांहीं कारस्थान मांडतील तर आह्मी त्या पासून तुमचें संरक्षण करूं आणि हिंदुस्थानावर स्वारी केली ह्मणजे भावलखान सुभ्याच्या ताब्यांतला मुलुख आणि सारा सिंधप्रांत जिंकून तुमच्या ताब्यांत आणून देऊं. पंजाब, कच्छ, गुजराथ किंवा सिंधूच्या आलीकडील दुसरा एखादा मुलुख सर करून देण्याचें ही तो कदाचित् वचन देईल; किंवा खुरासन प्रांताविषयीं जो तंटा आहे त्याचा निकाल आपल्या मनाप्रमाणें करून घेण्याचें ठरवून त्याच्या बदला हिंदुस्थानांत मुलुख मिळवून देण्याचें कबूल करील.

तोंडाला पाणी सुटण्यासारखा त्याच्या अशा गोष्टी ऐकून शहाला कदाचित् भूल पडेल आणि त्या शस्त्रधारी लोकांच्या नादीं लागल्यानें आपल्या राज्यावर केवढें संकट ओढवणार आहे हें कांहीं त्याच्या लक्षांत येणार नाहीं. मग अर्थातच माझ्यासारखा जो कोणी त्याचा तो फक्त भ्रम काढून टाकण्याचा यत्न करील त्याचें बोलणें तो नीट ऐकून देखील घेणार नाहीं.

याजकरितां फ्रेंच वकिलानें शहाला वळविण्याकरितां वचनें दिलीं असतील त्यांपेक्षां आह्माला कांहीं तरी अधिक लालुच दाखवावी लागेल. तर दारूगो-

ळा, सामान सुमान, अम्मलदार व पैसा कोठपर्यंत पुरविण्याचें मीं बोलावें वें खुलासेवार लिहून यावें. मला काबुलास फार दिवस रहातां येणार नाहीं. कारण रहाणें झाल्यास निमित्त तहाचें बोलणें उघड उघड चालू असलें पाहिजे. एशियांतील लोकांना आपल्या दरबारीं परदरबारचा कायम राहणारा वकील कसला असतो तें माहीत देखील नाहीं. त्यांतूनही अफगाण लोक असें समजतात की, वकील यावयाचा ह्मटले ह्मणजे त्याला आपल्या राजाचा कांहीं तरी मोठ्या गोष्टीसंबंधानें निरोप सांगावयाचा असतो. तो त्यानें पहिल्या भेटीसच कळवावा, उत्तर ऐकावें आणि चालूं लागावें, असा त्यांचा इकडील शिष्टसांप्रदाय आहे. तर मला सारें एकदम बोलावें लागेल.

एल्फिन्स्टन निघून गेला आणि इकडे हिंदुस्थान सरकाराला प्रथम जे भय पडलें होतें तें दूर झालें. कारण सन १८०८ मध्येच युरोपांत स्पेनमध्यें बंड झालें आणि आस्ट्रियाचा राजाही युद्धास उभा राहिला. त्यामुळे नेपोलियनाला इकडे आरंभिलेल्या कारस्थानांतून मन काढावें लागलें. इराणच्या शहाकडे त्याचा जो वकील गेला होता, त्याचें तेथें कांहीं चालेनासें झालें. एल्फिन्स्टन साहेबाचा मूळ पुरस्कर्ता जनरल वेलेस्ली याची इंग्लंडांत गेल्यावर मोठी तारीफ होऊन नेपोलियनाच्या सैन्याशीं लढण्याकडे योजना झाली होती. त्याला जय मिळाल्याची बातमी कलकत्त्यास पोहोंचली व युरोपांतलीं इतर राष्ट्रेंही पुनः कंबरा बांधून नेपोलियनावर उठल्याचें समजलें, तेव्हां हिंदुस्थान सरकारास अत्यानंद होऊन त्याचें मन लागलेच फिरलें आणि बाहेर जे वकील पाठविलेले होते, त्यांच्या स्वाऱ्यांचा खर्च म्हणजे फुकट बूड असें वाटूं लागलें, व त्यांना प्रथम जे अधिकार दिलेले होते ते तें कमी करूं लागले. एल्फिन्स्टन साहेबाच्या पत्राला जबाब असा मिळाला—आतां इराणच्या शहाशीं आपण होऊन लढण्याची आमची इच्छा नाहीं. परंतु त्याच्या मुलखांतून शत्रु इकडे येऊं पाहतील तर त्यांस वाटेंत विघ्न झाले पाहिजे म्हणून शहासुजाबरोबर स्वसंरक्षणार्थ तह करावा. फ्रेंच फौज तिकडून येऊं लागेल तर तिच्याशीं लढण्याचा त्याजपासून करार करून घेऊन त्याला लष्करी सामान, हत्यार, दारूगोळा वगैरे पुरविण्याचा ठराव करावा.

हिंदुस्थान सरकाराकडून असें लिहून आलें याचें कारण युरोपांत फ्रेंचांच्या नशीबाचें पारडें फिरलें हें एल्फिन्स्टन साहेबाला कळलें. विहमी इरो येथें वेलिंग्टनाला ( जनरल वेलेस्लीला ) मोठा जय मिळाल्याची वार्ता

त्याला कोहाट येथें समजली आणि मोठा आनंद झाला. शहाच्या दरबारची स्थिति कशी आहे, हा शोध करीत तो जसजसा पेशावराजवळ गेला, तसतसा तेथचा प्रकार त्याला अधिकाधिक समजू लागला. शहाच्या मुत्सद्दी मंडळींत दोन पक्ष होते, एक इराणी मंडळीचा आणि दुसरा अफगाणी सरदारांचा. इराणी मंडळी पुष्कळ प्रबळ होती परंतु त्यांचा इराणाशीं कांहीं संबंध नव्हता. ते पोटभरूपैकीं असून हिंदुस्थानांतल्या मुसलमानी दरबारांतून पूर्वी त्यांचें जसें प्राबल्य झालें होतें तसें या वेळीं काबुलांत झालें होतें. बहुश्रुत मंडळीला नेपोलियनाची भरभराट, त्यांचे डावपेंच, इराणाचा व रशियाचा तंटा, वगैरे गोष्टीची माहिती थोडी बहुत होती, परंतु त्या दूरदूरच्या गोष्टींचा अफगाण कारस्थानांशीं कांहीं संबंध नव्हता; म्हणून हिंदुस्थानांतून इंग्रज वकिलांची स्वारी एवढ्या डामडौलानें येण्याचें प्रयोजन त्यांना कांहीं दिसेना; त्यामुळे विशेष आश्चर्य वाटू लागलें. कांहीं मंडळींच्या मनांत भय व कांहींच्या मनांत आशा उत्पन्न झाली. एल्फिन्स्टन साहेबाला एकदा एकानें विचारलें, तुह्मांला जेवढें राज्य मिळालें आहे तेवढ्यांत संतोष मानून कां रहाना ? आणखी मुलूख मिळविण्याची हाव कां धरतां ? शहाचें आणि इंग्रजाचें सख्य झालें तर आपल्या स्वातंत्र्यास धक्का येईल असें त्यांतल्या टोळया टोळयांना वाटणेंही कांहीं गैर नव्हतें. कोणाकोणाचा तर्क फार दूर धांवून त्यानीं असें बोलून दाखविलें कीं, शीख लोक फार बलाढ्य होत चालले आहेत, ते आपल्यावर उठले तर त्याच्याशीं लढण्यास आमची मदत मिळावी ह्या खटपटीकरितां ही स्वारी आली असावी.

एल्फिन्स्टन पेशावरास पोंहोंचल्यावर शहासुजाची भेट कांहीं लागलीच झाली नाहीं. भेट कोणत्या प्रकारें व्हावी, त्याचा आदर सत्कार कसा व्हावा, मानमरातब कसा रहावा वगैरे गोष्टी ठरण्यांत आठ पंधरा दिवस गेले. इराणातून आणि तार्तरींतून वकील आले होते तेव्हां झालेला त्यांच्या भेटीचा प्रकार जो त्यानें ऐकिला तो कांहीं विलक्षणच होता. आपली भेट तशा प्रकारें होणें ह्मणजे मोठी अप्रतिष्ठा आहे असें त्यास सहजच वाटलें ह्मणून तो अर्थातच तशास कबूल झाला नाहीं. त्याला समजली ती हकीगत अशी—

जो वकील शहाच्या भेटीला यावयाचा असतो, त्याला दोन अम्मलदार अंगणांत आणून उभा करतात आणि दोघे दोहींकडून त्याचे हात घट्ट धरतात. शहा वर एका उंच खिडकींत असतो. त्याची नजरानजर झाली ह्मणजे ते दोघे त्या वकिलाला कांहीं पावलें दौडत पुढे नेतात. मग तेथें

क्षणभर थांबून तो शहासाठीं प्रार्थना करतो; ती झाली म्हणजे ते त्याला आणखी कांहीं पावलें पुनः धांवडधींत पुढें नेतात आणि पुनः प्रार्थना करायाला लावतात. मग तिसऱ्यानें तो तसाच धांवत पुढें आला म्हणजे शहा "खिलत" म्हणतो ती खिलात (पोषाख) त्याला देऊन झाली म्हणजे एक अम्मलदार "जेटशिन" (चालता हो) असें तुर्की भाषेनें म्हणतो. त्या बरोबर त्या विचाऱ्या वकिलाला माघारें फिरून अंगणांतून धांवत परत जायाला लावतात. मग शहाची त्याची पुनः भेट त्यानें खासगींत बोलावून नेऊन घेतली तर होते, नाहींतर नाहीं.

एल्फिन्स्टसाहेबांची भेट चांगली प्रतिष्ठेनें होण्याचें ठरून तारीख १५ मार्च रोजीं त्यांची स्वारी मोठ्या थाटानें राजवाड्यांत गेली. शहासुजा सिंहासनावर बसला होता तें सिंहासन भरगची किनखापानें मढविलेलें असून त्यांला मोत्यांची झालर लाविलेली होती. त्यांच्या अंगावरचा पोषाख आणि मस्तकावरचा मुगुट रत्नानीं भरलेला असून त्यांच्या प्रभेनें लखलखाट झाला होता. त्यांच्या हातांत मोठालीं पाचेचीं कंकणें होती आणि एका दंडांत भुजबंद होता. आज मितीस ज्याच्या तोडीस लागणारा दुसरा हिरा पृथ्वीवर नाहीं तो तेजःपुंज कोहिनूर त्यांत बसवलेला होता. शहासुजा रूपानें सुंदर, सुमारें तिशीच्या वयाचा, भरजवान होता. त्याचा वर्ण गौर असून दाढी दाट आणि काळी भोर होती. तो सभ्य, प्रौढ आणि चांगल्या चालीचा गृहस्थ असावा असें एल्फिन्स्टन साहेबास दिसलें त्याची इच्छा त्या वकिलाला खुष करण्याची दिसली, परंतु तो आपली प्रतिष्ठा राखून तें करीत होता.

ही प्रथम दरबारी भेट * झाल्यावर मग शहासुजानें त्याच्या कांहीं

---

* ह्या प्रथम भेटीची सविस्तर हकीगत एल्फिन्स्टन साहेबानें लिहून ठेविलीच असेल. त्यांत कांहीं शंका नाहीं. परंतु त्याच्याच चरित्रकारांनीं ती बाहेर आणली नाहीं. आह्माला ती उपलब्ध होण्यास दुसरा मार्ग नाहीं. भेट कशी झाली, म्हणजे शहासुजाच्या दरबाराचा थाट कसा होता, अमीर, उमराव, सरदार वगैरे कोण कोण हजर होते, दिल्लीदरबारांतल्या प्रमाणें सर्व उभे राहिले होते कीं बसले होते, असल्यास कोणकोणत्या बाजूस त्यांनीं एल्फिन्स्टन साहेबाला ताजीम कितपत दिली, त्यानें नजर काय धरली, खुरनिसाद (मुजरा) कशी केली, बरोबर नजराणा मोठा नेला होता त्यांत जिन्नस काय काय होते व ते केव्हां दिले वगैरे तपशील समजता तर बरें होतें.

खासगी भेटी घेतल्या; त्यांतल्या पहिलीची त्याणें हकीगत लिहिली आहे; ती अशी—सर्व व्यवस्था लागल्यावर शहानें आमच्या राजाची तब्येत कशी आहे, आम्ही दिल्लीहून कधीं निघालों, वगैरे प्रश्न विचारले मग बाकीच्या मंडळीस उठून जावयास सांगावें अशी मला हळूच सूचना झाली. तीप्रमाणें त्यांना उठवून लाऊन दिल्यावर शहानें मला आणि स्ट्राची साहेबाला पुढें येऊन बसण्यास सांगितलें. आम्ही पुढें सरून दाखविलेल्या जागेच्या जरा मागेंच बसलों. शहा आमच्या सरकाराशीं आपली दोस्ती असावी अशा आशयाचें बोलूं लागला. त्याला मी योग्य तसा जबाब दिला आणि मग ह्मटलें कीं मी पत्र आणलेलें आहे तें देण्यास हुकूम झाल्यास देतों. त्याणें बरें आहे, द्यावें, असें सांगितले, तेव्हां मिरझा शरिफ याणें तें घेतलें आणि सादर केलें. तें चाशबशी (चोपदार) जवळ देऊन ठेवावें, दरबारांत तो तुमच्या हातांत देईल, असें मिरझा शरीफानें मला सांगितलें होतें; त्याप्रमाणें मी तें त्याजजवळ देऊन ठेवलेलें होतें. मिरझानें मला असें सांगण्याचा हेतु मी तें खुद्द शहाच्या हातांत देऊं लागेन तर तसें होऊं देऊं नये हा असावा यांत कांहीं संशय नको. असो. त्याणें तें मोठ्यानें चांगलें वाचलें. शहा पुनः दोस्तीविषयीं बोलूं लागला. ती उत्तरोत्तर वाढत जावी अशी आपली इच्छा आहे असें ह्मणाला. त्यावर मला देतां आलें तसें उत्तर दिलें. मग त्याणें आमच्या देशाविषयीं कांहीं विचारलें. तेथची हवा झाडें, फळें वगैरे अगदीं काबूलच्या सारखीं आहेत असें मी सांगितलें तेव्हां तो ह्मणाला, तर मग ह्या दोनही राज्यांचें सख्य असावें अशी ईश्वरी इच्छा दिसते. आमचा स्नेह असावा असें तो पुनः बोलला. तेव्हां मी ज्या कामाकरितां आलों आहें तें माझें बोलणें आपण आतां ऐकाल, किंवा दुसऱ्या एकाद्या वेळीं असें विचारलें. तो आतांच ऐकतों ह्मणाला. तेव्हां मी उभा राहून आमच्या सरकारचा हेतु थोडक्यांत कळविला. त्यावर त्याणें अगदीं स्नेहभावाचें भाषण करून माझें राज्य मोठें बलाढ्य आहे असें जोरानें ह्मटलें. शहाजवळ मी जें बोलें ते माझे शब्द मिरझा शरीफ पुनः उच्चारी, परंतु त्यांत त्याणें दोन वेळ चूक केली ती मला सुधरावी लागली. शहाच्या राज्यावर प्रथम हल्ला व्हावयाचा होता ह्मणून तहनाम्यांतल्या बारीकसारीक गोष्टी ठरविण्याचें गव्हरनरजनरलानें आपल्यावरच सोंपविलें आहे असें मी बोललों, परं त्याणें तसें न सांगतां मोघम शब्दांनीं इतकेंच ह्मटलें कीं, आम्ही

कोणत्याही प्रकारें आपल्या उपयोगीं पडूं असें सांगण्याकरितां आलों आहों; आणि आपल्यावर अमुक संकट येणार आहे तें वारण्यास मदत करावी अशी आमची इच्छा आहे असें मी बोललों असून त्याणें आह्मी शहाच्या जबरदस्त बाहुबलाचा आश्रय मागण्यास आलों आहों असें सांगितलें. त्या बरोबर मी खणखणीत स्वरानें असें बोललों कीं, शहाचें राज्य शत्रूंनीं जिंकून घेतलें ( ईश्वर करो आणि असें न होवो ) तरी इंग्लंडच्या राज्याचें सरक्षण करण्याचें आणि त्यावर उठण्याचें धाष्टर्य जो कोणी करील त्या दुसमानाला जबर शासन करण्याचें सामर्थ्य ईश्वरानें आह्माला दिलें आहे. परंतु साम करणें ही उत्कृष्ट राजनीति आहे आणि शहाच्या कल्याणांत आमचें पुष्कळ हित आहे, ह्मणून त्याचें राज्य सुरक्षित असावें अशी आमची मन:पूर्वक इच्छा आहे आणि ह्मणून त्याविषयीं आह्मी झटत आहों. तें माझें भाषण ऐकून घेऊन शहा ह्मणाला, तुमचें जें काय ह्मणणें असेल तें मी संतोषानें मान्य करीन. तेव्हां मी ह्मटलें, राजाराजांचा स्नेह झाला ह्मणजे उभयतांमध्यें तहनामा व्हावा अशी वहिवाट आहे. तहनामा हें स्नेहाचें दर्शक चिन्ह आहे, तर आपला आमचा तहनामा व्हावा. माझें ह्मणणें त्याणें तत्काळ कबूल केलें आणि तुमच्या इच्छेप्रमाणें करण्याची तजवीज होईल असें सांगितलें.

मग दरबारच्या मुत्सद्दी मंडळीच्या आणि एल्फिन्स्टनसाहेबाच्या भेटी होऊं लागल्या आणि त्यांत तहामध्यें मुख्य काय काय गोष्टी ठरावयाच्या ती वाटाघाट होऊं लागली. शहासुजा गादीवर बसण्यापूर्वी झमानशहाच्या कारकीर्दींत पेशावरास सुभेदार होता. तेथें त्याचें वजन चांगलें बसलें होतें व त्याला लोक पुष्कळ अनुकूल होते. त्याचा सावत्र भाऊ महमूदशहा याणें काबूलची गादी बळकाविली होती. परंतु लोकांनीं बंड करून त्याला काढून टाकून ह्याला तीवर बसविलें परंतु ह्याचा अम्मल नीटसा बसला नाहीं. फत्तेखान बरकझाई ह्मणून वजीर होता त्याची अप्रतिष्ठा करून त्याला पदच्युत केल्यामुळें तो प्रतिपक्षास मिळाला. ( माजी अमीर अबदुल रहिमान हा त्याचा वंशज होता. ) त्याच्या सहाय्यानें महमूदशहा प्रबळ होऊन पुनः गादी घेण्याच्या तयारीस लागला. त्याणें फौज मिळवून कंदाहारांत दंगा आरंभिला. फत्तेखानि वजिराच्या मुलानें काश्मीर प्रांतांत बंडावा केला. शहासुजानें दोहींकडे दोन फौजा रवाना केल्या होत्या. बलख. कंदोज, हिरात, मक्रान, सीस्तान मुलतान, भावलखान आणि देराजान येथें त्याचा अम्मल सरासरी

नांवाला होता. त्यांतल्या कांहीं प्रांतांतून थोडीशी फौज त्याच्या चाकरीवर येई आणि थोडासा वसूल येई, परंतु त्याजवर खरा अम्मल चालत नव्हता. त्यांच्या उत्तरेकडील डोंगरांत युसुफझै लोक रहात, ते बहुतेक स्वतंत्र होते. फक्त काबूल आण पेशावर खरीं त्यांच्याकडे होतीं, आणि आसपासच्या पहाडी मुलखांत कांहीं अम्मल चालत होता. कोहिनूरादिक हिरेमाणकें, वगैरे रत्नें त्याच्या जवळ होतीं; त्यांची प्रभा फांकली म्हणजे डामडौल ठीक दिसे. परंतु तो फक्त वर दिसण्याला. आंत कांहीं राम नाहीं, सध्यांच्या प्रसंगीं उपयोगीं पडण्याला पैसा पाहिजे आहे, परतु खजिन्यांत कांहीं नाहीं; दरबारांत मुत्सद्दी मंडळींत जूट नाहीं आणि मुलखांत स्वस्थता नाहीं; त्यामुळें शहाच्या जिवाला चैन नाहीं, असें एल्फिन्स्टन साहेबाच्या ध्यानांत येण्यास उशीर लागला नाहीं. राज्यव्यवस्थेचा प्रकारही तेव्हांच दिसला. तारीख ६ मार्चच्या रोजनाम्यांत त्यानें असें असें लिहिलें आहे–

'राज्याची अंतर्व्यवस्था कशी आहे ती कांहीं मला कळत नाहीं, परंतु ती निंद्य असली पाहिजे. व्यापारी लोकांना आपला माल बाहेर काढावयाला धीर होत नाहीं. काढला तर तो सरकार नेईल असें भय वाटतें. माझ्या कांहीं लोकांना एक घर पाहिजे आहे, परंतु तें मिळेल असें वाटत नाहीं. कारण, आह्मी शहाचे झालों आहों आणि त्याचे जे लोक असतात त्यांच्या हातीं एकादी वस्तु गेली ह्मणजे मग ते ती कधीं सोडीत नसतात. माझ्या असें ऐकण्यांत आलें आहे कीं, आमच्या सरबराईचा खर्च शहरावर बसविला आहे. आमचे कपडे सावकारांकडून आणलेले आहेत त्यांची किंमत देणें दूर राहिलें, ते तुह्माला परत मिळतील एवढे नुसतें कोरडें देखील त्यांनां सांगितलेलें नाहीं. आज सकाळीं मी फिरावयास गेलों होतों तेव्हां दोन असामी आपली खेंचरें गव्हाच्या शेतांत सोडून देऊन तीं चरून पोटें भरून येतपर्यंत वाट पहात बसलेले पाहिले. ते इराणी असावेसे दिसले.'

शहासुजानें तह करावयाचें कबूल केलें त्याप्रमाणें बोलणें सुरू झालें. त्याच्यावर शत्रु उठलेला, अगदीं दारांत येऊन ठेपलेला होता; आपण गादीवर टिकूं किंवा नाहीं ही त्याला भीति उत्पन्न झाली होती; अशा समयीं इंग्रजांची मदत मिळाली तर उत्तमच; असें त्याला वाटणें सहजच होतें. तहनाम्यांत काय काय कलमें असावीं याविषयीं त्याचें व त्याच्या दरबारच्या मंडळीचें मत तेव्हांच ठरलें. एल्फिन्स्टनसाहेबाचेही मुद्दे ठरलेले

होते, परंतु ते त्यांना मान्य होण्यासारखे मात्र नव्हते. शहा अ.नल्यावर प्रस्तुत आलेलें संकट कसें निवारण होईल ह्या विचारांत होता, ह्मणून इंग्रजांबराबर तह होऊन त्यांच्याकडून द्रव्याची व सैन्याचीही मदत होईल तर पहावें अशा खटपटींत त्याची मंडळी होती. इंग्रजांवर तूर्त कांहीं प्रसंग नव्हता. फ्रेंच लोक इराणच्या शहाच्या सहाय्यानें अफगाणिस्थानांतून हिंदुस्थानावर स्वारी करतील हे काय ते त्यांनां मुख्य भय पडलेलें होतें आणि तशी वेळ येईल तेव्हां शहासुजानें त्यांनां आपल्या हद्दींत पाऊल घालूं देऊं नये, त्यांनां सहाय होऊन हिंदुस्थानांत येण्यास सवड देऊं नये, लागल्यास आपली मदत घेऊन मागें हटवून लावावें हा त्याचा कायतो मुख्य एक उद्देश होता. याप्रमाणें त्याच्यापासून करार करून घ्यावा ह्या खटपटींत एल्फिन्स्टनसाहेब होता. आपला हेतु साधण्याकरितां त्याणें मोठ्या हुशारीनें युक्तिप्रयुक्तिमत्, नानाप्रकारचीं भाषणें केलीं. परंतु ते अफगाण मुत्सद्दी कांहीं तशानें फसणारे नव्हते. तो जो जो मुद्दा काढी आणि आपल्या ह्मणण्याप्रमाणें कबूल करण्याची आवश्यकता दाखवी त्यावर ते आक्षेप घेत आणि त्याला निरुत्तरही करीत. अशीं ती वकिली डावपेचांचीं भाषणें बरेच दिवस चाललीं होतीं. त्यांच्या भाषणाचा रोंख असा होता कीं, अफगाणिस्थानची गादी जातीची बळकट आहे; ती दुसऱ्याकडे जाण्याची भीति धरावयास नको. ते ह्मणत आमच्या येथें गादीविषयीं आपआपसांत कितीं जरी भांडणें असलीं तरी आमचा देशाभिमान फार थोर आहे, त्यामुळें आह्मांवर जर कोणी बाहेरचा शत्रु येईल तर घरगुती तंटे बाजूस ठेऊन सारे लोक आधीं त्याच्यावर तुटून पडतील. फ्रेंच किंवा इराणी फौजेला आमच्या मुलखांत शिरणें ह्मणजे मोठें कठीण कर्म आहे. हिंदुस्थानावर स्वारी करण्याला आमचा बादशहा त्यांना अनुकूल होईल तरच त्यांचें पाऊल पुढें पडेल. एका ज्ञात्या अफगाण सरदारानें त्याला आपल्या देशबंधूंच्या स्वभावाचें लक्षण सांगितलें. ते शब्द इंग्रजांनीं चांगले लक्षांत ठेविलेले आहेत, ते पुन: पुनः त्यांचा उच्चार करतात. परंतु केव्हां केव्हां त्यांचा अर्थ विपरीत करतात. तो ह्मणाला "आह्मांला तंटे पत्करतात, आमच्यावर संकट आलेलें पुरवतें, रक्तपात झालेला पुरवतो, परंतु आमच्यावर राजा आलेला मात्र कधींही पत्करत नाहीं." त्यांच्या बोलण्याचा अर्थ राजा ह्मणजे परदेशांतून चालून येणारा कोणी राजा असा होता; आपल्या देशांतला

राजा असा नव्हता. शहाशुजाचा वजीर याच विषयावर बोलतांना जे शब्द बोलला ते किती खरे आहेत, याचा अनुभव इंग्रजांनां आलीकडे बराच आला आहे. त्यांनां त्यांची चांगली आठवण रहाण्यासारख्या गोष्टी घडल्या आहेत, तो ह्मणाला " आह्मी अफगाण लोक आपसांत किती हवेतितके तंटे करूं, परंतु आमच्या राष्ट्राचा अभिमान असा आहे कीं एकाद्या बंडखोराचा कोठें कांहीं उपाय चालेनासा झाला तर तो आपण होऊन आपल्या राजाच्या स्वाधीन होईल, परंतु परदेशच्या राजाकडे जाऊन त्याचें सहाय्य मागणार नाहीं. "

हिंदुस्थानातून इंग्रजसरकारांने आपल्या शहाकडे तहाचें बोलणें लावण्याकरितां एवढ्या मोठ्या थाटानें वकिलाची रवानगी केली, त्याच्याबराबर एवढा थोरला नजराणा पाठविला, तेव्हां ह्याचें कारण त्यांच्या राज्यावर तसेंच कांहीं तरी मोठें संकट आलें असावें आणि तें आमच्या मदतीवांचून टळण्यासारखें नसावें, असें त्या दुराणी लोकांच्या मनांत पूर्णपणें बिंबून गेलें होतें. तो त्यांचा भ्रम काढून टाकला पाहिजे असें एल्फिन्स्टन साहेबाला वाटून ब्रिटिश लोकांचें बळ आणि स्वातंत्र्य यांविषयीं त्यांची खात्री करून द्यावी ह्मणून तो पुष्कळ बोलला. त्यासंबंधानें त्यानें लॉर्ड मिंटोला पत्र लिहिलें त्यांत तो ह्मणतो, मी त्यांना असें उत्तर केलें कीं, " तुमचें साहाय्य मिळालें तरच आपला निभाव लागणार, असें आमच्या सरकाराला वाटत असतें तर तुम्ही जें म्हणाल तें कबूल करून तुमची मदत मिळवावी असा त्यांनीं मला अधिकार देऊन ठेविला असता, परंतु तसें कांहीं केलें नाहीं. मला एवढेंच सांगितलें आहे कीं, तुह्मांला मदत देऊं करावी, तुह्मांला काय काय पाहिजे आहे तें समजून घ्यावें आणि कळवावें ह्मणजे त्याचा विचार होईल. आपल्यावर संकट येईल तर तें कसें निवारावें याचा विचार आमचें सरकार आपला आपण करीत आहेत, असें बोलून मग स्पेन व पोर्तुगाल देशांवरच्या आमच्या स्वारीची हकीगत थोडक्यांत सांगितली आणि मुंबईस जी तयारी चालली आहे तिजविषयीं जेवढें सांगणें उचित होतें तेवढें सांगितलें. अखेर मी असें बोललों कीं, आम्ही आजपर्यंत साऱ्या जगाबरोबर पुष्कळ वेळ युद्ध केलें आहे, परंतु त्यात केव्हांही पराभूत झालों नाहीं; आणि आतां जरी फ्रेंच लोकांनीं हर तऱ्हा करून तुमचा देश घेतला, तरी आजपर्यंत याहीपेक्षां कठीण प्रसंगीं आम्ही त्यांच्याशीं जसे लढलों आहों तसे आतांही लढूं. "

' या प्रौढीच्या भाषणावर एकानें चोख उत्तर दिलें. तो म्हणाला. तें कांहीं असो, परंतु ह्या तुमच्या सरहद्दीवरच्या लोकांशीं लढून त्यांनां मागें हटवणें हें कर्म तितकेंच सोपें आहे असें समजूं नका. जर आमच्या शहानें फ्रेंचांना आपल्या मुलखांतून वाट दिली तर तो त्यांच्याबरोबर हिंदुस्थानांवर स्वारी करावयालाही येईल आणि मग त्यांच्याशीं लढण्यापेक्षां दुराणींशीं लढणें किती कठीण आहे तें तुम्हांला दिसेल !'

एल्फिन्स्टन साहेब त्या अफगाण मुत्सद्दी मंडळीपुढें आपल्या जातभाईची मोठी प्रौढी सांगूं लागला; तेव्हांही त्याला असेंच रोकड जबाब मिळाले. तो वजिराला म्हणाला, आम्ही इंग्रज लोक मनाचे मोठे मोकळे आहों; आमच्याजवळ कपट नसतें. त्यावर त्याणें उत्तर केलें, 'हें अगदीं निःसंशय खरें आहे असें कांहीं माझ्याने म्हणवत नाहीं. तुमचा बेत आमच्या शहाला फसवावयाचा आहे असें कांहीं मी ह्मणत नाहीं; परंतु तोंडाने म्हणतां असे अगदीं सरळ अहां असें मला वाटत नाहीं.' एल्फिन्स्टनसाहेब म्हणाला, प्रामाणिकपणाविषयीं आणि जिंकलेल्या राजांनां प्रतिष्ठेनें वागविण्याविषयीं आमची फार मोठी ख्याति आहे. त्यावर तो वजीर ह्मणाला " तसें असेल, परंतु तुम्ही मोठे कावेबाज अशी तुमची कीर्ति आहे; आणि तुमच्याशी वागण्याचा प्रसंग आला म्हणजे मोठे हुशार, फार सावध, राहिलें पाहिजे असें बहुतेक लोक समजतात."

शहासुजाचा भाऊ दिवसेंदिवस प्रबळ होत चालला तेव्हां दरबारच्या मंडळीची काळजी अर्थातच वाढत चालली आणि ह्या प्रसंगीं तुम्ही मदत करा असें ते एल्फिन्स्टनसाहेबाला ह्मणूं लागले त्यावर त्याने आपल्याला तो अधिकार नाहीं, कलकत्यास गव्हरनर जनरल यांस लिहिलें पाहिजे, असें उत्तर दिलं तेव्हां त्यांना मोठे आश्चर्य वाटलें " तुह्मी इंग्रज मोठे आपमतलबी आहां, शहाबरोबर तह करून प्रसंगीं आपल्याला त्याची मदत मिळावी ह्मणतां आणि त्याला मात्र तिच्या बदला तुह्माला कांहीं देतां येत नाहीं ह्मणता, असली कसली वकिली करावयाला आला अहां हो " असें ह्मणून त्यांनीं त्याचा उपहास केला. त्यांच्या भाषणांतला मुद्देसूदपणा, युक्ति आणि नेट पाहून एल्फिन्स्टनसाहेबाला गप्प बसावें लागलें. पुढें त्यानें त्यांना अनुकूल असेंच गव्हरनर जनरलाकडे लिहून पाठविलें. ते ह्मणाले " दोन राजांचा तहनामा होऊन स्नेह झाला तर तो खरा ह्मणण्याला आणि कायम टिकण्याला त्यांतून

कोणाही एकावर प्रसंग आला तरी दुसऱ्यानें त्याचें हित साधण्यास सिद्ध असलें पाहिजे, तर त्यांचें नांव स्नेही. आपल्यावर संकट आलें तर दुसऱ्यानें आपल्यास सहाय होऊन तें वारावें एवढीच इच्छा करणाराला स्नेही कसें ह्मणावें ? शहामहमुदाचें दुराणी लोकांवर वजन मुळींच नाहीं. शहासुजाला हुसकून देऊन त्यानें गादी मिळविली तर तिचा उपभोग घडण्याला त्याला इराणी लोकांचा आश्रय धरावा लागेल; पूर्वीं तो त्यांच्याच आश्रयास राहिला होता आणि त्याचा ओढा स्वभावतः त्यांच्याकडे आहे. ह्या देशाच्या गादीला त्याचा पाय लागला तर फ्रेंच आणि इराणी लोक तत्काळ सिंधू-नदावर आलेच समजा. अफगाण लोक बलाढ्य आहेत. ते परक्या लोकांना आपल्या देशांत येऊं देणार नाहींत. फ्रेंच आणि इराणी आले तर त्यांच्याशीं लढण्याला इंग्रजांची मदत त्यांना पाहिजे असें नाहीं; परंतु ते चालून येण्यापूर्वीं शहासुजा गादीस मुकला तर तुह्मी त्याच्याशीं तह करण्याचा जो एवढा खटाटोप केलात तो मात्र सारा निष्फळ होईल, आणि तुह्मी पश्चात्ताप पावाल. आतां प्रसंगीं उपयोगीं न पडतां मागाहून सावकाश मदत करण्याचें मनांत आणाल तर त्याचा कांहीं उपयोग होणार नाहीं. बरें, आतां दुसऱ्या पक्षीं असें समजूं कीं, शहासुजा गादीवर राहिला, परंतु त्याला आपल्या बंडखोर भावाचा पुरा मोड करवला नाहीं, त्याच्याशीं नित्य लढतच रहावें लागलें, आणि तशांत फ्रेंचांचा आणि इराणी-चा हल्ला आला तर त्यांच्यापुढें त्याचा निभाव लागणार नाहीं. तशी वेळ येऊन ठेपली तर मग तुम्ही कितीही मदत करतों म्हटलेंत तरी व्यर्थ आहे. आतां जें हजारांनीं काम होईल तें मग लाखों खरचलेंत तरी होणार नाहीं." त्यांच्या एकंदर भाषणांत असें दिसलें कीं, फ्रेंचांच्या आणि इराणींच्या स्वारीची ते कांहीं मोठीशी भीति बाळगीत नव्हते. आपल्यांतलाच एक पक्ष त्यांना सामील होईल तर मात्र जड जाईल ह्मणत. परंतु एकंदरींत ते मोक-ळ्या मनानें एवढें कबूल करीत कीं, त्यांची धाड आली तर जसें इंग्रजांना तसेंच आम्हालाही भय आहे खरें.

एल्फिन्स्टन साहेबानें गव्हरनर जनरलाला पत्र पाठविलें, त्यांत तो ह्मणतो, "मी त्यांना असें उत्तर केलें कीं, फ्रेंच आणि इराणी चालून येतील तर त्यांच्यापासून संरक्षण व्हावें एवढ्या पुरता तह करावा असा मला हुकूम आहे. अफगाण लोकांच्या घरगुती तंट्यांत पडण्याचें आपण कधींही मनांत आणणार

नाहीं हें मला माहीत आहे. घरगुती तंटे मोडून शहासुजाच्या राज्यास बळकटी यावी आणि परके शत्रु येतील त्यांना पुढें पाऊल घालूं देतां येऊं नये असें सामर्थ्य त्याचे अंगीं यावें ही आपली सहजच इच्छा असेल, परंतु त्याचा बंडखोर भाऊ फ्रेंच व इराणी यांस सामील झाला आहे अशी आपली पक्की खात्री होईपर्यंत त्या प्रकरणांत आपण पडावें अशी आपल्या मनाची प्रवृत्ति होणार नाहीं हें मला माहीत आहे, ह्मणून मी त्याप्रमाणें बोललो. आणखी असें सांगितलें कीं, आम्ही अगदीं निर्लोभपणानें, केवळ परोपकार बुद्धीनें, तुमच्याशीं स्नेह करावयाला आलों आहों असें नाहीं हें खरें आहे. कारण, असें उघड न बोलावें तर शहाला असा संशय येईल कीं, याच्या मनांत कांहीं तरी कपट आहे, आणि ते आपल्या हृष्टोत्पत्तीस येऊं नये हा यांचा बेत आहे. इराणी लोकांशीं शहामहमुदाचा संबंध असल्याची तुम्हाला कांहीं बातमी लागली असली तर मला सांगा, असे मी त्यांना वरचेवर ह्मणत असतो; परंतु ते मला हमेशा असे उत्तर देतात कीं, त्याचा त्यांच्याशीं कांहीं संबंध असेल असें आह्मांला वाटत नाहीं."

शहासुजाबरोबर तहनामा व्हावा ह्मणून एल्फिन्स्टन साहेब त्याच्या मुत्सद्दी मंडळीशीं अनेक प्रकारे बोलत होता तसें ते शहामहमदाचें बंड दिवसेंदिवस वाढत चाललें होतें ते मोडण्याकरितां त्याच्याकडून कोणत्या तरी प्रकारची मदत मिळावी ह्मणून त्याची विनवणी करीत होते. फ्रेंच आणि इराणी आले तर तुह्मांला मोठें संकट पडेल, त्यांच्याशीं लढलें पाहिजे, नाहींतर तुमचें राज्य बुडेल असें तो बोलला, परंतु त्यांची ते कांहीं भीति बाळगीत नाहींत असेंच त्याला दिसलें. त्याला वजीरानें सांगितलें कीं त्यांना येऊं देऊं नये हा तर शहाचा निश्चय आहेच, परंतु जरी ते आले तरी तुह्मी ह्मणतां, किंवा तुह्मांला वाटत असेल तेवढा त्यांचा कांहीं बाऊ नको. हिरात, कंदाहार, काबुल, पेशावर, हीं शहरें घ्यावयाला दहा हजार फ्रेंच जरी आले तरी भ्यावयास नको; त्यांच्यावर एक मुद्दाम शिपाई पाठवावयाला नको; एका मुल्लानें एक शब्द तोंडांतून काढण्याची कायती फुरसत, तितक्यांचा संहार होऊन जाईल.

याप्रमाणें उभयपक्षीं भाषणें चाललीं होतीं. तहनामा व्हावा ह्मणून एल्फिन्स्टन साहेब अतिशय झटत होता. त्याला काल अनुकूल होता. शहासुजाची सद्दी फिरत चालली. तो पेशावरास आल्यावर थोड्याच दिवसांनीं भावानें

कंदाहार घेतल्याची बातमी आली त्याच्यापुढें आपला निभाव लागणार नाहीं असें त्याला वाटूं लागलें. एल्फिन्स्टन साहेबाच्या ह्मणण्याप्रमाणें कबूल झालें तर कदाचित् इंग्रजांची मदत मिळेल ह्या आशेनें तो तहनाम्यास कबूल झाला आणि तारीख १९ एप्रिल सन १८०९ रोजीं त्यानें तहनाम्यावर सही करून दिली. तहनाम्यांत मुद्दा कायतो एवढाच होता कीं, फ्रेंच आणि इराणी लोक मिळून अफगाणिस्थानावर चालून येतील तर त्यांना हटवून लावण्याकरितां शहाला गव्हरनर जनरलानें द्रव्यद्वारा मदत करावी. ते दोघे एक असेपर्यंत शहानें त्यांच्याशीं लढून त्यांना हटवून माघारें लावावें आणि आपल्या मुलखांत कोणाही फ्रेंचाला कधींही ठेऊन घेऊं नये. याप्रमाणें उभयतांचा स्नेहसंबंध जुळून तो तहनामा गव्हरनर जनरलाचे सही करितां एल्फिन्स्टनसाहेबानें रवाना केला तेव्हां त्याचा जीव स्वस्थ झाला.

एल्फिन्स्टन साहेबाचा मुक्काम पेशावरास चार महिने होता तितक्या काळांत सर्व जातींच्या लहानथार अफगाण लोकांची माहिती करून घेण्याविषयीं तो सतत झटत होता. त्याला पुष्कळ लोक भेटावयाला येत, आपल्या देशासंबंधानें गोष्टी सांगत, व त्याच्या ऐकत. तरी तो कांहीं विशेष चौकशा करूं लागला आहेसें दिसलें ह्मणजे तेव्हांच बिथरत, त्याच्या बरोबर सरव्हेअर ह्मणजे मुलखाची पाहणी करणारा होता त्याने एकदां तेथलाच एक हिंदुमनुष्य रोज मजुरीनें ठेऊन घेतला आणि त्याच्या मार्फत कांहीं क्षुल्लक गोष्टींची चौकशी आरंभिली; त्याबरोबर त्यांना जबर संशय आला. तें पहातांच त्यानें त्याला सांगून तें काम बंद करविलें. परंतु तारीख १५ मार्चच्या रोजनिशींत असा लेख आहे.—इराणांतली बातमी कळावी ह्मणून नीट व्यवस्था लाविली. काबूल, कंदाहार, हिरात, येज्द, मेशद, आणि तेहेरान, येथें बातमीदार नेमले.

पेशावरच्या आसपासचा मुलुख पाहून एल्फिन्स्टन साहेबाला मोठा आनंद झाला. मग कदाचित तेव्हां वसंतऋतु नुकताच लागलेला असल्यामुळें त्याला तो रमणीय वाटला असेल. तो त्याविषयीं असे ह्मणतो—येथें बाग पुष्कळ असून ते अतिशय टवटवीत आहेत. हिंदुस्थानांत नेहमी रखरखीत उन्हाळा असतो; तेथें बागेवर असा तजेला कधींच दिसत नाहीं. मैदान मुलखांतून पुष्कळ ओढे नाले वहात आहेत, आणि त्यांच्या काठांवर उइलो (
व टामारिस्क ( ) झाडांची गर्दी आहे. मुलूखभर परसांत प्लम (
) पिच ( ) आपल ( ) पीयर ( )

क्विन्स (          ) आणि पपनसें या झाडांची गर्दी असून त्यांवर फुलांचा असा बहार लोटला आहे कीं, तसा आजपर्यंत दुसऱ्या कोठें माझ्या दृष्टीस पडलाच नाहीं. जी बिन् लागवडीची पड जमीन आहे तीवर दाट, नरम, आंखुड गवत आहे. त्याची शोभा अप्रतिम दिसते. तशी एक इंग्लंड शिवाय करून बहुधा कोठें आढळत नाहीं. मैदान मुलखाच्या बहुतेक भागावर उत्कृष्ट लागवड केलेली आहे. पिकास पाटाचें आणि कालव्याचें पाणी आहे. एवढ्याच विस्ताराच्या मुलखांत इतर ठिकाणीं याहून अधिक लोकवस्ती कोठें नसेल. लेफ्टनंट माकार्टनें साहेब यानें एका उंचवट्यावर उभें राहून आसपास चार मैलांच्या हद्दींतलीं खेडीं मोजून टिपून घेतलीं तीं ३२ भरलीं. तीं बहुतकरून मोठालीं असून पहाण्यासारखीं स्वच्छ व नीटनेटकीं आणि त्यांतल्या बहुतेकांच्या सभोंवार पुष्कळ झाडें आहेत."

तेथील लोकांविषयीं त्यानें असें लिहिलें आहे—"खेड्यापाड्यांतील लोकांचा सभ्यपणा तर नांवाजण्यासारखाच आहे. आह्माला ते आपल्या बागांतून वरचेवर बोलावून नेत. बहुतेक गांवांतून जो जो मनुष्य आह्माला पाही तो आमचें स्वागत करी. माझ्या बरोबरच्या गृहस्थानां आपल्या घरीं येण्याविषयीं ते फार आग्रह करीत, केव्हां केव्हां त्याच्या घोड्यांचे लगाम धरून उभे करीत आणि आज नाहीं तर पुढे केव्हांतरी तुमच्या घरीं येऊन उपहार करून जाऊं असें वचन घेत तेव्हां सोडीत. कोणी कोणी हातावर हात घेत आणि हा सर्व प्रकार खैबर घांटाच्या शेजारीं होत असे. तेथचे लोक कसे लुटारू आहेत याविषयीं मागें लिहिलेंच आहे." शिवाय त्यानें आणखी एक गोष्ट लिहिली आहे ती अशी—एक आर्मीनियन व्यापारी काबुलास जावयास निघाला होता; तो पेशावरपर्यंत येऊन ठेपला आणि तेथे त्याने त्या खैबरी लोकांच्या ज्या एक एक विलक्षण गोष्टी ऐकल्या त्यांनीं तो इतका घाबरला कीं, त्याला पुढें जाण्याचें धैर्य होईना. तेथून काबुलास जाण्याला त्याला सारे ११ दिवस लागले असते, परंतु ती वाट सोडून तो मुलतानाकडून जाणें पुरवलें ह्मणाला. तिकडून सवादोन महिने लागतात."

हिंदुस्थानातल्या आणि अफगाणिस्थानांतल्या मुसलमानांत एल्फिन्स्टन साहेबाला अंतर दिसलें तें त्यानें याप्रमाणें लिहिलें आहे.—थोर अफगाण गर्विष्ठ नाहींत, असणारा क्वचित् एखादा त्यांचेच वंशज हिंदुस्थानांतले मुसलमान त्यांच्याहून अगदीं निराळे; ते अतिशय बढाईखोर आणि रिकामी बडबड

करणारे. त्यांनां डामडौल आणि आदरसत्कार यांची हौस फार असून त्यांत उद्दामपणा आणि क्रूरपणा दाखविण्याचीही आवड असते. अफगाण लोकांची चाल रीत अगदीं साधी असते. त्यांचे सरदार बहुतकरून नम्र असतात, त्यांच्या रीतिभाति वाईट असल्या तर त्या गांवढळ तऱ्हेच्या असतात; त्यांत क्रूरपणा केव्हांही नसतो. ”

एल्फिन्स्टन साहेबाला जे लोक भेटायला येत त्यांत दोन गृहस्थ मोठे प्रतिष्ठित होते. त्यांतल्या एकाला इंग्रजांच्या बारीक सारीक प्रकरणांची सुद्धां माहिती होती. दुसरा मोठा विद्याभिलाषी होता. तो जर तशा प्रकारच्या लोकांच्या सहवासांत दुसऱ्या कोठें असता तर नामांकित पंडित झाला असता. एल्फिन्स्टन साहेबानें त्यांच्याविषयीं असें लिहिलें आहे–मिरझा गिरामीखान हा एका इराणी सरदाराचा मुलगा होता. तो मुनशी बशी म्हणजे हुजूर चिटणीस होता. तो हिंदुस्थानांत फिरून आमच्या चाली अगदीं लक्ष लाऊन फार बारकाईनें पाहून आला होता. युरोपखंडाचे भाग कसे पडलेले आहेत, त्यांत राज्यें किती आहेत, ही माहिती अफगाणिस्थानांत फार थोड्या लोकांना आहे; युरोपाच्या इतिहासांतल्या आमच्या गोष्टींतली एक सुद्धां हिंदुस्थानांत कोणी ऐकिलेली नाहीं; असें असतां त्याला पुष्कळ माहिती होती, ह्मणून ती पाहून मला मोठें आश्चर्य वाटलें. एक दिवस मंडळी जमली होती आणि गोष्टी बोलतां बोलतां मी ह्मटलें इ. स. १७४५ पासून आजवर आमच्या देशांत केव्हांही बंड झालेले नाहीं. तें ऐकून त्या मंडळीला मोठेंच आश्चर्य वाटलें. मग समुद्रावर आमचें प्राबल्य मोठें आहे असेंही मी बोललो. तें सर्व त्याणें मुकाट्यानें ऐकून घेतलें आणि सारी मंडळी उठून गेल्यावर मग तो हंसत हंसत मला ह्मणाला ‘ साहेब तुमची आपल्या अमेरिकन भाईबंदांबराबर जी लढाई झाली ती तुह्मी विसरलां वाटतें ! बरें ते असो, परंतु मी आतां आणखी एक गोष्ट विचारतों तेवढी खरी सांगा. तुमचें आरमार मोठें आणि समुद्रावर जर तुह्मी मोठे प्रबळ अहां तर फ्रेंच लोकांच्या खासगी लढाऊ गलबतांना जय कसा आला, आणि हल्लीं गलबतांच्या विम्याचा दर जो इतका चढला आहे त्याचें कारण काय ?

मुल्ला बैहरामंद हा गृहस्थ एकांतप्रिय आणि विद्याव्यासंगी आहे, परंतु तो स्वतः खरोखर बुद्धिमान आणि त्याला ज्ञानसंपादनाची हौस अतोनात आहे. तो आपल्या देशच्या अध्यात्मज्ञानांत आणि नीतिशास्त्रांत

पारंगत असून त्याला गणितशास्त्राचा ध्यास आहे. संस्कृत हें नांव सुद्धां त्याच्या देशबंधूंत कोणा एकाला माहीत नाहीं, परंतु हिंदूंच्या सरस्वती-भांडारांत काय काय सांठवलेलें आहे तें पहावें ह्या बुद्धीनें तो ती गीर्वाण भाषा शिकत आहे."

काश्मीरांत बंड झालें होतें तें मोडून तेथें आपला अम्मल बसवावा म्हणून शहासुजानें अमीर उल्मुलुख नामक सरदाराची तिकडे रवानगी केली होती. त्याला पहिल्यानें जय आला, परंतु अखेर पराभव पाऊन तो पेशावरास निघून आला. त्याचरात्रीं एल्फिन्स्टनसाहेबावर मोठा प्रसंग गुदरत होता, परंतु त्याच्या सुदैवानें तितक्यांत अक्रमखान वजीर तेथें आला ह्मणून निभावलें. तो प्रकार असा—काबुलास शहामहमुदाकडे जाण्याकरितां रवाना झालेला एक पंडित वाटेंत सांपडला आहे, त्याच्याजवळ पत्रें होतीं, आणि पैसाही असावा, अशी आफवा उठली. तींत लौकरच आणखी भर पडून शहासुजानें इंग्रज वकिलाला लुटून घेण्याचा निश्चय केला आहे आणि त्याचा हुकूम थोडक्या वेळांत येईल, असें चोंहोकडे पिकलें. ती बातमी पसरण्याबरोबर सुमारें ५०० लोक दरवाजा भोंवते जमले आणि शहरांतल्या साऱ्या मोहल्यांत लोक हत्यारें सरसाऊं लागले. इतक्यांत अक्रमखान तेथें आला तेव्हां कांहीं तरी चूक होऊन ही गप्प उठली असावी असें कळलें. मग ते जमलेले लोक कोणाला कांहीं इजा न करतां किंवा गैर न बोलतां निघून गेले. एल्फिन्स्टनसाहेब ह्मणतो अक्रमखान वजीर सुदैवानें तितक्यांत तेथें आला ह्मणून बरें झालें. कारण ते लोक रात्रभर तसेच तेथें राहते आणि कोणी एकादा शहाचा हुकूम आला असें ह्मणता किंवा आणखी एकादी आकस्मिक गोष्ट घडती, किंवा आमच्या हातून कांहीं दांडगाई होती, तर सारे आमच्यावर तुटून पडते.

काश्मिरावर गेलेल्या फौजेचा पराभव झाला अशी बातमी आली तेव्हांपासून शहासुजा गादीवर निभावण्याची निराशा पुरी झाली. त्याची मुत्सद्दी मंडळी आतां काय करावें ह्या काळजींत पडली. आतां पुढचा विचार पहावा ह्मणून सरदार मंडळी एकत्र जमली आणि त्यांनीं एल्फिन्स्टनसाहेबाला बोलाऊन आणून तुह्मीं ह्या प्रसंगीं कांहीं तरी चांगली मदत करा असा आग्रह केला. परंतु त्याचें बोलणें आपलें एक, होतें तें कायम. त्यांच्यांतला एक असामी आंतून शत्रूला सामील होता तो तें ऐकून जरा दांडगाईचें आणि निंदास्पद भाषण करूं लागला. परंतु बाकीच्यांनी त्याचें तोंड लागलेंच बंद केलें आणि

तो विषयच सोडून देऊन दुसऱ्या गोष्टी काढल्या. तूर्त आमच्या देशांत अस्वस्थता असल्यामुळें तुमचा आदरसत्कार आमच्या हातून जसा व्हावा तसा झाला नाहीं, आमच्या देशांतल्या ज्या गोष्टी तुम्हाला पाहण्यासारख्या आहेत त्या दाखवतां आल्या नाहींत, आणि पाहुणचार करतां आला नाहीं, याबद्दल आम्हांस वाईट वाटतें असे बोलून त्यांनीं ती कचेरी बरखास्त केली. एल्फिन्स्टनसाहेब म्हणतो " यानंतर मग पैशासंबंधानें किंवा इतर कोणत्याही प्रकारें मदत व्हावी अशी गोष्ट कोणीं एकाने ही मजजवळ काढली नाहीं. परंतु माझ्या आदरातिथ्यांत किंवा मानमरातबात अखेरपर्यंत एक दिवस कधीं काही इतकें कमी पडलें नाही. "

इंग्रजांकडून आपल्याला मदत होण्याची शहासुजाला अगदीं निराशा दिसली तरी त्यानें त्यांच्या वकिलाला इतके दिवस ठेऊन घेतलें याचें आश्चर्य वाटतें. परंतु त्याचें कारण असें असावें कीं एवढ्या लव्याजम्यानिशीं तो आपला स्नेह संपादण्याकरितां बसला आहे असे लोकांस दिसल्यानें त्यांस व आपल्या शत्रूस आपली शक्ति मोठी आहे असें भासून आपल्याला सहज मोठेपणा येईल असें त्यास वाटलें असावें. एल्फिन्स्टन साहेबाचा मुक्काम सुमारें चार महिने तेथें होता. मराठे दरबारी मंडळीच्या दुटप्पी वर्तनापेक्षां अफगाण लोकांचा मनमोकळेपणा आणि उघडपणे वागण्याच्या रीतिभाति त्याला अधिक आवडत असत. त्याचा तो काळ आनंदांत गेला. तरीपण तो ज्या कामाकरितां गेला होता तें नीटसें तडीस जाण्याचा रंग दिसेना आणि जनरल आर्थर वेलेस्लीला स्पेनमध्यें लढाईत जय आल्याची बातमी आली तेव्हां आपण त्याच्या हाताखालीं गेलों असतों तर बरें होतें असे त्याला वाटू लागलें असा त्याचा लेख आहे.

शहासुजाला पैशाची फार जरूर होती म्हणून त्याणें सिंधप्रांत इंग्रजांस मक्त्यानें द्यावा असें मनास आणलें. परंतु वजिरामार्फत बोलणें लाविलें नाहीं मुल्ला जाफराकडून बलत उल्ला एल्फिन्स्टन साहेबाकडे गेला आणि सिंधप्रांत तुम्ही घेत असाल तर पहा; दरमहा दोन लाख रुपये दिलेत म्हणजे पुरे असें बोलला. त्याला त्याणें असें उत्तर केलें कीं आम्हाला नको; कारण जर उद्यां फ्रेंच येथें आले तर आमचा पैसा फुकट जाणार. तें कसें होईल तें होऊ, परंतु आधीं आम्हाला आपलें राज्य वाढविण्याची इच्छाच नाहीं.

एल्फिन्स्टन साहेबानें याप्रमाणें त्याला उत्तर दिलें खरें, परंतु सिंधच्या अमीरांकडे फ्रेंचांनीं व इराणीनीं संधान बांधलें आहे, गव्हरनर जनरला कडून त्यांच्याकडे वकील गेला होता, त्याची कांहीं दाद लागली नाहीं, असें त्याला वर्तमान कळलें तेव्हां नीट विचार करतांना हा प्रांत आपल्या हातीं येईल तर बरें असें त्याला वाटलें आणि त्याणें त्याप्रमाणें लागलेंच गव्हरनर जनरलाकडे लिहिलें. त्याचे विचार हिंदुस्थानसरकाराला कांहीं पसंत पडले नाहींत. तिकडून उलट जबाब अगदीं खरमरीत आला. परंतु तेथपर्यंत तो पेशावराहून निघून पंजाबांत आलासुद्धां होता. मग हसन अबदुल येथून त्याणें पुनः पत्र लिहिलें. त्यांत आपण जें काय लिहिलें होतें तें आपल्यास जी काय माहिती मिळाली तिच्या आधारावर रचलें होतें, ती जर चुकीची ठरली तर आपल्यास क्षमा असावी असें ह्मणून पुढें तो प्रांत आपल्या हातीं असणें कसें जरूर वाटलें, तो घेण्यांत अन्याय कितीसा होणार आहे, तो शहाकडून घेणें बरें किंवा जिंकून घेणें बरें इत्यादि अनेक गोष्टींचा पूर्ण विचार केला होता. अखेर गव्हरनर जनरलाकडून त्याला लिहून गेलें त्यांत तीन लक्ष पौंड शहाला देऊं करावे आणि एवढ्याला हा व्यापार कांहीं गैर नाहीं, आपल्या नफ्याचाच आहे, अशी मनाची खात्री होत असेल तर करावा असा त्याला अधिकार मिळाला. परंतु प्रथम जी संधी आली होती ती निघून गेली. मग उपयोग काय ?

पुढें सन १८३९ मध्यें हिंदुस्थान सरकारानें सिंधप्रांत घेतला, तेव्हां एल्फिन्स्टन साहेबानें प्रथम तो घ्यावा ह्मटलें त्यावेळीं जीं कारणें सांगितलीं होतीं त्यांपक्षां कांहीं निराळीं पुढें आणलीं नाहींत. यावरून त्याचे विचार गैर होते कीं योग्य होते तें सहज दिसतें. असो.

शहासुजानें तहनाम्यावर सही करून तो एल्फिन्स्टन साहेबाच्या हवालीं केला आणि पुढें चारच दिवसांनीं त्यानें कंदाहारास जी फौज पाठविली होती तिचा पराभव होऊन अगदीं दुर्दशा उडाल्याची बातमी आली. काश्मिरावर जी फौज गेली होती तिचा पराभव झाला अशी बातमी आधींच उठली होती ती अगदीं खरी अशी दुसरी बातमी त्याच दिवशीं आली. शहामहामुदानें काबूल घेऊन लुटलें. त्या लुटीनें तो चांगला गबर झाला आहे, गिल्झाई आणि कझलबशी लोक त्याला अनुकूल झाले आहेत आणि ते आतां पेशावरावर चालून येणार; तो निघाला ह्मणजे आसपासचे लोक ही त्याला सामील होणार

अशी बातमी येऊन थडकली तेव्हां सारें दरबार आणि शहर अगदीं गलबलून गेलें. आतां येथें राहण्यांत कांहीं अर्थ नाहीं असें एल्फिन्स्टन साहेबास दिसलें. परंतु काश्मिरांत पराभव पावलेली फौज परत येईपर्यंत राहवयाचें असा त्यानें निश्चय केला.

तारीख ४ जून हा इंग्लंडच्या चौथ्या जार्ज राजाचा वाढ दिवस होता, ह्मणून त्याच्या सन्मानार्थ नेहमींच्या वहिवाटीप्रमाणें एल्फिन्स्टन साहेबानें आपल्या बरोबर असलेल्या शिपाई लोकांची कवाईत केली. ती पहाण्यास अक्रमखान वजीर कितीएक खान व सुमार ५० स्वार बरोबर घेऊन आला होता. एका उंचवट्यावर बसून त्यानें कवाईत पाहिली. त्याच्या सभोंते पुष्कळ दुराणी लोक जमले होते, त्यांच्याशीं तो मोकळेपणानें बोलत होता. त्या लहानशा फौजेची टापटीप आणि शिक्षण पाहून सर्वांना मोठें आश्चर्य वाटलें आणि ते ह्मणाले दुराणी लोकांना जर अशी कवाईत आली तर ते पाहिजे त्याला जिंकतील. मग आपल्या देशांतील आपसांतल्या तंटेबखेड्यांबद्दल नेहमींप्रमाणें हळहळून ते निघून गेले.

त्याच तारखेच्या रोजनाम्यांत एल्फिन्स्टनसाहेबानें असें लिहिलें आहे—काश्मिरांत पराभव पावलेली फौज परत आली. ती सुमार ६००० आहे. तींतला इराणी दुराणी हा भेद न पहातां पायच्या शिपायास दहा रुपये आणि घोड्यावरच्यास वीस रुपये प्रमाणें सर्वांस सरसकट शहानें दिले असें ह्मणतात. आतां दरबाराला बराच दम आला आहे असें दिसतें, परंतु मला वाटतें हा उगाच भ्रम आहे. सामान्य लोक सुद्धां असें ह्मणतात कीं, फौज बेदिल झालेली आहे. शिवाय आतां पुढें काय करावयाचें हा कांहींच विचार ठरलेला दिसत नाहीं. जो एक सरदार सर्वांत श्रेष्ट आहे, त्यावर सर्वांचा बेभरवसा दिसतो. मला वाटतें आतां शहासुजा गादीस मुकणार. परंतु (मुसलमान ह्मणतात त्याप्रमाणें) ईश्वर महा समर्थ आहे. त्याच्या विचित्र लीलेचे तऱ्हेवाईक उलटसुलट मासले जसे ह्या मुलखांत दिसतात तसे दुसऱ्या कोठेंही नसतील. महमूद शहाकडून मला पत्र आलें त्याचें मी उत्तर दिलें नाहीं. आमचें सरकार कोणालाच साहाय्य करणार नाहीं, तटस्थ राहील असें मी सांगितलें. मी आपलें जडभारी सामान अटकेस पाठवून देणार होतों. परंतु शहासुजा मला ह्मणाला मी येथें असेपर्यंत, निदान

आणखी कांहीं दिवस तरी, जाऊं नका. मला आपल्या बरोबर काबुलास न्यावें असा त्याचा हेतु आहे. त्यानें बोलतां बोलतां मला तसें सुचविलें.

आतां भाऊ येऊन आपल्याला जिंकतो असें शहासुजाला पक्कें कळलें तरी त्यानें कांहीं धीर सोडला नाहीं. आणखी एकवार लढाईला उभें राहून नशिबाची अखेरची परीक्षा पहावी, असा त्यानें निश्चय केला. एल्फिन्स्टन साहेबाचें आगतस्वागत त्यानें अगदीं अखेरपर्यंत उत्तम प्रकारें केलें हें त्याला भूषणावह होतें. एल्फिन्स्टन त्याचा अखेर निरोप घ्यावयास गेला तेव्हां तो आदरपूर्वक उत्कंठेनें त्याला ह्मणाला "तुह्माला आणखी कांहीं दिवस ठेऊन घ्यावें असें माझ्या मनांत होतें; परंतु हाल्लीं आमच्या राज्यांत अस्वस्थता झालेली आहे; अशा स्थितींत तुह्माला रहाण्याचा आग्रह करणें कांहीं बरोबर नाहीं. असल्या प्रसंगांत राहण्याची तुह्माला कांहीं संवय नसेल. तुह्माला जा ह्मणणें मला मोठें जड वाटते आहे खरे, परंतु तुह्माला संकटांत पाडणेंही बरें वाटत नाहीं. तर तुह्मी सरहद्दीवर जाऊन कोठेंतरी रहा आणि माझा जय पराजय काय होणें असेल तें एकदा होऊन गेलें ह्मणजे ती बातमी कळल्यावर पाहिजेतर इकडे माघारे या नाहींतर हिंदुस्थानात निघून जा; जसें तुह्माला सोईचें वाटेल तसें करा."

याप्रमाणें अखेरची भेट होऊन निरोप घेतल्यावर तारीख १४ जून सन १८०९ रोजीं एल्फिन्स्टनसाहेब पेशावराहून निघाला तो सिंधूनद उतरून अटक शहरावरून हसन अबदाल येथे येऊन पंधरा दिवस तेथें राहिला इकडून गव्हर्नर जनरलाकडून त्याला माघारें येण्याविषयीं पत्र गेलें होतें तें तेथें पोहोंचलें. शहासुजा काबुलावर चालला होता, त्याला शहामहमुदानें वाटेंत नीमलाहा येथें अकस्मात गांठलें आणि लढून अगदीं पराभव केला; तेव्हां तो पळून पहाडांत गेला परंतु आठ दिवसांनीं माघारा फिरून पेशावरास आला. तेथचे खैबरीलोक त्याला अनुकूल असल्यामुळें तेथें शत्रूचा इलाज चालत नव्हता. तो अजून तें ठाणें धरून आहे, त्याचा वज़ीर अक्रमखान लढाईत पडून मेला, परंतु मरतां मरतां त्यानें शत्रूकडचा एक मोठा सरदार भाला भोंसकून ठार मारला" अशी तिकडची बातमी एल्फिन्स्टन साहेबाला कळली. मग तेथून निघून तो शीख मुलखांत रावळपिंडीस आला. तेथून पुढें येण्याला रणजितसिंगाची परवानगी मिळेपर्यंत कांहीं दिवस त्याला तेथेंच रहावें लागलें. शहासुजाचा जनानखाना (बायकामुलें) पेशवराहून निघून पंजाबांत शिखांच्या आश्रयास

आला. त्याचा, विशेषतः पिंडीचा सरदार जेवनसिंग याचा, शहासुजाशीं बरेच दिवसांचा स्नेहसंबंध होता. त्यानें त्याचा परामर्ष चांगला घेतला. अंधळा झालेला माजी बादशहा झमानशहा येथेंच होता, त्याची एल्फिन्स्टन साहेबानें भेट घेतली. त्याच्याविषयीं त्यानें असें लिहिलें आहे:-"हा प्रसिद्ध पुरुष, त्याच्याविषयीं तुमच्या मनांत जशी कल्पना येत असेल तसाच, ह्मणजे सुंदर, दिलदार आणि प्रौढ आहे. त्याच्यावर दुर्दैव कोसळलें असल्यामुळें त्यानें निरुत्साह दिसणें सहजच आहे; परंतु तो अगदीं उदास किंवा खिन्नवदन नाहीं. त्याच्या तोंडाला विद्रूपता येई अशा तऱ्हेनें कांहीं डोळे बिघडलेले नाहींत. ज्या देशांत त्याणें फौजांवर फौजा नेऊन जय मिळविले त्याच देशांत त्याला अंध होऊन पळून येऊन बसावें लागलेलें पाहून वाईट वाटतें. शिख लोकांना देखील त्याची दया येते."—झमानशहानें त्याचा सत्कार केला आणि तैमूरलंगापासून एकेका बादशहाच्या दुर्दैवाच्या आणि घोर मरणाच्या गोष्टी सांगितल्या.

एल्फिन्स्टन साहेब शीखांच्या मुलखांत आला, तेव्हां त्यांचा पादशहा (रणजितसिंगाला ते पादशहा ह्मणत) पटणकोट येथें असून कोटेकानग्रह ह्मणजे नगरकोट घेण्याच्या तयारीस लागला होता. त्या शहराला नेपाळच्या राजानें वेढा घातला होता. एल्फिन्स्टन साहेबाच्या मनांत त्याला भेटावयाचें होतें, परंतु भेट झाली कीं नाहीं कळत नाहीं. शीख लोकांविषयीं त्याच्या मनाचा ग्रह कांहीं चांगला झाला नाहीं. त्यांच्यांत सभ्यपणा नाहीं आणि ते दारूबाज आहेत असें त्याला वाटलें. तो सारा पंजाब उलटून आला, परंतु त्यांत त्याणें माणिक्याल एवढेंच एक ठिकाण पाहिलें. तेथच्या बुद्धाच्या देवालयाचें चित्र त्याणें आपल्या पुस्तकांत दाखल केलें आहे. त्याची बांधणावळ ग्रीक तऱ्हेची आहे, हें प्रथम त्याणें ओळखिलें. लुधियाना येथें इंग्रजांची छावणी होती तींत तो आला तेव्हां आतां आपल्या लोकांत येऊन पडलों असें त्याला वाटलें.

पंजाबांत आल्यावर एल्फिन्स्टन साहेबानें आपला मित्र स्ट्राची याला एक पत्र लिहिलें. त्यांत तो ह्मणतो, हल्लीं मी प्रवास करीत आहें, तरी मन उदास होण्याचें कांहीं राहत नाहीं. तरी ह्या उदासपणावर मी एक लहानसें पुस्तक (pamphlet) लिहिलें आहे. त्याचें शेवटचें पृष्ठ आतां लिहिणार होतों आणि त्यांत असें सिद्ध करून दाखविणार होतों कीं, ज्या पुरुषांची अशी वृत्ति

होते त्यांच्या हातून कोणतेंही महत्कृत्य होत नाहीं. इतक्यात आरिस्टॉटल याच्या ग्रंथांतील एक वाक्य माझ्या दृष्टीस पडलें. अलीकडे तुमची वृत्ति तशी होत नाहीं परंतु मागें तिणें तुह्मालाही गांठलें होतें. याजकरितां तें वाक्य तुह्मांला लिहून पाठवितों. "तत्वज्ञान, राजनीति, काव्य, किंवा कलाकौशल्य, यांतून कोणत्याही एकाद्या विषयांत जे कोणी मोठे विख्यात पुरुष होऊन गेले त्या सर्वांना उदासीनतेनें गांठलेलें होतें असें दिसतें."

शहासुजाबरोबर ठरलेल्या तहनाम्यावर तारीख १९ एप्रिल रोजीं सही, शिक्कामोर्तब होऊन एल्फिन्स्टन साहेबानें तो गव्हरनर जनरलाकडे बहाल होण्याकरितां पाठविला. त्याप्रमाणें कलकत्त्यास लॉर्ड मिंटोनें तारीख १४ जून रोजीं आपल्या सही शिक्यानिशीं तो मुकरर केला. इकडे त्याच दिवशीं एल्फिन्स्टन साहेबानें पेशावर सोडलें. आफगाणिस्थानांत लागलीच राज्यक्रांति होऊन शहासुजाला उभें रहाण्याला जागा नाहींशी झाली. त्याणें आपला खजानखाना पंजाबांत पाठविलाच होता आणि मागोमाग आपणही पळत सुटून त्याला येऊन गाठलें. सुमारें तीस वर्षें तो तसाच तेथें होता. अखेर त्याचें आणि इंग्रजांचें दुर्दैव एकदम उभें राहून लॉर्ड ऑक्लंड याला त्याला काबुलास नेऊन गादीवर बसविण्याची बुद्धि उत्पन्न झाली. त्याप्रमाणें त्याला पुनः बादशाहीचा टिकला लागण्यास फारसे प्रयास पडले नाहींत, परंतु तो टिकला मात्र नाहीं. सन १८४१।४२ च्या हिंवाळ्यांत सारेच अफगाण लोक एकदम चवताळून उठले आणि त्यांणीं इंग्रजांच्या फौजेचा फडशा उडविला. बिचारा शहासुजाही प्राणास मुकला. त्याचा जीव कोणी दुष्टानें दग्यानें घेतला. त्याच्याबरोबर दुराणी वंश संपला.

एल्फिन्स्टन साहेब लुधियानाहून दिल्लीस रमत रमत गेला. तेथें तो सप्टंबरमध्यें ह्मणजे पेशावराहून निघाल्यापासून तीन महिन्यांनीं पोहोंचला. शहासुजाचा त्याणें अखेर निरोप घेतला, तेव्हांच खरें ह्मटलें ह्मणजे तो ज्या कामगिरीवर गेला होता ती संपली. परंतु त्याणें आणि त्याच्या बरोबरच्या मंडळीनें गेल्यापासून काय काय केलें, कोणते कोणते मुलूख पाहिले, त्यांची स्थिति कशी आहे, वगैरे सर्व हकीगतीचा रिपोर्ट होऊन यावयास पाहिजे होता. ह्मणून 'काबुलमिशन' हें त्या स्वारीचें नांव सन १८१० च्या जून महिन्यापर्यंत कायमच होतें. एप्रिल महिन्यांत गव्हरनर जनरलाच्या मनांत त्याला पुनः पाठवावें असें आलेलें असावें असें देखील दिसतें. जूनमध्यें त्याला

कलकत्त्यास येण्याविषयीं हुकूम झाला. तेथपर्यंतचा काळ रिपोर्ट तयार करण्यांत गेला. त्याच्या बरोबर जी अंमलदार मंडळी होती, त्यांच्याकडे त्याणें एक एक प्रकरण सोंपविलें आणि खुद्द आपण आफगाणिस्थानांतील राज्यव्यवस्था व तेथील लोकांच्या रीतिभाति या विषयावर लिहिलें. पेशावरास असतांना पाहिजे तशी माहिती मिळवतां आली नाहीं, विचारपूस करूं लागतांना लोकांस संशय येऊन भलतेंच होईल असें दिसलें तेव्हां तो नाद अगदीं सोडून द्यावा लागला होता. बहुतेक माहिती इकडे आल्यावर, तिकडचे जे आफगाण व इतर लोक त्याच्या स्वारीबरोबर आले होते, त्यांच्याकडून व जे दिल्लींत आणि तिच्या आसपासच्या मुलखांत भेटले त्यांच्यापासून मिळवावी लागली. त्याच कामाकरितां तो, हरिद्वारास मोठी जत्रा भरली तेव्हां मुद्दाम गेला आणि रोहिलखडांत आफगाण लोक कायमचे राहिलेले होते त्यांच्याकडे गेला. कलकत्यास गेल्यावर सन १८१० च्या अखेर अखेर त्याणें तो रिपोर्ट सरकारांत गुदरला. तो कांहीं छापून प्रसिद्ध झाला नाहीं. इंडिया आफिसाच्या दफ्तरांत कोठें पडला आहे त्याचा पत्ताही नाहीं. कलकत्याहून त्याणें आपल्या बहिणीस पत्र पाठविलें त्यांत तो ह्मणतो; मी आज अडीच वर्षें बाहेर होतों आणि इतक्या काळांत सुमारें ५००० मैल फिरलों.

ह्याप्रमाणें काबूलच्या वकिलीच्या कामाची परिसमाप्ति झाली, तीपासून इंग्रजांना कायमचा नफा किंवा नुकसान कांहींच झालें नाहीं. एल्फिन्स्टन साहेबाच्या चरित्रांत त्याची ही स्वारी ह्मणजे एक उपाख्यान झालें. इकडून जातेवेळीं त्याच्या दृष्टीसमोर जे एक एक मनोरथ उभे राहिले होते, ते सारे भग्न झाले ह्मणून तो ओशाळल्यासारखा झाला. त्याला आपल्या पत्रांत किंवा रोजनाम्यांत ह्या काळाबद्दल उल्लेख करण्याचा प्रसंग आला, तर तो त्याविषयीं कांहीं आनदानें लिहीत नसे. उलटें तो असें ह्मणत असे कीं, "काबूलच्या स्वारीनें माझ्या अंगांतलें महत्वाकांक्षेचें वेड पार काढून टाकलें." परंतु तीमुळें त्याला अनुभव पुष्कळ आला, आणि अंगावर जबाबदारी पडली ह्मणजे कसें वागलें पाहिजे तें मनांत चांगलें ठसलें; त्याचें नांव विलायतेंत प्रसिद्ध झालें आणि अखेर ग्रंथकार मंडळींत पडलें.

---

# भाग. ८.

## पुण्याचा रेसिडेंट. सन १८११–१८१५.

एल्फिन्स्टन साहेब कलकत्त्यास पोहोंचल्यावर थोड्याच दिवसांनीं त्याची नेमणूक पुण्याच्या रेसिडेंटाच्या जागेवर झाली. ती जागा मुद्दाम त्याच्याकरितां राखून ठेविलेली होती असें दिसतें. तेथचा कायमचा रेसिडेंट सर बारी क्लोज याची नेमणूक सन १८१० त कांहीं विशेष कामगारीकरितां हैदराबादेस होऊन तो तिकडे गेला होता आणि त्याच्या जागीं मिस्टर रसेल काम करीत होता. क्लोज साहेब हैदराबादेहून माघारा आलाच नाहीं. पेशवे आणि त्यांच्या पदरचे जाहागिरदार व इतर सरदार यांच्यामध्यें कांहीं कटकट सुरू होती, ती मिटवणें इंग्रज सरकारास अवश्य वाटलें. तें काम करण्यास चांगला हुशार मनुष्यच पाहिजे होता. एल्फिन्स्टन साहेब स्वारी करून माघारा आला तेव्हां कांहीं वयानें मोठा नव्हता; सरासरी तिशीच्या उमरीचा, जवान होता. परंतु काबुलाला रवानगी होण्यापूर्वीच हुशारीविषयीं त्याची ख्याति झालेली होती. मराठी दरबारांची त्याला माहिती चांगली होती; पुण्यास त्याणें पूर्वी काम केलेलें होतें आणि सर आर्थर वेलेस्लीचे विचार त्याला चांगले माहीत होते; ह्मणून त्या जागेला तोच योग्य असें कलकत्तासरकारांत ठरून त्याची नेमणूक झाली.

काबूलच्या वकिलींत कांहीं मोठेंसें यश आलें नाहीं, खर्च फार झाला आणि सिंधप्रांत साधल्यास घ्यावा ह्मटल्याबद्दल गव्हनरजनरलाकडून विनाकारण ठपका मिळाला. ह्मणून वाईट वाटून त्याला मोठेपणा मिळवण्याची हौस राहिली नाहीं. आतां थोडीं वर्षें बिन दगदगीनें काम करून निर्वाहाची तजवीज ( पेनशन ) झाली ह्मणजे चाकरी सोडून देऊन स्वस्थ बसावयाचें असें त्याणें मनांत आणलें होतें. परंतु ईश्वरी संकेत कांहीं निराळा होता. मराठी राज्याचा शेवट त्याच्या हातानें लागावयाचा होता आणि इतिहासांत त्याचें नांव चिरस्थायी व्हावयाचें होतें; खरा राजकार्यधुरंधर अशी त्याची कीर्ति गाजावयाची होती; वकिली सुटून त्याच्या हातून राज्यकारभार व्हावयाचा होता; त्याच्या चरित्रांतील ह्या उत्तर भागास तो पुण्यास गेल्यापासून सुरवात झाली.

एल्फिन्स्टन साहेब कलकत्त्यास गेल्यापासून आपल्या स्ट्राची वगैरे मित्र-मंडळींत होता, परंतु मागच्या खेपेस त्याचे दिवस जसे आनंदांत आणि करमणुकींत गेले तसे आतां गेले नाहींत; ह्मणून शहर सोडतांना कठीण वाटलें नाहीं. तरी चौरंघी चौकांतून येतेवेळीं वाईट वाटलें आणि तोंडांतून—

Looked on stream and tree and plain
As what I ne'er might see again.

असे शब्द निघाले. काबूलच्या वकिलीसंबंधानें सर्व काम आटपून रिपोर्ट झाल्यावर तो ता. ७ जानेवारी सन १८११ रोजीं दक्षिणेंत यावयास निघाला. मागच्या खेपेस पायरस्त्यानें प्रवास झाला होता; आतां जलपर्यटण करावें असें मनांत आणून तो "हमुदी" नांवाच्या एका आरबी गलबतांत बसून निघाला. त्याच्यावरचा नाखुदा अबिसीनियन गुलाम होता; खलाशी आणि उतारू मंडळी अनेक जातींची, एकंदर २५ भाषा बोलणारी होती. त्यांत हेनरी मार्टिन ह्मणून एक पाद्री प्रकृतीस बरें नसल्यामुळें हवा पालटण्याकरितां आरबस्थानास जावयास निघालेला होता. तो मोठा विद्वान्, स्वभावानें अत्यत सौम्य, उल्हासवृत्ति, आणि अतिशय गमत्या होता. त्याच्याशीं एल्फिन्स्टन साहेबाचा स्नेह जमला. त्याच्याविषयीं त्याणें असें लिहिलें आहे:—तो मला वाटलें होतें त्यापेक्षां फारच चांगला सोबती भेटला. त्याला ल्याटीन, ग्रीक, वगैरे सात आठ भाषा येत असून केंब्रीज येथें गणिती ह्मणून नांवाजलेला होता. तो अतिशय धर्मनिष्ठ असून त्या नाखुदाबरोबर धर्मविषयावर वाद करतो; पवित्र अपवित्र सर्व विषयांवर बोलतो; आपण हंसतो आणि दुसऱ्याला हसवतो; तें इतकें कीं, कोणी ह्मणेल कीं हा काफर आहे:—

तें गलबत सीलोन ( लंका ) बेटांत थोडे दिवस थांबून पुढें गोव्यास जाऊन लागलें. तेथें पोर्तुगीज सरकारचे दरबारीं क्याप्टन शुइलर ह्मणून इग्रजांचा वकील होता, त्याणें त्याला लागलेंच बोलाऊन नेलें त्या रात्रीं त्याच्या येथें बाल ( नाच ) होता. ह्मणून पुष्कळ मंडळी जमली होती, तींत जनरल वेलेस्लीबरोबर लष्करांत असतांना ओळख पडलेले कांहीं लोक होते, त्यांच्या अकस्मात् भेटीनें त्याला मोठा आनंद झाला. त्यांच्याबरोबर त्यावेळच्या गोष्टी झाल्या. मग दुसरे दिवशीं व्हास्को डी गामा, आल्बुकर्क, झेव्हियर, वगैरे प्रसिद्ध पुरुषांच्या कबरा त्यानें पाहिल्या. क्याथलिक धर्माच्या उलट मताचे जे कोणी असतील त्यांना कोंडून ठेऊन शिक्षा करण्याचें स्थळ

" इन्क्विझिशन " नामक जी इमारत होती ती त्याच्या मनांत पहावयाची होती, परंतु इग्रज लोकांना तींत जाऊं देत नसत ह्मणून त्याला ती पहावयास मिळाली नाहीं. तेथच्या एका उंच देवळावर चढून त्याणें आसपासचा देखावा पाहिला; तो फार सुंदर आणि रमणीय होता. तेणेंकरून त्याला मोठा संतोष झाला आणि तेथें कसला एक शब्दही ऐकूं येत नव्हता, ह्मणून त्या शांत स्थळीं सहा महिने खुशाल बसून अभ्यास करावयास सांपडेल तर बरें होईल असें त्याच्या मनाला वाटलें.

गोव्याहून निघून एल्फिन्स्टनसाहेब मुंबईस गेला. तेथें त्याचा मित्र माल्कम साहेब होता, त्यानें त्याचें स्वागत केलें. सर जेम्स म्याकिंटॉश ह्मणून तेथें रेकार्डर होता त्याची त्याणें ओळख करून दिली त्याला एल्फिन्स्टन साहेबाची हुशारी तेव्हांच दिसून आली. त्याच्या तोंडून त्यानें अफगाणिस्तानाकडील हकीकत ऐकून घेतली आणि त्याला सांगितलें, तुह्मी तिकडे जें काय पाहिलें असेल तें सारें लिहून, छापून प्रसिद्ध करा. एल्फिन्स्टनसाहेबाविषयीं त्यानें असें लिहिलें आहे:—' त्याची बुद्धि फार नामी आहे, तो अत्यंत विनयशाली आणि मोठा साध्या वागणुकीचा आहे."——म्याकिंटॉश साहेबाचा जांवई अर्स्किन ह्मणून होता, त्याची तेव्हांच ओळख झाली आणि दोघांचा जो स्नेह जमला तो पुढें विलायतेंत जाऊन अर्स्किन मरेपर्यंत अव्याहत चालला होता. एल्फिन्स्टन इकडच्या भाषांचा अधिक अधिक अभ्यास करूं लागला आणि व्यवहारशास्त्राच्या, कायद्याच्या, अभ्यासास लागून त्यांत प्रवीण झाला तो त्याच्या प्रेरणेनें.

एक दिवस म्याकिंटॉश, माल्कम आणि एल्फिन्स्टन एकत्र बसले असतां ' हिंदुस्थानाचा इंग्लंडाला उपयोग कितीसा आहे ' हा विषय निघून त्यावर अगदीं कडाक्याचा वाद झाला. म्याकिंटॉश ह्मणाला, " आह्माला ह्यापासून कांहीं मोठासा फायदा आहे असें नाहीं, कारण समुद्रापलीकडे आमच्या ताब्यांत जे देश आहेत त्यांत ह्याची योग्यता अगदीं कनिष्ठ ठरते. उत्तर अमेरिकेसारखीं जीं ठाणीं आहेत, ज्यांपासून द्रव्य आणि सैन्य ह्या दोहींची मदत होते, तीं पहिल्या प्रतीचीं उत्कृष्ट होत; वेस्ट इंडीज बेटांसारखीं जीं आहेत, ज्यांपासून द्रव्य मिळतें, आणि सैन्य जरी मिळत नाहीं तरी आमच्या आरमाराची शक्ति वाढते, तीं दुसऱ्या प्रतीचीं होत; हिंदुस्थान खरोखर त्यांच्या खालच्या प्रतीचें ठरतें. कारण येथचे शिपाई हिंदुस्थानाच्या बाहेर न्यावे असें

कोणाच्या मनांत येत नाहीं. हिंदुस्थान दिसावयाला आणि कानांनीं नांव ऐकावयाला मोठें आहे, परंतु त्यापासून आमच्या राज्याला नव्या इंग्लंडापासून जितका फायदा होतो तितका सुद्धां होत नाहीं."

ह्यावर मालकम आणि एल्फिन्स्टन यांनीं काय काय उत्तरें दिलीं तें त्यानें लिहून ठेविलें असतें आणि त्यांचे विचार कळते तर बरे होतें. हिंदुस्थानापासून आह्माला फायदा कांहीं नाहीं, ही इंग्रजांची ओरड आतांहि आहे. परतु तेव्हांच्या आणि आतांच्या स्थितीला जमीन अस्मानाचें अंतर आहे. शंभर वर्षांपूर्वीचें ह्मणणें कदाचित् तेव्हां खरे असेल, परंतु आतां हिंदुस्थानांतली फौज हवी तिकडे नेतां येते वगैरे गोष्टी मनांत आणून ह्या प्रश्नाचा निकाल करावयाचा आहे.

कलकत्याहून निघाल्यापासून सुमारें पांच महिन्यांनीं ह्मणजे सन १८११ च्या मे महिन्यांत एल्फिन्स्टन साहेब पुण्यास जाऊन पोहोंचला आणि काम पाहू लागला. गेल्या नऊ वर्षांत पेशवे दरबारांत पहिल्यापेक्षां अंतर पडलें होतें. इंग्रजांचे साहाय्य मिळाल्यापासून बाजीराव गादीवर निर्भय होता, परंतु त्यांची फौज चाकरीस ठेवून घ्यावी लागली हें कांहीं त्याला बरें वाटत नव्हतें. तो मनांत संतापत होता, परंतु त्याला ते कांहीं बाहेर दाखवितां येत नव्हतें यशवंतराव होळकरानें पुण्यांत आणि आसपासच्या मुलखांत जो अनर्थ उडवला, त्यामुळें सन १८०३ मध्यें जसा जबर दुष्काळ पडला तसा दक्षिणेंत पूर्वी कधींच पडला नव्हता. मुलखांत शांतता झाल्यापासून पुढें लौकरच हळूहळू आबादानी होत चालली होती. बाजीराव इंग्रजी पलटणांच्या आश्रयाच्या जोरावर आपल्या पदरच्या जहागिरदारांना त्रास देत होता आणि प्रसंगीं उपयोगीं पडावा ह्मणून पैसा सांठवून ठेवीत हाता.

पुण्यांत आल्यापासून एल्फिन्स्टन साहेबाचा लेखनवाचनक्रम पहिल्याप्रमाणें सुरू झाला. सरकारी कामही तो मोठ्या मेहेनतीनें करीत असे. पेशवे आणि त्यांच्या पदरचे दक्षिणेकडील जहागीरदार यांच्या दरम्यान फार दिवस लढा पडलेला होता. त्याचा उलगडा पाडण्याचें काम त्याच्याकड आलें. हें सर्वांत मोठें होतें. इंग्रजसरकारचे वकील परदरबारीं पुष्कळ ठिकाणीं आहेत, परंतु त्यांचीं कामें आणि इंग्रजांचीं पलटणें ज्या राजांनीं आपल्या पदरीं नोकरीस ठेऊन घेण्याचा करार केला त्यांच्या दरबारीं त्यांचा जो वकील रेसिडेंट या नांवानें असतो, त्याचें काम यांत अंतर असतें हें कांहीं सांगावयास पाहिजे आहे असें

नाहीं. अशा राजांकडून त्यांनीं जे करारनामे करून घेतले, त्यांत मुख्य एक कलम असें घातलें कीं, राजेसाहेबांनीं परदरबाराशीं कोणत्याही प्रकारचा संबंध ठेऊं नये, काय बोलणें असेल तें आमच्या रेसिडेंटामार्फत बोलावें. तेव्हां अर्थातच कोणाचाही एकमेकांशीं संबंध राहिला नाहीं. सारीं तोंडें बंद झालीं. मराठ्यांचा इतर राजे रजवाड्यांशीं संबंध पुष्कळच होता, तो सारा ह्या करारानें एकदम बंद झाला, आणि त्यांच्याशीं जे काय वाद, तंटे बखेडे होते ते सारे तुटावयाला रेसिडेंटाकडे गेले. चाकरीस ठेऊन घेतलेल्या इंग्रजसरकारच्या पलटणांनीं राज्याचें संरक्षण करावें, त्याला बाहेरून कोणाचाही उपद्रव लागूं देऊं नये; आंतली राज्याची व्यवस्था राजेसाहेबांनीं आपली आपण पाहिजे तशी ठेवावी; असें ह्या तहनाम्याचें स्थूल स्वरूप होतें. परंतु त्यांतील करारांप्रमाणें कांहीं वागणूक घडत नसे. ह्मणून सारा लगाम आपल्या हातांत ठेऊं पाहणाऱ्या इंग्रज सरकाराला मुलखांत शांतता आणि स्वस्थता रहावी ह्मणून मध्यें पडावें लागे आणि राजेसाहेबांच्या पूर्ण अधिकाराचा दुरुपयोग होऊं नये ह्मणून कामांत हात घालावा लागे. आपल्या बरोबर तहनामे ठरून आपले दोस्त झालेल्या राजेरजवाड्यांच्या अधिकारांत व राजव्यवस्थेंत इंग्रजसरकारनें हात कितीसा घालावा ह्याविषयीं हिंदुस्थानांतील मुत्सद्दीमंडळींत मतभेद पुष्कळ आहे.

पेशव्यांचा आणि इंग्रजांचा जो वसईस तहनामा झाला, त्यांत इतर राजे रजवाड्यांबरोबरच्या वर सांगितलेल्या मुख्य कलमांपेक्षां एक कलम जास्त होतें. बाजीरावाला त्याच्याहून बलवान असे दुसरे कोणी लुटूं लागतील तर त्यांपासून त्याचें संरक्षण इंग्रजांनीं केलें पाहिजे असा ठराव असून शिवाय त्याच्या चाकरीस ठेविलेली फौज ‘ बंडखोरांना जेरीस आणून शिक्षा करण्याच्या कामीं लावावी ’ असा करार होता.

वसईचा तह झाला त्या वेळीं खुद्द पेशव्यांच्या अमलांतलि मुलखांत अगदीं बेबंदशाई झालेली होती, ती मोडून नीट व्यवस्था लावावी आणि बाजीरावाचा अम्मल नीट सुरळीत चालूं लागावा ह्या उद्देशानें तें कलम घातलेलें होतें. त्यांतले शब्द संदिग्ध असले तरी खरा हेतु एवढाच होता. वसईची लढाई झाल्यावर तारीख १५ जानेवारी सन १८०४ रोजीं जनरल वेलेस्ली यानें गव्हरनर जनरलास पत्र लिहिलें त्यांत तो ह्मणतो—“बाजीरावाचा अधिकार त्याच्या मुलखांत फक्त नांवाला उरला आहे, खरा मुळींच चालत

नाहीं. पुण्यापासून पांच मैलांवर भीमातीरीं जो मुलूख आहे त्याचा सुद्धां बंदोबस्त त्याणें केलेला नाहीं. सांप्रत तो वैराण झालेला आहे आणि चोरटे लुटीत आहेत. पंत प्रधान आपलें राज्य स्वतः चालवण्याला समर्थ नाहींत.

याप्रमाणें राज्यांत जी सारी अंदाधुंदी आणि बंडाळी माजली होती ती मोडून हळूहळू व्यवस्था लागत चालली. सन १८११ त एल्फिन्स्टन पुनः पुण्यास आला तेव्हां मुलखाच्या स्थितींत पहिल्यापेक्षां पुष्कळच अंतर पडलेलें दिसत होतें, आणि पेशवे सरकारच्या मुलखांत साऱ्या ठिकाणीं त्यांचा अम्मल सुरळीत चालूं लागला होता. परंतु साऱ्या राज्यांत कांहीं तसें होत नव्हतें. राज्यापैकीं सुमार निम्मे भाग मोठमोठ्या जहागीरदारांना तोडून दिलेला होता. पेशवे सरकार कोठें बाहेर स्वारीला जावयास निघाले आणि त्यांना बराबर चला असा हुकूम झाला ह्मणजे लुटीचें संधान दिसल्यास ते सारे एक होत. तसें कांहीं काम नसलें ह्मणजे आपसांत एकमेकांबराबर भांडत बसत. केव्हां केव्हा ते यजमानाबरोबरही भांडत. पुण्याच्या दरबारांत जेव्हां कोणी कर्ता मनुष्य दिसेनासा झाला तेव्हां ते पेशव्यांस जुमानीतनासे झाले.

बाजीराव गादीवर बसल्यावर राज्यांत जी अव्यवस्था झाली ती संधी साधून ह्या जहागीरदारांनीं आणखी मुलूख बळकावला, परंतु पुढें जेव्हां इंग्रजांनीं लढाई सुरू केली तेव्हां एक शिवाय करून बाकीचे सारे दूरदूर राहिले. पेशव्यांकडून आणि त्यांच्या पदरच्या ह्या जहागीरदारांकडून आपल्याला कांहीं मदत होत नाहीं ह्मणून जनरल वेलेस्ली कंठशोष करीत होता. बाजीरावाच्या अंगांत कांहीं सामर्थ्यच नाहीं, ह्मणून त्याच्याकडून मदत होत नाहीं कीं त्याणें आमच्याशीं तह करून आतां बेमानपणा आरंभिला आहे ह्मणून असें होत आहे, काय ह्मणावें नकळे; असा त्याला केव्हां केव्हां संशय पडे. त्याला खुद्द पुण्यांत सुद्धां लष्कराला सामान मिळेना. जाहागीरदारांना समजाऊन त्यांच्याशीं मिलाफ करून घ्या असें इंग्रज सरकार बाजीरावाला जरी वरचेवर आग्रहानें सांगत होतें तरी त्याणें कांहीं एक केलें नाहीं. ते जाहागीरदार दुर्मुखल्यासारखे, असंतुष्ट होऊन बसले होते. कोणी कोणी आपल्या घरांत तंटे काढून भांडत होते. हें त्यांचें रुसून बसणें इंग्रजांच्या पथ्यावरच पडलें. त्यांची रसद बहुतेक म्हैसुराकडून येत असे. ते न्रिथरते आणि जर ती वाटेंत मारते तर साऱ्या मोहिमेचा विध्वंस होऊन भलतेंच झालें

असतें. परंतु त्या स्वारींत पेशव्यांचा पदरच्या ह्या जाहागीरदारांची पथकें नाहींत हें पाहून शत्रूंनां धीर येई आणि इंग्रजांना वरचेवर त्यांची आठवण होई.*

ती लढाई संपल्यावर बाजीरावाला ताळयावर आणावें ह्मणून जनरल वेलेस्ली यानें आपली शिकस्त करून सोडली, परंतु तो कांहीं केल्या वळेना. हे जहागीरदार बुडवावे असा त्याच्या मनाचा अगदीं पुरा संकल्प होता. चुका उभयपक्षीं होत्या, नाहीं असें नाहीं, परंतु श्रीमंत अगदीं हट्टास पेटले; त्यांणीं दुराग्रह धरल्यानें कांहींच बोलणें चालेना. अखेर हे बंडखोर आहेत असें ह्मणून चाकरीस ठेवलेल्या फौजेकडून त्यांनां वठणीस आणून शिक्षा करावी असें ते ह्मणू लागले.

जनरल वेलस्लीनें असें मनांत आणलें कीं तुह्मी जोंपर्यंत इमानें इतबारें पेशवे सरकारची चाकरी कराल तोंपर्यंत तुमच्या जाहागिरींस धक्का लागणार नाहीं असें ह्या सरदार मंडळीस आश्वासन द्यावें आणि बाजीरावाचा त्यांजवरचा अम्मल चालू द्यावा. या मुख्य मुद्यांवर त्यांच्याकडून करार करून घ्यावे असं सांगून त्याणें स्ट्राची साहेबाला त्यांच्याकडे पाठविलें. त्याणें जाऊन तुकतेंसें बोलणें सुरू केलें, कांहीं असामींनीं तें ठीक आहे ह्मणून मान्य केलें आणि कांहींनीं सरासरी हू ह्मटलें; इतक्यांत तिकडे होळकराबरोबर चांगलीच लढाई जुंपणार असा रंग दिसला तेव्हां त्याला तें तितकेंच टाकावें लागलें. कारण तें आरंभल्याप्रमाणें शेवटास नेण्याला पुष्कळ इंग्रजी फौज आणून उभी करावयास पाहिजे हाती. ह्मणून आतां राहूं दे, पुढें पाहूं, अशा विचारावर राहिलें.

लॉर्ड वेलेस्ली गव्हरनर जनरलीचें काम सोडून गेल्यावर त्यानें आरंभिलेलीं कारस्थानें उलटलीं. नव्या गव्हरनर जनरलाचें मत त्याच्या अगदीं उलट. दुसऱ्या राजांच्या भानगडींत आपण पडावयाचें नाहीं हा नियम होऊन पुण्याच्या रेसिडेंटाला हुकूम गेला कीं, पेशवे आणि त्यांचे जाहागीरदार यांच्या दरम्यान तुह्मीं अगदीं कांहीं बोलूं नये. मग तें प्रकरण कांहीं वर्षे तसेंच पडलें. परंतु मुलखांत जेव्हां गडबड उडूं लागली, तेव्हां इंग्रजसरकार जागें झालें आणि आतां कांहीं तरी केलें पाहिजे असें वाटून त्यांणीं एल्फिन्स्टन साहेबास

---

* जनरल वेलेस्ली याचीं तारीख ४ जून व तारीख २४ जुलै सन १८०३ चीं पत्रें गव्हरनर जनरलास गेलेलीं आणि तारीख १८ जूनचें कर्नल क्रोज यास गेलेलें पत्र पहावें.

हुकूम केला कीं, ह्या साऱ्या प्रकरणाचा नीट विचार करून मुजरत रिपोर्ट करावा. ह्या कामाकरितांच त्याची नेमणूक झाली होती असें ह्मटलें तरीसुद्धां हरकत नाहीं.

एल्फिन्स्टन साहेबानें पुण्यास जातांच तें काम हातीं घेऊन चार महिन्यांत ह्मणजे आक्टोबरांत सरकारास रिपोर्ट पाठविला. त्यांत पेशव्यांचे आणि जहागीरदारांचे संबंध कसे कसे होते तें अगदीं मुद्देसूद, फार चांगल्या रीतीनें दाखवून सन १८०४ मध्यें जनरल वेलेस्लीनें जो तोड काढली होता, त्याच मार्गानें आतांही जावें आणि तंटा मिटवावा असें लिहिलें होतें. पेशव्यांचे हक्क अमुकच आहेत असें कांहीं कोठें नक्की ठरलेलें नाहीं मराठ्यांचा अम्मल सुरू झाला तेव्हांपासून चालत आलेल्या वहिवाटीप्रमाणें निरनिराळ्या प्रकारांनीं चाललें आहेत तसे असतील असें त्याला प्रथम वाटलें होतें, परंतु साऱ्या सरदारांजवळचे कागदपत्र जेव्हा त्यानें आणवून पाहिले, तेव्हां जो काय संशय होता तो दूर झाला. कोल्हापूरचे महाराज हे तर साताऱ्च्या छत्रपतींचे भाईबंद असून त्याचें राज्य अगदीं स्वतंत्र होते. कित्येक सरदारांनां मराठेशाई स्थापन करणाऱ्या पुरुषांनीं जाहागिरी दिल्या होत्या तव्हांच्या सनदा त्यांच्याजवळ होत्या. परंतु अलीकडच्या काळांतलेच पुष्कळ होते. त्यांच्याकडे मुलूख कसे चालावयाचे ते ठराव स्पष्ट असून त्यांचे कागदपत्र हजर होते. तेव्हां तंट्याचा निकाल लागण्याला कांहीं हरकत येण्यासारखी नव्हती; मात्र एक नड दिसत होती आणि ती मोठी होती. उभयपक्षी मनें बिघडलेलीं होतीं तंटा पुष्कळ दिवस चालला असल्यामुळे त्यांत अधिकाधिक भर पडत चालली होती. जहागीरदारांनीं धामधुमीच्या वेळीं जो मुलूख साधला होता तो सोडून द्यावयास ते कांहीं कबूल नव्हते त्यामुळें खरोखर भानगडीचे कांहीं प्रश्न उत्पन्न झाले होते. बाजीराव तर हट्टास पेटला होता; त्याणीं अगदीं बेहेड्यांतील अक्षरशः करारांप्रमाणें चाललें पाहिजे असें ह्मणत बसला होता

एल्फिन्स्टन साहेबाचा विचार असा होता कीं जाहागीरदारांकडून नोकरी घेण्याचा पेशव्यांचा अधिकार आहे, त्याप्रमाणें त्यांना नोकरी करावयाला लावावें. त्यांनीं गैरहक्कानें जो मुलूख बळकावलेला असेल तो सोडून द्यावयास लावावें आणि तुह्मी कराराप्रमाणें वागत असाल तोंपर्यंत तुह्मांला बाजीरावाकडून उपसर्ग लागणार नाहीं, याजबद्दल जामीन आह्मी आहों; असें त्यांना इंग्रज सरकारानें आश्वासन द्यावें. याप्रमाणें ह्या तंट्यांत आपण पडून निकाल

त्यावणें जरूर आहे किंवा नाहीं ह्या प्रश्नाचा उलगडा करण्याचें त्यानें कलकत्ता सरकारावरच सोंपविलें होतें. लॉर्ड मिंटोनें नीट विचार करून लांबलचक मिनिट लिहिलें; त्यांत जाहागीरदारांकडून नोकरी घेण्याचा हक्क पेशवे सरकारचा खराच आहे असें पूर्णपणें शाबीद केलें. त्यांच्या तंट्यांत आपण पडावें कीं नाहीं, हा प्रश्न निराळा होता, त्याचाही त्यानें चांगला विचार केला. पेशव्याच्या मुलखांत राज्यव्यवस्था नाहींशी झाली आहे, आपल्या बरोबरच्या तहनाम्यांत बाजीरावानें जे करार केले आहेत ते पुरे करून देणें त्याच्या हातून होत नाहीं, पेंढाऱ्यांच्या उपद्रवापासून आपल्या मुलखाचें संरक्षण करण्याचें सुद्धां त्याला सामर्थ्य नाहीं अशा पंचास गोष्ट आलेली आहे, तेव्हां मुलखांत शांतता आणि बंदोबस्त होण्याकरितां आह्माला त्यांत पडलेंच पाहिजे असें त्यानें ठरविलें.

एल्फिन्टन साहेबाचा अभिप्राय असा होता कीं आतां ह्या गोष्टीचा निकाल लांबणीवर टाकणें बरें नाहीं; कारण बाजीराव किंवा ते जाहागीरदार यांपैन कोणीही जरी शिरजोर झाला तरी मुलूखभर दंगा माजेल. जाहागीरदार बाजीरावाला जुमानीतनासे झाले, त्याची चाकरी करीत नाहीं ह्मणाले, तर मग ते आपआपसांत भांडत बसतील, नाहींतर बाहेर दुसरे राजे रजवाडे आहेत त्यांना जाऊन मिळतील. तसें झालें ह्मणजे मग आह्मांला त्यांचा विचार करावा लागेलच लागेल.

हे जाहागीरदार बुडवावे असा बाजीरावाचा हेतु आहे तो आमच्या मदतीशिवाय, आपल्या फौजेच्याच जोरावर त्याला तडीस नेतां आला तर मग विशेषच बंडाळी होईल. तसें होणें फार अनिष्ट आहे, याजकरितां काय होईल तें होऊंदे असें ह्मणून आह्मांला मौज पहात बाजूस रहातां येत नाहीं, असें सर आर्थर वेलस्ली साहेबानें ह्मटलें होतें. एल्फिन्स्टन साहेबानें सर्वांवर आणखी एक निराळेंच कारण दाखविलें आणि तें त्याच्यामतें सर्वांत अग्रगण्य होतें. तो ह्मणाला श्रीमंतांच्या राज्यव्यवस्थेंत एक मोठा दोष असा आहे कीं त्यांच्या अम्मलदारांचें मुलखांत वजन थोडें आहे आणि त्यांच्या हाताखालीं जे प्रांत आहेत ते आबाद असले काय आणि नसले काय, त्यांना त्याची काळजी थोडीच आहे? जहागीरदारांची गोष्ट याहून अगदीं निराळी आहे, आणि शिवाय इतर प्रांतांपेक्षा त्यांच्या त्या मुलखांत ते असणें अगदीं जरूर आहे. ते एवढाले मोठाले इतके सरदार बुडाले तर त्यांच्या ताब्यांत जो मुलूख आहे त्यांत पुष्कळ

बंडाळी झाल्याशिवाय राहणारच नाहीं, आणि ती मोडणें पेशव्यांच्या पदरा जे अम्मलदार आहेत, त्यांच्या हातून होईल हें मनांत सुद्धां आणण्यास नको."

एल्फिन्स्टन साहेबानें जो रिपोर्ट केला त्यांत मुख्य मुद्दे वर सांगितल्याप्रमाणें होते. त्यांवर ज्या कांहीं शंका उद्भवण्यासारख्या होत्या त्यांचेंही त्यानें समाधान केलें होतें. आणि तें काम शेवटास नेण्यास सैन्य किती लागेल, व व्यूह कसा रचावा लागेल, तेंही सुचविलें होतें. पूर्वी स्ट्राची साहेबाची त्या कामावर योजना झाली होती तेव्हां त्याच्या हातून ते तडीला गेलें नाहीं त्याचें कारण होळकराबरोबरचें युद्ध वगैरे हें तर खरेंच, परंतु दुसरें उभयपक्षांचा आणि त्यांत ही विशेषें करून बाजीरावाचा, हट्ट आणि अयोग्य बोलणें, हें होतें. एल्फिन्स्टन ह्मणतो त्या वेळीं सुद्धां जाहागीरदार नोकरी करण्याला अगदीं कबूल होते. स्ट्राची साहेबाचें मत असें होतें कीं, ते इतके कबूल झाल्यावर बाजीरावानें जर त्यांना छळण्याचें मनांत धरलेलं साडून दिलें असतें, त्यांचे मागचे कांहीं अपराध असते तरी त्यांची क्षमा केली असती, आणि मागच्या बाक्या काढून हिशेबाची जिकीर लावण्यापेक्षां ती सूट देतों ह्मटलें असतें, ह्मणजे त्याचवेळीं सारा निकाल लागत होता.

हें प्रकरण एल्फिन्स्टन साहेबापुढें आलें तेव्हांची वेळ मागच्यापेक्षां निराळी, जशी हवी तशी होती; त्यानें नेट चांगला धरला आणि त्याला फौजेचें पाठबळ हवें तेवढें होतें. त्यामुळें कोणतीच अडचण उरली नाहीं. बाजीरावानें आपल्या नेहमीच्या लपंडावी युक्त्या चालविल्या होत्या, परंतु त्या साऱ्या लटपटून अखेर त्याला मान्य व्हावें लागलें. एल्फिन्स्टन साहेबानें काम जारीनें चालविलें असल्यामुळें त्याणें मागच्या खेपेस जसे फंद केले होते तसे करण्याला त्याला या वेळेस मुळीं सवडच मिळाली नाहीं.

एल्फिन्स्टन साहेबानें ही सर्व हकीगत आपल्या रोजनाम्यांत व स्ट्राची साहेबाला पत्र पाठविलें त्यांत लिहिलेली आहे. तो ह्मणतो " ह्या जाहागीरदारांपासून आह्माला भय होतें. लढाईच्या प्रसंगीं ते आमच्या कुशींत कांटे सलत असल्यासारखे होते, ह्मणून त्यांचा बंदोबस्त करणें भाग होतें. माझे विचार लॉर्ड मिंटो साहेबांस पसंत पडून त्यांच्याकडून हुकूम येतांच मी त्या कामाला लागलों. माझा बेत काय आहे हें पेशव्यांना किंवा जाहागिरदारांना कोणालाच कळूं देणें बरें नव्हतें, ह्मणून मी फार गुप्तपणें तयारी चालविली.

कोल्हापूरचे महाराज आणि सावंतवाडीकर देसाई यांच्या बद्दलचाही विचार याचवेळीं करून टाकण्याचा मी निश्चय केला. ”

महाराज खरें ह्मटलें तर स्वतंत्र होते. परंतु बाजीराव ते आपल्या ताब्यांतलेच आहेत, त्यांच्याशीं स्वतंत्र तह करण्याचा इंग्रजांना अधिकार नाहीं ह्मणूं लागला. मालवणचा किल्ला सिंधुदुर्ग त्यांच्या ताब्यांत असून तेथें आरमार ठेऊन ते चांचेपणा करीत; इंग्रज व्यापाऱ्यांचीं गलबतें ही लुटीत; असा त्यांचा त्रास होता. त्याचप्रमाणें सावंतवाडीकर उपद्रव देत. वेंगुर्ल्याच्या किल्ल्याच्या आश्रयानें तेही चांचेपणा करीत.

दक्षिणेंतली जितकी फौज रिकामी राहून मिळण्यासारखी असेल तितकी यावेळीं पाहिजे असें एल्फिन्स्टन साहेबानें सरकारास लिहिल्यावरून २२ पलटणें पायदळ आणि ४ पलटणें रिसाला त्याच्या स्वाधीन झाला. शिवाय, म्हैसूरचे आणि निजामाकडचे हजारों स्वार पाहिजे तेव्हां मिळावे अशी तजवीज झाली. मग कोठें किती फौज ठेवावी तो सारा विचार करून त्याणें आपला बेत त्या फौजेवरच्या मुख्य अधिकाऱ्यास कळविला. त्याला तो फार पसंत पडला. एल्फिन्स्टन साहेबाचा विचार सन १८१२ च्या पावसाळ्यांत हें काम करावें असा होता, तो मात्र त्याला बरा वाटला नाहीं. परंतु त्या दिवसांत पेंढाऱ्यांचें भय फार असणार नाहीं असें ह्मणून एल्फिन्स्टन साहेबानें आपलेच ह्मणण्याप्रमाणें करण्याचा निश्चय ठरविला. मग त्यानें बाजीरावाजवळ कोल्हापूरसंबंधानें बोलणें सुरू केलें. एक महिना शुष्क वाटाघाटींत गेला. नंतर त्यानें जाहागीरदार प्रकरण काढलें. आठ दिवस ती वाटाघाट आणि त्रास होऊन अखेर बाजीराव त्याच्या विचाराप्रमाणें करण्यास कबूल झाला आणि दुसऱ्या दिवशीं पंढरपुरास जावयास निघाला. आषाढीच्या यात्रेकरितां दर्शनास जाण्याचा त्याचा बेत आधींच ठरलेला होता. तो एल्फिन्स्टन साहेबाला कांहीं अनिष्ट नव्हता. त्यानें श्रीमंतांच्या संरक्षणाकरितां ह्मणून दोन पलटणें त्यांच्या बरोबर पाठविलीं; आणि पेशवे सरकारच्या व तुमच्या दरम्यान जो लढा पडलेला आहे त्याचा निकाल लावावयाचा आहे, तर तुह्मी पंढरपुरास श्रीमंतांच्या स्वारींत दाखल व्हावें ” अशीं जाहागीरदारांस पत्रें लिहून आपणही जाण्यास निघाला. जाहागीरदार कदाचित् गडबड करतील तर त्यांच्या मुलखावर हल्ला करण्याकरितां पांच पायदळ पलटणें, एक रिसाला आणि म्हैसूरपैकीं बाराशें स्वार व पेशव्यांच्या आणि निजामाच्या मुलखाच्या संरक्षणाकरितां

तेरा पलटणें पायदळ, तीन रिसाले आणि त्या उभयतांच्या फौजांपैकीं पुष्कळ स्वार त्यानें नाक्या नाक्यानें बसविले आणि मुंबईहून तीन पायदळ पलटणें समुद्रांतून हल्ला करण्यास हवीं तेव्हां यावीं अशी तजवीज केली. याप्रमाणें जय्यत तयारी झाल्यावर आतां ह्या प्रकरणाचा निकाल लागण्यास कांहींच उशीर लागणार नाहीं असें त्याला वाटलें.

एल्फिन्स्टन साहेब तारीख १४ जुलै रोजीं पुण्याहून निघून तारीख २० रोजीं पंढरपुरास पोहोंचला वाटेंत जेजुरीस खंडेरायाचें देवालय पाहण्यास तो गेला होता. एका ब्राह्मणानें डोंगराच्या पायथ्याशीं त्याला भेटून वर नेऊन सारें दाखविलें. खंडेराव हें होळकराचें कुळदैवत. देऊळ थोरल्या मल्हारराव होळकरानें बांधलें. तें कांहीं पाहण्यासारखें नाहीं. वर जाण्यास पायऱ्या आणि त्यांच्या बाजूस दीपमाळी आहेत त्या, आणि दरवाजांवरच्या कमानी दुरून फार मौजेच्या दिसतात. वर जाऊं लागलें ह्मणजे वाघ्ये व मुरळ्या पैशा साठीं हात पसरीत पाठीस लागतात. एल्फिन्स्टन साहेबाच्या पाठीस पुष्कळ लागले होते. एका मुरळीनें आपल्या कडेवरच्या मुलाला कुत्र्यासारखें ओरडाविलें; एक मुलगा कुत्र्यासारखा भुंकत होता. अशा अनेक तऱ्हेच्या अनेकांनीं मौजा दाखविल्या, परंतु याच्यापासून कांहीं छदाम मिळत नाहीं असें दिसलें तेव्हां तीं सारीं कुत्रीं* दूर गेलीं.

तारीख १८ रोजीं जाहागीरदारांचे वकील एल्फिन्स्टन साहेबाला भेटले. त्यांच्याशीं बोलणें होऊन ठराव कसे करण्याचा आपला विचार आहे तें त्याणें त्यांना कळविलें. पंढरपुरास गेल्यावर जाहागीरदारांच्या स्वाऱ्या आल्या आणि भेटी होऊन बोलणें सुरू झालें. त्यांत चिंतामणराव आप्पा पटवर्धन आणि रास्ते लागलेच कबूल झाले, परंतु बाकीचे तसे होतना. निपाणकर शिदोजीराव आपा देसायाला पुढें करून ते तक्रारी करूं लागले. तेव्हां एल्फिन्स्टन साहेबानें बाजीरावाच्या चाकरीस ठेवलेल्या फौजेस चालून येण्यास हुकूम केला. मग सारे वठणीस आले. कुडीगुळ हा निपाणकराचा मजबूद किल्ला घेण्याचा हुकूम न जुमानल्यासारखें दाखवून लढण्यास सिद्ध झाला,

* आपल्याला मूल व्हावें ह्मणून पुष्कळ लोक खंडोबाला नवस करतात, आणि तो पावला ह्मणजे तें पहिलें मूल त्याला वाहतात; त्याला खंडोबाचें कुत्रें ह्मणतात.

परंतु कर्नल डौसी थोडीशी फौज घेऊन तो घेण्याच्या तयारीनें आला तेव्हां किल्लेदारानें मुकाट्यानें तो त्याच्या स्वाधीन केला.

पंढरपुरास एल्फिन्स्टन साहेबाचा मुक्काम पंधरा दिवस होता. बाजीरावाला वरचेवर विचारण्याचें कारण राहिलें नाहीं तेव्हां काम झपाट्यानें चाललें. जाहागीरदारांकडे वहिवाटींप्रमाणें असलेला मुलूख बिनतक्रार चालावा, धामधुमीच्या वेळीं कोणीं कांहीं जास्त घेतलेला होता तो सोडून द्यावा, आणि पेशवे सरकारची चाकरी कराराप्रमाणें करावी, श्रीमंतांकडून कोणास कांहीं जास्ती मागणी होऊन उपसर्ग पोहोचणार नाहीं, यास इंग्रज सरकार जामीन आहे, असा सर्वांशीं ठराव झाला. तो पुरा अमलांत येईपर्यंत फौज ठिकठिकाणीं कायम होती. सारे जाहागीरदार एल्फिन्स्टन साहेबाबरोबरच पुण्यास गेले.

याप्रमाणें ही बिनगोळीबाराची दोन महिन्यांची मोहीम झाली. एल्फिन्स्टन साहेबाचा तो काळ मोठ्या आनंदांत गेला. मध्यें दोनचार वेळ तो डुकराच्या शिकारीसही गेला.

पंढरपुराहून तारीख ६ आगस्ट रोजीं एल्फिन्स्टन निघाला तेव्हां त्याला वाटेंत चिमाजी आपाचा एक खिदमतगार पुण्याहून लोटांगण घालीत आलेला आढळला. त्याला निघून महिना झाला होता. त्यानें मुलासाठीं विठोबाला नवस केला होता, तो तो फेडीत होता. तो अगदीं न थांबतां, रस्त्यावर खडे, कांटे, दगड, कांहीं असलें तरी त्यांवरून अगदीं मधोमध नीट लोळत जाई. अशी तो रोज दोन कोसांची मजल करी.

इकडे जाहागीरदारांशीं बोलणें चाललें होतें तेव्हां तिकडे निपाणकराची आणि कोल्हापुरकरांची लढाई चालली होती. तींत महाराज जेरीस येत होते. एल्फिन्स्टन साहेबानें त्यानां सांगितलें तुह्मी ज्या साठीं भांडत आहां त्या मुलखावर तुमचा खरा हक्क असला तर शाबीद करा ह्मणजे तो तुमच्या ताब्यांत येईल. परंतु ते कांहीं ऐकेनांत. पुढें पुष्कळ वादविवाद होऊन अखेर त्यांच्या वकिलानें तहनाम्यावर सही केली. त्यांत करार इंग्रजसरकार मध्यस्थी करून सांगेल तें ऐकावें, चांचेपणा बंद करावा आणि मालवणचें बंदर व सिंधुदुर्ग किल्ला इंग्रजांच्या स्वाधीन करावा आणि त्याबद्दल त्यांचे पांच लाख रुपये फार दिवसांचें कर्ज देणें असलेलें त्याणी माफ करावें, असे होते. परंतु महाराज चौकशीस कबूल होईनात आणि त्या तहनाम्यावर सही करून देईनात. ते दांडगाईने मुलुख घ्यावयास लागले तेव्हां त्यांच्यावर फौज रवाना करणें आलें.

त्याप्रमाणें होऊन चिकोडी व मनोळी दोन तालुके पेशव्यांच्या स्वाधीन झाले. कर्नल डौसीचा मुक्काम मलप्रभेवर बरेच दिवस होता.

बाजीरावाला जहागीरदार नको होते; त्यांचें भय वाटत होतें, परंतु ते कांहीं बुडत नाहींत असें दिसलें तेव्हां स्वसरक्षणाकरितां इंग्रज अम्मलदार ठेऊन त्यांच्याकडून कांहीं नवी फौज तयार करावी, असें त्याच्या मनांत येऊन आपल्या सरहद्दीवरील मुलखाचें पेंढाऱ्यांपासून रक्षण करण्याकरितां अशी फौज तयार केली पाहिजे असें त्याणें इंग्रज सरकारास कळविलें. त्यांना तें इष्टच होतें. सरकाराकडून एल्फिन्स्टन साहेबाला असें लिहून आलें कीं, हा तुमचा बेत उत्तम आहे अशी बाजीरावाला भर देऊन पलटणें तयार करण्यास लावावें. परतु त्यानें उतावाळ केली नाहीं. आपला आग्रह किंवा घाई दिसली तर बाजीरावाला संशय मात्र येईल, थोडे दिवस जाऊं दिले ह्मणजे जाहागीरदार प्रकरणाचा निकाल होतांच हें सहज होईल, असें त्याचें मत पडलें आणि तें अगदीं खरें ठरलें. एल्फिन्स्टन साहेबाच्या ह्मणण्याला जाहागीरदार कबूल होतात असे दिसतांच बाजीराव घाबरला. त्यांचीं पथकें चाकरीस यावयाचीं तीं त्याला शत्रूसारखीं वाटूं लागलीं आणि त्यांच्यापासून आपलें रक्षण व्हावें ह्मणून इंग्रजी नवी फौज ठेवण्याची त्याला घाई सुटली. जाहागीरदारांबरोबरचा तंटा तुटून आपल्या अधिकाराला अधिक बळकटी आली हें एल्फिन्स्टन साहेबाच्या मध्यस्थीनें झालें; ह्मणून त्यानें त्याचे आणि त्याच्या सरकाराचे फार मोठे आभार मानले. परतु एक देखील सरंजामी स्वार आपल्या चाकरीस यावयाला नको असें ह्मटलें. मग इंग्रज अम्मलदार ठेऊन त्याजकडून नवीं पलटणें त्याणें तयार करविलीं. त्यांचें आधिपत्य क्याप्टन फोर्ड यास देऊन तारीख ११ जुलै सन १८१३ रोजीं त्याला वस्त्रें दिलीं. त्यांची छावणी पुण्यासरशी केली. पगार महिनेमहा, इंग्रजी रीतीप्रमाणें, तिजोरींतून रोकड देण्याचें ठरलें. एल्फिन्स्टन ह्मणतो, "बाजीरावानें पलटणें तयार करावीं हा आमचा फार हेतु होता तो सिद्धीस गेला. त्यांचा पगार वगैरे खर्च उदारपणानें, सढळ हातानें आणि शहाणपणानें ठरला आहे." ह्या पलटणांत मराठे थोडेच होते. बाकी सारे लोक कंपनीच्या मुलखांतील, हिंदुस्थानांतले भरले होते. पेशवे सरकार इंग्रज सरकाराशीं स्नेहानें वागेल तोंपर्यंत त्याची चाकरी आह्मी इमानें इतबारें करूं अशी त्या लोकांनीं आपण होऊन शपथ घेतली; असें इतिहासकार ग्रन्थांट डफ् ह्मणतो.

१०-१५४-२०००

वसईचा तह करते वेळीं बाजीरावाला इंग्रजांचीं पलटणें चाकरीस ठेऊन घ्यावीं लागलीं ह्मणून पुढें लागलेंच वाईट वाटलें होळकर, भोसल यांजबरो-रच्या लढाया हे त्या तहाचे परिणाम त्याला दिसत होते, तरी त्याणें हीं आणखी पलटणें उभीं करविलीं आणि अखेर त्याला तींच घातक झालीं.

एल्फिन्स्टन पुण्यांत आला तेव्हां उन्हाळा असल्यामुळें त्याच्या प्रकृतीला विकार होऊं लागला. त्याला मागच्यासारख्या पुन: लहरी येऊं लागल्या. त्याबद्दल त्याच्या रोजनाम्यांत उल्लेख आहेत. सरकारी काम कांहीं फार पडत नव्हतें; त्यामुळें वाचनाला पुष्कळ वेळ मिळे. अफगाणिस्थानावर ग्रंथ लिहिण्या-विषयीं म्याकिंटॉश साहेबानें त्याला सांगितलें होतें ते त्याच्या मनांत भरलें होतें. त्या कामास त्यानें सुरवात केली. पेशावरास गेल्यावेळीं जशी पाहिजे होती तशी माहिती कांहीं तिकडे मिळवतां आली नाहीं हें मागें लिहिलेंच आहे. इकडे जे अफगाण लोक भेटत त्यांना विचारून त्याणें पुष्कळ सामुग्री मिळविली आणि ग्रंथ लिहिण्यास सुरवात केली. म्याकिंटॉश साहेबाकडून त्याला पत्रें येत त्यांत लिहिण्यास सुरवात झाली कीं नाहीं, काम कोठपर्यंत आलें, असें तो वरचेवर विचारी. त्याचा मित्र मालकम् इराणांत जाऊन आला होता तो तेथचा इति-हास लिहीत होता, तें पाहूनही त्याला ईर्षा आली. सन १८१२ च्या हिंवा-ळ्यांत पुस्तक छापण्यास पाठवावें असा त्याचा बेत होता, परंतु जसजशी माहिती जमत चालली तसतसें काम वाढत चाललें. जाहागीरदार प्रकरणांतून मोकळा झाल्यावर १८१३।१४ च्या थंडीच्या दिवसांत लिहिण्याचें काम चांगलें चाललें. तेथपर्यंत तरी सरकारी काम आटपून जेवढी फुरसत सांपडे तेवढी तो ह्या कामांत घालवीत होता. प्रसिद्ध इतिहासकार गिबन ह्याचें चरित्र तो वाचीत होता, तें वाचून झाल्या-वर त्याणें त्याची व आपली तुलना केली आणि असें लिहिलें आहे कीं, "वि-चार करण्याची किंवा ग्रंथ लिहिण्याची माझी मुळींच योग्यता नाहीं. काबुला-विषयीं लिहावें ह्मणून चौकशी करून माहिती मिळविण्याची मला हौस वाटत आहे, तेवढें काम मी उत्साहानें आणि त्वरित करीत आहें, परंतु ग्रंथ रचनेचा मला कंटाळा येतो आणि श्रम वाटतात. आपल्याच कल्पनेनें आणि अकलेनें लिहावयाचें आलें ह्मणजे हात चालत नाहीं, कांहीं सुचेनासें होतें. शिवाय कामामुळें आणि मंडळीच्या येण्याजाण्यामुळें वरचेवर हरकत होते. पुष्कळ वेळ जेवणाखाणांत घालवावा लागतो आणि जो कांहीं थोडासा ह्या कामाला

उरतो त्याला विघ्नें फार येतात. मंडळी जमते ती तरी माझ्या कांहीं उपयो-गाची आहे! जे लोक भेटावयास येतात त्यांत बुद्धिमान् मनुष्य क्वचितच आ-ढळतो आणि विद्वानाचें तर नांवच घ्यावयास नको. माझा काळ अशा स्थितींत गेला असल्यामुळें विद्वत्तेच्या विषयावर लिहावयाचें किंवा विचार करा-वयाचा झाला तर मी संशयांत पडतों आणि भीत भीत लिहितों. अशा कांहीं गोष्टी मला प्रतिकुल आहेत, परंतु कांहीं अनुकूल आहेत आणि त्या-मुळें मी आपली उमेद खचूं देत नाहीं.

तारीख १२ जुलै सन १८१३ रोजीं त्यानें स्ट्राची साहेबाला पत्र लि-हिलें. त्यांत तो ह्मणतो, "ह्या जाहागीरदार प्रकरणाची चौकशी करणें, कागद-पत्र पाहणें, त्यांच्याशीं मध्यस्तीचें बोलणें, यांत मी सारखा गुंतलेला आहें. यामुळे माझें खासगी काम–काबुलाचा इतिहास लिहिण्याचें–होत नाहीं. अशांतही मीं तें चालू ठेविलें आहे. त्यापासून मला चांगली करमणूक होते आणि आनंद वाटतो.

या प्रमाणें त्याचे लिहिण्याचें काम चालले होतें. परंतु तें झटून करूं लाग-ण्यापूर्वीं त्याणें मालकम् साहेबाला पत्र पाठविलें त्यांत असें लिहिलें होतें कीं, तुह्मीं इराण । इतिहास लिहीत आहां त्यांत कोणत्या कोणत्या विषयांचा समावेश करणार तें मला नक्की कळलें पाहिजे; नाहींतर असें होईल कीं, माझ्या लेखानें तुमच्या ग्रंथाची शोभा कमी होऊं लागेल आणि माझे श्रम फुकट जातील. ( छापण्या सारखे नसले तरी दस्तेच्या दस्ते कागद लिहिणें ह्मणजे कांहीं थोड्या मेहेनतीचें काम नाहीं. ) हिंदुस्थानचा इतिहास लिहिणें अगदीं अवश्य आहे अशी तुमच्या सांगण्यावरून माझी अगदीं पुरी खात्री झाली आहे. परंतु तें जरी मी हातीं घेत नसलों आणि कुत्र्याची शिकार, बहिरीची शिकार, वाचन व सरकारी काम येवढेंच करीत राहिलों तर त्यापासून मला आणि लोकांना पुष्कळ फायदा व्हावयाचा तो बुडेल; ह्यावर मालकम् साहेबानें असें उत्तर दिलें कीं, मी फक्त इराणा-संबंधानें लिहिणार. तें वाचून आपण काबूलच्या राज्याचा इतिहास लिहावयाचा असा त्याचा निश्चय झाला. तो मेहेतीनें, काळजीनें, सावकाश, असें लिहित असे. जो मजकूर लिहावयाचा तो खरा आणि आपला लेख शुद्ध व भाषासरणी चांगली असावी, अशा विषयीं तो फार जपत असे. घाईनें केलेलें काम चांगलें होतनाहीं ही त्याची खात्री होती. त्याचा नवा मित्र

अर्स्किन आणि जुना जोंकिन्स यांणीं त्या कामीं त्याला चांगली मदत केली. पुस्तकाचें नांव अफगाणिस्थानच्या शहाच्या ताब्यांतील राष्ट्रांचा इतिहास व लगतच्या संस्थानांची माहिती असें ठेवावें असा त्याचा प्रथम विचार होता. परंतु तें लिहितां लिहितां वाढून पुष्कळ मोठें झालें तेव्हां काबूलच्या राज्याचा व त्याच्या ताब्यांतील इराण, तार्तरी व हिंदुस्थान यांतील मुलखांचा इतिहास असें त्याणें नाव ठेविलें. पुस्तक लिहून, तपासून, छापावयास पाठविण्यासारखें झालें आणि तारीख ७ जून सन १८१४ रोजी विलायतेस रवाना झालें; तेव्हां त्याला आतां आपण अगदीं मोकळे झालों असें वाटलें. मग तें प्रसिद्ध होऊन लोकांना कसें काय आवडतें, त्यावर अभिप्राय कसे येतात व ते पहावयास कधीं मिळतात इकडे त्याचें लक्ष लागलें. परंतु तो कांहीं उतावळा झाला नाहीं. इतकें होण्याला निदान १८१५ साल सारें लोटलें पाहिजे असा त्याणेंच अजमास केला. तितका काल सहज लागला.*पुस्तक छापून निघण्याबरोबर त्याची चोहोंकडे प्रसिद्धी झाली. एडिंबरो रिव्ह्यूसारख्या नामांकित पत्रांतून त्याचें परीक्षण होऊन वाहवा झाली. त्यावेळीं मालकम् साहेब विलायतेस होता आणि तेथें त्याची मोठी कीर्ति झालेली होती, तो त्याची जिकडे तिकडे वाहवा करीत सुटला. ह्या पुस्तकाच्या योगानें एल्फिन्टन साहेबाची गणना ग्रंथकारांत होऊन कीर्ति झाली. इतकेंच नाहीं, त्याला अभ्यास कर-

---

* त्यानें आपला मित्र स्ट्राची याला पत्र लिहिलें. त्यांत तो ह्मणतो, माझी तुह्माला एवढी विनंती आहे कीं, माझ्या पुस्तकाविषयींची सर्व खरी आणि तपशीलवार,-मुख्यत्वें खरी-हकीगत लिहा. त्याची अवहेलना होईल अशी कांहीं मला जशी भीति नाहीं तशी वाहवा होईल अशी आशाही नाहीं, तरी जें काय होईल तें कळावें येवढी उत्कंठा आहे. हा ग्रंथ लिहिणारा विचारी, मेहेनती, आणि बऱ्यांतला आहे इतकें कोणी ह्मटलें ह्मणजे फार मिळालें. याहून जास्त प्रशंसा व्हावी अशी माझी इच्छा नाहीं. कांहीं वर्षांपूर्वी-समजा मी वसईत होतों तेव्हां-मला कांहीं तरी बुद्धि आहे असें मला वाटत होतें, त्या वेळीं इतकेंच ह्मणून घेण्यांत वाहवा कसली आणि ती हवी कशाला असें मला वाटत होतें. परंतु आतां हें वेड माझ्या डोक्यांत कोठून भरलें होतें याचें मला पुनः पुनः आश्चर्य वाटतें. अशा प्रकारचें हें चऱ्हाट कांहीं संपावयाचें नाहीं.

ण्याला उत्तेजन आलें आणि आपल्या अंगीं असलेल्या बुद्धिसामर्थ्याबद्दल अधिक खात्री वाटूं लागली, हा मोठा फायदा झाला. त्या ग्रंथाची दुसरी सुधारलेली आवृत्ति सन १८३९ मध्यें निघाली. आतां कोठें आढळण्यांत येते ती तीच. त्याच्यानंतर अफगाणिस्थानाविषयीं पुष्कळ ग्रंथ झाले, परंतु अद्यापपर्यंत प्रमाणभूत असा तोच मानला जातो.

यावेळीं एल्फिन्स्टन साहेबाचा पुण्यांत जो काळ गेला तो त्याच्या साऱ्या आयुष्यांतला अती सुखाचा असें ह्मणण्यास हरकत नाहीं. त्याचा नित्यक्रम असा होता कीं, सकाळीं घोड्यावरून दहांपासून वीस मैलपर्यंत फिरून यावयाचें; मग * कसरत करावयाची; नंतर सरकारी कामकाज आणि खासगी पत्रें लिहिणें वगैरे दहा वाजल्यापासून दोन वाजेपर्यंत करावयाचें. नंतर फराळ करून अर्धा तास वामकुक्षी करावयाची. मग वाचीत बसावयाचें व अफगाणिस्थानासंबंधीं माहिती लोकांस विचारावयाची. संध्याकाळीं गार्डींतून फिरावयास जावयाचें, आणि अकरा वाजतां निजावयाचें तें पहाटे चार वाजले कीं उठावयाचें.

त्याला वाचण्याचा नाद मोठा होता, त्यामुळें त्यानें पुष्कळ ग्रंथ वाचले. जेफ्रेस ह्मणून एक तरुण डॉक्टर होता, तो असाच विद्याव्यासंगी होता; त्याच्याशीं त्याचें सख्य जमलें होतें. ते दोघे मिळून ल्याटिन व ग्रीक भाषांचा अभ्यास करीत. मुंबईहून केव्हां केव्हां मित्र मंडळी येत, तेणें करून त्याला करमणूक होई त्यांना घेऊन तो प्राचीन स्थळें, किंवा चित्रविचित्र मौजेचे देखावे पाहण्यासारखे असतील ते पहावयास जाई. लेडी हूड ह्मणून एक बाई विलायतेंतल्या त्यांच्या सर्व मित्रमंडळीला नुकतीच भेटून आलेली होती, ती मोठी हुशार आणि चांगली विद्वान् होती; तिचा सहवास त्याला फार आवडे तिच्याबरोबर बगदाद आणि इराण पाहण्याला सन १८१४ इसवींत जावें असें त्याच्या मनांत होतें.

सन १८१२ च्या जानेवारींत मालकम् साहेब विलातेस जावयास निघाला, तेव्हां त्याला भेटण्याकरितां एल्फिन्स्टन मुंबईस गेला; तो वाटेनें जातांना कार्ली येथील लेणीं पाहावयास गेला. त्यांविषयीं तो ह्मणतो,—" हीं लेणीं मी

* कसरत कोणत्या प्रकारची तें रोजनाम्यांत लिहिलेलें नाही. जोर, बैठक वगैरे मेहेनत असावी असें वाटतें.

दहा वर्षांपूर्वी पाहिलीं होतीं, तेव्हांपासून त्यांचें स्मरण झालें ह्मणजे मला मोठा आनंद होतो आणि आश्चर्य वाटतें. त्यांत जो कांहीं एक प्रकारचा भव्यपणा आहे, तो दुसऱ्या कोणत्याही इकडील इमारतींत पाहिल्याचें मला स्मरत नाहीं. हीं लेणीं पाहून मला बुद्धांविषयीं आणि त्यांच्या धर्माविषयीं माहिती करून घ्यावी अशी उत्कट इच्छा झाली व त्यांचा शोध लावण्याकरितां आपल्या हातून होईल तितकी मदत करावी असा निश्चय झाला."—या प्रमाणें मुंबईहून परत आल्यावर त्या लेण्यांतील लेख उतरून घेण्याकरितां त्यानें एक चितारी पाठविला आणि त्याणे आपल्या मनास येईल तसे उगाच कांहीं तरी रंगवूं नये ह्मणून नकल बरोबर उतरली आहे किंवा नाहीं, तें पाहण्याकरितां त्याच्या बरोबर एक ब्राह्मण लेखक पाठविला. मग त्याची प्रत करून घेऊन अस्सल प्रत मुंबईस अर्स्किन साहेबाकडे पाठवून दिली. कारण, त्यानें दुसऱ्या कांहीं लेण्यांतील शिलालेख लावण्याची खटपट केली होती, व ती बरीच सिद्धीस गेली होती. दिल्ली व अलहाबाद येथील स्तंभांवरील लेख दिसण्यांत यासारखेच, परंतु तीं अक्षरें निराळीं असावीं असे त्याला वाटले.

जातवेळीं बोरघाटांतील वनश्रीची उत्कृष्ट शोभा पहात पहात तो गेला. तेव्हां त्याला पुष्कळ चालावें लागलें; थकवा येऊन झोंप काढावी लागली. त्या शोभेविषयीं त्यानें बरेंच लिहिले आहे.

पंढरपूरच्या स्वारींत ज्हाहागारदारांबरोबर तहनामे झाल्यावर पुण्यास येऊन एल्फिन्स्टन साहेबानें काबुलावर ग्रंथ लिहिण्याचे काम मेहनतानें चालविलें. तें पुरें झाल्यावर तो मोकळा झाला ह्मणून मग ऐषआरामांत निमग्न होऊन पडला नाहीं. त्याचें लेखन वाचन व अवलोकन सारखे चालू होतें बाजीरावसाहेब पुनः पंढरपुरास गेला आणि तेव्हां तेथे जो भयंकर प्रकार झाला तेथपर्यंतचा त्याच्या रोजनाम्यांतील व त्यानें मित्रमंडळाला लिहिलेल्या पत्रांतील कांहीं मजकूर नमूद करून हा भाग संपवूं. हा मजकूर कालानुक्रमानेच लिहिला आहे असें समजूं नये.

एल्फिन्स्टन साहेबाचा वरिष्ठ, ज्याच्या हाताखालीं पुण्यास प्रथम येऊन त्यानें राजकारस्थानांत प्रवेश केला तो, सर ब्यारी क्लोज हैद्राबादेस गेला होता तेथें मेला; तें वर्तमान समजलें तेव्हां त्यानें त्याचे गुणानुवाद वर्णन केले. ते असे:—" त्याच्या मागें तसा अनेक गुणसंपन्न कोणी पुरुष आहे किंवा नाहीं याची मला शंका वाटते. तो शरीरानें बळकट आणि कणखर होता; त्याची

बुद्धि तीव्र होती आणि विषयाचें आकलन करण्याची शक्ति मोठी होती. त्याचीं मतें ठरलेलीं होतीं आणि धैर्य अढळ होतें. त्याला डामडौलाचा आणि ऐषआरामाचा तिटकारा होता; त्याचें सारें लक्ष सरकारी कामाकडे असे; तो अत्यंत निरभिमानी आणि साधा असे. मला वाटतें असा पुरुष प्राचीन रोम शहरीं झाला असला तर असेल. आमच्या राष्ट्रांत, ह्या काळांत मिळणें कठीण."

हा त्याचा लेख वाचून टासिटसनें आग्रिकोलाची जी स्तुति केली तिचें स्मरण होतें.

एल्फिन्स्टन साहेब आपल्या अंगांतले दुर्गुण ओळखून, ते सोडून देण्याविषयीं यत्न करीत असे, हे मागे सांगितले आहे. त्या विषयावरचे त्याचे लेख असे आहेत.

"मी आजपासून आणखी एक नियम करण्याचें मनांत आणतों आहें. त्याविषयीं थोडे स्पष्ट लिहिलें पाहिजे. कारण, त्यांत बारीक गोष्टी पुष्कळ आहेत. हा नियम असा कीं, राग सोडून द्यावयाचा; कामाच्या वेळीं तर तो नाहींच येऊं द्यावयाचा.—वरचेवर रागावलें ह्मणजे काम लौकर होतें हें मत तर मी कधींच सोडून दिले आहे. माझी अशी खात्री झाली आहे कीं, रागीटपणाच्या योगानें आपल्या थोरपणाला लांछन येतें आणि खऱ्या रागाची जी दहशत असते ती नाहींशी होते. इतकेंच नव्हे, आपण चिरडखोर आहों अशी आपली खात्री असल्यामुळें एकादे प्रसंगीं रागावलें ह्मणजे तेव्हां रागावणें बरोबर होतें किंवा नाहीं हा मग संशय येतो आणि जर कोणी अप्रतिष्ठा केली, तर ती मुकाट्यानें सोसून घ्यावी लागते. दुसरें असें होतें कीं, आतां मी असें करीन, तसें करीन, अशी रिकामी बडबड सुरू होते; ती प्रमाणें हातून कांहीं होणारें नसते; आणि कित्येक वेळ मनांतल्या गुप्त गोष्टी तोंडानें बाहेर काढल्याशिवाय राहवत नाहीं. राग आवरतां येणें शक्य आहे; त्या विषयीं मला कांहीं शंका नाहीं. मीच आतां खरोखर पुष्कळ सुधारलों आहें तर आतां असा निश्चय केला पाहिजे कीं, पहिल्या झपाट्या बरोबर कधीं बोलावयाचें नाहीं; क्रोध गिळून मग तोंड उघडावयाचें. पेशव्याबरोबर आणि त्याच्या दिवाणाबरोबर बोलतांना तर हें चांगलेंच लक्षांत ठेऊन वागलें पाहिजे. कारण, त्या दोघांतून एकाविषयींही माझ्या मनांत

आदर किंवा मान्यता नाहीं. हें खरें आहे, परंतु त्यांची मनोधारणा करणें हें माझें काम आहे."

ह्या लेखाच्या सुमारासच त्यानें असें लिहिलेलें आहे. " बास्वेलकृत जानसनच्या चरित्रांत मला एक वाक्य आढळलें तें आणि कांहीं काळापूर्वी मला एक विचार सुचला तो मी लिहून ठेविला आहे. ते अगदीं बरोबर जुळतात. जानसनचें वचन असें आहे.—" उल्हासवृत्ति ही एक कला आहे. ती पुष्कळ अंशीं संवइनें साध्य होत असते." अशी सवय लागणें किती महत्वाचें आहे? मनुष्याला सुख होणें तें मंडळींत मिसळून करमणूक करून घेण्याची त्याची जशी शक्ति असेल तसें होतें. विलायतेंत असलेल्या हिंदुस्थानांतल्या मनुष्याला तर हे विशेष लागू आहे. ही उल्हासवृत्ति, अथवा मन स्वाधीन ठेवणें, जगांतल्या साऱ्या माणसांना शक्य असतें आणि जो जात्याच चांगल्या स्वभावाचा असतो त्याला तें खरोखरच साधतें. संभाषणाची कला संपादण्याकडे मी फारच दुर्लक्ष करीत असतों. परंतु तें चांगलें नाहीं. स्पेक्टेटरसारखा ग्रंथ लिहिण्याच्या शक्तीपेक्षां संभाषणाच्या शक्तीच्या योगानें आपल्या मंडळींत मनुष्याची मान्यता अधिक होत असते आणि कदाचित् सुखही अधिक होत असेल. मनुष्याला पुष्कळ ज्ञान असलें तरी तें जर त्याच्या तोंडानें बाहेर पडलें नाहीं, तर मनांतल्या मनांत जिरून नाहींसें होतें परंतु भाषणाच्या योगानें त्याला चालन मिळतें आणि सतेजस्कता येते, आणि तें वाढावें अशी ईर्षा येते; शब्दयोजना ही त्वरित आणि मनोहर अशी करतां येऊं लागते.'

त्यानें संवईविषयीं असें लिहिलें आहे—तपकीर सोडून द्यावी असा मी कितीएक दिवस विचार करीत आहें. आज एका कादंबरीचा परीक्षण लेख आलेला वाचीत असतांना त्यांत एक वाक्य वाचलें, त्याबरोबर माझा बहुतेक निश्चय ठरल्यासारखा झाला. मनुष्यानें आपल्या संवई सोडून देण्याची संवय करणें व आत्मसंयमनाचे आणखी कांही यत्न करणें यांचा उपयोग त्यांत सांगितला आहे. मला आतां तपकीर सोडून देणें खरोखर जड जाईल, पण याचकरितां तें सोडलें पाहिजे. आजपासून तिसऱ्या दिवशीं मी तें सोडून देईन. परंतु सोडल्यापासून आठ दिवस तरी अगदीं कोणा एकाजवळ सोडलें असें बोलावयाचें नाहीं.......दोन दिवसांपुरती तपकीर ठेऊन घेऊन मी बाकीची टाकून दिली, मग अगदीं वाईट घेतली आणि अखेर साफ सोडली.

एल्फिन्स्टन साहेबानें आणखी एक निश्चय केला होता; तो कशाबद्दल याचा कांहीं खुलासा होत नाहीं. त्याबद्दल त्याचा लेख इतकाच आहे–"मी एक नेम केला आहे. विस्मरण होऊं नये ह्मणून फार जपलें पाहिजे. या करितां जेव्हां जेव्हां आपला रोजनामा लिहीन तेव्हां तेव्हां, किंवा साधल्यास आठवड्यास एकदां त्याप्रमाणे मी कितपत वागतो आहें हें लिहून ठेवण्याचें माझ्या मनांत आहे" त्याप्रमाणें पुढच्या बारा महिन्यांच्या रोजनाम्यांत Res safe इतकीं सांकेतिक अक्षरें नियमानें आढळतात. त्यांचा अर्थ Resolution safe ह्मणजे नियम चालला आहे असा करतां येईल. जो नियम त्यानें इतका जपून पाळला तो कांहींतरी तसाच बिकट असला पाहिजे परंतु तो काय होता हें समजण्यास मार्ग नाहीं

एल्फिन्स्टनसाहेब बारा पंधरा वर्षांमागचे–सन १७९७ पासून १८०० पर्यंतचे–आपले रोजनामे एकदां वाचीत होता तेव्हा त्यानें असे लिहिलें आहे.–ह्या वाचनानें माझी मागची हौस आणि मनोवृत्ति पुनरुज्जीवित होऊन मला मोठा आनंद वाटतो. सन १८०० पासून माझें वर्तन बहुतकरून सुधारले आहे; परंतु अभ्यासाची आस्था, हौस आणि ग्रंथरचना, हीं उलटीं कमी झालीं आहेत असे वाटते. मागच्या रोजनाम्यांच्या वाचनाने माझी ग्रंथवाचनाची प्रीति वाढत आहे. तरुणपणीं जो अभ्यास करण्यांत मला आनंद होत असे आणि पुढें ह्मातारपणीं कालक्रमण करण्यास मला बहुधा तेवढेंच जें एक साधन असणार, त्याजविषयीची माझी प्रीति वृद्धि पावत आहे. मला ही जी गोडी लागलेली आहे, ती सोडतां कामा नये, उलटी वाढवीत गेलें पाहिजे. कारण, मी चाकरी सोडून रिकामा झालों ह्मणजे मला सुखाचें साधन बहुधा एवढेंच असणार आहे. तेव्हां जें काय सुख व्हावयाचें तें ह्या गोडी ज्या मानानें असेल त्या मानाने होईल."

दक्षिणेंतील जाहागीरदारांचे तंटे तुटल्यावर पुढें गायकवाड प्रकरण आलें. अखेर तेंच पेशवाईच्या नाशास कारण झालें. ती हकीकत पुढच्या भागांत येईल. तूर्त गंगाधर शास्त्री पुण्यात आल्यावर एल्फिन्स्टन साहेबानें आपल्या मित्रास लिहिलेल्या एका पत्रांतील मजकूर खालीं देतों.

"पेशव्यांच्या आणि गायकवाडाच्या तंट्याचा निकाल लावण्यांत मी अगदीं गढून गेलों आहें. त्यांत माझा पुष्कळ वेळ अगदीं व्यर्थ मोडतो. श्रीमंत ह्मणतात, गायकवाड आमच्या पोटांतील Shikum आहेत. मला

त्याच्या उलट शाबीत करावयाचें आहे. श्रीमंतांनीं कितीएक संस्थानें गट्ट करून आपलें पोट फार मोठें केलें आहे आणि त्यांतून तीं ओकवून पाडावयाला फार प्रयास पडत आहेत. कोल्हापूरच्या राजाला त्यांच्या तोंडांतून बाहेर काढण्याला मला फार श्रम करावे लागले. आमचा दोस्त आपा देसाई ( निपाणकर ) याच्या कामांत तर मला फारच त्रास झाला. कोल्हापूरकरांच्या कांहीं मुलखावर आपला हक्क आहे असें निमित्त लाऊन बाजीरावानें निपाणकराकडून त्यांचें बहुतेक राज्य घेवविलें, आणि आह्मी जेव्हां त्या दोघांचा तह करून दिला आणि तंट्याचा निकाल करूं लागलों, तेव्हां श्रीमंत तक्रारीस आले, मुकाट्यानीं मुलूख सोडीतना; नाहीं नाहीं त्या सबबी लाऊन टाळाटाळ करूं लागले. अमुक मुलूख कोल्हापूरकरास द्यावा असें ठरून त्याप्रमाणें ताब्यांत देण्याविषयीं हुकूम झाला, तो निपाणकर ऐकेना. तो आपल्या फौजेसुद्धां येथे आला होता. अखेर मला बाजीरावाला असें सांगावें लागलें कीं, तुह्मी काय जो आपला हक्क ह्मणत असाल तो तावडतोब पुरावा दाखवून शाबीत केलात तर बरें आहे, नाहींतर मी कांहींएक न ऐकता निकाल करीन. निपाणकरावर तर चार पलटणें पाठवावीं लागलीं आणि महाराजांचा ह्मणून जेवढा मुलूख ठरला तेवढा त्याच्याकडून जबरीनें काढून घ्यावा लागला. मी इतकी मेहेनत केली, तरी चौकशी लांबत लांबत सुमारें तीन महिने चालली होती. तेथपर्यंत तीं पलटणें उगाच निपाणकरावर नजर ठेऊन बसलीं होतीं. तो रिकामा त्रास होत होता आणि दक्षिणेंतल्या एकून एक अम्मलदारानें मला अगदीं वेड लागलें आहे असें ह्मटलें असेल. मी तें सारें जाणून होतों, परंतु अगदीं उत्कृष्ट गंभीरपणा दाखवीत होतों. तसें केलें नसतें, तर त्या कामाचा शेवट लागला नसता. ही माझ्या मनाची पुरी खात्री आहे. गायकवाड प्रकरण कांहीं तसें भानगडीचें नाहीं. त्यांत वकिलीचें बोलणं बोलण्याला बडोद्याचा मुख्य दिवाण गंगाधर शास्त्री ( पटवर्धन ) आला आहे. तो चांगला विनोदी असल्यानें काम मौजेनें चालतें. हा गृहस्थ मोटा हुशार आणि बुद्धिवान् आहे. त्यानें बडोद्याच्या साऱ्या राज्याची व्यवस्था अगदीं उत्कृष्ट ठेविली आहे. येथें तो पैसा खूप उडवीत आहे. आपली स्वारी अशा थाटानें काढतो कीं, सारें पुणें पहात राहातें. तो चांगला विद्वान् शास्त्री असून अगदीं इंग्रज असल्याचा डौल आणतो; तुरुतुरु चालतो, चुरचुर बोलतो, दुसरा बोलत असतांना मध्येंच तोंड घालतो आणि त्याच्या

उलट प्रतिपादन करूं लागतो. पेशवे आणि त्यांचे सारे कारभारी old fools आणि dam rascals आहेत ह्मणतो. तो हरएक भाषणांत इंग्रजी शब्द मिसळतो आणि कोणाला कांहीं, कोणाला कांहीं नांवें ठेवितो. उदाहरणार्थ, होळकराला असें ह्मणतो, " बहुत ट्रिक्सवाला था, लेकिन बडा अक्लकंद काकाय $( cockeye ) था. "

" अरे देवा हें सारें जर अमेरिकन लोकांच्या हातीं लागलें आणि त्यांनीं आपल्या कॉंग्रेसच्या माहितीकरितां छापलें तर मला तें केवढें शल्य वाटेल ! शस्त्रवैद्याच्या कचेरींतल्या तुमच्या कवनापेक्षां हें वाईट होईल. खरोखर हें कागदावर लिहिणें आणि तो टपालांत टाकणें कांहीं बरें नाहीं." *

गायकवाड प्रकरण सुरू झाल्यावर मे महिन्यात बाजीराव साहेब नासिकास जावयास निघाले. सदाशिवराव माणकेश्वर, गंगाधरशास्त्री आणि दरबारची सारी मंडळी स्वारीबरोबर होती. एल्फिन्स्टन साहेबाच्या मनांत वेरूळचीं लेणीं पहावयास जावयाचें होते ह्मणून तोही निघाला. नासिकास पोहोचल्यावर दोन दिवस सारखें बसून, बाजारावाचे कान उघडावे ह्मणून, त्यानें एक लेख तयार केला. तो गंगाधरशास्त्री ज्या कामाकरितां आला होता त्या संबंधीं होता. तेवढें काम आटोपल्यावर तो अगदीं मोकळा झाला. मग आसपासचीं शहरें डोंगरांतलीं कोरीव लेणीं, शिवनेरी किल्ला, जुन्नरच्या वाटेवरचें गणेश लेणे, इत्यादि स्थळें पहावीं, लोकानां माहिती विचारावी, जें बरेसें वाटेल तें लिहून ठेवावें, शिकार करावी, आाण पुस्तके वाचावीं, याप्रमाणें त्याचें कालक्रमण चाललें होतें;

**नासिकापासून** जवळच सिन्नर शहर आहे, त्याची प्राचीन काळीं चांगली भरभराट असावी. तेथचें एक देवालय ७०० वर्षांचें जुनें आहे असें लोकानीं त्याला सांगितलें. परंतु तें पाहिल्यावर त्याला असें वाटलें कीं, तें

---

$ एकाक्ष, कावळा.

* वरील मजकूर एल्फिन्स्टन साहेबानें खासगी पत्रांत लिहिलेला आहे हें खरें; त्यांत इतकें भिण्यासारखें काय होतें कळत नाहीं. त्यावरून एक गोष्ट मात्र चांगली सिद्ध होते; ती अशी कीं, खरा इतिहास कळण्यास व लिहिण्यास अवश्य अशा पुष्कळ गोष्टी कागदीं नमूद झाल्या शिवाय राहिल्या असाव्या.

त्याच्याही पेक्षां प्राचीन असावें. त्या शहराचा मुसलमानांनीं आणि पुढें मराठ्यांनीं फार नाश केला. मोंगलांच्या ताब्यांत असतांना तें त्यांच्या तर्फे अंबाजी देशमुखाच्या हातीं होतें तेव्हां चांगलें संपन्न होतें. पुढें दुर्दशा झाली. तीविषयीं एल्फिन्स्टन साहेबानें असें लिहिलें आहेः—

" विद्यमान श्रीमंत बाजीराव गादीवर बसल्यावर मराठ्यांचे जे आपसांत कलह झाले त्यांत त्याचा अगदीं विध्वंस उडाला. महंमदखान पुष्कळ दिवस तेथें ठाणें देऊन बसला होता. त्यानें त्याचा कोनाकोपरा कोठें कांहीं उकरल्या- शिवाय ठेविलें नाहीं. त्या धामधुमीच्या काळांत माझा लष्ट, आळशी, चैनी, मुनशीसुद्धां शिपाई बनला होता. त्याच्याजवळ ३०० स्वार होते ते घेऊन तो जुन्ने*च्या पदरीं राहिला होता. तो बंड करून शिंद्यावर उठला होता. तेव्हां त्यानें खुद्द आपला व त्या ३०० स्वारांचा पगार हे शहर घेऊन ह्याच्या लुटीवर भागवावा असें ठरलें. त्याप्रमाणें करण्याकरितां त्यानें येऊन वेस धड- कून उघडली. आंतून कोणी कांहीं हरकत केली नाहीं. मग त्यानें एक काकर ( सावकार ) आणि दुसरे संपन्न लोक धरले आणि हाणमार करून त्यांच्याक- डून पैसा काढला तेव्हां त्यांना सोडलें. मला वाटतें, मुनशीच्या खुद्द हिश्शाला आठ नऊ हजार रुपये आले होते. "

" संध्याकाळीं आह्मी देशमुखाचा वाडा पहावयास गेलों. तो फार मोठा चौदाचौकी आहे ह्मणतात. त्याच्याभोंवता खूप उंच दगडी तट आहे. बांधणी मुसलमानी तऱ्हेची असून आंत पुष्कळ सुंदर दालनें होतीं. वाड्यांत द्रव्य पुरलेलें असेल, तें काढावें ह्मणून शहामतखानानें भिंती पाडल्या आणि सारा नाश केला मालक देशमुख गरीब, ह्यातारा माणूस आहे. तो घरांत लक्ष्मी होती तेव्हांचा एक जुना, झडलेला, गालीच्याचा तुकडा टाकून त्यावर बसला होता. तेथें त्यानें आह्मांला या, बसा ह्मटलें. तो फार संभावित होता; परंतु एकाद्या मोठ्या श्रीमान्, आपल्या पदवीला आणि मानमरातबाला फार जपणाऱ्या अमीराप्रमाणें वागत होता. आह्मी गेलों तेव्हां लौकर उठला नाहीं, आणि आह्मांला सामोराही फार आला नाहीं. "

" नाशिकाची तर ह्याहीपेक्षां दुर्दशा झालेली आहे. सुमारें अर्धें शहर उद्ध्वस्त झालेलें आहे; परंतु त्याच्या पूर्वींच्या भरभराटीचीं चिन्हें अजून पुष्कळ दिसतात. "

---

* यशवंतराव होळकर.

त्रिंबकजी डेंगळ्याचा गांव नाशिकापासून जवळच होता व त्यानें आसपासचे आणखी पुष्कळ गांव मिळविले होते. त्यानें श्रीमंतांस मेजवानी केली. एल्फिन्स्टन साहेबाकडे सर्व पक्वान्नें ताटें भरभरून पाठविलीं. त्याचा मेहुणा एका गांवचा पाटील होता, तो एल्फिन्स्टन साहेबास भेटावयास गेला होता; त्यानें असें लिहून ठेविलेलें आहे:—

" त्रिंबकजी एवढ्या उच्चतेस पावला असून आपल्या पहिल्या आप्तइष्ट मंडळीला व गांवच्या लोकांना स्मरतो आहे; आपल्या गांवाला जपतो, त्याच्याभोंवता कोट बांधतो आहे; हें त्याला भूषण आहे असें कोणालाही वाटेल. त्याचें एकंदर वर्तन असेंच असतें ह्मणजे बरें होतें. "

नाशिकच्या स्वारींत एल्फिन्स्टन साहेबानें जें काय पाहिलें त्यापासून त्याला पुष्कळ संतोष वाटला. वेरुळाला जाणें झालें नाहीं. परंतु पुण्यास आल्यावर थोड्याच दिवसांनीं बाजीरावाची स्वारी आषाढीकरितां पंढरीस जावयास निघाली, तेव्हां त्याला तो हेतु सिद्धीस नेतां आला. तो अहमदनगर, औरंगाबाद, दौलताबाद, वगैरे वाटेवरील शहरें, जगांतील अत्युत्तम मजबूद किल्ल्यांत गणलेला दौलताबादचा किल्ला, वगैरे पहात पहात तारीख २४ जुलै रोजीं वेरुळास गेला. कागजवाडा ह्मणून जें मुसलमानी लहानसें शानदार खेडें आहे, त्यांतील दौलताबादी नांवाच्या प्रसिद्ध कागदांचा कारखाना पाहून तो रोझ्यास गेला. तेथें औरंगजेब, त्याचे पुत्र, नारायण नकीखान, मलिकंबर, मूर्तिजानिजामशहा, वगैरेंच्या कबरा आहेत त्या त्यानें पाहिल्या. तेथें फकिरांच्या झुंडीच्या झुंडी होत्या. ते सुमारें १५०० आहेत ह्मणत. त्यांतले कांहीं त्याच्याबरोबर डोंगरावर गेले आणि त्यांची हद्द संपली तसे माघारे फिरले. हद्दीवर ब्राह्मण उभेच होते, ते त्याला लेणीं दाखविण्याला घेऊन गेले डोंगराच्या एका बाजूला रोझें शहर, चांगलें तटबंदी केलेलें परंतु बहुतेक उद्वस्त झालेलें, त्याच्या पहिल्या भरभराटीच्या वेळच्या अद्याप कांहीं निशाण्या आहेत त्या पाहून, दुसऱ्या बाजूस लेणीं आहेत तिकडे एल्फिन्स्टन गेला; तेव्हां तेथचा देखावा साराच निराळा दिसला. आपण अगदीं निराळ्या लोकांत, निराळ्या युगांत, आणि निराळ्याच जगांत आलों आहों कीं काय, असा त्याला भास झाला. शेकडों वर्षें होऊन गेलीं तरी वारा, ऊन, पाऊस, यांपासून ज्यांना कांहीं फारशी इजा झाली नाहीं, शोभा जशीच्या तशी कायम आहे, जीं कोणत्या काळीं, कोणी राजानें, कोणत्या कारागिरांकडून निर्माण करविलीं, याचा

अद्याप तर कांहीं पत्ता लागत नाहीं, औरंगजेबासारख्या हिंदुधर्मद्वेष्ट्या, क्रूर, मूर्ख, मुसलमानांनीं ज्यांतील अनुपम कृतीचा थोडाबहुत विध्वंस करून सहृदय प्रेक्षकांच्या नेत्रांचें जन्मसाफल्य होत असतां आनंदभरांत मध्येंच मुखां-तून अपशब्द निघण्यास मात्र कारण करून ठेविलें, कसाही दुरभिमानी पुरुष असला तरी हिंदुस्थानच्या प्राचीन कारागिरीस जगांत दुसरी तोड नाहीं असें ज्यांचें अवलोकन होतांच त्यास कबूल करावें लागतें, अशीं तीं त्या डोंगराच्या उत्तरेच्या टोंकास पारसनाथ सभा. दक्षिण टोंकास धेडवाडा, आणि मध्यें इंद्रसभा, सुतार झोपडें, आणि सर्वांत उत्कृष्ट कैलास, इत्यादि अत्यंत मनोहर, अनुपम, * अवर्णनीय, अतर्क्य कारागिरीचीं कोरींव कामें पाहून त्याला अपरिमित आनंद झाला.

---

## भाग नववा.

### त्रिंबकजी डेंगळा, सन १८१५–१७.

दक्षिणेंतील जाहागीरदाराबरोबर ठराव होऊन त्यांनीं पेशव्यांची पूर्ववत् चाकरी करावी असें झालें, तेव्हां त्यांचीं पथकें हुकमांत आल्यानें बाजीरावास तितकें बळ जास्त आलें ह्मणण्यास कांहीं हरकत नव्हती; परंतु ते त्याला शत्रूसारखें दिसत होते आणि त्यांच्या फौजेचें भय वाटत होतें, ह्मणून त्यानें स्वसंरक्षणार्थ लागलेंच एक पलटण इंग्रजांकडून तयार करविलें हें मागें सांगितलेंच आहे. आतां आपण निर्भय झालों असें त्याला वाटूं लागलें; राज्याला कोणाचा उपद्रव नाहींसा झाला, तेव्हां मुलखांत आबादानीही होऊं लागली आणि मग आपण बलाढ्य आहों; आपली शक्ति उत्तरोत्तर वाढत जाणार असा त्याला भ्रम होऊं लागून, बापआजाच्या वेळच्या पेशवाईचा दरारा पुन: बसेल असे विलक्षण तर्क त्याच्या मनांत येऊं लागले. परंतु इंग्रजांबरोबरचा स्नेहसंबंध तोडून टाकून आपली सत्ता वाढवावी असें तो केव्हांही खरोखर मनांत आणणार नाहीं, असेंच एल्फिन्स्टनसाहेबाला वाटत

---

* एक इंग्रज ग्रंथकार ह्मणतो, ह्या लेण्यांचें कितीही वर्णन केलें तरी तें पुरें होणारच नाहीं. त्या डोंगरावर जाऊन तीं आपल्या डोळ्यांनींच पाहिलीं पाहिजेत.

होतें. परंतु तो त्याचा भ्रम लौकरच दूर झाला. तो वेरूळचीं लेणीं पहाण्यांत गुंतला होता, तेव्हां इकडे श्रीमंतांची स्वारी पंढरपुरीं असतां त्या पुण्यक्षेत्रीं श्रीसन्निध ब्रह्महत्या घडली. ती प्रत्यक्ष त्यांच्या हुकमानें नसली, तर संमतीनें तरी असावी; असा लोकापवाद त्यांच्या माथीं बसला आणि ती करविणाराचा कैवार त्यांनीं घेतल्यानें लोकांचा व एल्फिन्स्टन साहेबाचा ग्रह दृढ झाला. आणि त्यांना त्याचें प्रायश्चित्तही घडलें. त्यांच्या राजलक्ष्मीचा आणि तिजबरोबर महाराष्ट्राच्या स्वातंत्र्याचा क्षय झाला, तो प्रकार आतां वर्णन करावयाचा.

एल्फिन्स्टनसाहेब पुण्यास रेसिडेंट झाल्यापासून त्याचें काम केवळ वकिली करून राहण्याचें राहिलें नाहीं. त्याच्या अंगावर राज्यकारभार पडला होता असें नाहीं, परंतु राज्यकारस्थानात त्याला बरेंच मन घालावें लागलें आणि एक एक बिकट प्रश्न पुढें येऊन उलगडत गेला, तसतसा तो अधिकाधिक तरबेज होत गेला व त्याची योग्यता सहजच वाढत गेली. त्या वेळीं हिंदुस्थानची राजकीय स्थिति कशी होती तिचें थोडेंसें वर्णन करणें जरूर आहे; सबब तें करूं ह्मणजे पुढील कथानक ध्यानांत येण्यास बरें पडेल.

इसवी सन १८१३ च्या अखेर लॉर्ड मिंटो गव्हरनरजनरलाचें काम सोडून गेल्यावर त्या जागीं अर्ल ऑफ मोइरा याची नेमणूक झाली तो वयानें पोक्त आणि अनुभविक मनुष्य होता. विलायतेस असतांना तो लॉर्ड वेलेस्लीच्या उलट मताचा असून त्याच्या राज्यपद्धतीस नांवें ठेवीत होता, परंतु हिंदुस्थानांत येऊन त्याला काम करूं लागून फार महिने लोटले नाहींत, तों कसेंही करून तह करून स्वस्थ बसावें असें जें कंपनीच्या विलायतेंतल्या मुख्य अधिकाऱ्यांचें मत झालेलें होतें तें अगदीं चुकीचें होतें आणि त्यापासून मोठा नाश झाला हें त्याच्या लक्षांत आलें. नेपाळच्या दक्षिणेकडील, हिमालय पर्वताच्या उतरणीवरील प्रदेशावर गुरखे लोक हल्ला करून उपद्रव देऊं लागले. नेपाळ दरबाराबरोबर गोडीगुलाबीनें तह करून त्यांनां तो मुलूख सोडून जाण्याला सांगावे अशी लॉड मिंटोनें खटपट केली. परंतु ती निष्फळ झाली; तेव्हां आतां शस्त्र उचलावें असें लॉर्ड मोइरानें मनांत आणलें आणि सन १८१४ मध्यें त्या पहाडी लोकांबरोबर लढाई आरंभिली. तींत इंग्रज सेनापतीची नालायकी आणि अविचार दिसून आला. गुरख्यांनीं मोठ्या शौर्यानें लढून त्याला चांगलाच हात दाखविला. मग

लॉर्ड मोइरानें डेव्हिड ऑक्टर लोनी याचें शौर्य पाहून त्याला मुख्य सेनापतित्व दिलें आणि सारा भार त्याच्यावर टाकला. त्यानें सत्रा हजार १७००० फौज बरोबर घेऊन खटमंडू राजधानीवर चाल केली. तो अगदीं जवळ, पन्नास मैलांवर येऊन ठेपला तेव्हां आतां लढणें व्यर्थ आहे असें समजून राजानें तह केला. लॉर्ड मोइरानें ही लढाई मोठ्या हुशारीनें चालविली, ह्मणून त्याची वाहवा होऊन त्याला मार्किस ऑफ् हास्टिंग्ज असा किताब मिळाला. हिंदुस्थानच्या इतिहासांत त्याची प्रसिद्धि याच नांवानें विशेष आहे.

सर जॉर्ज बार्लो याने मराठे राजांबरोबर जे तह केले होते ते नांवाचे होते; तथापि त्याच्या दूषकांना वाटले होतें, त्यापेक्षां ते पुष्कळ अधिक काळपर्यंत टिकले आणि तितक्या अवधींत त्यांच्या सैन्याची सुधारणा किंवा तयारी न होतां उलट त्यांची शक्ति कमीच झाली. मग इंग्रजांना त्यांचें कांहीं भय उरलें नाहीं. इंग्रजांच्या सैन्याची स्थिति त्याच्या अगदीं उलट होता त्यांत भरती अधिक झाली आणि त्याची तयारी अगदीं उत्कृष्ट होती; पेंढारी मात्र दिवसदिवस बळावत चालले होत आणि त्यांचा उपद्रव अधिकाधिक होऊ लागला होता शिंदे होळकर वगैरे मराठे सरदारांना त्यांना आवरून धरण्याचें सामर्थ्य नव्हतें. आणि इच्छाही नव्हती. त्यांवर हात टाकण्याला उठावें तर न जाणों, कदाचित् सगळीकडेच एकदम धामधूम होईल ह्या भीतीनें इंग्रजही त्यांच्या वाटेस जात नव्हते त्यामुळें ते अधिकच निर्भय झाले आणि त्यांच्यातले कांहीं नाईक. घोडेस्वार, पायदळ, तोफखाना, अशी चांगली कायम फौज ठेऊन संस्थानें स्थापूं लागले. साऱ्या मध्य हिंदुस्थानांत आणि रजपुतान्यांत केवळ झोटिंगबादशाही माजली आणि तिचे परिणाम दक्षिणेला भोवूं लागले.

बाजीरावाचा आणि इंग्रजांचा तह झाला, तेव्हां त्यांनीं त्याच्याकडून असें लिहून घेतलें होतें कीं, मी कोणत्याही राजाशीं कांहीं संबंध ठेवणार नाहीं; परदरबाराशीं जें काय बोलावयाचें असेल तें तुमच्या रेसिडेंटामार्फत बोलेन. परंतु त्याप्रमाणेंच वहिवाट घडत होती असें नाहीं. शिंदे, होळकर, गायकवाड, नागपूरकर भोसले, निजाम, ह्या साऱ्यांचे वकील पहिल्याप्रमाणें पुण्यास होते. पेशव्याच्या आणि त्यांच्या मुलखाच्या हद्दींचे तंटे, खंडणीचा पैसा येणें देणें, वगैरे प्रकरणें कांहीं संपलीं नव्हतीं. त्यासंबंधानें पत्रव्यवहार चाले; असें त्यांच्याशीं संबंध ठेवण्याला तें द्वार खुलेंच होतें. आपण इंग्रजांचीं पलटणें

चाकरीस ठेवून घेतलीं हें कांहीं बरें केलें नाहीं असें बाजीरावाला वाटूं लागलें होतें आणि ह्या पाशांतून मोकळें व्हावें ह्मणून त्याची आंतल्याआंत धडपड चालली होती. तो ज्या काय धडपडी करीत होता, त्यांची सारी हकीकत एल्फिन्स्टन साहेबाला कळत होती; परंतु हा जातीचा भित्रा माणूस निकरावर यावयाचा नाहीं अशी त्याची पक्की खात्री होती; ह्मणून आपण होऊन त्याच्या वाटेस जा कशाला? असें ह्मणून तो स्वस्थ पडून होता. नेपाळाबरोबरच्या पहिल्या लढाईंत गुरख्यांची सरशी होऊन इंग्रजांची थोडीशी तारांबळ उडालेली ऐकून बाजीरावाला मोठें स्फुरण आलें आणि त्यानें शिंदे, होळकर, व भोसले यांच्याशीं बरींच कारस्थानें मांडली. तेव्हा आतां आपण असे मौज पहात बसून उपयोगी नाहीं, थोडें दटाऊन बोललें पाहिजे असें एल्फिन्स्टन यास वाटूं लागून तो त्या तयारीस लागणार होता. इतक्यांत बाजीरावाचें नशीब ओढवलें आणि गोष्ट निकरावर आली. तेव्हां चंद्रभागातीरी पंढरिनाथाच्या द्वारीं जी ब्रह्महत्या झाली ती, तो पुढें सर्वस्वास मुकून गंगातीरीं जाऊन स्वस्थ स्नानसंध्या करीत बसण्यास जावयास निघाला त्या स्वारीचें प्रस्थानच ह्मटलें तरी चालेल.

एल्फिन्स्टन साहेब कुशाग्रबुद्धि आणि सूक्ष्मदृष्टि असल्यानें त्यानें पुणें दरबारच्या स्थितीचें, त्यांतील लहानथोर मंडळीच्या स्वभावाचें व चालचलणुकीचें आणि राज्यकारभाराच्या तऱ्हेचें अवलोकन नीट केलें होतें आणि जें दिसलें तें सन १८१५ च्या नोव्हेंबर महिन्यात गव्हरनर जनरलास विदित केलें.

बाजीरावसाहेबाच्या बाह्य स्वरूपाचें चित्र एकाद्या उत्कृष्ट चितान्यानें काढलेलें असेल, परंतु तें कोठें उपलब्ध असल्याचें ऐकिवांत नाहीं. एल्फिन्स्टन साहेबानें त्याचें वर्णन केलेलें मागें दिलेंच आहे; परंतु उत्कृष्ट चित्रकारास कधींच न साधणारें जें अंतःस्वरूपलेखन तेंही त्यानें हुबेहूब तसबीर काढल्याप्रमाणें करून ठेविलें आहे. तें असें:—

" श्रीमंत बाजीरावसाहेब पेशवे यांच्या मनांत कशा प्रकारचे विचार घोळत असतील व त्यावरून ते कशा प्रकारें पुढें वागतील त्याचें अनुमान करण्याविषयींचे प्रयत्न पुष्कळांनीं केले, परंतु त्यांना त्यांच्या खऱ्या स्वभावाचें अनुमान होऊं शकलें नाहीं. असें होण्याचीं अंशतः कारणें दोन दिसतात.—एक असें कीं, बाजीरावाच्या मनाचा मुख्य धर्म भित्रेपणा हा असून त्याशीं विसंगत अशा पुष्कळ गोष्टी करण्यास ते प्रवृत्त होत असतात. दुसरें कारण असें कीं,

आपल्या मनांतल्या गोष्टी लोकांस न कळूं देण्याच्या कामांत ते फार पटाईत आहेत; यामुळें स्वतःच्या मनाची खरी स्थिति व स्वतःचे हेतु हे लोकांच्या दृष्टोत्पत्तीस येऊं न देतां आपल्या मनांत लवमात्र नसणाऱ्या गोष्टी दुसऱ्यास आहेतशा भासवाव्या ही गोष्ट त्यांना अगदीं साधून गेली आहे. त्यांच्या अंगीं थोडें अधिक धैर्य असतें, तर ते महत्वाकांक्षी होऊन आपण हव्या ती पूर्वदिशा असें करते; स्वतःच्या निश्चयांत लवमात्र न ढळतां आपलें वर्तन दृढ ठेवते; फार तर काय, अंगांत खिळलेल्या भित्रेपणाच्या कारणानें त्यांना जी ऐषआरामाची अनिवार इच्छा होत असते तिलाही त्यायोगानें आळा पडला असता. सध्यांची स्थिति पाहूं जातां आपण बलाढ्य व अधिकारसंपन्न असावें ही हौस त्यांना फार आहे, परंतु तसे होण्याला जे धैर्य पाहिजे तें अंगीं नाहीं आणि फार आळसी असल्यामुळें त्यांना आपला अधिकार चालवतां येत नाहीं. तरी पण तो हातचा सोडूं नये ही फार इच्छा आहे. ते आळशी आहेत खरे, परंतु त्यांचा स्वभाव संशयखोर असल्यानें सदां सावध असतात. त्यामुळें त्यांना तो आळस केव्हां केव्हां बाजूस ठेवावा लागतो. त्यांच्या अंगीं परिपूर्ण भरलेला-असा एकही गुण नाहीं व जो जो ह्मणून गुण घ्यावा त्याच्याबरोबर त्याच्याच विरोधी गुणांचें मिश्रण त्यांचे अंगीं आढळतें. त्यांनां मोठेपणाची हौस असल्यानें पदरच्या हलक्या माणसांची संगत फार आवडते; कारण, त्यांच्यामध्यें आपलें श्रेष्ठत्व अगदीं मनसोक्त मिरवावयाला सांपडतें. त्यांच्याशीं ते तोऱ्यानें आणि उद्दामपणानें वागतात. परंतु त्यांना जेव्हां एखादें आपलें कार्य साधावयाचें असेल तेव्हां मान, प्रतिष्ठा, वगैरे सारें गुंडाळून ठेऊन ते कोणतेही नीच कृत्य करण्याला मागें सरणार नाहींत. जरी त्यांचा स्वभाव लहरी आणि घटकेत बदलणारा आहे तरी त्यांचे जे मोठेमोठे बेत असतात ते अगदीं कायम असतात. त्याचें जें ह्मणणें असतें तें कोणी थोडेंसें कबूल केलें ह्मणजे आपला हेतु सिद्धीस नेण्याचा दृढ निश्चय करण्यास त्यांना उत्तेजन येतें; आणि त्यांच्या मनाच्या उलट गेलें ह्मणजे ते अधिकच आग्रहास पडतात. परंतु त्या आग्रहांत परिणामीं भय आहे असें त्यांच्या नजरेस आलें ह्मणजे आपलें ह्मणणें लागलेंच सोडून देतात. ते अतिशय आकसखोर, केवळ कृष्णसर्प आहेत. त्यांनां कोणी अपकार केला असला, तर तो कधीं विसरत नाहींत आणि आपल्या वैऱ्याचा नाश करण्यास व त्याचा सूड उगविण्यास हरतऱ्हेनें प्रयत्न केल्याशिवाय रहात नाहींत. त्यासाठीं कुलंगडीं करावयाचे

त्यांना कांहींच प्रयास पडत नाहींत; कारण, ते स्वभावतःच कपटी असून लाघवी आहेत आणि त्यांना कारस्थानें व गारुड रचण्याची जातीचीच मोठी हौस आहे. ही मूर्ति अशा गुणगणांनीं मंडित असल्यानें एकटा त्रिंबकजी खेरीज करून बाकी प्रत्येक व्यक्तीविषयीं त्याला अविश्वास वाटावा यांत कांहीं आश्चर्य नाहीं. त्रिंबकजीवर तरी त्याचें प्रेम बसलें ते त्याच्या अंगीं तसेच गुण होते ह्मणून. तो अगदीं हलका असल्यानें त्याचें त्याला भय बाळगावयास नको आणि अति नीच असल्यामुळें त्याच्याविषयीं मत्सर उत्पन्न व्हावयाला नको; आणि अत्यंत खुशामती, थुंकी झेलणारा असल्यामुळें आपल्या उलट वागून संतापवील हें ही मनांत आणावयास नको. अशा परमभक्तिमान् सेवकाची निष्ठा पाहून त्याने त्याच्यावर अत्यंत प्रेम करावें आणि मानवजातींत कधीं कोणावर टेविला नाहीं असा त्याच्यावर विश्वास ठेवावा हें विहितच आहे. "

"याप्रमाणें बाजीरावसाहेबांच्या अंगांत अनेक दोष मात्र आहेत आणि गुण मुळींच नाहींत असें नाहीं; तेही आहेत व ते सांगितले पाहिजेत. ते बुद्धिमान नाहींत असें खचित नाहीं. पैशाच्या देवघेवींत ते फार सचोटीनें वागतात. त्यांच्या मनाला एकाद्याविषयीं भीति किंवा सूड घेण्याची इच्छा यांनीं ग्रासलेलें नसले ह्मणजे तें दयार्द्र असतें. ते खर्च बेतानें करतात परंतु कद्रू नाहींत. त्यांची चालरीत सभ्यपणाची आणि प्रौढ आहे. त्यांच्या वर्तनांत आणखी कांहीं गोष्टी सांगण्यासारख्या आहेत, त्यांचा संबंध त्यांच्या राजकीय प्रकरणीं वागणुकीशीं कांहीं नाहीं हें खरें, परंतु त्या सांगितल्या पाहिजेत. ते अतिशय देवभोळे, देवभाळेपणाचे केवळ बंदे गुलाम आहेत. त्यांचें अर्धे आयुष्य उपासतापास, जप ध्यान, पाठ प्रार्थना आणि यात्रा यांत, स्नानसंध्या, पूजाअर्चा, होमहवन, ह्यांत जातें आहे. उत्पन्नापैकीं बराच भाग मंत्रतंत्र प्रकरणांत खर्च होत असतो; आणि कांहीं करूं लागले तरी प्रश्न, मुहूर्त, शकुन, अपशकुन, हें पहात असतात; त्यामुळें त्यांना चैन पडत नसतें. परंतु हा प्रकार त्यांच्या ऐषआरामाला किंवा चैनबाजीला आड येत नाहीं. स्नानसंध्यादिक कर्मांत त्यांचा जेवढा वेळ जातो तेवढा शिवाय करून बाकी सारा अनाचाराच्या, लाजिरवाण्या गोष्टि करण्यांत जातो. ते बाहेर मोठा सोंवळेपणा दाखवितात परंतु खुषमस्करी मंडळी आणि निर्लज्ज बायका ह्यांत बसून प्रहर सहा घटिका घालविल्यावांचून त्यांचा दिवस जात नाहीं. त्या मंडळींत जो बीभत्सपणा

आणि व्यभिचाराचा अत्यंत निंद्य प्रकार चालतो. तो उच्चारूं सुद्धा नये इतका घाणेरडा असतो. हे राजश्री तो पाहून आनंदांत निमग्न होत असतात. ह्या मंडळींत येणाऱ्या बायका पुष्कळ आणि बहुधा थोरथोरांच्या असतात. जे सरदार आपल्या बायका वाड्यांत पाठवीत नाहींत, त्यांवर श्रीमंतांची अवकृपा होते आणि कितीएकांशीं त्यांचें जें अगदीं हाडवैर पडलें आहे त्याचें कारण हेंच आहे. खंडेरावरास्त्याचा जो नाश झाला तो तो आपली बायको साफ पाठवीत नाहीं ह्मणाला ह्मणून. माधराव रास्त्यांचा अगदीं निर्दयपणानें अजून जो छळ चालला आहे त्याला तरी अंशतः तेंच कारण आहे. बापू-गोखल्याची मागें जी अप्रतिष्ठा झाली आणि तो आतां जो मर्जींत आला आहे त्याला कारण तो आपल्या कुटुंबाची विडंबना करून घेण्यास पहिल्यानें कबूल नव्हता आणि मग हळु हळु कबूल झाला हेंच आहे असें लोक निःशंकपणें बोलतात. ”

त्रिंबकजी डेंगळा अगदीं हलका मनुष्य, जासूद होता. बाजीराव पुणें सोडून वसईस जाऊन बसले तेव्हां तेथून त्यांच्या पक्षाच्या मंडळीकडे पत्रे नेण्याआणण्याच्या कामीं त्याची चाकरी मनासारखी झालेली पाहून ते खूष झाले. तेव्हां पासून तो थोडा थोडा त्यांच्या मर्जींत येत चालला. पुण्यांत येऊन बाजीराव पुनः स्वस्थानापन्न झाल्यावर ते जेव्हां महाल मक्त्यानें देऊं लागले तेव्हां त्यांच्या इच्छेचा कल पाहून तो सर्वांपेक्षां चढ सवाल करूं लागला तसतशी त्यांची मर्जी सुप्रसन्न होऊं लागली. तो जी रक्कम बोले तिची भरती करून देण्याकरितां ह्मणून प्रजेवर अनेक प्रकारें जुलूम करी आणि पाहिजे तितका पैसा काढी. श्रीमंतांच्या मर्जीचा झोंक पाहून त्याप्रमाणें वागावयाचें, त्यांस खुष करण्याकरितां पाहिजे तें कृत्य करावयाचें, बरें वाईट कांहीं ह्मणावयाचें नाहीं; त्यांची जी आज्ञा होईल ती मोठ्या धैर्यानें करावयाची, हे कायते त्याचे गुण; त्यांवर त्यानें त्यांची मर्जी संपादिली आणि पक्का विश्वासू बनला. तो एकदां असें ह्मणाला कीं मला ‘ गाय तोड ’ अशी श्रीमंतांनीं आज्ञा केली तर मी ती तत्काळ बजावीन. यावरून तो किती नीच असेल त्याचें अनुमान सहज होतें. ”

त्रिंबकजी बाजीरावाचें कृपापात्र झाल्यापासून जो भरारत चालला तो अखेर हत्तीच्या गंडस्थळावर जाऊन बसला. सदाशिवरावभाऊ माणकेश्वर दिवाण होता, परंतु तो थोडक्याच दिवसांत निस्तेज दिसूं लागला. त्रिंबकजी-

पुढें त्याचें वजन पडेनासें झालें; नाव मात्र राहिलें. पुढें बाजीरावानें रेसिडेंटाकडे वकिलीचें बोलणें बोलण्याच्या कामावर प्रधानमंडळांत त्याची नेमणूक केली. एल्फिन्स्टन साहेबानें त्याच्याविषयीं असें लिहिलें आहे:—

" त्याची नेमणूक झाल्यापासून तो मला भेटण्याकरितां कितीएक वेळ आला. त्यानें स्वतः आपल्या कृतीनें व आडपडद्याच्या भाषणांनीं, आणि चांगल्या प्रकारें वागण्याचीं वचनें देऊन, माझी मर्जी संपादण्याची फार इच्छा दाखविली. आपली मुख्य दिवाणगिरीवर नेमणूक झाली तर ती इंग्रजसरकारास मान्य होईल कीं नाहीं, ह्या सशयांत तो आहे. ती जागा पटकवण्याला त्याला कायती एवढीच हरकत वाटत आहे. येवढ्या थोरल्या पदावर विराजमान होण्याला तो खरोखर अगदीं अयोग्य मनुष्य आहे. तो आर्धी अक्षरशत्रु आहे, वाचावयाला सुद्धां शिकलेला नाहीं. त्याची रीतभात, समज, अक्कल वगैरे तो ज्या वर्गांतला आहे, त्यांतल्या इतर माणसांप्रमाणें आहे. हिंदुस्थान देशाची स्थिति काय, आपले यजमान श्रीमंत पंतप्रधान यांची योग्यता काय, त्यांचें राज्य केवढें, त्यांचा आणि इंग्रज सरकारचा जो तहनामा झालेला आहे, त्यानें उभयतांचा संबंध कोणत्या प्रकारचा झाला आहे, वगैरे गोष्टींची त्याला कांहींएक माहिती नाहीं. मराठे लबाड आणि बेमान हें तर प्रसिद्धच आहे, परंतु त्यांच्यामध्यें देखील त्रिंबकजीचा ह्या गुणाविषयीं डंका वाजत आहे. "

इंग्रज सरकारानें आपल्या राज्यव्यवस्थेंत हात घालूं नये असें बाजीरावाला वाटत होतें, परंतु त्याचा भाऊ अमृतराव, त्याच्या पदरचे पुष्कळ लोक, नाना फडनविसाचे आप्तसंबंधी, व दक्षिणेंतील जहागीरदार, यांस त्याच्याकडून उपसर्ग लागणार नाहीं अशी त्यांनी ( इंग्रजांनीं ) हमी भरली होती. अनेकांना अनेक प्रकारचीं आश्वासनें दिलीं होतीं, ह्मणून त्याप्रमाणें वागणूक घडण्याकरितां त्यांना कारभारांत हात घातल्यावांचून राहतां येईना. बाजीरावाला तें पुरवत नव्हतें. त्यामुळें घासाघास सुरू झाली. माझ्या कारभारांत तुह्मी ढवळाढवळ करूं नका असें त्यानें जनरल वेलेस्ली याला अगदीं साफ सांगितलें होतें. वसईच्या तहानंतर थोड्याच दिवसांनीं वेलेस्ली साहेबानें जे खलिते ( मिनिटें ) लिहिले, त्यांत अशी रड गालेली आहे कीं, श्रीमंतांच्या राज्याच्या बऱ्याकरितां ह्मणून आह्मी जी कांहीं गोष्ट सांगूं ती अडून पडेल. ती सिद्धीस न जाण्याला कारण आमच्या तोंडून निघाली एवढेंच पुरे आहे.

रेसिडेंटाला पेशवे दरबाराशीं मोठमोठ्या प्रकरणांत मात्र बोलावें लागत होतें असें नाहीं. कारभारी मंडळी व प्रजा, भोसले, निजाम वगैरे पर दरबारें व त्यांच्या प्रजा यांच्या एकमेकांवर फिर्यादी, सरकारच्या हक्कांबद्दल फिर्यादी, पेशव्यांच्या मुलखांत शिंदे व होळकर यांचे गांव होते त्यांसंबंधीं तक्रारी, ह्या सर्व प्रकरणांत नेहेमीं तंट्याला जागा असे. याशिवाय व्यापाऱ्यांच्या फिर्यादी, चाकरीस ठेवलेल्या फौजेंतील शिपायांच्या फिर्यादी, जकात माफ असावी, गुन्हेगार स्वाधीन करावे वगैरे पेशवे दरबारचें ह्मणणे असे तें, अशीं अनेक बारीक सारीक प्रकरणं असत, त्यांतही त्याला बोलावें लागत असे. त्यांत श्रीमंत बाजीराव साहेब स्वत: कसे वागत असत व पुढें कसें कसें घडेल असें त्याला वाटत होतें, तें एल्फिन्स्टन साहेबानें लिहून ठेविलें आहे. तें असें:—

" आह्मी कांहीं गोष्टी सांगितल्या आणि त्या श्रीमंतांच्या मनांत करावयाच्या नसल्या, परंतु करीत नाहीं असें ह्मणणे वाजवी नसलें, ह्मणजे त्या घडूं नयेत ह्मणून ते अनेक प्रकारचे अडथळे आणतात; केव्हां हरकती दाखवितात, केव्हां केव्हां तुमच्या ह्मणण्याप्रमाणें करण्याला आह्माकडून अगदीं उशीर नाहीं असे ह्मणतात, परंतु दुसऱ्या कोणीकडून तरी विघ्न उपस्थित करतात; किंवा एक एक प्रकरण अशा प्रकारें लांबणीवर टाकतात कीं, ही त्यांची तऱ्हा ज्याला माहीत असते त्यालासुद्धां हे ह्या कामांत असें मुद्दाम करीत आहेत असें ह्मणावें, कीं दरबारच्या नेहमींच्या वहिवाटीप्रमाणें होतें आहे ह्मणावें, याचा विचार पडतो. अलीकडे ज्या कांहीं गोष्टी घडल्या आहेत, त्यांमुळें कितीएक प्रकरणांत त्यांचे विचार पालटले असतील; परंतु त्यांपासून पुढें परिणाम कसा होईल हें कांहीं काल लोटल्यावांचून खात्रीने सांगतां येणार नाहीं. पेशव्यांशीं आमचा जो संबंध आहे, त्यांत बाजीरावाच्या स्वत:च्या वर्तनाप्रमाणें नेहमी पुष्कळ फेरबदल होत असतो. जर एकादा पेशवा चलाख, पाणीदार आणि शूर निघेल, तो आपलें सैन्य सुधारण्याकडे लक्ष देईल, जहागीरदारांना खुष करील आणि मराटेशाईतले जे पहिले थोरथोर सरदार आहेत त्यांना खुष करून त्यांनीं आपल्याला यजमान ह्मणून सेवकधर्मानें वागावें असें करील, तर पेशवे सरकारचे जे अनेक हक्क, दावे वगैरे आहेत ते त्याच्या हातीं पडले असतां त्यांना कसें स्वरूप प्राप्त होईल ती कल्पना करूं लागलें ह्मणजे मौज वाटेल. अशा प्रकारचा कोणी पुरुष अग्रणी निघेल, तर महाराष्ट्रमंडळ प्रबळ करण्याला सध्यां हिंदुस्थानाची जी स्थिति आहे, हींत उत्कृष्ट साधनें आहेत

हें अगदीं उघड आहे. परंतु जेथें फार दिवस स्वस्थता नांदत आली आहे आणि ब्राह्मणी विद्या पसरली आहे, तेथें असा पुरुष निर्माण व्हावयाचा ह्मटलें ह्मणजे तो लोकोत्तर बुद्धिमान् पाहिजे."

एल्फिन्स्टन साहेबानें ह्मटल्याप्रमाणें महाराष्ट्रमंडळ प्रबळ करण्यास हिंदुस्थानची तत्कालीन स्थिति अनुकूल होती खरी, परंतु ती ओळखणारा देखील कोणी पुरुष राजमंडळांत नव्हता; मग त्याप्रमाणें हातानें करून दाखविणाराचें नांव कशास पाहिजे? शिवाजीमहाराजांसारखे महात्मे उत्पन्न होण्यास साऱ्या राष्ट्राचें पुण्य खर्चीं पडावें लागतें असें ह्मणण्यास हरकत नाहीं. तें होऊन जाऊन नशीबाचें पारडें फिरलें ह्मणजे रावबाजीसारखींच रत्नें उत्पन्न होतात आणि त्यांना परिवारही तसाच मिळतो. अखेर सर्व स्वनाश होतो. तसा प्रसंग महाराष्ट्रावर हां हां ह्मणतां येऊन ठेपला. पेशवे टिकल्याचे मालक आणि सारा राज्यकारभार चालविणारा मुखत्यार नानाफडणविसासारखा चतुर मुत्सद्दी असता, तर तशाही प्रसगांतून तो निभाऊन जाता. परंतु बाजीराव मालक होतांच नानाची अक्कल गुग होऊन त्याच्या कपाळीं कारागृहवास आला, तेव्हां महाराष्ट्राचें नशीबच खोटें असें ह्मटलें पाहिजे.

रावबाजीच्या कारकीर्दींत भटाभिक्षुकांच्या हातीं राज्यकारभार गेला. माणकेश्वराच्या हातचा टाळ—तंबुरा सुटून त्याला मुख्य दिवाणगिरी मिळाली. 'हात् तुझ्या कामांत भट पडो' ही शापोक्ति याच कारकीर्दींत घडलेल्या भटांच्या गोष्टींवरून उत्पन्न झाली. त्रिंबकजीनें तर त्या सर्वांवर ताण केली. यजमानाची आणि दिवाणाची अशी अदृष्टपूर्व जोडी जमल्यावर पुढें जो एक एक विलक्षण प्रकार घडला आणि राज्य लयास गेलें त्याचें आश्चर्य मानावयास नको.

बाजीराव त्रिंबकजीला अधिकाराच्या शिखरास चढवूं लागला, तें एल्फिन्स्टन साहेबाला जरी अगदीं अयोग्य दिसत होतें तरी त्याला "असें करूं नका" ह्मणावयाचें नाहीं हा त्याचा निश्चय होता. अमुक मनुष्याला दिवाण नेमा किंवा नेमूं नका असें श्रीमंतांस ह्मणण्याचा इंग्रजांस अधिकार नव्हता हें खरें आहे. परंतु ते धूर्त, स्वहित साधण्याविषयीं नेहमीं दक्ष असत. त्रिंबकजी दिवाण झाल्यानें राज्यांत घोटाळा होईल आणि तें बुडण्याच्या पंथास लौकर लागेल ही गोष्ट सामान्य अक्कलेच्या मनुष्यासही कळणारी होती. मग ती एल्फिन्स्टनसारख्याच्या लक्षांत आल्याशिवाय राहिली असेल? परंतु त्यानें

त्यावेळीं गव्हरनर जनरलास इतकेंच लिहून ठेविलें:—“ ह्या नवीन दिवाणाची इच्छा इंग्रज सरकारचा आपल्यावर विश्वास बसवून घ्यावा अशी असल्यानें आह्माला दूर्त कांहीं फायदे होतील, परंतु ते फार वेळ टिकणार नाहींत; आणि त्रिंबकजीच्या स्वभावावरून व वर्तनावरून मला अशी भीति उत्पन्न होते कीं, बाजीराव जे आपले हक्क हक्क ह्मणत आहेत ते साधून देण्याची तो फार खटपट करील आणि आमच्या बेतांच्या उलट ते वागूं लागतील, तेव्हां आह्मी जी सल्लामसलत देऊं तिला आतांच्या दिवाणापेक्षां तो अगदीं अयोग्य प्रकारें आडवा जाईल.”

एल्फिन्स्टन साहेबानें जे अनुमान केलें होतें, त्याप्रमाणें अनुभव थोड्याच काळांत येऊं लागला. त्याकाळीं ( सन १८१५ ) त हिंदुस्थानची स्थिति त्याच्यासारख्या खटपटी मनुष्यास कारस्थानें रचण्यास हवीतशी अनुकूल होती. मुलखांत शांतता असावी ह्मणून पेशव्यांच्या राज्यकारभारांत इंग्रजांना हात घालावा लागला होता, परंतु वसईच्या तहाप्रमाणें परदरबाराशीं असलेला संबंध अगदीं बंद करण्याचा जरी अधिकार होता तरी तो त्यांनीं तितक्या सक्तीनें चालविला नव्हता. साऱ्या मोठमोठ्या राजेरजवाड्यांचे वकील पेशव्यांच्या दरबारीं होतेच आणि त्यांच्यामार्फत पुष्कळ पत्रव्यवहार चाले, तो रेसिडेंटाच्या नजरेखालूनही जात नसे. पेशवे आणि निजाम व गायकवाड यांच्या दरम्यान पुष्कळ प्रकरणांत पैशासंबंधीं लढा पडलेला होता त्याचा निकाल होणे होता. त्यामुळे त्यांच्या बरोबरचा राजकीय व इतर पत्रव्यवहार एकदम बंद करा असें ह्मणणें इंग्रजांस कठीणच होतें; आणि जोंपर्यंत आपसांत निकाल करून घेण्यास राजेरजवाड्यांची नाकबुली नव्हती, तोंपर्यंत आमच्या मध्यस्थीनेंच निकाल करून घ्या असें ह्मणण्याचें त्यांना राजकारण दृष्टीनें ही कांहीं जरूर नव्हतें. गायकवाडाकडे आपला पैसा येणें आहे ह्मणून बाजीरावाला त्याचे कडे पत्रें पाठविणें, त्याचे वकील बोलावणें व त्यांच्याबरोबर बोलणें चालणें करण्यास सवड होती आणि त्या कामांत तो अगदीं गढून गेला होता; आणि तो निकाल होईपर्यंत इंग्रजांस पेशव्यांचा दरबारचा संबंध बंद करणें लांबणीवर टाकावें लागलें. त्यामुळें कारस्थानें करणारांना फावलें. नेपाळाबरोबर चाललेल्या लढाईत इंग्रजांना प्रथम अपयश आलें. ती बातमी चोहींकडे पसरली आणि हिंदुस्थानभर अस्वस्थता असल्यानें इंग्रजांच्या शत्रूंस स्फुरण आलें आहे, आपण यांचा पराभव करूं असें वाटूं

लागलें आहे, असें पाहून त्रिंबकजीनें खटपटीस सुरवात केली; शिंदे होळकर वगैरे राजेरजवाड्यांकडे पत्रें जारीने खेळूं लागलीं, आणि वसईच्या तहास सुटून बाजीरावाचें एक एक बोलणें सुरू झालें. अखेर गोष्ट निकरावर येऊन आपल्यास आतां दटाऊन बोलावें लागणार असें वाटून एल्फिन्स्टन त्या तयारीस लागत होता, इतक्यांत अकस्मात् त्याच्या ध्यानींमनींही न येई असा भयंकर प्रकार पंढरपुर क्षेत्रीं घडून आला.

पेशव्यांचा गुजराथेंतील मुलूख सन १८०० इसवी पासून गायकवाडाकडे मक्त्यानें होता. त्याची मुदत संपल्यावर तो पुनः आपल्यासच मिळावा अशी त्याची, आणि त्यालाच द्यावा अशी इंग्रजांची इच्छा होती. त्याप्रमाणें बाजीरावाजवळ बोलणें सुरू झालें. परंतु तें कांहीं जमलें नाहीं. श्रीमंत प्रथम होय ह्मणाले, परंतु मग फिरले. गायकवाडाकडे आपलें पुष्कळ येणें आहे, फार वर्षे हिशेब होणें राहिला आहे तो व्हावा असें त्यांणीं बोलणें लाविलें. बापू मैराळ ह्मणून गायकवाडाचा पुण्यांत जो वकील होता त्याच्याबरोबर बोलून भागत नाहीं, बडोद्याहून दुसरा कोणी यावा, असें ते ह्मणूं लागले. तेव्हां गंगाधर शास्त्र्यांस पाठवावें असें ठरलें. परंतु पेशव्यांचें दरबार फार बिघडलेलें, काय होईल याचा नेम नाहीं, ह्मणून आमच्या वकिलाच्या जिवास अपाय होणार नाहीं असा तुह्मी जिम्मा घेत असाल तर त्याला पाठवितों, असें गायकवाडानें इंग्रज सरकारास ह्मटल्यावरून त्यांनीं ती जोखीम पत्करली. तेव्हां गंगाधर शास्त्री तेथून निघून इ. स. १८१४ मध्यें पुण्यास येऊन दाखल झाले. मागें सन १८११ मध्यें शास्त्रीबावांस पाठविण्याचें ठरलें होतें, तेव्हां बाजीरावानें तें तत्काळ मान्य केलें होतें; परंतु तेव्हां त्यांचें येणे झालें नाहीं. बडोद्यास गंगाधर शास्त्री दिवाण होण्यापूर्वी सीताराम रावजी ह्मणून एक परभू त्या कामावर होता, तो शास्त्रीबावांचा द्वेष करीत असे, त्यानें बाजीरावापर्यंत संधान बांधून शास्त्रीबावा इंग्रजांच्या पक्षाचे आहेत असें त्याच्या मनांत बिंबवून दिलें होतें; त्यामुळें प्रथम श्रीमंत त्याची भेटच घेईनात. परंतु मग त्याच्याशीं बोलणें सुरू झालें. अमदाबाद सुभा गायकवाडास मक्त्यानें देत नाहीं असें त्यांनीं साफ सांगितलें आणि मुदत संपतांच तो काढून घेतला. मग काय तें काठेवाडसंबंधीं व मागील देण्याघेण्यासंबंधीं बोलणें राहिलें. तें सरळ चालेना. निकाल होण्याचें कांहीं चिन्ह दिसेना, कांहीं तरी हरकत उपस्थित करून दिनावधीवर टाकून टाळाटाळ चालली आहे असें दिसलें. तेव्हां आतां या

प्रकरणाचा निकाल करण्याचें इंग्रज सरकारावर सोंपवून आपण निघून जावें असें मनांत आणून शास्त्रीबावांनीं त्याप्रमाणें एल्फिन्स्टनसाहेबास कळविलें. तें त्यालाही मान्य झालें. आतां शास्त्रीबावा जाणार. असें पक्कें ठरल्याचें श्रीमंतांस कळलें तेव्हांपासून ते आणि त्रिंबकजी लागलेच त्यांच्याशीं निराळ्या तऱ्हेनें वागूं लागले. श्रीमंतांनीं त्यांना राहण्याविषयीं आग्रह केला आणि दिवसेंदिवस कृपा अधिकाधिक करूं लागले; ती इतकी कीं, ते आपली मेहुणी तुमचे मुलास द्यावयाची असें ह्मणाले. त्यांच्या गोड भाषणावरून आतां आपण ज्या कामासाठीं आलों त्याचा निकाल आपल्या मनाप्रमाणे लौकरच होईल असेंही शास्त्रीबावांना वाटूं लागले आणि रेसिडेंटाच्या संमतीने त्यांनी परत जाण्याचा बेत रहित केला. लग्नाचा ठराव होऊन साहित्यास सुरवात झाली. श्रीमंत नासिकास जावयास निघाले तेव्हां शास्त्रीबावांस गंगास्नानास चला ह्मणून बरोबर घेऊन गेले. एल्फिन्स्टन स्वारीबरोबर होताच, तो पुढें वेरूळचीं लेणीं पाहवयास गेला. स्वारी पुण्यास परत आल्यावर सारें तंत्र फिरलें. शास्त्रीबावा हुशार खरे, परंतु डौली आणि भोळे होते; त्यामुळें श्रीमंतांच्या आप्तसंबंधाच्या बोलण्याला भुलून फुशारले. त्यांची दृष्टि प्रथम दूर पोहोंचली नाहीं, परंतु मागाहून ताळ्यावर आले. त्यांच्या ध्यानांत असें आलें कीं, मी आपल्या धन्याच्या कामाचा निकाल लाऊन न घेतां हा लग्नसमारंभ करीत बसलो आहें असें त्याला कळलें तर त्याला हें बरें कसे वाटेल. त्याची आपल्यावर अवकृपा व अविश्वास होऊन कृतघ्नपणाचाही दोष पदरीं येईल. ह्या विचारांचे प्राबल्य होतांच त्यांनीं लग्नाचा बेत रहित केला. त्यामुळें बाजीरावाचा त्यांवर चांगलाच रोष झाला. परतु तो त्यानें त्यांना अगदीं दिसूं दिला नाहीं. त्यांनीं आपली बायको वाड्यांत पाठवीत नाहीं असेंही सांगितलें, त्यामुळें बाजीरावाचा क्रोधाग्नि अधिकच भडकला, परंतु त्यानें त्यांना त्याचा संशयही येऊं दिला नाहीं. तो दीर्घद्वेषी असल्यामुळें त्यानें त्यांचा सूड उगवण्याचा मनांत पक्का निश्चय केला, परंतु वरकांति पूर्ववत् प्रेम दाखविण्यांत कांहीं कमी केलें नाहीं. असे कांहीं दिवस लोटल्यावर आषाढीच्या यात्रेकरितां स्वारी पंढरपुरास जावयास निघाली, तेव्हां श्रीचे दर्शनास तुह्मीही चला असा शास्त्रीबावांस श्रीमंतांनीं व त्रिंबकजीनें अतिशय आग्रह करून बरोबरचा लवाजमा पुण्यासच ठेववून अगदीं थोड्या माणसांनिशीं आपल्याबरोबर स्वारींत नेलें. तुह्मी जाऊं नका, निदान सडे तरी जाऊं नका, असा बापू

मैराळानेंही आग्रह केला; परंतु शास्त्रीबावांनीं ऐकिलें नाहीं. पंढरपुरास गेल्यावर बाजीरावानें देवळासभोंता व आपल्यासभोंता पहारा वगैरे बंदोबस्त विशेष केला. कारण पुणी ( पुणेरी ) मारेकरी येथें आले आहेत अशी अफवा उठली. ती खरी किंवा मुद्दाम उठविलेली होती हें मात्र कळत नाहीं. देवळांत कोणी हत्यारबंद मनुष्य जाऊं नये असा ही बंदोबस्त झाला. पुढें दोन दिवसांनीं तारीख १४ जुलै सन १८१५ ह्मणजे आषाढ शुद्ध ८ शके १७३७ रोजीं रामचंद्र गोसावी पाटणकर यांनीं श्रीमंतांस मेजवानी केली. शास्त्रीबावा तेथें भोजन करून बिऱ्हाडीं गेले. नंतर थोडासा ज्वर आला ह्मणून बाहेर जावयाचें नाहीं ह्मणाले. अस्तमानानंतर देवळांतून श्रीच्या दर्शनास येण्याविषयीं त्रिंबकजीकडून बोलावणें आले तेव्हां मला बरें नाहीं, येत नाहीं, असें त्यांनीं सांगून पाठविलें, त्याने पुनः बोलावणें पाठविलें, तेव्हांही त्यांनीं तसाच जबाब दिला. पुढें बापू चिपळूणकर आणि रावजी मराठे दर्शनाला गेले त्यांना त्रिंबकजी ह्मणाला, शास्त्रीबावांना दोन्दां बोलावणें पाठविलें, परंतु ते आले नाहींत; आणखी एकदां तुह्मी जा आणि त्यांना दर्शनाला या ह्मणावें. त्याप्रमाणें रावजी मराठा गेला, तेव्हां ते प्रथम ह्मणाले मला बरें नाहीं; परंतु पुनः विचार करतांना त्रिंबकजी इतका आग्रह करीत असतां गेलें नाहीं तर त्याला राग येईल असें मनांत आणून ते जाऊंया ह्मणाले आणि दोन मशालजी, दोन हुजऱ्ये, तीन हरकारे, आणि त्रिंबकजीकडचा एक कारकून बरोबर घेऊन निघाले. ते पेठेंतून चालले असतां माणसांच्या दाटींत ' शास्त्री कोणता ' असें एकानें विचारलें आणि ' तो, गळ्यांत कंठी आहे तो ' असें त्याला दुसऱ्यानें सांगितलें. तें त्यांच्या एका हुजऱ्यानें ऐकिलें, परंतु कोणकोण बोलत आहेत हें तो कशाला पाहून ठेवील ? देवळांत जाऊन देवाचें दर्शन घेऊन, बाजीराव साहेब तेथे वरच्या सोप्यांत बसले होते, त्यांजवळ व त्रिंबकजीजवळ थोडेंसें बोलून ते बिऱ्हाडीं जावयास निघाले. चेतनदासबावा ह्मणून एक वृद्ध त्यांच्या गुरूसारखे होते ते तेथेच होते, त्यांच्याजवळ आपल्यापैकीं तीन मनुष्यांस त्यांनीं रहावयास सांगितलें. शास्त्रीबावा निघाले, तेव्हां त्रिंबकजीकडील कांहीं शिपाई त्यांच्यापुढें दहाबारा पावलांवर चालूं लागले. त्यांच्यामागें त्यांचे दोन हरकारे, त्यांच्यामागें दोन मशालजी आणि त्यांच्या मागें शास्त्रीबावा होते. त्यांचा हात. रामचंद्रबावा बडव्यानें धरला होता, उजव्या बाजूस एकदोन पावलें मागें, त्यांचा मित्र बापू चिपळूणकर आणि

त्याच्यामागें दोन हुजऱ्ये होते. अशी ती अगदींच सडी स्वारी देवळाबाहेर पडून दोनतीनशें पावलें गेली नाहीं, तों मागून देवळांतून तीन असामी 'पैस पैस' असें ओरडत धांवत आले. त्या तिघांच्याही डाव्या हातांना-धोत्रें गुंडाळलेलीं होतीं आणि उजव्या हातांत तोबे होते. त्यांतल्या एकानें शास्त्रीबोवांना तोब्याचा रट्टा सडकून दिला, त्याबरोबर दुसऱ्यानें त्यांची शेंडी धरून हिसडा दिला आणि त्यानें ते खालीं पडतात, इतक्यांत तिसऱ्यानें डोक्यावर वार केला. इतकें होतें आहे तों स्वारीच्या पुढून गर्दींतून आणखी दोन असामी घुसले. शास्त्रीबावां बरोबरचे तनि असामी सरसे होऊन त्यांना संभाळावंयाला पहात होते, त्यांच्यावर वार झाले; तेव्हां ते, मशालजी, हुजऱ्ये वगैरे सारे पळाले. मग त्या मारेकऱ्यांनीं शास्त्रीबोवांच्या देहाचे अगदीं तुकडे उडविले. असें तें घोरकर्म पुरें झालें तेव्हां त्यांतलाच एक असामी ह्मणाला, 'आमचें काम पुरें झालें' हें त्या जखमी झालेल्यांपैकीं एकानें ऐकिलें. ते मारेकरी तलवारींचीं म्यानें तेथेंच टाकून पळून गेले. चेतनदासबावांजवळ शास्त्रीबावांनी ठेविलेलीं त्यांचीं माणसें मागून येत होतीं त्यांना पांच असामी हातांत नंग्या तरवारी घेऊन देवळाकडे धांवत चाललेले भेटले, आणि एक मशाल विझून धूर येत जमिनीवर पडलेली दिसली तेव्हां ते घाबरले परंतु काय झालें आहे हें कळेना ह्मणून दोनतीन असामी धांवत बिऱ्हाडीं गेले. तेथें शास्त्रीबोवा आले नाहींत असें कळतांच ते त्यांच्या शोधास निघाले आणि पाहतात तर रस्त्यांत त्यांचे तुकडे तुकडे होऊन पडले आहेत. ते जमा करून ते घरी घेऊन गेले. यावेळीं सुमारें साडेआठ वाजले असावे. शास्त्रीबावांच्या खुनाचें वर्तमान श्रीमंतांकडे लागलेंच गेलें. तें ऐकतांच त्यांनीं आधीं आपल्यासभोंता पहारा वगैरे विशेष बंदोबस्त केला. थोड्या वेळानें काय झालें ह्मणून चौकशी करण्याकरितां त्रिंबकजीनें शास्त्रीबावांच्या बिऱ्हाडीं मनुष्य पाठविले. कोतवालानें जाऊन मुर्दा पाहिला, आणि श्रीमंतांस वर्दी दिली. आणखी असें कळविलें कीं, मारेकऱ्यांपैकीं एक चंद्रभागेजवळ आढळला, तो हातांतली तलवार खालीं टाकून गर्दींत शिरून पळाला· परंतु ती तलवार नेऊन त्रिंबकजीकडे पोहोचविली आहे. शास्त्रीबावांचा घात झाल्याची बातमी गायकवाडाच्या गोटांत लौकरच समजली, त्याबरोबर त्यांचे कांहीं मुख्य मुख्य सरदार शहरांत येऊन पुढच्या तयारीस लागले. दहनाला त्रिंबकजीची परवानगी मिळाली तशीच

शहरांतून बाहेर जाण्या येण्यास त्यांस हरकत करूं नये अशी श्रीमंतांकडून वर्दी गेली. मग त्यांनीं जाऊन दहन* केलें. दुसऱ्या दिवशीं शास्त्रीबावांकडील कांहीं कारकून त्रिंबकजीकडे गेले आणि त्याला ह्मणाले आपला व शास्त्रीबावांचा स्नेह होता आणि आपण श्रीमंतांचे दिवाण आहां; तर हा खून कोणी, कां केला याची चौकशी आपण अगत्यपूर्वक केली पाहिजे. तेव्हां तो ह्मणाला "मी करतोंच आहें; पण कोणाचा ह्मणून संशय घेऊं ! मला कांहीं थांग लागत नाहीं." त्यावर ते पुनः ह्मणाले शास्त्रीबावांचें नांव आणि आपल्या सरकारचा लौकिक राखण्यासाठीं झाल्या गोष्टीचा तपास करून मूळ शोधून काढावें हें आपल्याला योग्य आणि अवश्य आहे. त्यावर त्रिंबकजीनें शोभेसेंच उत्तर दिलें आणि ह्मटलें श्रीमंतांनांही ह्या गोष्टीबद्दल फार वाईट वाटत आहे. शास्त्रीबावांची चूक झाली. शें पन्नास माणूस बरोबर घेतल्याशिवाय त्यांनीं घराबाहेर पडणें बरोबर नव्हतें. तेव्हां ते ह्मणाले, ते आपण आपल्या मित्राच्या घरांत आहों असें समजत होते, आणि शिवाय देवाला जातांना अशा वेळीं इतकीं माणसें घेऊन जाण्याची वहिवाटही नाहीं. शास्त्रीबावांचे शत्रु कोण आहेत ते आपण जाणत आहां ते मारेकरी कर्नाटकी मनुष्य असावेसे दिसले. त्रिंबकजी ह्मणाला तुह्मी ह्मणतां तें खरें, परंतु नशीबीं होतें तसें घडलें. त्याला माझा इलाज काय ? तें काय माझ्यानें टाळवतें ? आतां तुह्मी आपला विचार पाहिला पाहिजे. मी तुह्माला लागेल ती मदत करीन. तुह्मा सर्वांचा पालन कर्ता होता तो गेला, परंतु माझ्या हातून होईल तितकें मी तुमचें रक्षण करीन. इतकें भाषण झाल्यावर शास्त्रीबावांचे कारकून निघून गेले, आणि दुसऱ्या दिवशी बडोद्याच्या मंडळीनें पुण्यास निघून जावें अशी त्यांनीं त्रिंबकजीच्या द्वारेंच श्रीमंतांकडून परवानगी घेतली. आतां तुह्मी त्रिंबकजीकडे किंवा श्रीमंतांकडे बोलावल्याशिवाय येऊं नये अशी त्यांना ताकीद झाली.

त्या मारेकऱ्यांनीं कर्नाटकी लोकांसारखे मांडचोळणे घातले होते, परंतु शास्त्रीबावा ठार झाले तेव्हां आपलें काम पुरें झालें असें ते जें बोलले तें मराठींत बोलले, यावरून ते मराठे असावे असें दिसतें.

---

* बाजीरावानें गच्चीवर उभें राहून चिता पेटलेली पाहिली, तेव्हां त्याला ती फारच भयंकर वाटली, आणि 'अरे फेवडी आग ही' असें तो ह्मणाला अशी माहिती मिळाली आहे.

शास्त्रीबावांचा खून अशा भयंकरप्रकारें भर रस्त्यावर झाला, त्रिंबकजीनें त्याची चौकशी करतों ह्मटलें परंतु कोणी कांहींएक विचार केला नाहीं. आणि भगवंतराव गायकवाड व गोविंदराव बंडोजी यांचा व शास्त्रीबावांचा खासगी व राजकीय प्रकरणीसंबंधानें द्वेष असल्याचें प्रसिद्ध झाल्यानें लोक तेव्हांच त्यांचा संशय घेऊं लागले, परंतु ते पंढरपुरांत खुशाल हिंडत होते. त्यांनां कोणी कांहीं विचारलें नाहीं, व धरलें नाहीं. असा प्रकार चालला, तेव्हां हें कर्म त्रिंबकजीनें करविलें असावें असें लोकांच्या मनांत सहजच आलें, आणि त्याला श्रीमंतांची फूस असावी, निदान जें झालें तें बरें असें वाटलें असावें असेंही लोक बोलूं लागले. त्यांच्या अनुमानाला एक एक प्रमाण पटत चाललें तसतसें तें बळावत चाललें. देवदर्शनास येण्याविषयीं शास्त्रीबावांस त्रिंबकजीचा अस्तमानापासून अती आग्रह चाललेला होता. शास्त्रीबावा कोणते ही चौकशी कांहीं असामींनीं केली आणि त्यांची खूण धरली. शास्त्रीबावा घरांतून बाहेर पडल्यापासून त्यांचा देह विछिन्न होईपर्यंत मध्यंतरीं दोन घटका सुद्धां पुऱ्या लोटल्या नसतील. त्रिंबकजी अगदीं जवळ देवळांत होता, तो खून झालेला ऐकल्याबरोबर तेथें धांवत येता आणि स्वतः, निदान आपले मनुष्य पाठवून, चौकशी करून मारेकऱ्यांस धरण्याची खटपट करता, आसपासचे दुकानदार शास्त्रीबावांबरोबरचे लोक, रस्त्यानें जाणारेयेणारे वगैरे जमवून ते मारेकरी कोणाच्या दृष्टीस पडले, कसलेसे होते, कोणीकडे गेले, वगैरे चौकशी करता, त्यांचा तपास लावण्याकरितां बक्षीस लावता, हर तऱ्हा करता; त्याला कांहीं दिवस तरी त्यावांचून दुसरें काम सुचलें नसतें. परंतु त्याची सारी क्रिया अगदीं उलट चालली होती. त्यानें कांहींच चौकशी केली नाहीं. उलट पहिल्या दिवशीं ती बातमी बाहेर जाऊं नये व कोणाचीं पत्रें वगैरे जाऊं नयेत असा बंदोबस्त केला, आणि मग आपलें नांव घेतात ह्मणून कितीएक लोक कैद केले. ज्यांच्यावर खरा संशय यावयाचा त्यांच्या वाटेस न जातां उगाच कोणाला तरी धरून बसविलें आणि यांणीं अमूक अमूक कारणामुळें हें कृत्य खास केलें असावें असें स्थापन करण्यांत अक्कल खरचली. अमदाबादेस त्याचे जे उपद्व्यापी हस्तक होते त्यांनां पत्रें लिहिण्यांत तो गढून गेला होता आणि मग इतःपर शास्त्रीबावांचें कोणी नांवही घेता कामा नये अशी त्यानें ताकीद केली. ज्या गोष्टींत प्रत्यक्ष मालकाचें हिताहित असेल तिचा तपास मराठेशाईंत अम्मलदार किती आस्थेनें लावीत असत आणि

पेशव्यांच्या मुलखांतल्या शहरांत असे भयंकर गुन्हे होऊं न देण्याविषयीं किती बंदोबस्त असे हें मनांत आणलें ह्मणजे त्रिंबकजीचें वर्तन फारच संशयित वाटावें यांत कांहीं आश्चर्य नाहीं.

चंद्रभागातीरीं ही ब्रह्महत्या घडली तेव्हां एल्फिन्स्टन साहेब वेरूळचीं लेणीं पाहण्यांत गुंतला होता. त्याला तें वर्तमान कळतांच त्यानें तारीख २५ जुलै रोजीं श्रीमंतांस पत्र लिहिलें. त्यांत मी पुण्यास टाकोटाक निघून येतों, इंग्रजसरकारच्या दोस्त सरकारचा दिवाण, आह्मी अभयवचन दिल्यावरून आपल्या दरबारीं आला असतां असा भयंकर प्रकार घडला ही गोष्ट वाईट झाली. आपण लौकर नीट चांगला तपास करून अपराधी धरावे आणि चौकशी करून त्यांस योग्य शासन करावें, असें लिहिलें होतें. पुण्यास त्याच्यामागें त्याचा मदतनीस ( असिस्टंट ) क्याप्टन् पॉटिंजर होता त्याला त्यानें असें लिहिलें कीं, शास्त्रीबावांबरोबर बडोद्याची जी मंडळी आलेली आहे त्यांच्या संरक्षणाकरितां आधीं योग्य बंदोबस्त करावा; पाहिजे तर त्यांस बेटावर, आमच्या बंगल्याजवळ, येऊन रहाण्यास सांगावें. त्याचप्रमाणें त्यानें कलकत्यास गव्हरनर जनरलाकडेही आपल्यास कळलेली सर्व हकीगत लिहून पुढें कसें करावयाचें ह्मणून विचारिलें व आपले विचार काय होते तेही कळविले. ह्या खुनाची चौकशी नीट लौकर करून अपराध्यांस योग्य शिक्षा करावी असें एल्फिन्स्टन साहेबानें श्रीमंतास चरचरीत लिहिलें होतें, परंतु स्वारी पंढरपुरास असेपर्यंत त्यांनीं कांहींच केलें नाहीं. एकंदर लोकांचा ग्रह हें कृत्य त्रिंबकजीनें करविलें असा झालेला, व एल्फिन्स्टन पुण्यास आला ह्मणजे कांहीं स्वस्थ बसणार नाहीं आपल्यामागें त्याचा ससेमिरा खास लागेल, हें मनांत येऊन त्यांच्या तोंडचें पाणी पळालें. शास्त्रीबावांचा खून होण्याच्या आधींच चौकीपहाऱ्याचा बंदोबस्त विशेष झाला होता, तो मग त्याच्याहीपेक्षां कडक झाला. त्याकरितां दूरची फौज आली. श्रीमंत आणि त्रिंबकजी दोघेही आपल्या जिवाला सारखे जपूं लागले. श्रीमंतांची नेहेमींची वहिवाट ह्मटली ह्मणजे स्वारी चालली असतां खाशा मेण्यापासून अमूक पावलांच्या आंत हत्यारबंद मनुष्य फिरकावयाचा नाहीं असा बंदोबस्त असावयाचा. परंतु ते पंढरपुराहून पुण्यास यावयास निघाले तेव्हां त्याच्या अगदीं उलट प्रकार होता. ते अगदीं भ्यालेले आणि काळजींत असून मेण्यासभोंते एक हजार हत्यारबंद कर्नाटकी शिपाई चालवीत होते. शहरांत स्वारी केव्हां येणार हें कोणाला कळूं न देतां, कोणा सरदाराची भेट

न घेतां, वाटेनें भेण्याचीं दारें लाऊन घेऊन श्रीमत एकदाचे वाड्यांत शिरले, आणि त्यांबरोबर जिकडे तिकडे सक्त पाहरे बसले. त्रिंबकजीच्या घरींही तसाच बंदोबस्त झाला. तो दिवस ह्मटला तर मोठ्या समारंभाचा असल्यानें पुण्यांतल्या हजारों लोकांच्या झुंडीच्याझुंडी बाहेर पडावयाच्या. हजारों ब्राह्मण जमलेले असून श्रीमंत स्वतः बसून त्यांना दक्षिणा दिल्याशिवाय तोंपर्यंत कधीं राहिले नव्हते; परंतु त्या दिवशीं ते वाड्याबाहेर पडले नाहींत. त्यांच्या वाड्याप्रमाणें त्रिंबकजीच्या घरींही चौकीपहाऱ्याचा अगदीं सक्त बंदोबस्त होता. इतका बंदोबस्त करण्याचें कारण पुढें बाहेर पडलें. तें असें—त्या दोघांनाही असें भय पडलें होतें कीं, बापू मैराळाजवळ गंगाधरशास्त्र्याबरोबरच्या बडोद्याच्या शिपायांपैकीं जे कांहीं राहिलेले आहेत, त्यांतला कोणी येऊन आपला जीव घेईल.

एल्फिन्स्टन वेरुळाहून पुण्यास आल्यावर त्याला झाल्या कृत्याची सारी कच्ची हकीगत समजली, आणि आपण इतकें निक्षून लिहिलें असतां त्याकडे श्रीमंतांनीं कांहींच लक्ष दिलें नाहीं असें कळलें व हें घोर कर्म त्रिंबकजीनेंच करविलें असें अगदीं निर्धास्तपणें ह्मणण्यास हरकत नाहीं, अशी त्याच्या मनाची खात्री झाली. तेव्हां उघडपणें त्यावेळ नांव घ्यावें असें त्याला वाटूं लागलें. परंतु एकदम असें करावें किंवा गव्हरनरजनरलाकडून हुकूम येईपर्यंत दम धरून गप्प बसावें हा त्याला मोठा विचार पडला. थोड्याच वेळांत त्यानें असा निश्चय केला कीं, हुकमाची वाट पहात बसूं नये. त्याच्यावर दोषारोप करून त्याला एकदम कैद करण्यास बाजीरावास सांगावें. आपल्याच मुकत्यारीनें असें करणें ह्मणजे साहस, परंतु येवढें जोखीम आपल्या शिरावर घेण्यास त्याला कांहींच हरकत वाटली नाहीं. कारण प्रथम आपल्या मनाशीं ताडून पाहतांना त्याला असें वाटलें कीं आज नाहीं उद्यां, केव्हां तरी आपल्याला असें केल्यावांचून गत्यंतर नाहीं; परंतु इष्ट हेतु सिद्धीस जाण्यास उत्तम वेळ जशी आतां आहे तशीच पुढें राहील असा नेम नाहीं. त्रिंबकजीला फुरसत सांपडली कीं तो सारा पुरावा नाहींसा करून टाकील; इतकेंच नव्हे, तर बाजीरावाला भय घालून लढाईवर आणून बेतवील. हा खून करण्यांत त्याचा हेतु काय होता हें जरी अद्याप कांहीं निश्चयात्मक कळत नाहीं, तरी तो केवळ द्वेषाबद्दल सूड घेण्याचा नसावा; त्यांत कांहींतरी राजकारण असावें; याजकरितां दिनावधि लावणें कोणत्याच तऱ्हेनें बरें नाहीं. सध्यां लोकमत आप-

त्याला पूर्ण अनुकूल, त्रिंबकजीचेंच हें कृत्य असावें असें सर्वतोमुखीं झालेलें आहे आणि त्याच्या नांवाचा जो चोंहींकडे डंका वाजत आहे तो बंद करण्यास श्रीमंतांस उमेद आणण्याला किंवा आपले जे हाडवैरी असतील त्यांचीं तोंडें बंद करण्याला, किंवा त्यांना समूळ नाहींसें करण्याला त्याला फुरसत नाहीं, आतां तैनाती फौज ( subsidiary force ) सरहद्दीवरून खुशाल हालवितां येईल आणि ती घोडनदीस आपल्या छावणीला आली ह्मणून कोणाच्या मनांत कांहीं अंदेशा येणार नाहीं; शास्त्रीबावांच्या खुनाबद्दल चौकशी करून अपराध्यांस धरून शिक्षा दिली पाहिजे, असेंच पेशव्यास सांगण्यास गव्हरनरजनरालाचा आपल्यास हुकूम येईल; याप्रमाणें त्यानें जें एक एक अनुमान केलें तें अगदीं योग्य होतें. आपल्या विचाराप्रमाणें सर्व कांहीं करून त्यानें तें गव्हरनरजनरलास तपशीलवार लिहून पाठविलें तें त्याला अतिशय पसंत होऊन मंजूर झालें. त्यानें लिहिलें होतें तें असें:—

" गंगाधरशास्त्र्याच्या खुनाचा आरोप इंग्रजसरकार आपल्यावर ठेवील असें त्रिंबकजीला वाटलें असतें, ( आणि तसें न वाटण्याला मला वरोपचारी फारच सोंगाडेपणा करावा लागता. ) ह्मणजे त्याला जेवढा अवकाश मिळता तेवढ्यांत तो बहुधा पेशव्यांच्या मनांत भलभलतें भरवून त्यांना आपल्या मुलखांत दंग्यास प्रवृत्त करता व त्यांच्याशीं जो आमचा तह आहे त्याला विरुद्ध असे इतर राजांशीं ठराव करायाला लावता; आणि हा आरोप आपल्यावर येतो कीं काय, अशा संशयांत पडून बाजीरावाचें चित्त जोंपर्यंत सचिंत राहतें तोंपर्यंत त्रिंबकजीला पाहिजे ते करण्यास सुलभ गेलें असतें. "

" शास्त्रीबावांना मारण्यांत त्रिंबकजीचा हेतु काय, त्याला अखेर काय साधावयाचें होतें, हें कांहीं निश्चित कळेना आणि आह्मी जरी अगदीं स्वस्थ बसलों तरी बडोद्यास त्याची जी खटपट चालू आहे, तीमुळें हें प्रकरण विकोपास गेल्याशिवाय राहणार नाहीं असा संशय घेण्याला चांगला आधार दिसूं लागला. मला असें खचित वाटलें कीं, बाजीरावाला न्याय करण्याला लावावें असाच आपला हुकूम येईल आणि त्याला तसें करण्यास भाग पाडण्याला सध्याची वेळ जशी सोईची आहे तशी केव्हांच नसेल. मी हें प्रकरण लांबणीवर टाकून बसलों असतों तर दुसरें कांहीं नाहीं, एवढें एक मात्र होतें कीं आमच्या सरकारानें आपल्या दोस्त राजाच्या दिवाणाला, तुझ्या जिवाला अपाय होणार नाहीं असें पुनः पुनः सांगून इमान-प्रमाणपूर्वक वचन देऊन येथें बोलाऊन आणलें असून

त्याचा खून झाला असतां त्याचा सूड तुह्मी घ्याल किंवा नाहीं ह्या शंकेंत मी पडलों असें दिसून माझी अप्रतिष्ठा होती. × × × × इत्यादि कारणांनीं व मुख्यत्वें सारा देश न्याय झाला पाहिजे असें ओरडत असतां स्वस्थ बसणें लज्जास्पद आहे असें मनांत येऊन संधि सांपडतांच मी त्रिंबकजीवर आरोप ठेविला. ”

त्रिंबकजीला आतां आपली घडगत नाहीं असें वाटलें, ह्मणजे तो कांहीं तरी गडबड करील. तर आपल्या बचावाकरितां घोडनदीस फौज आणून ठेविली पाहिजे; असें एल्फिन्स्टन साहेबाला वाटलें. त्याप्रमाणें त्यानें ती आणविली आणि पेशवे सरकाराला यत्किंचित् संशय न येई अशा तऱ्हेनें, ती फौज नेहेमीप्रमाणें आपल्या छावणीस आली असें कळविलें. मग गंगाधरशास्त्र्याच्या कुटुंबाचीं माणसें, बापू मैराळ, वगैरे बडोद्याच्या इतर मंडळीस सुरक्षितपणें परत घरीं पाठवितां यावे ह्मणून त्यानें त्यांस बेटावर आपल्या शेजारीं येऊन रहावयास सांगितलें. परंतु त्यांना लौकर जातां आलें नाहीं. कारण तितक्यांत बडोद्याच्या शिपायांनीं आपल्यास पगार मिळाला पाहिजे असें निमित्त करून थोडासा बंडावा केला. त्याला कारण त्रिंबकजी व भगवंतराव यांची चिथावणी असावी असा संशय आला. त्यांना दुसरे लोकही सामील झाले, परंतु एल्फिन्स्टन साहेबानें तो दंगा तत्काळ मोडला आणि त्या मंडळीला बेटावर नेलें.

बाजीरावसाहेबांची स्वारी पंढरपुराहून परत आल्यावर थोड्याच दिवसांनीं ‘ मी भेटावयास येतो ’ असा एल्फिन्स्टन साहेबानें त्यांस निरोप पाठविला. त्रिंबकजीवर शास्त्रीबाबांचा खून करविल्याचा आरोप ठेऊन त्याला कैद करावें असा त्यानें श्रीमंतांस खलिता लिहिला होता व तो स्वतः आपण त्यांच्या हातीं द्यावा असा त्याचा बेत होता; परंतु त्यांची भेट कांहीं झाली नाहीं. श्रीमंतांनीं प्रथम आपली प्रकृति स्वस्थ नाहीं, तबीयतीस आराम नाहीं, असें सांगितलें. पुढें त्यांची मुलगी वारली, तेव्हां अशौचाची अडचण दाखविली. त्यांची अशी टाळाटाळ दिसूं लागली तेव्हां त्यानेंही भेटीला येण्याचें बोलणें सोडून दिलें आणि तो खलिता कसा तरी त्यांच्या हातीं जाऊन पडावा ह्मणून दुसरी तजवीज चालविली. त्यानें आपल्या हाताखालच्या एका अम्मलदाराबरोबर तो पाठवून दिला आणि कारभारी मंडळींपैकीं कोणाजवळ तरी देऊन श्रीमंतांस प्रविष्ट करण्यास सांगितलें. परंतु त्रिंबकजीला ते इतके

भीत होते कीं, त्यांतला कोणी एक असामी तो हातांत धरीना; तेव्हां तो अम्मलदार परत गेलाच परंतु पुनः पुनः जाऊन त्यानें त्यांतल्या मुख्याला असें सांगितलें कीं, हा खलिता श्रीमंतांकडे न पोहोचवाल तर तुह्मांवर केवढी जोखीम राहील तें मनांत आणा. असें करतां करतां तो एकदां श्रीमंतांच्या हातांत जाऊन पडला.

एल्फिन्स्टनसाहेबानें बाजीरावसाहेबाला पाठविलेला हा लेख मासलेदार चरचरीत असून त्यांत त्याची कानउघाडणी चांगलीच केलेली होती. शास्त्रीबावांच्या खुनांत त्रिंबकजीचें अंग असल्याविषयीं अनुमानें, प्रमाणें, वगैरे दाखवून पुढें असें लिहिलें होतें:—" सर्व गोष्टींवरून त्रिंबकजी डेंगळ्याच्या अपराधाविषयीं माझी खात्री झाली आहे असें मी ह्मणतो; आणि आपल्याला असें सांगतो कीं, आपण त्याला, तसेंच गोविंदराव *बंडोजीला व भगवंतराव गायकवाडाला कैद करावें आणि आपल्याला योग्य वाटेल त्या विश्वासू मनुष्याच्या ताब्यांत, सुरक्षित रहात अशा बंदोबस्तांत ठेवावें. या तिघांच्या अपराधाविषयीं जरी आपली बालंबाल खात्री होत नसली, तरी त्यांना अटकेंत ठेवण्याला पुरेसा चांगला आधार आहे हें आपण मान्य केलें पाहिजे. नामदार गव्हरनर जनरलसाहेब व आपण, या उभयतांस या प्रकरणाचा विचार करण्यास सवड होईपर्यंत आपण असें करावें येवढेंच माझें सांगणें आहे; आणि आणखी इतकेंच ह्मणतों कीं, त्यांना ताबडतोब कैद करावें अशी माझी इच्छा आहे.

" आपल्या भरस्वारींत परदरबारच्या वकिलाचा खून झाला; आपल्या धर्माप्रमाणें आपण यात्रा ह्मणजे एक मोठें पुण्यकर्म करण्यास गेलां असतां तेथें, देवाच्या सन्निध, बहुतेक देवळांतच कां ह्मणाना, एक ब्रह्महत्या झाली, आणि ती करणारे खुशाल निर्भयपणें हिंडत असल्यामुळें लोक पर्यायापर्यायानें आपल्या सरकाराविषयीं अशा कांहीं गोष्टी बोलतात कीं, त्या मनांत देखील येऊं नयेत. हें मला आपल्याला कळविलें पाहिजे, छपवून ठेवणें बरें नाहीं. लोक असें जे काय बोलतात तें अगदीं खोटें आहे, अशी माझी जितकी खात्री आहे तितकी दुसऱ्या कोणाचीच नसेल. परंतु आपल्या कीर्तीला

* हे दोघे बडोद्याहून आलेले, सीताराम रावजीच्या पक्षाचे, त्रिंबकजीकडे त्यानें पाठविलेले होते.

कलंक लागण्यासारखीं असलीं हीं कुभांडें आपण अगदीं उडवून देणें जरूर आहे असें आपल्या मनांत येण्याला तीं आपल्याला कळविणें हें माझें कर्तव्य समजून मी लिहीत आहें. मी आपल्याला विनंति करून आणखी असें कळविंतों कीं, त्रिंबकजीचा अधिकार मोठा असल्यानें तो जोंपर्यंत मोकळा असेल तोंपर्यंत त्याला आणखीही अविचाराचीं कृत्यें करतां येतील आणि आपल्या व इंग्रजसरकारच्या दोस्तींत अंतर यावें ह्मणून तो तसें मुद्दाम करील. आपल्या दरबारांत कारभारी मंडळींत पुण्यास तो प्रमुख असून फौज त्याच्या हुकमांत आहे; तसेच आमच्या सरकारच्या, निजामाच्या व गायकवाडाच्या मुलखाला लागून आपला जो मुलूख आहे तो त्याच्या स्वाधीन आहे. त्यांत त्यानें जरी उघडपणें कांहीं धामधूम केली नाहीं, तरी तेथलें आपलें काम तो कोणत्या प्रकारें करील याजविषयीं माझ्या मनांत काळजी उत्पन्न होऊन भीति वाटल्यावांचून रहात नाहीं. ह्याकरितां माझ्या सूचनेप्रमाणें आपण अगदीं लौकर तजवीज करणें फार अवश्य आहे. मी आपणास ह्याप्रमाणें सूचना केली असून जर त्रिंबकजी कांहीं दंगाधोपा करील, तर त्याबद्दल गव्हरनरजनरल आपल्याला जबाबदार धरतील. याकरितां मी आपल्याला जो मार्ग सुचविला आहे त्याप्रमाणें आपण चालावें. आपल्या दरबारीं जे परदरबारचे वकील आहेत, त्यांचा आपल्यावरचा विश्वास नाहींसा झालेला आहे; तो मी सुचविल्याप्रमाणें केलें तरच पुनः बसेल. त्यावांचून आपल्याशीं कामकाज करण्याला जो निर्धास्तपणा अवश्य पाहिजे तो त्यांना वाटणार नाहीं. त्यांना शहरांत निर्भयपणें राहवणारसुद्धां नाहीं; आपआपल्या संरक्षणाकरितां ज्याला जो उपाय सुचेल तो करणें भाग पडेल, त्याचा एक परिणाम असा होईल कीं, मी सूचविलेली गोष्ट आपण करीपर्यंत इंग्रजसरकाराशीं आपला जो व्यवहार चालावयाचा तो बंद पडेल. श्रीमंतांस माझी अशी विनंति आहे कीं, ह्या खलित्याचें उत्तर त्रिंबकजीशीं ज्याचा संबंध नाहीं अशा मनुष्याबरोबर यावें."

याप्रमाणें त्रिंबकजीला कैद करीपर्यंत आपल्याशीं आह्मी दुसरे कांहीं बोलणार नाहीं, असें स्पष्ट सांगून एल्फिन्स्टनसाहेबानें शेवटीं असें लिहिलें होतें कीं, एवढें झाल्यावर मग आपण जो दिवाण नेमावयाचा तो आपल्या मर्जीप्रमाणें नेमावा; त्या कामांत आह्मी बोलणार नाहीं. इंग्रजसरकारची व आपली जी दोस्ती आहे ती कायम राखून उत्तरोत्तर वाढत जाईल असें करणाराच मनुष्य आपण त्या जागीं नेमाल ही माझी खात्री आहे.

एल्फिन्स्टनसाहेबाचा खलिता तारीख १७ आगष्ट रोजीं बाजीरावसाहेबाच्या हातांत पडला. पुढें एकदोन दिवसांनीं त्यांनीं सदाशिवराव माणकेश्वरा बरोबर त्याला असें सांगून पाठविलें कीं, मी तो सारा नीट वाचून पाहिला आणि गोविंदराव बंडोजी व भगवंतराव गायकवाड यांना अटकेंत ठेवण्यास हुकूम केला आहे. त्रिंबकजीबद्दल तसें करतां येत नाहीं; आपल्याकडचा एक कारकून पाठवून द्यावा ह्मणजे त्याचें कारण काय तें सर्व खुलाशानें कळवितों. हा निरोप खरेपणानें पाठविलेला आहे असें एल्फिन्स्टनसाहेबाला वाटेना. कारण माणकेश्वरावरून श्रीमंतांची मर्जी कधींच उडालेली होती, आणि गोविंदरावाच्या व भगवंतरावाच्या घरावर जे पहारेकरी ठेविलेले होते, ते त्रिंबकजीच्या येथचे असून आदल्या रात्रींच गोविंदरावाची व डेंगळ्याची भेट झाली होती असें त्याला पक्कें समजलें होतें. परंतु त्यानें त्या निरोपाचें उत्तर श्रीमंतास कोणत्याही प्रकारचा संशय न येई असें पाठविलें आणि कारकून पाठविला. बाजीराव त्याच्याजवळ पुष्कळ बोलून ह्मणाले, इंग्रजांच्या व आमच्या दोस्तींत अंतर येऊं नये ही आमची खरी इच्छा आहे. त्रिंबकजी अपराधी नाहीं. परंतु त्यानें गुन्हा केला अशी शाबिती होईल तर त्याला कैद करतों. इतकेंच नव्हे, थोडेच लोक बरोबर घेऊन देवाला यावें असा त्यानें गंगाधरशास्त्र्याला तीनदां निरोप पाठविला असें एल्फिन्स्टनसाहेब सिद्ध करीत असतील तर त्यानें गुन्हा केलाच असें समजून त्याला शिक्षासुद्धां करूं. त्यावर एल्फिन्स्टनसाहेबानें असें उत्तर पाठविलें कीं, मी आपल्याला पुरावा दाखविलाच आहे आणि हा आरोप सिद्ध करून देण्याला मी तयार आहें. याजकरितां पुनः सांगतों की त्रिंबकजीला कैद करा; तो अधिकारावर राहून जर दंगाधोपा किंवा कांहीं कारस्थान करील आणि त्यामुळें आपल्या व आमच्या दोस्तीस बाध येण्यासारखें कांहीं घडेल तर त्याचा परिणाम वाईट होईल हें ध्यानांत ठेवा.

त्रिंबकजीचा पक्ष बाजीरावानें पुराच धरला होता आणि एल्फिन्स्टन तर त्याला कैद करा याशिवाय दुसरें कांहीं बोलेना. ह्मणून बाजीरावानें फौज जमविण्यास आरंभ केला तेव्हां त्यानें त्याला सांगून पाठविलें कीं, तुह्मी पुण्यांत फौज वाढवीत अहां हें बरें नाहीं; परिणाम वाईट होईल. श्रीमंतांनीं तें ऐकून ती फौज दहाबारा कोस दूर ठेविली. परंतु भरतीचें काम चाललेंच होतें. त्रिंबकजीबरोबरच आपला सोक्षमोक्ष काय व्हावयाचें असेल तें होऊंदे असा

त्यांचा अगदीं निश्चय झाला असल्यासारखें दिसूं लागलें. त्रिंबकजीनें बंड केल्यासारखें करून पळून जावें अशीही एकदां त्यांनीं तयारी केली. पुनः एल्फिन्स्टन साहेबाजवळ तडजोडीचें बोलणें लाविलें. त्यांत मुद्दा कायतो एवढाच कीं, त्रिंबकजीनें शास्त्रीबावांना तीनदां बोलावणें पाठविलें हें सिद्ध करून द्यावें ह्मणजे त्याला कैद करून शिक्षा करतों. त्यावर त्याचें उत्तर त्याला कैद करा, पुरावा करून देतों; तो दिवाणगिरी करीत असल्यामुळें लोक साक्षीला उभे रहावयाला भितात; तेवढें भय नाहींसें झालें ह्मणजे हवा तेवढा पुरावा आहे.

याप्रमाणें निरोपानिरोपीं कांहीं दिवस काम चाललें होतें. इतक्यांत हैदराबादेस दंगा झाल्याचें वर्तमान आलें, तेव्हां बाजीरावाला दम आला आणि त्रिंबकजीनें दरबारात आपल्या कामावर असावें असें ठरवून त्यानें एल्फिन्स्टनसाहेबांकडे जरा चढाच्या शब्दांनीं निरोप पाठविला; व शास्त्रीबावाच्या खुनाबद्दल खोट्यानाट्या जबान्या घेण्यास सुरवात केली. तेव्हां आतां श्रीमंत तह मोडतात असे त्याला पक्कें वाटलें. परंतु तो नेटानें पहिल्याप्रमाणेंच बोलत राहिला. हैदराबादचें बंड खरें केवढेसें आहे तें मनांत न आणतां भलभलत्याच उठलेल्या आवईवर विश्वास ठेऊन श्रीमंत कंपनीसरकारचा व आपला बेबनाव झाला असें ह्मणून पुणें सोडून कदाचित् बाहेर पडतील असें मनांत येऊन त्यानें त्यांला असें कळविलें कीं, "त्रिंबकजी तुमच्या मर्जींतला ह्मणून त्यानें भलतें भलतें कांहीं शिकविलें आणि आपण तसें केलेंत तर कदाचित् त्याचा एकादा हेतु साधेल, परतु आपलें व कंपनीसरकारचें वैमनस्य आल्यावांचून राहणार नाहीं; आणि तसें झालें ह्मणजे तो बाजूस राहील; आपण मात्र दुर्लौकिक करून घेऊन गादीला मुकाल एवढें लक्षांत ठेवा." याप्रमाणें निरोप पाठवून त्यानें जोडनदीची फौज पुण्यास आणविली आणि बाजीरावाला कळविलें कीं "आपले दरबारच्या भापणाचा रोख कांहीं निराळा दिसूं लागला आहे व आपण चोहींकडून फौज जमवीत आहां, ह्मणून आह्मांसही त्याचप्रमाणें तयारी ठेवणें जरूर वाटल्यावरून हीं पलटणें आणविलीं आहेत."

असा प्रकार चालला असतां सप्टेंबर आला आणि तारीख ४ रोजीं गव्हर्नरजनरलाचें उत्तर एल्फिन्स्टन साहेबाच्या हातांत येऊन पडलें. त्यानें लिहिलेलें सर्व पसंत करून लाट साहेबांनीं त्याला असें फर्माविलें होतें कीं, पेशवे सरकार तुमच्या ह्मणण्याप्रमाणें न करतील तर ते आमचे शत्रु झालेच; तुह्मी एकदां जें बोललां अहां त्यांत माघार घेणें ह्मणजे अप्रतिष्ठेचें काम आहे,

याजकरितां तसें करूं नये. परंतु एकदम निकरावर येऊन लढाईला उभें राहूं नये; बेताबेतानें काम चालवावें. बाजीरावाला कळून किंवा न कळतां त्रिंबकजी पुण्यांतून पळेल, तर पळूं देऊं नये. तो गेला तर कदाचित् त्याच्या मागून तेही जाऊं लागतील; तसें होईल तर त्यांना हरएक प्रकारें अडथळा करावा, जाऊं देऊं नये. पुण्यास जी तैनाती फौज आहे ती तुमच्या हुकमांत आहेच, शिवाय तशीच जरूर वाटेल तर मुंबई व मद्रास येथील व कर्नल डोव्हटन याचे हाताखालील फौज बोलवावी.

गव्हरनर जनरलानें पेशव्यांस निराळा खलिता लिहिला होता, तो सादर करून एल्फिन्स्टन साहेबानें त्यांस असे कळविलें कीं, आपण शास्त्रीबावांच्या खुनाची चौकशी न कराल तर त्रिंबकजीस आपल्या स्वाधीन करून घ्यावे असा मला हुकूम आहे. आपण अद्याप तसे कांहीं केलें नाहीं तर त्याला आमच्या स्वाधीन करावें. याप्रमाणें सांगून त्यानें मग त्यांना आणखी असा उपदेश केला कीं, आपण डोळे झांकून परिणाम मनांत न आणतां त्या वाईट मनुष्याचा पक्ष धरून आग्रहास पडाल तर फुकट संकटांत पडाल. इंग्रजसरकार त्याला आपल्या हातांत घेतल्यावांचून राहणार नाहीं.

याप्रमाणे एल्फिन्स्टन साहेबाने अखेर काय होणार ते सांगितले, तेव्हां बाजीराव जरा शुद्धीवर आले. मग त्यांनीं आपली भरवशाची मानलेली मंडळी जमवून विचार केला आणि त्याला सागून पाठविले कीं त्रिंबकजीला आह्मी कैद करतों, परंतु तुह्मी त्याला देहान्त शिक्षा करा किंवा आमच्या स्वाधीन करा असें ह्मणूं नये आणि शास्त्रीबावांच्या खुनाप्रकरणीं आतां जास्ती कांहीं चौकशी करूं नये. एल्फिन्स्टनसाहेबानें ते त्यांचें ह्मणणें अर्थातच कबूल केलें नाहीं. कांहींएक अट न लावतां त्याला इंग्रज सरकारच्या स्वाधीन केलें पाहिजे एवढें एक तो धरून बसला होता. परंतु बाजीरावाला खुद्द आपल्याविषयीं भीति वाटू नये ह्मणून त्याने सदाशिवराव माणकेश्वराला असें सांगितलें कीं, एकदां त्रिंबकजी आमच्या स्वाधीन होऊन कैदेत राहिला, ह्मणजे मग या कामीं आणखी कांहीं चौकशी करण्याची जरूर राहणार नाहीं. याप्रमाणें बोलणें चाललें असतां मध्यंतरीं श्रीमंतांनी त्रिंबकजीची भेट घेऊन त्याचें शांतवन केलें. तुझ्या मुलाबाळांचें संरक्षण करतो, कांहीं काळजी करूं नको, असें त्याना आश्वासन दिले आणि साताऱ्याजवळ वसंतगडावर त्याची रवानगी केली. परतु एल्फिन्स्टन कांहीं तशानें स्वस्थ बसणारा नव्हता. त्यानें

कांहीं आपलें बोलणें सोडलें नाहीं. गव्हरनर जनरलाचा हुकूम आल्यापासून त्याचें भाषण अधिक नेटाचें पाहून आतां इंग्रजांबरोबरचा तह मोडला तर परिणाम नीट होणार नाहीं, असें बाजीरावाच्या मनांत आलें आणि त्यानें नवीन तयार कराविलेल्या फौजेवरचा सेनापति मेजर फोर्ड याची सल्ला घेऊन त्रिंबकजीला तुमच्या स्वाधीन करतों असें कबूल केलें. मग एल्फिन्स्टन साहेबानें त्याला असें आश्वासन दिलें कीं, आतां या प्रकरणांत जास्ती चौकशीची आह्मी जरूर समजणार नाहीं; त्रिंबकजीच्या जीवाला अपाय होणार नाहीं, अटकेंत असलें ह्मणजे जेवढें दुःख व्हावयाचें त्याच्यापेक्षां त्याला कांहीं जास्त होणार नाहीं.

याप्रमाणें ठरून मेजर फोर्ड याच्या हाताखालील फौजेंतली एक तुकडी वसंतगडावर गेली. तेथे तारीख १९ सप्टंबर रोजी त्रिंबकजी तिच्या हवालीं झाला. तेथून पुण्यास आणून तारीख २६ रोजीं इंग्रजी फौजेच्या स्वाधीन होऊन त्याची मुंबईस रवानगी झाली आणि तेथून तो ठाण्याच्या किल्ल्यांत जाऊन अटकेत पडला. गोविंदराव बंडोजी व भगवंतराव गायकवाड यांस स्वाधीन करून घेऊन इंग्रजसरकारानें गायकवाडसरकारच्या * हवालीं केलें.

त्रिंबकजीला कैद करावें असें एल्फिन्स्टन साहेबानें ह्मटलें, तेव्हांपासून शिंदे, होळकर, व भोंसले यांच्याशीं बाजीरावाचें कारस्थान बरेंच सुरू झालें होतें, असें त्या त्या दरबारच्या रेसिडेंटांकडून जे सरकारांत रिपोर्ट गेले त्यांवरून दिसून आलें. त्यांच्या खटपटीमुळें व हैदराबादच्या बंडाची बातमी ऐकून बाजीरावाला चेव येऊन तो हट्टास पडला होता.

शास्त्रीबावांच्या खुनाची बातमी कानीं पडल्यापासून त्रिंबकजी हातीं येईपर्यंत एल्फिन्स्टन साहेबाला दुसरें कांहीं काम करतां आलें नाहीं. त्याची ठाण्यास रवानगी झाली, आपल्या अंगांत पाणी कसें आहे तें

---

* गायकवाडानें दोघांस दोन डोंगरी किल्यांत तुरंगांत टाकिलें. गायकवाडाचा दिवाण सीताराम रावजी त्रिंबकजीच्या सारयांना सामील होता व तो फौज जमवीत होता, ह्मणून इंग्रजसरकारानें त्याला कामावरून काढून आपल्या स्वाधीन करून घेऊन अटकेंत ठेविलें. तें फत्तेसिंग गायकवाडाला बरें वाटलें नाहीं. पुणेंदरबारच्या कारस्थानानें त्याच्या मनाची चलबिचल होत असल्याचीं चिन्हें दिसूं लागलीं.

बाजीरावाला नीट कळलें, तेव्हां आतां दरबारांत कांहीं बखेडा होणार नाहीं व आपल्याला पहिल्यापेक्षां ही स्वस्थपणानें आपल्या वाचनादिप्रिय व्यवसायांत निमग्न व्हावयास वेळ सांपडेल असें त्याच्या मनांत आलें असेल, परंतु तसें कांहीं घडलें नाहीं. त्रिंबकजीला दूर, प्रयागच्या किंवा चुनारच्या किल्ल्यांत, बंगाल्यांत नेऊन टाकावें असें त्यानें सांगितलें होतें, परंतु मुंबई-सरकारनें तें मान्य केलें नाहीं; त्याला अगदीं आपल्या डोळ्यांपुढें ठेविलें आणि सक्त बंदोबस्त रहावा म्हणून त्याच्यावर कडक पहारेकरी, सारे गोरे नेमिले. आतां कारागृहांतून आपली सुटका होईल अशी त्रिंबकजीला तिळमात्र आशा उरली* नाहीं, परंतु भवितव्यता विचित्र होती त्यामुळें तसतसें घडून आलें. त्या गोऱ्या शिपायांना आमची भाषा कळत नसल्यामुळें त्यांच्या देखत उघड उघड मसलत करण्याला त्याला सवड मिळाली. ती साधून त्रिंबकजीचें आणि बाजीरावाचें सूत्र जमलें. किल्ल्यांतल्या एका गोऱ्या अम्मलदाराच्या घोड्याचा मोतद्दार मराठा होता, त्याच्या द्वारें उभयतांचें भाषण सुरू होऊन पळून जाण्याचा बेत ठरला. तो मोतद्दार साहेबाचा घोडा टेहेळवावयाकरितां काढी, तेव्हां त्रिंबकजी ज्या गच्चीवर फिरत असे तिच्याच समोर त्याला फिरवी आणि तोंडानें गाणें म्हणूं लागे. त्यांत इकडची बातमी तिकडे व तिकडची इकडे पोहोंचवी. गोऱ्या पहारेकऱ्यांस तें कांहीं कळत नसल्यामुळें काडीइतकाही संशय येत नसे आणि त्याचें काम निर्विघ्नपणें चाले. असे होतां होतां थोड्याच दिवसांत बेत होऊन त्रिंबकजीचे मित्र व नौकर वगैरे टाण्यापासून जवळ जंगलात येऊन त्याला नेण्याची तयारी करून वाट पहात बसले. त्या मोतद्दाराने गात गात तें वर्तमान त्याला कळविलें. मग भिंतीला भोक पाडून त्या वाटेनें त्याला घेऊन तो तारीख १२ सप्टेंबर १८१६ इसवी रोजीं तीन घटका रात्रीच्या सुमारास पळाला.

मुंबईसरकारच्या चुकीनें आणि बाजीरावाच्या साहाय्यानें त्रिंबकजीस पळून जातां आलें. परंतु तेवढ्यानें मराठे लोकात त्यानें हें शिवाजीसारख्या शूराला

---

* आतां आपला जन्म तुरंगांत जाणार असें त्रिंबकजीला पक्कें कळलें, सुटकेची कांहींच आशा नव्हती, तेव्हां किल्ल्यांतल्या गोऱ्या अमलदारांबरोबर बोलतांना मी गंगाधरशास्त्र्याला तोडविलें खरें; परंतु तें आपण होऊन नाहीं, श्रीमंतांच्या हुकमावरून केलें असें तो म्हणे असें मराठ्यांचा इतिहास लिहिणारा ग्र्यॉंट डफ् यानें लिहिलें आहे.

शोभेसें कृत्य केलें अशी त्याची वाहवा सुरू झाली आणि पुण्यांत मुख्य दिवाणगिरीच्या अधिकारावर असतांना तो जरी लोकांना अप्रिय होता तरी आतां फार प्रिय झाला. तो जो पळाला तो नासिक व संगमनेर यांच्या आसपास डोंगरांत भिल्ल, मांग, रामोशी जमवून त्यांच्या आश्रयानें राहिला. तो शंभुमहादेवाच्या डोंगरांत वरचेवर येऊन रहात असे.

---

# भाग १० वा.

## इ० सन १८१६-१७

गंगाधरशास्त्र्याचा खून झाल्यापासून त्रिंबकजी ठाण्याच्या किल्ल्यांत जाऊन अडकेपर्यंत एल्फिन्स्टनसाहेबाला अर्थातच चैन नव्हतें. चित्त स्वस्थ झाल्यावर ग्रंथावलोकन, शिकार, खेळ वगैरे पूर्ववत् सर्व प्रकार सुरू झाले; ते तो पळून जाऊन पुनः त्रास होऊ लागेपर्यंत अव्याहत चालले होते. त्या मधल्या काळांत त्याचा पत्रव्यवहार पुष्कळ झाला. त्यांत व त्याच्या रोजनाम्यांत स्वतःविषयींच्या कांहीं गोष्टी व त्रिंबकजीचा पक्ष धरून बाजीराव राज्यास मुकण्याच्या पंथास कसे लागले तें लिहिलेलें आहे, ते वर्णन या भागांत करूं. त्यावेळीं हिंदुस्थानची स्थिति कशी झालेली होती तेंही वर्णन यांत कोठें कोठें येईल.

एल्फिन्स्टन साहेबानें तारीख १५ फेब्रुआरी सन १८१६ रोजीं आपला मित्र स्ट्राचीसाहेब याला एक लांबलचक पत्र लिहिलें. त्यांत तो ह्मणतोः—त्रिंबकजीला स्वाधीन केल्यावर बाजीरावानें फौजही कमी केली आणि आतां जिकडेतिकडे शांतता आहे. त्रिंबकजी कामावर असतांना त्याच्या खटपटीमुळें मला नेहमीं त्रास होत होता. आतां दोनप्रहरीं बारावाजेपर्यंत सिसेरोचे आणि सायंकाळीं सहांपासून भोजनाच्या वेळेपर्यंत डॉक्टर जेफ्रिस बरोबर हिरॉडॉटसचे ग्रंथ वाचण्यास फुरसत मिळते. एक आठवडा आड करून आह्मी बुधवारीं संध्याकाळीं दहाबारा मैल डुकराच्या शिकारीला जातों. गुरुवारीं शिकार करतों आणि शुक्रवारीं सायकाळीं परत येतों. आज वर्षभर असा क्रम चालला आहे. बाहेर गेलों ह्मणजे ऊन लागून माझ्या नाकाचें सालडें जातें या शिवाय दुसरी कांहीं इजा होत नाहीं. आह्मी आपले भाले पूर्वीसारखे फेकीत नाहीं. ते पहिल्यापेक्षां लांब असतात; त्यांनीं आह्मी डुकरांना भोसकतों, ते हातचे टाकून देत नाहीं. केव्हां केव्हां मुंबईची किंवा घोडनदीची मंडळी

पाहुणी येते, त्यांच्या संगतींत वेळ बरा जातो; अगदीं रंगेलपणाही नसतो आणि औदासिन्यही नसतें. पेंढारी फार धीट होत चालले आहेत. गुदस्तां त्यांची एक टोळी घोडनदीजवळून गेली. ती पंढरपुरावर घाला घालते असें भय वाटत होतें. परंतु हैद्राबादेच्या दक्षिणेस वळून ते कृष्णेजवळ गेले आणि सोडलेल्या ( ceded to the English ) मुलखांत धुमाकुळ मांडून, मद्रासच्या लोकांना घाबरवून सोडून सरहद्दीने उत्तरेस वळून पुन: नर्मदा उतरून रगड लूट आणलेली खुशाल घेऊन गेले. त्यांच्या ह्या स्वारीची हकीकत ऐकिली ह्मणजे हिंदुस्थानावर मागे ज्या मुसलमानांच्या स्वाऱ्या होत त्यांची अथवा अमेरिकेंत स्पेनचे लोक जी लूट करीत तिची आठवण होते. आमचा एक बातमीदार हेर त्यांच्या छावणीत गेला होता, तेव्हां लुटीची वांटणी चाललेली त्याला पहावयास मिळाली. सोने, जवाहीर, उंची कपडे आणि एका देवळांतून आणलेली देवाची सोन्याची मूर्ति ते वजन करून घेत होते. आह्माला त्यांच्या पाठीस लौकरच लागले पाहिजे. परंतु मध्यतरी नेपाळावर स्वारी करावी लागेलसें वाटतें; कारण गुरखे लोक तहनाम्यावर सही करीत नाही असें ह्मणतात. कच्छ जिंकण्यास फारशा मेहेनत पडली नाहीं, कारण आमची फौज पुष्कळ, गोरी काळी मिळून १३००० होती. कांहीं मुलूख मिळून शिवाय आमचें एक काम मोठें झालें आहे. गायकवाडाच्या आणि आमच्या गुजराथेंतील मुलखांत जे वरचेवर हल्ले होत ते आता होणार नाहींत. बाळ होळकराच्या फौजेनें बंडावा केल्यामुळे तो पदरच्या मंडळीसह पळून एका डोंगरी किल्ल्यात शिरून कोट्याच्या राजाच्या आश्रयानें राहिला आहे. हिंदुस्थानांत अन्यत्र कोठें कांहीं कमजास्त नाही.

खुष्कीच्या मार्गानें विलायतेस जावें आणि कौन्सिलांत जागा मिळविण्याची खटपट करावी असे माझ्या मनांत अर्धवट येऊ लागलें आहे. बोनापार्ट विलायतेंत ( विलायतेच्या किनाऱ्यावर ) आला ह्मणण्याच्या बातमीची सविस्तर हकीगत आह्माला नुकतीच पोहोचली आहे. एकेका फ्रेंच मनुष्याला पाहून केवढे याचें भाग्य असें मला वारवार वाटत असे आणि आमचे तसें नाहीं ह्मणून खेद होई. परतु आतां तें पारडें फिरलें आहे. आह्मी तें वैभव उपभोगीत आहों आणि पूर्वी कारण नसतां ते दुसऱ्यांना जीं दुःखें देत होते तीं आमचे मित्र त्यांना भोगावयास लावीत आहेत. तरी बोनापार्टाची स्थिति

पाहून मला दया येते आणि दुर्दैवाच्या फेऱ्यांत सांपडला आहे तरी त्याचा तो निश्चय आणि मनाची स्वस्थता पाहून आश्चर्य वाटतें.

एल्फिन्स्टन साहेबानें आपला चुलता लॉर्ड कीथ याला तारीख २७ एप्रील १८१६ इसवी रोजीं पत्र लिहिलें त्यांत तो ह्मणतोः—

" काका, नेपोलियनाशीं तुमची बोलचाल झाल्याबद्दल वर्तमानपत्रांतून जो मजकूर येतो तो मी अत्यंत उत्सुकतेनें वाचतो. तुह्मी मोठे नशीबवान ह्मणून तो येवढा थोर पुरुष अशा संकटांत पडला असतां इतक्याजवळून त्याचें निरीक्षण तुह्माला करावयाला मिळतें आहे. मी खुपकीच्या मार्गानें घरीं जावें ह्मणतों, कारण त्यांत पुष्कळ मौज पहावयास मिळेल असें मला वाटते आहे; परतु जलमार्गानें गेलें असतां सेंट हेलेना येथे बोनापार्ट अटकेंत स्वस्थ पडलेला आहे, त्याचें दर्शन होईल असें मला खास वाटेल तर मी आपला पहिला बेत सोडून देईन. इतर कांहीं नाहीं, परंतु त्याच्या बुद्धीचें मला मोठें आश्चर्य वाटतें. "

एल्फिन्स्टन साहेबानें आपल्या बहिणीला तारीख २२ नावेंबर १८१६ रोजीं पत्र लिहिलें त्यांत तो ह्मणतो—आमच्या बागेची सारी नासाडी झाल्याचें तूं लिहिलेंस तें वाचून मला फार वाईट वाटलें. आपला फार दिवसांचा एकादा मित्र मेल्याचें ऐकून दुःख व्हावें तसें झाले. आपल्या घरच्या स्थितींत उलटापालटी झालेल्या ऐकावयाला सान्याच वाईट, कारण आह्मी आपले इष्टमित्र टाकून इतके दूर या देशांत आलों, तेव्हां त्यांचा आमचा वियोग झाला तो झालाच; आतां आह्मी तिकडच्या माणसांवर आणि स्थलांवर प्रीति करतों हा भ्रम आहे; तशीं माणसें, स्थलें व इतर सर्व वस्तु, केवळ काल्पनिक होत, असें आमच्या मनांत सहजच येत असते; आणि एकादे वेळीं उदासीन होऊन बसलेले असलें ह्मणजे तें स्मरण झाल्यावांचून रहात नाहीं. त्यांचीं नावें मात्र पहिलीं तींच असतील, परंतु स्वरूपें, स्वभाव, व आमच्याविषयीं मनोवृत्ति आणि इतर सर्व कांहीं अगदीं पालटून गेलेलें असेल. मला असें वाटतें कीं, आह्मी जेव्हां आपल्या घरच्या माणसांचा निरोप घेऊन, स्वदेश सोडून आलों तेव्हांच त्यांचा आमचा पक्का वियोग झाला; आतां तिकडे परत आलों तर नव्या लोकांत, नवीन वागणूक सुरू करावी लागेल. हे विचार मनांत आले ह्मणजे वाईट वाटतें. हे निराधार ठरले आणि तिकडे आल्यावर तेथच्या मंडळीला अगदीं परकेसे वाटलों नाहीं तर बरें होईल.

असे तरंग मनांत येतात तरी आमची बाग पहिली होती तशी करण्याला मी बराच पैसा देईन. चार्लस यानें ती मोडून टाकिली याचा मला राग आल्याशिवाय रहात नाहीं. मला वाटतें तो पैशाकरितां अगदी पेंचांत आला असावा आणि त्यामुळें तो मिळविण्याच्या नादांत आपण कसल्या कसल्या नामी स्थळांचा नाश करीत आहों याचें त्याला भान राहिलें नसावें. केव्हां केव्हां माझ्या मनांत असें येतें कीं, खुष्कीच्या वाटेनें घरीं येऊन आपल्या फार दिवसां मागच्या त्या आवडत्या स्थळांचें दर्शन घ्यावें आणि लहानपणच्या मित्रमंडळीची पुनः ओळख करावी. हें याच्या मागेंच केलें असतें तर बरें होतें. इतके दिवस इकडे अव्यवस्थेनें आणि निःकाळजीपणानं घालवून नुकतासा कोठें मी पैसे सांठवूं लागलों आहें अशा वेळीं आलों तर मग पन्नाशी भरत येई-पर्यंत मला इकडेच रखडत रहावें लागेल. आतां मी स्वदेशीं परत येऊन तेथें नांवलौकिक मिळवीन हें मनांत आणावयालाच नको. तसें करण्याला संधी नव्हतीच आणि असली तरी ती कधींच निघून गेली. आतां आलों ह्मणजे थोड्याशा उत्पन्नावर स्वस्थ आनंदांत राहून आयुष्याचे उरलेले दिवस लोटावे याशिवाय दुसरें माझ्या मनांत कांहीं नाहीं. माझ्या मनांत आलेंच तर स्टरलिंगशायरमध्यें आमच्या घराण्याचें पहिलें वजन होतें तसें बसवावें एवढें येणार. परंतु तें होण्याला जेवढी खटपट लागेल तेवढ्या खटपटीनें मोरोक्कोच्या राज्यांत आपलें वजन सहज बसवितां येईल ही माझी खात्री आहे. मी सहा महिन्यांची रजा मागितली आहे, मिळाली तर कान्स्टन्टिनोपलपर्यंत एका मित्राबरोबर जाण्याचें मनांत आहे. परंतु रजा मिळणें कठीण. मिळाली आणि गेलों तर माझी प्रकृति सुधारेल. वाटेनें श्रम होतील हें खरें, परंतु चांगले चांगले देश पहावयास मिळतील. त्या योगानें आणि एकाच ठिकाणीं राहिल्यानें अंगांतील तरतरी नाहींशी होत असते ती पुनः आल्यानें प्रवास हितावहच होईल. घरी लौकर परत यावे असें तूं ह्मणतेस तें सारें मला मान्य आहे, परंतु तेथें बसून निर्वाह होईल इतका पैसा सांचेपर्यंत मला इकडे राहिलेंच पाहिजे. माझी हांव कांहीं फार नाहीं; सालिना ( १५०० ) दीडहजार पौंड मिळतील असें झालें ह्मणजे मी पुरे ह्मणतों. इतके मिळण्याला पांच वर्षे इकडे काढलीं पाहिजेत.

लेडी हूड नांवाची एक विद्वान् व रसिक बाई एल्फिन्स्टनसाहेबाच्या पीरच याची होती, ती हिंदुस्थान पाहून विलायतेस गेल्यावर इकडच्या प्रवासाचें वर्णन

छापणार होती, परंतु तो बेत तिनें रहित केला. तें वर्तमान त्याला कळलें तेव्हां त्यानें तिला पत्र पाठवून त्यांत पुस्तक लिहित्यात तर बरें होतें असें ह्मणून कांहीं विषयांच्या सूचना केल्या होत्या; त्यांतील एक अशी होती.—ज्यांच्या नैसर्गिक सौंदर्याचें वर्णन केलें असतां तें मनोरंजक होईल अशीं स्थळें हिंदुस्थानांत कांहीं थोडीं नाहींत. उदाहरणार्थ बादशहा महाल घेऊं. त्याचा तो जंगली चमत्कारिक देखावा असा कांहीं विलक्षण आहे की, त्याच्याहून वरचढ ह्मणावयाला साऱ्या जगांत दुसऱ्या कोठें बहुधा नसेल. बहुतेक दुर्गम अशा त्या अरण्यांत, अगदीं मध्यभागीं असलेल्या वाड्याचे ते अगदीं शुष्क चौक व दिवाणखाने, तो यमुनेच्या स्वच्छ जलाचा वेगानें चाललेला प्रवाह, जवळच्या डोंगरांवरची किर्र दाट झाडी आणि त्या खोऱ्याच्या बाजूंचे प्रचंड पर्वत, इत्यादिकांचें जर यथास्थित वर्णन केलें तर त्याची वाचक वाहवा करणार नाहींत असें होणारच नाहीं. हिमालय पर्वत पाहून मी तर आश्चर्यानें थक्क होऊन जातों. तुमची वृत्ति तशीच होते कीं काय तें मला माहीत नाही. त्याचा तो प्रचंड आकार आणि स्वरूप पाहून तेवढ्यानेंच मीं आनंदभरित होऊन जातो असें नाहीं. तेथची शांतता, एकांतवास आणि शोभा पाहून मनाची अशी कांहीं स्थिति होते कीं, तिचें मला नीटसें वर्णन करतां येत नाहीं. दुसरें असें मनांत येतें कीं, हे पर्वतराज कधीं जन्मास आले याचा तर मागमूस नाहींच आणि पुढें किती कालपर्यंत असेच राहतील याचे अनुमान करणेंही अशक्य आहे, तस्मात् हे चिरंजीव होत. त्याचीं गगनचुंबित शिखरें पाहून शिकंदर बादशहा आणि त्याच्या बरोबर आलेले मासिडोनियन लोक आश्चर्यचकित होऊन तोंडांत बोटें घालूं लागले तेव्हां तीं जशीं होतीं तशींच पुढें महंमद गिझनवी, चंगिझखान आणि दुसरे तैमुरलंग इत्यादि इमाम दांडग्यांच्या टोळधाडीसारख्या झुंडीच्याझुंडी आल्या तेव्हांही होतीं आणि पुढें आह्मी व आमचें राज्य लयास जाऊन पृथ्वीवर आमचें नांवसुद्धां उरणार नाहीं तेव्हांही असतील; त्यांच्या स्थितींत तिळमात्र कमजास्त होणार नाहीं. वर्णन करण्याला अशीं स्थळें नेहमींच मिळत नसतात. हिंदुस्थानाचे जे भाग आह्माला अगदीं यःकश्चित् वाटतात त्यांचेंसुद्धां वर्णन इंग्रजलोकांनां अगदीं नवीन असल्यामुळें वाचावेंसें वाटेल.'

'स्ट्राचीसाहेबानें आणि मी रजा मागितली आहे; मिळाली तर आह्मी मार्चच्या अखेरीसच निघूं आणि जूनच्या अखेरीस युरोपांत पोहोंचूं. आह्मी

एशियामायनरमधून जाणार आणि मिसर देशांतून परत येणार. हा आमचा बेत आहे, परंतु आह्माला जातां येणार नाहीं; कदाचित् आलें तरी इतका दूर पल्ला होणार नाहीं असेंही घडेल. जर येथें कांहीं काम उपस्थित झालें तर आह्माला जागेवरून हालतां येणारच नाहीं. असें आहे, तरी ह्या प्रवासाविषयीं मनांत अनेक तरंग येऊन मी मनोराज्यांत अगदीं गुंग होऊन जातों. इतकें घराजवळ येऊन माघारें फिरावयाचें ह्मटलें ह्मणजे अत्यंत दुःख वाटल्यावांचून राहणार नाहीं. परंतु त्या मोहास गुंतून पुढें यावें तर चारपाच वर्षें चाकरींत ज्यास्त काढावी लागतील.'—

एल्फिन्स्टनसाहेबानें आपला चुलता लॉर्ड कीथ यास तारीख २६ नोव्हेंबर सन १८१६ रोजीं पत्र लिहिलें त्यांत तो ह्मणतोः—सर पल्टनेचें बोनापार्टीबरोबर भाषण झालें, त्याचे टिपण त्यानें केलें आहे तें फार मनोरंजक आहे. भाषण तुह्मी ऐकिलेंच आहे. हिंदुस्थानावर फौज पाठविण्याचा त्याचा बेत होता कीं काय हे त्याला कोणीच विचारलेलें दिसत नाहीं. ह्या देशाशीं ज्या ज्या लोकांचा संबंध आहे त्यांना त्यांना ही गोष्ट कळणें फार अगत्याचें वाटावें. बोनापार्टीनें जर तशी कांहीं खटपट केली असती आणि त्याला रशियन लोकाची चांगली मदत असती, तर त्यानें आह्माला बहुधा जिंकलें असतें. इराण जिंकून घ्यावे हा रशियनांचा हेतु आहे अशी जनवार्ता आहे; ती जर खरी असेल आणि ते अजून जरी तेवढे करतील तर आह्मी बहुतेक अंशीं त्यांच्या मुठींत सांपडूं. हिंदुस्थानची सरहद्द फार उत्कृष्ट, आश्चर्य करण्यासारखी आहे. तिचें रक्षण आह्मांला करतां आलें ह्मणजे मग कशाचें भय नाहीं. तें होण्याला आह्मांला इकडे बाकी मुलखांत निर्भयता पाहिजे. परंतु हल्लीं मध्यहिंदुस्थानांत अशी स्थिति आहे कीं, जशी सरहद्दीवर तशीच त्याच्यावरही नजर ठेविली पाहिजे. हल्लीं जो मत्सर वाढलेला आहे तो ज्या मार्गानें कदाचित् टाळतां आला असता तो आह्मी फार दिवसापूर्वींच (कदाचित् लॉर्ड क्लाईव्हच्या कारकीर्दींत) सोडून दिला. तेव्हां दुसरा योग्य अथवा निर्भय उपाय ह्मटलें तर साऱ्या हिंदुस्थानांत आपण श्रेष्ठ होऊन बसणें हा उरला. परंतु आह्मी तोही अर्धवट टाकून बसलों आहों. याचा परिणाम असा झाला आहे कीं, जिकलेले लोक विजयी लोकांचा जो तिरस्कार करीत असतात त्याला मात्र आह्मी पात्र झालो आहों; आणि जिंकणारांच्या अंगीं जी हिंमत दिसावी ती आमच्यांत दिसत नाहीं. राज्यविस्तार मोठा झाला ह्मणजे

त्याबरोबर जी जबाबदारी येते ती आमच्यावर पडली आहे, परंतु त्या राज्यापासून जो लाभ अथवा युद्धाच्या उपयोगीं पडण्यासारख्या सामुग्रीची प्राप्ति व्हावी ती झाली नाहीं. तसें होईपर्यंत मध्यंतरीं शांततेच्या काळांत साधेल तितकी आम्ही आपली शक्ति वाढवीत चाललों असतों तर अशा संकटावस्थेंत राहणें कांहीं तरी योग्य आहे असें म्हणतां आलें असते. परंतु तें कांहीं नसून उलट आमच्या प्रांतांवर व आमच्या मित्रांच्या राज्यांवर लढाईच्या वेळेपेक्षांही अधिक हल्ला होण्याची व त्यांत लूट होण्याची भीति आहे. हल्लींची आमची मुलखाच्या बंदोबस्ताची जी तऱ्हा आहे ती अगदीं वाईट असून त्या कामीं एका वर्षांत जितका पैसा उडतो, तितक्यांत आमच्या शत्रूंचा चुराडा उडवून नीट नेटकें, चांगलें संरक्षण करतां येईल असें, आटपसर राज्य आम्हाला बनवतां आलें असतें.

गुदस्तसालीं पेंढाऱ्यांची धाड मद्रासेकडच्या मुलखावर पडली तें तुह्मांला माहीत आहेच. सालमजकुरीं नागपूरकर भोंसल्याबरोबर आमचा तह झाला आहे, हा मागेंच झाला असता तर आमची जी संरक्षणाची तऱ्हा आहे ती सुसाध्य दिसली असती. आमच्या मित्र राजांच्या उत्तर सरहद्दीवर त्यांच्या सैन्यापैकीं बरेंच व आह्मांला जितके स्वार पाठवितां येण्यासारखे आहेत तितके, अशी मोठी फौज आहे. दक्षिणेंत जी पर्वतांची आडवी ओळ आहे ती धरून तींतल्या घांटांतून पेंढाऱ्यांना येतां येऊं नये ह्मणून नाकीं धरून आह्मी जागोजाग स्वारांच्या चौक्या ठेविल्या आहेत. असा आमचा बंदोबस्त होतो आहे, इतक्यांत पेंढाऱ्यांनीं आपला नेहमीचा क्रम आरंभिला. त्यांची तीन चार हजारांची एक टोळी जी निघाली ती आह्मांला जी वाट अडवण्याला अवकाश सांपडला नव्हता तिनें घुसून जालन्याच्या छावणी जवळून गेली. अहंमदनगरच्या किल्ल्याच्या पश्चिमेस सुमार वीस मैलांवर एक आमचें पलटण छावणी करून होतें त्यांतले उंट त्यांनीं नेले; घोडनदीस जी तैनाती फौज आहे तींतील कांहीं जनावरें नेलीं; ह्या शहरापासून सात आठ कोसांवरून पेशव्याच्या फौजेच्या एका लहानशा टोळीची दाणादाण उडवून देऊन जात जात ते दक्षिणेकडे पार झाले. ते मद्रासइलाख्याच्या पश्चिम भागांत शिरले असावे यांत शंका नाहीं. सरहद्दीच्या पूर्वेकडील भाग चांगलाच मजबूत आहे, त्यावर आह्मी नागपूरची तैनाती फौज आणून ठेवून बंदोबस्त केला होता. ती फळी फोडून जाण्याचा पेंढाऱ्यांनीं प्रयत्न केला तेव्हां तिनें प्रथम त्यांना धुडकावून

माघारें फिरवून लाविलें; परंतु मागून एक ५००० पांच हजारांची टोळी आली, तिला कांहीं अडवितां आलें नाहीं. ती सरळ उत्तरसरकार मुलखांत राजमहेंद्रीवर गेली आणि यावेळेस तेथचे कलेक्टर, जज्ज वगैरेंना गांगरवून हांकून लावीत असेल. मद्राससरकार आपल्या सरहद्दीवर रांगेने चौक्या बसविणार होतें, परंतु चाळीस चाळीस पन्नास पन्नास मैलांच्या अंतरानें बसलेल्या असल्या शिपायांना पेंढारी जुमानतात! त्यांची लगट केली तर ते रोज तीस चाळीस मैल याप्रमाणें आठ आठ दिवस सारखीं घोडीं पळवितात. चौकीदारांना ते येत असल्याची बातमी लागण्याच्या आधीं ते निघून पार होतील हें अगदीं उघड आहे; आणि ते चौकीपासून पन्नास पावलांवरून गेले तरी काय होणार? चौकीवाले त्यांच्यावर फार तर एक शिलक झाडतील, त्यांना त्यांच्या पाठीस लागवणार नाही. ह्या लुटारूंना वठणीस आणावयाचें हाटलें तर त्यांचीं जीं कायमचीं ठाणीं आहेत त्यांवर हल्ले केले पाहिजेत, आणि जागोजाग स्वाराचे टप्पे बसवून त्यांच्या नेहेमी पाठीस लागत राहिले पाहिजे; त्यांच्या टोळया अगदीं मोडेपर्यंत किंवा सांपडतील तेथें अगदीं तोडून टाकीपर्यंत साऱ्या हिंदुस्थानांत त्याना कोठें ही चैन पडूं देतां कामा नये. एवढाच एक उपाय आहे हें अगदीं उघड आहे. परतु आह्माला तसें करतां येत नाही; कारण त्यांचें मुख्य ठाणें शिंद्याच्या मुलखांत आहे. परंतु शिंद्याच्या दरबारीं आमचा जो रेसिडेंट आहे त्याचे मत असे आहे कीं, आह्मी जर शिंद्याला नेटानें सांगूं तर त्यांचा समूळ नाश करण्याला जें ह्मणूं ते तो तत्काळ मान्य करील. बरं, त्यानें मान्य न केले तर त्याच्यावर एक लहानशी मोहीम करून आह्मी त्याच्याकडून जे पाहिजे ते कबूल करून घेऊं हें सर्वांना कळतें आहे. लॉर्ड मोईरा हे सर्व नीट जाणून आहे, आमच्या हातांत जो एकच उपाय आहे तोही त्याला कळतो आहे असें दिसतें. परंतु कोर्ट ऑफ डायरेक्टर्सच्या सक्त हुकमापुढें त्याचा नाइलाज झाला आहे असें समजते. हें जर खरें असेल तर डायरेक्टर्स साहेब तो हुकूम लौकर रद्द करोत अशी मी मनापासून इच्छा करतों. आमचे शत्रू आमचा मुलूख लुटून गबर होत चालले असतां आह्मी निष्फळ तयारी करीत बसण्यात आपला पैसा खर्चीत आहो हें आधीं वाईट; परंतु दुसरी गोष्ट याहूनही वाईट आहे ती अशी कीं, आमच्या फौजेची हुरूप नाहींशी होत चालली आहे आणि आमची प्रजा घाबरूं लागली आहे. आमचे शत्रू दिवसेंदिवस बळावत

१३-१५४-२०००

चालले आहेत; त्यांना असें खास वाटूं लागलें आहे कीं, अखेर इंग्रजांना जेरीस आणण्याची युक्ति आपल्याला सांपडली. आपल्या पूर्वजांची ही लूट करीत सुटण्याची लढाईची रीत चांगली आहे; मराठे उदयास आले ते प्रथम याच तऱ्हेनें आणि आतां आपण तेंच करून इंग्रजांना बेजार करूं. हे पत्र लिहितां लिहितां फार लांबलें. असो. विषयच तसा होता.'

एल्फिन्स्टनसाहेबानें तारीख २७ नोव्हेंबर १८१६ रोजीं आपली चुलती लेडी कीथ हिला पत्र लिहिलें. त्यांत लिहिण्याला वरच्यासारखा कांहीं मोठासा विषय नव्हता. तेव्हां त्यानें आपल्या आसमंतांतल्या गोष्टींचें वर्णन केलें. त्यावरून त्याची अवलोकनशक्ति आणि वर्णनशैली कशी होती तें चांगलें दिसून येतें. तो ह्मणतो—मी एका बागेत लिहीत बसलों आहें. हींत जीं झाडें आहेत त्यांतल्या काहींना इंग्रजींत नांवेंच नाहीत, बाकीचीं विलायतेंत अती दुर्मिळ असून ग्रीन * हौसमध्यें ठेवितात तसलीं आहेत. माझ्या घरापासून पंधरावीस पावलांच्या आंतच एक हिंदूंचें देऊळ आहे त्यांत देवापुढे धूप जाळतात त्याच्या धुरानें माझी खोली भरून गेली आहे. हिंदूबायकांचे थवेच्याथवे त्या देवाला वाजत गाजत येऊन फुलांच्या माळा वाहतात आणि जसा ज्याचा नवस असेल त्याप्रमाणें त्याच्यापुढे मेंढरें तोडतात आणि आपल्या डोक्याचे केंस कापून टाकतात. याच बागत एक फार प्राचीन, पडकें, एका वली मुसलमानणीचें थडगें आहे. ती जागा ह्मणजे मोठें जागृत स्थान आहे असे लोक समजतात आणि काफर लोक देखील त्याच्यापुढें येऊन कोणी शपथ घेतली ह्मणजे अगदीं अखेर झाली असें समजतात. येथून सरळेंच नदीच्या कांठावर मघाशीं एक प्रेत आलें, त्याच्याजवळ माणसें रडत होतीं, आतां चिता पेटूं लागली आहे आणि तीं माणसें बाजूस स्वस्थ बसलीं आहेत. राख भरून टाकण्यासारखी होईपर्यंत तीं अशींच बसतील. ह्याच जागीं मी पूर्वीं सती गेलेली ह्मणजे मेलेल्या माणसाबरोबर जिवंत बायकोला जाळलेलें पाहिलें आहे. येथून जवळच दोन हत्ती पाण्यांत लोळत आहेत आणि नदी उतरून जाण्याच्या वाटेवर ह्मशी, उंट, व सईल अंगरखे घालून लांबलांब

---

* कित्येक नाजुक वेली व लहान कोमल झाडें कोमेजून जाऊं नयेत, टवटवीत रहावी, ह्मणून त्यांच्यासाठीं मुद्दाम घर बांधून त्यांत तीं ठेवीत असतात, त्याला ग्रीन हौस ( Green house ) असें ह्मणतात.

भाले हातांत घेऊन घोड्यावर बसलेले व पाई चालणारे पुरुष व बायका आहेत. त्यांचे पोषाख अनेक तऱ्हांचे आणि अनेक रंगांचे आहेत.

"आज मोहोरमच्या सणाचा ह्मणजे हसनहुसन लढाईंत मेले तो दिवस असल्यामुळें यावेळीं मुसलमानांची स्वारी निघाली आहे. ते आरबां-सारखे पोषाककरून वेडेविद्रे नाचत, नंग्या तलवारी परजीत चालले आहेत. ह्या सणानिमित्तच शहरांत जिकडे तिकडे ताशे व शिंगें वाजत आहेत आणि आरडाओरडा चालला आहे. नर्मदेच्या पलीकडून लुटारू घोडेस्वारांची एक टोळी आली आहे, ती पुण्याच्या आसपासचे गांव लुटून फस्त करीत सुटली आहे. तेथचे गरीब बिचारे लोक शहरांत आश्रयासाठीं धांवत आहेत. असा सारा एकच गोंधळ विलायतेंत कोणाच्या नजरेस पडणार नाहीं. परंतु हिंदुस्थानांतल्या असल्या साऱ्या चमत्कारिक गोष्टींचे वर्णन मागेंच होऊन गेलें आहे आणि त्यांत मला आतां नवें असे कांहींच वाटेनासें झालें आहे.'

एल्फिन्स्टनसाहेबानें तारीख २९ नोव्हेंबर १८१६ रोजीं एडवर्ड स्ट्राची-साहेबाला पत्र लिहिलें, त्यांत तो ह्मणतो—घरीं जावें असा तुह्मी मला उपदेश करावयाला नको आहे. माझ्या मनांत रात्रंदिवस तोच विचार घोळत आहे; स्वप्नांतसुद्धां तेंच दिसतें. कांहीं दिवस तरी जाऊन यावें ह्मणून मी अगदीं निघण्याच्या बेतांत होतों. परंतु गेलें असतां तीनचार वर्षें उमेदवारींत घालवावीं लागतील आणि पन्नाशी उलटेपर्यंत इकडेच रखडत रहावे लागेल हें मनांत येऊन पाय मागें घेतला. मला १५०० पौंड सालिना मिळूं लाग-ण्याला पांच वर्षें चाकरी केली पाहिजे. तितका काळ इकडे राहिलों म्हणजे ह्या जगांत सुख मिळण्याचा संभव देखील पुष्कळ अंशीं मी घालवल्यासारखेंच होणार. आतां हातून एकादें मोठें कृत्य होण्याचा किंवा कीर्ति मिळवि-ण्याचाही काळ नाहीं. तो मागें कधींच गेला. मी घरीं येईन तों बेचा-ळीस वर्षांचा होईन. तें वय म्हटलें म्हणजे लग्न करून संसार थाटण्याचेंही नाहीं आणि मंडळींत मिसळून वागण्याचेंही नाहीं; त्या दोहींवांचून मला कालक्रमण करतां येईल असेंही नाहीं. मला कांहीं काम न करतां रिकामें राहवेल कीं नाहीं याचीही शंकाच वाटते.'

'तुम्ही पुण्याची बातमी विचारलीत ती ऐका—त्रिंबकजी तुरुंगांतून पळाला त्याला आज दोनतीन महिने झाले, परंतु अद्याप कोठें कांहीं दंगा-धोपा करीत नाहीं. तो कोठें लपून राहिला आहे ती खरी बातमी मला

कांहीं लागत नाहीं; एकदा एक एकदा एक असें ऐकितों. तो जर थोडी गड-बड करूं लागेल तर त्याला आम्हीं लागलाच पकडूं. ती न करील तर तो न सांपडला म्हणून तरी काय गेले? पेंढाऱ्यांचा दंगा शिवाय करून दुसरी हिंदुस्थानांत कोठें कांहीं धामधूम नाहीं. रणांगणीं आमचें सैन्य पुष्कळ आहे. तें पाहून शिंदे होळकर थरथर कांपत आहेत आणि 'ईश्वरा! यांच्याशीं तंटा उपस्थित व्हावयाला कारणच न घडो, अशी प्रार्थना करीत आहेत. परंतु त्यांच्यानें कांहीं पेंढाऱ्यांना आवरवत नाहीं. ते आमच्या मद्रासेकडच्या मुलखांत व आमच्या दोस्तराजांच्या मुलखांत उपद्रव देत आहेत. येथून सात आठ कोसांच्या आंत दोनतीन दिवसांखालीं त्यांनीं लूट केली. अजिंठ्या-कडून वगैरे त्यांना दक्षिणेत उतरतां येऊं नये म्हणून आम्हीं सह्याद्रीपासून वर्ध्यापर्यंत वाटा बंद करावयास पहात आहों; परंतु असले सारे उपाय त्या लुटारूंपुढें व्यर्थ आहेत. ते अशाला जुमानतात!'

ग्रीस देश पहाण्याला जावें अशी मला पुन: उत्कट इच्छा झाली आहे. ते तीनशें स्पार्टन योद्धे थर्मापिलीच्या खिंडीत कोठेसे पडले तें मी पहातों आहें आणि शोधतां शोधतां त्यांच्या थडग्यावर उभा केलेला दगड मला खराच सांपडला आहे आणि त्यावरचा 'पांथस्थ हो! तुमच्या आज्ञेप्रमाणें आम्ही येथें पडलों आहों असें लासिडिमोनियन लोकांना सांगा' हा लेख मी वाचतों आहें असें मनांत आणा.'

'माझा बेत एशियामायनर मधून जावें, तीन महिने ग्रीस देशांत रहावें आणि मिसरदेशांतून माघारे यावें असा आहे. विलायतेस आलें असतां एकादी जागा पटकावावयास सांपडेल असें वाटतें, तर मी तसाच पुढें सुद्धां आलों असतों. परंतु मुंबईवर मालकम् साहेबांची नजर आहे आणि आडाम साहेब कौन्सिलांत जाण्याला टपलेले आहेत. मुंबईची गोष्ट तुम्ही काढलीत म्हणून मी बोलतों. ती माझ्या मनांत सुद्धां आलेली नव्हती. तें काम मला करतां येणार नाहीं, असें मला वाटत आहे असें मात्र नाहीं. जोनेथन यानें तें काम केलें आणि चार्लस् रिकेट त्या जागेला लायक आहे असें जर लोक बोलतात तर माझ्यानें तें होणार नाहीं कीं काय? परंतु माझा तीवर कांहीं हक्क नाहीं आणि मला ती विशेष हौसही नाहीं. ती आवडण्याला तरी पगा-राशिवाय तींत दुसरें कांहीं नाहीं. मुंबईचा गव्हरनर म्हटला म्हणजे तो नेहमीं सगळ्यांचा द्वेपास पात्र असावयाचाच. त्याचे मोठें काम ह्मटलें ह्मणजे खर्च थोड

करावा आणि कापूस खरेदी करावा. त्याच्या हातांत जागा देण्याचें असतें, परंतु मला तें सुद्धां आवडणार नाहीं. शिफारसपत्रांखालीं मी बेजार होऊन जाईन, चांगल्या मनुष्याला मागें टाकून नालायक असामीला बढती देणें भाग पडेल आणि अभिमानी मनुष्याला नाखुष करावें लागेल. घाणेरड्या कटकटींत पडण्याची मला कांहीं इच्छा होणार नाहीं. मुंबईची गव्हर्नरी म्हणजे अशी आहे.'

'माझी वर्हाण पार्लमेंटांत जाण्याच्या बाबतींत जें काय बोलली तें बहुधा पूर्वी ज्या दोन परगण्यांत आमच्या घराण्याचें वजन फार होतें ( एकांत तर करूं तो कायदा होता ) आणि आतां मुळींच नाहीं, त्यांच्यासंबंधानें बहुधा असावें. तें करणे झाल्यास आमच्यापैकीं कोणीतरी आधीं आपली स्थिति पहिल्याप्रमाणे होण्याविषयीं यत्न केला पाहिजे. मी तसें करावें ह्मटलें तर ती गोष्ट अगदीं निराळी आहे. हिंदुस्थानांतून जाणाऱ्या थोड्याच लोकांना मतें मिळवतां येतील. मला आपल्या ऐन उमेदींत सुद्धां कांहीं मिळवतां आलीं नसतीं.'

आपण रिकामपणांत काय करावे हा विचार एल्फिन्स्टन साहेबाच्या मनांत येई. केव्हां केव्हा त्याला वाटे एकादा ग्रंथ लिहावा. परतु देशाटनाचे बेत त्यापेक्षां अधिक होत. सन १८१६च्या अवेलीस त्याचा एक लेख असा आहे सकाळीं उपहार करून पुण्यांतल्या उलाढालीविषयीं बोलत बसलो असतां माझ्या मनांत असें आले कीं, मराठ्यांच्या साम्राज्याचा इतिहास लिहिला असतां तो मनोरंजक होईल, आणि तो लिहिण्याची वेळ जलद निघून जात आहे. त्या इतिहासांत मोगल बादशाहीच्या र्‍हासाची हकीगत व सध्याची स्थिति कशी आहे आणि ती घडून येण्याला कारणें काय झालीं तेही वर्णन येईल; दीर्घ काळाचा एकादा इतिहास ह्मटला ह्मणजे तो लांबलचक व्हावयाचा. परंतु हा आटोपसर व मोटा मनोरजक होईल. तसेच त्याला थोडें वैचित्र्य ही येईल. त्यांत दोष असणार आहे तो हा की, त्यांत वर्णावयाचे जे कर्ते पुरुष त्यांच्या अंगीं सद्गुणांचा अगदी अभाव व स्वभावांत थोरपणाचा अभाव, त्यांमुळें तो गोड लागणार नाहीं. शिवाजीने आणि त्याच्या पुत्रांनी, नातवांनीं, जीव देऊन केलेलीं कामें; पहिल्या पेशव्यांनी केलेले मोठमोठे पराक्रम, तसेंच त्यांच्या नशिबानें उलट खाल्ली तेव्हां त्यांना जे विलक्षण झोले बसले ते, त्यांनीं युरोपीयन युद्धकला उचलून ती लागू करून केलेली स्वसत्तेची पुनः संस्थापना, तेथून पुढच्या काळांत घडलेलीं दुष्कर्में आणि त्यामुळें उडालेली दाणादाण,

अखेर वसईचा तह होऊन मराठ्यांच्या गडबडीचा आणि श्रेष्ठपणाचा झालेला विलय, इत्यादि गोष्टी ह्मणजे त्या इतिहासाला सामुग्री कांहीं वाईट नाहीं; लिहिणारा मात्र शहाणा पाहिजे. निरनिराळ्या देशांच्या व तेथच्या रीतिभातींच्या वर्णनानें व कित्येक प्रसिद्ध पुरुषांच्या चित्रांनीं ग्रथाला शोभा आणतां येईल. लोकांना माहीत नसणाऱ्या अशाच इतर विषयांपेक्षां याची माहिती पुष्कळ सुलभ रीतीनें मिळवितां येईल. या विषयाचें पूर्ण ज्ञान करून घेण्याला ज्या साधारण सोई असावयाच्या त्यापेक्षां मी हल्लीं ज्या जागेवर आहें तींत त्या अधिक आहेत व मला संधीही अधिक आहेत. परंतु हा विषय युरोपियन लोकांना मोठासा वाटत नसल्यामुळें त्यांना गोड लागेसा होण्याकरितां त्याची मनुष्यजातीच्या साधारण इतिहासाशीं सांगड घालून दिली पाहिजे; आणि तसें करण्याला मानवी कृत्यांच्या मूलतत्वांचें पूर्ण ज्ञान पाहिजे. थोड्या शब्दांत पुष्कळ अर्थाचा समावेश असून लेख जोरदार असावा अशी लिहिण्याची शैली पाहिजे. तसेच त्यांतले विचार चकित करणारे व गहन असले पाहिजेत. असा इतिहास तयार करण्यास हे अवश्य लागणारे गुण माझ्या अंगीं नाहींत. परंतु एवढ्यामुळेंच हा विषय मनांतून टाकून देतां उपयोगी नाहीं. याचा चांगला विचार केला पाहिजे. ”

पुढें बरेच दिवसांनीं ह्मणजे तारीख १२ सप्टंबर रोजीं त्यानें असें लिहिलेलें आहे.—विलायतेस गेल्यावर कांहीं काम नाही तर मला रिकामें राहवेल कसें हा विचार नेहमीं माझ्या मनांत घोळत असल्यानें मला अगदीं चैन पडेनासें झालेलें आहे. याकरितां मराठ्यांचा इतिहास किंवा मोगल बादशाहीचा न्हास आणि आमच्या राज्याची स्थापना यांचा इतिहास लिहावा हा उपाय मी मनांत आणला आहे. आतां मला असे वाटतें कीं, एरियनचें भाषांतर आणि त्यावर टीका करावी; ती मुख्यत्वे स्थलनिर्णयात्मक असावी. हा नुसता विचार मनांत आणला ह्मणजे मला ग्रीक भाषेचा अभ्यास करावा लागेल. टीकेचें साहित्य हिंदुस्थानांत जमा करतां येईल आणि घरीं जातांना मार्ग तपासतां येईल. ”

याप्रमाणें एल्फिन्स्टन साहेबाचा विचार व बेत चालले होते, आपल्या हातून एकादें मोठें कृत्य होण्याची व नांवलौकिक मिळविण्याची कांहीं आशा नाहीं असें वाटत होतें, परंतु कीर्ति हातांत माळ घेऊन उभी होती, ती तिनें एका वर्षाच्या आंतच त्याच्या गळ्यांत घातली. तशीच मुंबईची

गव्हरनरीही दुष्प्राप्य आणि फक्त त्रासास कारण ह्मणून तिजकडे ढुंकून पहाण्याची सुद्धां आपली इच्छा नाहीं असें तो ह्मणत होता, परंतु तिचीही त्याच्या गळ्याला मिठी पडली आणि जी कीर्ति झाली तिला लोपविणारा असा अजून तर दुसरा कोणी गव्हरनर मुंबईस आला नाहीं. गव्हरनरजनरलीसुद्धां माझा स्वीकार करा असें त्याला ह्मणत होती, परंतु तिला त्यानें झिटकारलेंच. असो. तो प्रकार पुढें यथाक्रम वर्णन करण्यांत येईलच.

त्रिंबकजी पळाल्याचें वर्तमान कानीं येतांच एल्फिन्स्टनसाहेबानें तें बाजीराव साहेबास कळविलें आणि ह्मटलें, कंपनी सरकाराशीं आपली दोस्ती कायम राहावी अशी इच्छा असेल तर आपण त्याला आश्रय देतां उपयोगी नाहीं; त्याला धरण्याविषयीं चोहींकडे सक्त हुकूम पाठवावे. बाजीरावानें तें कबूल केलें परंतु एल्फिन्स्टनसाहेबाने विश्वासावर न रहातां तो कदाचित् गडबड करील तर ती चालूं देऊं नये, ह्मणून घोडनदीची तैनाती फौज पुण्यास आणविली.

त्रिंबकजी बाजीरावाच्या साहाय्याने पळून गेला असावा आणि कोठें लपून बसला आहे हेंही त्याला माहीत असावें असा इंग्रजांना जबर संशय होता तरी तसें कांहीं बोलतां येईना; कारण पुरावा दाखवावयाचा कांहीं मिळेना. ह्मणून तो कोठेंतरी स्वस्थ पडून राहता तर ते त्याचे नाव घेतेना. परंतु तसें कसें व्हावें? पळाल्यापासून पंधराच दिवसांनीं तो पुण्यांत आला असावा अशी बातमी एल्फिन्स्टनसाहेबाला कळली. तो आपला करावयाचा तो बंदोबस्त करून स्वस्थ बसला होता. सदाशिवराव माणकेश्वर, मोरदीक्षित वगैरे कारभारी मंडळी त्याला भेटत. श्रीमंताचीही भेट होई. त्यांचा क्याप्टन फोर्ड यावर विश्वास फार होता; तो आपल्या पदरचा असे त्यांना वाटत असे. ह्मणून त्याच्यामार्फत एल्फिन्स्टनसाहेबाबरोबर पुष्कळ बोलणें होत असे. श्रीमंतांची गाडी उलटून त्यांना इजा झाली होती ह्मणून तारीख २० दिसेंबर रोजीं डॉक्टर जेफ्रिस याला बरोबर घेऊन तो फुलगांवास जाऊन त्यांना भेटला. तेथें त्यांनी एक नवीन बाग तयार केला होता, त्यांत स्वारी होती. ' याप्रमाणें उभयपक्षीं वरकांती मोठें सख्य दिसत होतें, परंतु आंतून बाजीरावाची कपटव्यूहरचना अगदीं जारीनें चालली होती. शिंदे, होळकर, नागपूरकर भोंसले, अमीरखान पठाण आणि पेंढारी, ह्या साऱ्यांनीं एकदम इंग्रजांवर उठावें ह्मणून त्यांच्याशीं बोलणीं लाऊन त्याची खटपट चालली

होती. इकडे त्रिंबकजीला पुष्कळ पैसा पोहोंचत होता आणि तो मुलखांत जागजागीं फौज जमा करीत होता. इंग्रजांना ती फौज उमगली तर ते बंडखोर किंवा पेंढारी आहेत असें दिसावें अशी त्यानें तजवीज ठेविली होती. परंतु एल्फिन्स्टन मोठा धूर्त, खरा मुत्सद्दी, त्याच्यापुढें बाजीरावाचें आणि त्रिंबकजीचें शहाणपण कितीसें चालणार होतें! प्रथम थोडे दिवस त्याला कांहीं नीटशी बातमी लागत नव्हती, परंतु मग अगदीं इत्थंभूत, कोठें काय चाललें आहे तें कळूं लागलें. क्याप्टन ब्रिग्ज त्याच्या हाताखालीं होता त्यानें असें लिहिलें आहे.–

माझी नेमणूक एल्फिन्स्टनसाहेबाच्या हाताखालीं सन १८१६च्या अवेलीस झाली. मला इकडच्या भाषा चांगल्या येतात असें पाहून थोड्याच दिवसांत त्यानें मला भाषांतराचें काम सांगितलें. शिंदे, होळकर वगैरे परदरबारीं त्यानें जे बातमीदार ठेविले होते त्यांजकडून त्यावेळीं पुष्कळ अखबारा, बातमीपत्रें, येत, त्यांचें मी भाषांतर करीं. एल्फिन्स्टन पूर्वी नागपुरास रेसिडेंट होता, तेव्हां त्याची कारभारी मंडळीशीं ओळख झालेली होती व कोणाची चालचलणूक कशी आहे व कोणाचा कोणाशीं संबंध कसा आहे हें त्याला चांगलें कळलें होतें. मी सांगतो आहें ह्यावेळीं ह्या राजांच्या मुख्य मुख्य शहरीं आमचें टपाल बसलेलें असून सुरळीत चाललें होतें. तें सारें खातें आमच्या पुण्याच्या पोष्टमास्तराच्या ताब्यांत असल्यानें त्यांच्याकडून जें लिहून येई तें बहुतांशीं खरें मानण्याला कांहीं प्रत्यवाय नसे; आणि त्याचें प्रत्यंतर पाहण्याला आह्मी केव्हां केव्हां आपला एक खात्रीचा विश्वासू माणूस त्यांना पगार वांटण्याला ह्मणून एकेका बाजूस पाठवीत असूं. तो इत्थंभूत खरी हकीगत कळवी. बाजीरावाचीं जीं परदरबारीं पत्रें जात तीं नेणारे उंटावरचे हरकारे किंवा मुजरत सोडलेले पायचे जासूद असत; त्यांच्या हातांत लहान लहान बरच्या असत; त्यांच्या निरनिराळ्या रंगांवरून कोण कोणत्या दरबारचा हें ओळखत असे. वाटेनें त्यांना कोठें कांहीं मदत हवी लागली तर ती मिळवण्याला ती त्यांची खूण असे. बर्ची ही जासुदाच्या पेहेरावापैकींच, त्याची निशाणी असे, परंतु तिच्या रंगावरून तो कोणाचा हें निरनिराळ्या दरबारच्या अम्मलदारांना मात्र ओळखे. कारण प्रत्येक दरबारचा रंग ठरलेला होता. संस्थानी, जहागिरी मुलखांतील शहरांतल्या सावकार लोकांच्या जासुदाजवळसुद्धां तसल्याच बरच्या असत परंतु त्या साऱ्यांचा रंग बहुधा एक असे.

आमच्या टपालाच्या ठाण्यावरून जाणारा परदरबारचा कोणी जासूद पुण्यांत शिरला कीं आह्मांला त्याची तत्काळ वर्दी पोहोंचे. कोठचा कोण केव्हां येतो तें आह्मांला टपून बसून पहावयास सांपडे आणि तसेंच पेशव्याकडून कोण कोठें गेला तेंही कळे. ”

पेशव्यांचे परदरबारांमध्यें जे गुप्त व्यवहार चालत त्यांची इंग्रजांना याप्रमाणें जेव्हांच्या तेव्हां बातमी लागे. त्यांचे गुप्त हेर फिरत असत, त्यांच्याकडून कळे तें निराळेंच. बाजीरावसाहेबही बातम्या काढण्याच्या खटपटींत असत आणि पुष्कळ पैसा खर्चीत; परंतु तो उलटा त्यांना बाधक होत होता, तें मात्र त्यांच्या ध्यानांत आलें नाहीं. ब्रिग्जसाहेबानें असें लिहिलें आहे:–सारें मराठेमंडळ एक करून इंग्रजांवर उठावें असा बाजीरावाचा बेत होता. त्याचीं कारस्थानें गुप्तपणें चाललीं होतीं; परंतु तीं एल्फिन्स्टनसाहेबाच्या नजरेस आल्यावांचून राहिलीं नाहींत. बाजीरावाच्या मनांत तीही धुगधुग होती. मी जें करतों आहें तें एल्फिन्स्टनसाहेबाला कितपत कळतें आणि त्याचे बेत काय आहेत ते आपल्याला कळावे ह्मणून रेसिडेन्सींतील जितकीं माणसें वळवावयाला सांपडतील तितकीं तो वळवावयास झटत होता; तो त्यांना पुष्कळ मोठमोठीं वचनें देई आणि लांचही देई. डॉक्टर जेफ्रिस एल्फिन्स्टनसाहेबाबरोबर रोज तासभर ग्रीक वाचीत असे. तो इतर स्नेह्यांपैकींच एक होता, परंतु तो त्याच्या विश्वासांतला, त्याच्याशीं गुप्त गोष्टी चालत असाव्या, असें बाजीरावाला वाटत होतें आणि त्याला आपल्या कुटुंबांतल्या मनुष्यांना औषध देण्याला पाठवावें असें सांगून पाठवून तो बोलाऊन नेई. तो त्याचें आगतस्वागत फार करी, त्याच्यावर प्रेम दाखवी आणि इंग्रजांशीं आपलें सख्य आहे, आपण अगदीं इमानानें वागणार इत्यादि जें बोले तें सारें त्याला खरें वाटे. त्यानें त्याला असें भारून टाकलें होतें कीं, प्रत्यक्ष लढाई सुरू होईपर्यंत त्याचा तो भ्रम गेला नाहीं. तैनाती ( Contingent ) फौजेवरच्या एका अम्मलदाराला असाच भ्रम पडला होता. बाजीराव आमच्यावर कधीं उठणार नाहीं असें तो अगदीं शेवटपर्यंत ह्मणत असे. त्रिंबकजी कोठें आहे आणि काय करीत आहे ती बातमी काढण्याकरितां ह्मणून बाजीरावानें त्याला दोन लाख रुपये दिले होते. एल्फिन्स्टनसाहेबाला तें कळलें, तेव्हां त्यानें त्याचा जाब घेऊन जेवढी रक्कम शिल्लक होती तेवढी तिजोरीस जमा करविली. आपल्या जवळच्या कोणत्या कोणत्या माणसांना बाजीरावाकडून पैसा पोहोंचत आहे हें एल्फिन्स्टनसाहेबाला

कळत होतें, परंतु तें दिसूं न देतां उलट त्यांच्याच द्वारानें तो त्याच्याकडची सारी बातमी काढीत होता; ती येथपर्यंत कीं, श्रीमंतांनीं आज काय खाल्लें याची वर्दी त्याला असे. ”

त्रिंबकजीचा शोध लावून तो काय काय करतो आहे, बाजीरावाचें त्याला साहाय्य कितपत आहे वगैरे बातमी काढण्याची एल्फिन्स्टन साहेबाची खटपट चालली होती ती लौकरच सफळ होऊं लागून त्रिंबकजीच्या नांवावर बाजीराव लढाईच्या तयारीस लागले आहेत अशी त्याची खात्री होऊं लागली. प्रथम जानेवारींत त्याला असें समजलें कीं त्रिंबकजी फलटणापासून पंढरपुरापर्यंत आसपासच्या मुलखांत असतो. पुढें असें कळलें कीं नरशिंगपूर येथें कांहीं बंडखोर लोक जमूं लागले आहेत. तेथच्या बातमीदारानें शंभुमहादेव, पुरंदर, मैमनगड, शिरसतवाडी, नातेपोतें, बुरूड वगैरे ठिकाणीं मिळून शंभुमहादेव आणि मैमनगड यांच्या दरम्यान १८०० लोक जमले आहेत, ते सारे पायचे असून बहुतेक मांग व रामोशी आहेत असें तारीख २९ जानेवारी रोजीं कळविलें ते सारे त्रिंबकजीच्या हाताखालीं आहेत असें लोक बोलतात असें ही त्यानें लिहिलें होतें, परंतु तें एल्फिन्स्टन साहेबाला प्रथम खरें वाटेना. त्रिंबकजी असे लोक कशाला जमवील ही त्याला शंका आली.

पुढें तारीख १८ फेब्रुवारी रोजीं त्या बातमीदारानें असें कळविलें कीं, दहावीस दहावीस अशा स्वारांच्या टोळ्या चोहींकडून येऊन शंभु महादेवाकडे जात आहेत. त्रिंबकजीचे हेर मुलूखभर हिंडत आहेत. बंडखोरांच्या तयारीविषयीं जर कोणी तोंडांतून ब्र काढला तर त्याची दशा अशी उडवतात कीं, ती पहाणाराचा थरकांप होऊन जातो. एका सरदाराला आपले स्वार घेऊन ये, अमुक पगार मिळेल असें पत्र गेलें होतें त्याची त्या बातमीदारानें ता. १९ रोजीं नक्कल पाठविली आणि अशीं पत्रें पुष्कळांना गेलीं आहेत असें लिहिलें. ता. २२ रोजीं त्यानें असें लिहिलें कीं, ह्या बंडाविषयीं गोष्टी बोलण्याला किंवा त्रिंबकजी याचा मुख्य आहे असें ह्मणण्याला आतां कोणाला दिक्कत वाटत नाहीं. त्याचा जो काय बेत ठरला आहे, त्याप्रमाणें करण्याचा दिवस तारीख १८ मार्च ठरला आहे.

एल्फिन्स्टनसाहेबाचे पुण्यांत बातमीदार पसरले होते. त्यांच्याकडूनही त्याला फेब्रुवारीच्या अवलीस वरच्यासारखेंच ऐकूं येऊं लागलें. त्यानें शंभुमहादेवाच्या दर्शनाला ह्मणून दोहींकडून दोन ब्राह्मण पाठविले होते, ते १५

तारखेच्या सुमारास तसेंच सांगत आले. जेऊरच्या बातमीदारानें तारीख १७ रोजीं असें लिहिलें कीं, त्रिंबकजी बुरूड येथें स्वार जमवीत आहे. महादेवाजवळ १५०० जमले आहेत. तो फार सावध असून त्याच्या आणि त्याच्या सोबत्यांच्यामधून जाणें फार जिवावरचें आहे, असें साऱ्यांच्याच सांगण्यांत होतें.

तारीख २४ रोजीं इंग्रजसरकाराशीं बरेच दिवस संबंध असलेला एक भला मनुष्य एका मराठ्याला एल्फिन्स्टनसाहेबाकडे घेऊन गेला. त्यानें सांगितलें, मी वीस स्वारांनिशीं त्रिंबकजीजवळ नोकरीस राहिलों आहें. तो स्वार वगैरे सोडून जंगलांत एकटा असतो. त्याच्या रक्षणाला ५०० रामोशी आहेत, ते त्याच्यापासून थोडे दूर असतात. त्यानें दोनतीन हजार स्वार जमविले आहेत, ते आसपासच्या गांवांतून आहेत. त्यांवर हुकूम त्याचा सासरा रविराव शिंदा याचा. आणखी पुष्कळ लोक चाकरीस राहिले आहेत, परंतु ते तूर्त आपआपल्या गांवीं आहेत. त्रिंबकजीनें मला थोडा पैसा आगाऊ दिला आहे आणि होळी झाल्यावर घोडा वाईट बरा असेल त्याप्रमाणें दरएकास चाळीसपासून पन्नास रुपयेपर्यंत दरमहा, असा दोन महिन्यांचा पगार देईन असें सांगितलें आहे.

तारीख २५ रोजीं एका गृहस्थानें एक स्वार एल्फिन्स्टन साहेबाला नेऊन भेटविला. तो पेशव्यांचा नोकर असून सध्यां त्रिंबकजीच्या दिमतीस होता. तो चांगला हुशार मनुष्य होता. त्यानें वरच्यासारखी माहिती सांगून सध्याची स्थिति आणि त्रिंबकजीचे पुढचे बेत काय असावे तेंही सांगितलें. त्रिंबकजीच्या मागच्या साऱ्या कृत्यांची त्याला चांगली माहिती असल्यानें त्याचें ह्मणणें एल्फिन्स्टन साहेबाला खरें वाटलें. तो ह्मणाला, त्रिंबकजी आज दोन महिने फलटण आणि शंभूमहादेव यांच्या आसपास असतो. त्याच्याजवळ ३००० स्वार आणि ३०० शिपाई आहेत; पुण्याशीं त्यांचा नेहमीं संबंध आहे, सारी अगदीं तथ्य बातमी त्याला कळत असते; पेंढाऱ्यांकडचा एक वकील आला होता; बाजीरावाचें आणि त्याचें सूत्र अगदीं एक आहे. त्यांनीं हिंदुस्थानांत पुष्कळ ठिकाणीं खटपट चालविली आहे. त्रिंबकजी तारीख १५ मार्चच्या सुमारास उघडपणें बाहेर पडणार आहे.

आणखी स्वार जमत असल्याच्या बातम्या येतच होत्या. तारीख २ मार्च रोजीं नरसिंगपूरच्या बातमीदारानें लिहिलें कालरात्रीं पंढरपुराहून अमुक अमुक असामींकडून त्रिंबकजीकडे २१३००० रुपये आले. तारीख ३ रोजीं

महादेवाजवळून एका ब्राह्मणानें येऊन एल्फिन्स्टन साहेबाला सांगितलें, आपा देसायाचा एक विश्वासु मनुष्य त्रिंबकजीकडे येऊन भेटला.

तारीख ५ रोजीं एक जहागीरदार एल्फिन्स्टन साहेबाला जाऊन भेटला. तो पहिला चांगला होता, परंतु अलीकडे त्याची जहागीर गेली होती. तो ह्मणाला, त्रिंबकजी मला पुष्कळ स्वार घेऊन चाकरीस ये असें सांगत आहे. मी तुह्माला त्याची बातमी सांगतो आणि त्याला धरीत असाल तर मदत करितों.

निरातीरच्या एका गावांतला एक शेतकरी ह्मणाला, आमच्या गांवांत स्वार जमले आहेत आणि आसपासच्या गांवांतूनही जमत आहेत. एल्फिन्स्टन-साहेबानें त्याच्याबरोबर एक हरकारा पाठविला; त्याला त्यानें ते गांवाबाहेर असलेले दाखविले. रात्रीं गुप्तपणें स्वारांच्या टोळया जात असलेल्याही दाखविल्या. तारीख १८ मार्च रोजीं बंडाचा झेंडा उभारावयाचा अशी बातमी चोहींकडे असल्याचेही त्याला ऐकूं आलें.

सांगली, पुसेसांवळी वगैरेकडूनही एल्फिन्स्टनसाहेबाला बातमी लागली कीं, शंभुमहादेवाकडे त्रिंबकजीजवळ फौज जमत आहे.

तारिख ७ रोजीं एका सराफाकडे एक मनुष्य कांहीं होन मोडण्यास घेऊन आला. त्याच्याजवळ बोलत बोलत त्यानें बातमी काढली. तींत एक पठाण सरदार त्रिंबकजीजवळ नोकरीस राहिला आहे, त्यानें हे मोडावयास पाठविले आहेत असें कळलें. तें त्यानें एल्फिन्स्टन साहेबास कळविलें. त्याला आणखी पुष्कळ लोकांकडूनही असें कळलें कीं, त्रिंबकजीजवळ सारें नाणें सोन्याचें आहे आणि फलटणापासून तहत भीमेपर्यंत तें मोडून रुपये करण्याची खटपट जिकडे तिकडे चालली आहे.

याप्रमाणें एल्फिन्स्टन साहेबाला त्रिंबकजीच्या गुप्त तयारीची सारी बातमी लागूं लागली, तेव्हां त्यानें बाजीरावाच्या कारभाऱ्याला सांगितलें, शंभुमहादेवाच्या आसपास फौज जमत आहे ती पेशवेसरकारच्या हुकमानें कीं काय तें मला सांगा. तो ती हुकमानें जमत नाहीं एवढें बोलून राहिला नाहीं; तेथें मुळीं फौजच नाहीं ह्मणाला. पेशव्यांची फौज नव्हे, तर ते लोक बंडखोर असावे असें मानणें भाग आहे असें ह्मणून एल्फिन्स्टन साहेबानें त्याला ते नातेंपोतें वगैरे कोठें कोठें होते तें सांगितलें आणि ह्मटलें ह्या टोळ्या लौकर मोडून टाकण्याचा उद्योग करा. तेव्हां त्याच्या समजुतीकरितां म्हणून बापू

गोखल्याच्या हाताखालील थोडेसे लोक रवाना झाले. ते बंडवाल्यांमध्येंच जाऊन स्वस्थ बसले आणि आम्हाला कोठें कोणी बंडखोर दिसत नाहीं ह्मणूं लागले. बाजीराव साहेब त्रिंबकजीची आपल्याला कांहीं माहिती लागत नाहीं आणि बंडाची ही कोठें कांहीं वार्ता ऐकूं येत नाहीं असेंच ह्मणत होते; आणि एल्फिन्स्टन साहेबाला त्यांनीं सांगून पाठविलें कीं तुह्माला जर उगाच भल-भलत्या अफवा खऱ्या वाटत असल्या तर बंडखोर कोठें आहेत तें पाहून तुह्मी त्यांचा पाहिजे तसा समाचार घ्या. तेव्हां श्रीमंत त्रिंबकजीला सामील आहेत अशी एल्फिन्स्टन साहेबाची पुरी खात्री झाली.

तारीख ३ नवंबर रोजीं बाजीरावानें एल्फिन्स्टनसाहेबाला गुप्तपणें असा निरोप पाठविला होता कीं आह्मी कांहीं दिवस पुणें शहर सोडून बाहेर जाणार आहों, तेव्हां मागें मुलखांत स्वस्थता असावी अशी आमची इच्छा आहे. परंतु त्रिंबकजीची जर समजूत केली नाहीं तर तो बहुत करून दंगा-धोपा करील. याजकरितां इंग्रज सरकारच्या तर्फेनें ह्मणून त्याला कांहीं अटी सांगाव्या असें आमच्या मनांत आलें आहे. त्याप्रमाणें तो वागेल ह्मणण्याची आह्मी खात्री सांगतों. हा निरोप ह्मणजे धमकावणी असावी, निदान त्रिंब-कजी बंड करील असें कानीं आलें असतां इंग्रजसरकारची चित्तवृत्ति कशी होते तें पहावें हा बेत असावा असा त्याचा अर्थ करून एल्फिन्स्टन साहेबानें उलट उत्तर गुप्तपणें व प्रसिद्धपणेंही असें पाठविलें कीं तुमच्या साहाय्या-वांचून त्रिंबकजीची बंड करण्याची छाती नाहीं; याजकरितां त्याणें बंड केलें तर त्याचा जाबसाल आपल्याला द्यावा लागेल; आणि आपण तहनाम्याविरुद्ध आमच्या सरकाराशीं बेमानपणानें वागूं लागलां असें नजरेस येऊन तसा पुरावा दिसला तर आपला सर्वस्वीं नाश होईल, येवढें ध्यानांत असावें. ह्या खरमरीत उत्तरानें ह्मटलें असतां बाजीरावाचे डोळे उघडावयाला पाहिजे होते, परंतु बुडत्याचा पाय खोलांत ह्मणतात त्याप्रमाणें त्याची दिवसें दिवस स्थिति होत चालली. त्याचा नित्यक्रम सुटला. गुहागर व कोपरगांव येथें स्वारी वर्षास जावयाची तें राहिलें. एक त्रिंबकजीचें ध्यान लागलें. पुण्यापासून १७ मैलांच्या आंतच फुलशहर येथें विनाकारण मुक्काम झाला. तेथून भास्कर-पंत त्रिंबकजीकडे जाईयेई व त्याचीही तेथें भेट झाली. तो बरोबर पुष्कळ स्वार घेऊन आला होता आणि ते गांवाभोंवते वेढा देऊन बसले होते. एल्फिन्स्टन साहेबाला ही सारी बातमी लागत होती.

बापू गोखल्याची बंडवाल्यांवर रवानगी झाली होती, परंतु तो कांहींएक न करतां स्वस्थ बसला होता. त्याणें तारीख २४ फेब्रुवारी रोजीं फलटणाहून पत्र पाठविलें कीं मला इकडे कोठें बंडवाले दिसत नाहींत. नातेंपोत्याच्या कमाविसदारानेंही तसेंच लिहिलें होतें. तीं दोनही पत्रें कारभाऱ्यांनीं एल्फिन्स्टनसाहेबाकडे पहावयास पाठवून दिलीं आणि "बंड नाहीं कांहीं नाहीं, उगाच कांहीं तरी बोलतां. कोठें आहे त्रिंबकजी? श्रीमंतांजवळ बोलावयाचें तें नीट विचार करून, चौकशी करून, विचार पाहून बोलावें" असें ह्मणूं लागले. तेव्हां त्यानें उत्तर केलें, "सारे लोक बंड झालें आहे असें बोलत असून तुह्मांला मात्र तें कोठें ऐकूं येत नाहीं हें मोठें आश्चर्य आहे. असो. मला करावयाचें होतें तितकें मी केलें. पुढें जें होईल त्याचे जबाबदार तुह्मी आहां."

याप्रमाणें फेब्रुवारी महिना सारा गेला. बंड बळावत चाललें. श्रीमंतांच्या व एल्फिन्स्टनसाहेबाच्या पुष्कळ भेटी झाल्या. तुमची आमची दोस्ती कायम रहावी असें ते बोलत, परंतु आंतून कृति अगदीं उलट चालली होती. ह्मणून आतां ह्या भेटी पुरे आहेत असें त्याला वाटूं लागलें. तारीख १४ फेब्रुवारीच्या रोजनाम्यांत त्याचा लेख असा आहे—"आज संध्याकाळीं त्रिंबकजीविषयीं मला पुष्कळ बातमी लागली. मला मारण्याचे बेत चालले आहेत असें अलीकडे मी ऐकतों त्याप्रमाणें आजही कानीं आलें. त्रिंबकजीला क्षमा करावी ह्मणून लालूच दाखवून, विनवणी करून प्रयत्न झाले; तशानें मी वळत नाहीं असें दिसलें तेव्हां आतां भीति घालून पहावें अशा उद्देशानें बहुत करून ही कंडी पिकली असेल. अखेर हा रंग होईल असें मला वाटतच होतें. त्याप्रमाणें वेळ आली तर मला कांहीं भ्यावयास नको. माझा जीव घेण्याचा खराच बेत झाला तर तो माझ्यानें कसा टाळवणार? मनांत तेंच घोळीत बसलें ह्मणजे रिकामा त्रास मात्र होणार, याजकरितां तिकडे मुळीं लक्षच देतां कामा नये. ऐकिलेलें मनांत येऊन माझें चित्त घटकाभर जरी अस्वस्थ झालें तरी मला त्याची लाज वाटली पाहिजे."

त्रिंबकजीची ठाण्याच्या तुरुंगांत रवानगी झाल्यापासून एल्फिन्स्टन स्वस्थ होता. आता रजा घेऊन ग्रीसदेश पहावयास जावयाचें, पांच वर्षांनीं चाकरी सोडून घरीं जावयाचें, हे बेत चालले होते; तें मागें सांगितलेंच आहे. त्यावेळीं त्याच्या मनांत नानाप्रकारचे तरंग उठत असत आणि त्यांनीं केव्हां केव्हां चित्त अस्वस्थ असे. परंतु त्रिंबकजी पळून जाऊन गडबड करूं लागला

तेव्हांपासून तें अगदीं नाहींसें झालें. मार्च महिन्यांत आरंभीं त्याच्या रोजनाम्यांत असा लेख आहे:—" आतां त्रिंबकजी आणि बाजीराव यांच्या प्रकरणीं काम पुष्कळ आहे. फौजेची व्यवस्था वगैरेही पाहिली पाहिजे. आतां मनाला कल्पनातरंगांत गुंग होण्याला अवकाश नाहीं. हें त्रिंबकजीप्रकरण कोणत्या थराला जाणार कांहीं कळत नाहीं."

त्रिंबकजीला बाजीरावाचें पूर्ण साहाय्य आहे अशी खात्री झाली तेव्हां तारीख १३ मार्चरोजीं एल्फिन्स्टन साहेबानें गव्हरनर जनरल लॉर्ड मोइरा याला सर्व हकीगतीचें एक पत्र लिहिलें. त्यांत वर सांगितलेली बातमी लिहून तो पुढें ह्मणतो:—

' त्रिंबकजी पळून जाण्याच्या आधीं पुष्कळ दिवस मराठे मुलखांत साऱ्या लोकांचें मत असें झालें होतें कीं, त्याला कैदेंत टाकलें हा आपल्याला डाग लागला आहे असें बाजीरावास वाटत आहे. ह्मणून इंग्रजांचा सूड उगवण्याकरितां आपलें अंग दिसूं न देतां तो बंड माजवील. चांगले लोक असें ह्मणतात कीं, त्याला मुक्त करून पुनः पूर्वपदारूढ करण्याकरितां तो अनेक खटपटी करील, आर्जवें करील, लोभ, लालूच दाखवील; तीं फुकट गेलीं तर भय दाखवील; त्यानें कांहीं झालें नाहीं, तर इंग्रजांनीं कंटाळून तरी आपल्या मनाप्रमाणें करावें ह्मणून गुप्तपणें बंडावा माजवील.'

' बाजीरावाला मीं अनेक वेळ बजाऊन सांगितलें असतां तो बंडास फूस देतच आहे, तेव्हां मला असें वाटतें कीं, तो हें समजून उमजून आरंभिलेलें कृत्य सहज सोडणार नाही. त्याच्या राज्यांत मध्यभागीं व दक्षिणेकडेही त्रिंबकजीला मिळण्याकरितां फौज तयार होत आहे. वऱ्हाडांत व खानदेशांत त्याचे अम्मलदार फौज जमवीत आहेत. यशवंतराव जिवाजी ह्मणून एक मोठा लुटारू नाईक महाराष्ट्राला पूर्वीं फार उपद्रव देत होता, त्याच्याशीं बाजीरावानें संधान बांधलें आहे असें मी कांहीं महिन्यांपूर्वीं ऐकिलें, परंतु मला तें खरें वाटेना; कारण यशवंतराव कधींच मेला असें मी समजत होतों. परंतु आतां असें कळतें कीं, तो खानदेशांत पुष्कळ लोक जमवून बसला आहे, आणि आतां हालण्याचे तयारींत आहे. बाजीरावाची किल्ल्यांची डागडुजी कधींच अगदीं बंद नसे; परंतु अलीकडे तें काम फार जारीनें चाललें आहे. त्याचें गायकवाडाकडे चाललेलें बोलणें व शिंदे होळकरांच्या दरबारीं चाललेल्या खटपटी आपल्यास कळल्याच आहेत. चोळीमहेश्वर अगर उज्जनी

येथें येथून ३०००० रुपये गुप्तपणें चालले होते ते घाटांत आमच्या चौकीदारांनीं धरले. अमरचंद वगैरे पांच मोठमोठ्या मारवाड्यांच्या नांवाने बाजीरावाने कितीएक लाख रुपये हिंदुस्थानांत रवाना केले आहेत.

हें बंड पेशवे सरकारास व कंपनी सरकारास सारखेंच अपायकारक आहे व तें पेशवे खचित मोडतील असें तारीख २४ फेब्रुआरीपर्यंत मी समजत होतो; परंतु कारभाऱ्यांनीं गोखल्याचें पत्र माझ्या तोंडावर टाकले, तेव्हांपासून माझी ग्रह निराळा होऊन त्यांना योग्य तसें मी उत्तर दिलें. तारीख २ मार्च रोजीं मी बाजीरावाला असा निरोप पाठविला कीं, आपल्या चालू कृतीला काय ह्मणावें आणि आपला हेतु काय आहे तें स्पष्ट कळवा. सर्व लोक बंड झालें आहे असें ह्मणत असून आपण नाहीं ह्मणतां, तस्मात् इंग्रज सरकाराशीं उघड व सलोख्यानें बोलावयाचें नाहीं, असा आपला निश्चय झाला आहे असें मी समजेन.'

'मला सारी बातमी आहे असें बाजीरावाला वाटलें तेव्हां त्यानें बंड झालें आहे असें कबूल केलें; परंतु "त्याला मी काय करूं ? त्रिंबकजी कोठें आहे मला माहीत नाहीं. इंग्रजसरकराशीं अगदीं स्नेहानें वागावें अशी माझी इच्छा आहे आणि मी तसा वागत आहे. परंतु तुमची खात्री कशी होणार ? तें माझ्या स्वाधीन नाहीं;" असें ह्मटलें. तेव्हां तारीख ४ रोजीं मी ह्मणालों त्रिंबकजीचीं माणसें धरून आह्मांकडे ओलीस द्या. पुढें तारीख ७ रोजीं त्याला एक नीट विचार करण्यासारखें लांब पत्र लिहिलें. त्यांत असें ह्मटलें होतें—हल्लीं आपला चालू असलेलाच क्रम पुढे चालेल तर इंग्रजसरकारचा व आपला सलोखा राहणें अशक्य आहे; ह्या तंट्याचा परिणाम घातक होईल. त्रिंबकजीला आपण मदत करून कांहीं उपयोग नाहीं. तो आह्माला जिंकील असें खचित कधीं कोणी मनांतसुद्धां आणावयाला नको. त्याच्याशीं तुह्माला करार करतां येणार नाहीं. तो पुन: आमच्या तुरुंगांत येऊन पडेपर्यंत त्याच्या जिवाला अपाय होणार नाहीं असा करार आपल्याशीं होणें अशक्य आहे. हें बंड आपोआप नाहींसें झालें तरी आपलें मन आमच्याशीं शुद्ध आहे अशी लाटसाहेबांची खात्री करून देणें कठीण आहे; आपण जें बोलतां तें खरें, मनापासून आहे, असें दाखविणें असेल तर त्याप्रमाणें आचरण ठेवणें हाच शहाणपणाचा मार्ग आहे. तसें झालें ह्मणजे त्रिंबकजी सांपडण्याला कांहीं उशीर लागणार नाहीं."

'यावर बाजीरावानें मला पुनः पहिल्यासारखेंच उत्तर दिलें. "फौज तुमच्या स्वाधीन करतों, तिला जेथें बंडवाले आहेत असें वाटेल तेथें पाठवा. अमूक असामी त्रिंबकजीला सामील आहे असें ह्मणाल तर त्याला धरतों;" असें ह्मटलें. तेव्हां तारीख ९ रोजीं मी असा निरोप पाठविला कीं, आमच्या थोड्याशा फौजेनें बंड मोडणें होणार नाहीं आणि तो माझा तादृश हेतुही नाहीं. माझा मुख्य हेतु इतकाच आहे कीं, आपलें मन आमच्याशीं निर्मळ आहे कीं नाहीं, इतर कशाही प्रसगीं आपल्यावर विश्वास कितपत ठेवावा, हें पाहून ठेवावें. आपल्या मनांत असलें तर बंडवाले आणि त्रिंबकजीचे साथीदार आपल्याला सांपडणें कठीण नाहीं.' मग त्यानें मला सांगून पाठविलें कीं, ते लोक धरतो. त्यानें मेजर फोर्ड यास बंडवाल्यांवर जाण्यास हुकूम केला. परंतु मी तो जावयास नको असें सांगितलें. कारण बंडवाल्यांत जातीचा जोर कांहीं नाहीं; आंतून फूस असल्यानें बाऊ झाला आहे. आतां मला अशी बातमी लागते कीं, शंभुमहादेवचे व त्याच्या आसपासचे स्वार नाहींसे होऊं लागले आहेत."

'काल प्रभाकर पंडिताबरोबर मला लांबच लांब निरोप आला; त्यांत हांशील इतकेंच कीं, तुम्ही माझ्याविषयीं संशय घेतां तो निराधार आहे. इंग्रजांबरोबर लढाईला उठावें किंवा त्यांच्यापेक्षां त्रिंबकजीच्या स्नेहाची किंमत अधिक मानावी इतका मी मूर्ख नाहीं. माझ्या निरोपांतल्या एका वाक्याचा त्यानें आपल्याला फार राग आलासें दाखवून म्हटलें, टिपूसुलतानासारखी माझी दशा उडविण्याची मला भीति दाखवितां होय? परंतु मी तसलें मुळींच कांहीं म्हटलें नव्हतें, ह्मणून त्याचें निराकरण तेव्हांच केलें. त्याच्या मनाचा माझ्याविषयीं कांहीं विपरीत ग्रह झाला असेल तर तो दूर व्हावा ह्मणून मी असें सांगितलें कीं, आपल्याशीं स्पष्ट बोलणें हा माझा धर्म आहे. मी जरी आपला दिवाण असतों तरी आपली खरी स्थिति कशी आहे ती उघड करून सांगितली असती. त्यापासून आपल्याला कितीही राग आला तरी फिकीर नाहीं म्हटलें असतें. आपल्या मर्जीप्रमाणें बोलून किंवा आपल्याशीं कपट करून, आपला ज्यांत नाश त्या मार्गास लागण्यास आपल्यास उत्तेजन दिलें नसतें. असें केलें असतें तरच आपली खरी सेवा केली असें समजलों असतों. इत्यादि. त्रिंबकजीला आश्रय द्याल तर परिणाम वाईट होईल असें मी आज चार महिने सांगतों आहें त्याचें स्मरण करा, असेंही सांगितलें."

१४-१५४-२०००.

' आपा देसायाच्या वकिलाची बाजीराव केव्हां केव्हां गुप्तपणें भेट घेतो, हें मागें सांगावयाचें राहिलें. आतां पुढें श्रीमंत कोणता मार्ग स्वीकारतात हें थोडे दिवस पहात रहातों, आणि बंड मोडण्याची त्यांनीं जर नीट तजवीज केली नाहीं तर मी आपली फौज पाठवितों. परांड्याजवळ स्वारांचीं दोन पलटणें आणि अहमदनगराजवळ एक पलटण पाठविण्यास मी कर्नल स्मिथ यांस लिहिलें आहे. तसेंच तुळजापुराजवळ एक पलटण पाठविण्यास हैदराबादच्या रेसिडेंटास लिहिलें आहे, त्याप्रमाणें तीं नेमल्या जागीं तीनचार दिवसांत जातील. "

याप्रमाणें गव्हर्नरजनरलास पत्र पाठवून एल्फिन्स्टन त्याचा हुकूम येण्याची वाट पहात बसला. तुह्मी बंडवाल्यांना फूस देत आहां, इंग्रजसरकारला अगदीं अनिष्ट अशा प्रकारें वागण्याचा तुमचा संकल्प झालेला दिसतो, परंतु हें बरें नव्हे, याचा परिणाम फार वाईट होईल; असें तो पुनः पुनः सांगून पाठवीत होता, परंतु तिकडे मुळींच लक्ष न देतां बाजीराव फौज जमा करूं लागला. कारभारी मडळीच्या भाषणांत उद्धटपणा दिसूं लागला. तुमच्या मनांत स्वस्थ रहावयाचें आहे अगर लढाईचा बेत आहे ते कळूं द्या असें ते त्याला विचारूं लागले. तेव्हां त्यानें कर्नल स्मिथ यास पलटण घेऊन पुण्यास येण्यास सांगून पाठविले आणि त्याला बोलाविल्याचें बाजीरावास कळविलें. साऱ्या गोष्टींचा नीट विचार करून पहातां त्याला असें वाटले कीं, आतां गोष्ट निकरावर आणलीच पाहिजे. कारण बंडवाले खानदेशांत बळावत चालले; एक किल्ला त्यांच्या हातीं लागला; बाजीरावाचें किल्लेकोटांची दागदुजी करण्याचें व फौज ठेवण्याचें काम जारीनें चाललें; पर्जन्यकाळ जवळ येत चालला; तो लागून बाजीराव एकाद्या बिकट डोंगरी किल्ल्यावर जाऊन बसला आणि 'लढाई सुरू' ह्मणाला ह्मणजे ती थोडक्यांत आटोपणार नाहीं; कदाचित् मराठे सरदारांना आवेश येऊन सारे उठून त्याला मिळतील. याच संधीस दुसरी गोष्ट अशी झाली कीं, कटक प्रांतांत दंगेधोपे होऊन कलकत्त्याचें टपाल बंद झालें; त्यामुळें गव्हरनरजनरलाचा हुकूम केव्हां येईल याचा नेम लागेना. परंतु एल्फिन्स्टनसाहेबाच्या सुदैवानें त्याच्या सेक्रेटरीचें खासगीपत्र त्याला पोहोंचलें. त्यांत असे लिहिलें होतें कीं, पेशव्याकडून आतां कोणत्याही प्रकारचे ठराव करून घेणें झालें तरी आधीं त्रिंबकजीस स्वाधीन केलें पाहिजे ही पहिली अट असणारच. इतकी सूचना मिळतांच त्याला जोर

येऊन तो पुढच्या तयारीस लागला. त्यानें बाजीरावाला सांगून पाठविलें कीं, त्रिंबकजीला धरून आमच्या स्वाधीन करा, बंड मोडा, फौज जमवीत आहां तिला फांटा द्या, आणि किल्ल्यांची दुरुस्ती चालविलेली बंद करा. आह्मी गव्हरनरजनरलाकडे सारें लिहून पाठविलें आहे. त्यांजकडून हुकूम येईल त्याप्रमाणें आणखी काय काय केलें पाहिजे तें मागाहून सांगूं.

बाजीरावानें ह्याही निरोप जुमानला नाहीं, केवळ लढाईचा घाट घातला. याप्रमाणें मार्च महिना गेला. तारीख २८ चा एल्फिन्स्टनसाहेबाचा लेख असा आहे—"काल अगदीं लढाईचा रंग दिसत होता. आज ताळ्यावर आल्यासारखें दिसतें." पुन: तारीख ३१ चा लेख असा आहे—"काल बाजीरावानें शरण येऊन फौजेस फांटा देतों, ठाणीं उठवतों, आणि गव्हरनर जनरलाचें काय लिहून येतें पहातो असें कबूल केलें. मी सांगितलें तुह्मी बंड मोडण्याची खटपट ज्या मानानें खरी कराल त्या मानानें त्यांचा निकाल सौम्य अगर कडक असेल. श्रीमंतांचें भाषण खरें मनापासून आहे असें मला फारसें वाटत नाहीं. मनापासूनचें असलें तरी देखील कदाचित दंगा होईल."

हा संशय दुसऱ्याच दिवशीं खरा होण्याची वेळ आली. तारीख ३१ च्या प्रसंगाचें वर्णन लेफ्टनंट जनरल ब्रिग्जसाहेबानें केलें आहे तें पुढें देतों. त्यावरून एल्फिन्स्टन साहेबाचे धैर्य, स्थैर्य, विचारीपणा, वगैरे गुण कसे होते तेंही चांगलें दिसून येईल. ब्रिग्ज ह्मणतो:–

फौज शहरांत भरत आहे अशी बातमी असल्यामुळें दिवस काळजींत गेला. पुढें मला असें कळले कीं तोफखान्याकडील बैल आणण्याला हुकूम गेला होता त्याप्रमाणें ते आले, तास झाला. तोफा बाहेर ओढल्या आहेत. रस्ते स्वारांनीं भरून गेले आहेत, आणि पेशवे साहेबांनीं सरदार मंडळीस बोलाऊन दरबार भरला आहे, आतां लढाई सुरू करण्याची वाटाघाट चालली आहे. मी तसाच उठून ते वृत्त एल्फिन्स्टनसाहेबास कळवावयास गेलों. तो एका मोठ्या तंबूंत गंजिफानी खेळत बसला होता. मंडळी बरीच होती, त्ींत कांहीं मडमाही होत्या. मला त्याणें पाहिलें आणि कांहीं तरी विशेष जरुरीचें बोलण्याकरितां आलों आहें हेंही चर्येवरून ओळखिलें. परंतु रोजच्या सारखा स्वस्थपणें डाव चालविला. तो अर्ध्यातासानें आटपून सारी मंडळी गेली. साऱ्या मडमांनां म्यान्यांत बसवून रवाना केल्यावर तो हात चोळीत मजकडे आला आणि ह्मणाला "हां, काय आहे?" मी ऐकिलेलें सांगितलें, तें

त्यानें अगदीं स्वस्थ चित्तानें ऐकून घेतलें आणि कचेरीची वाट धरली. तेथें तनाती (Contingent) फौजेचा अम्मलदार आलेला होता त्याला त्यानें विचारले यावेळीं बातमी काय आहे ? त्याला काय चाललें होतें तें कळलेंच नव्हतें असें दिसलें. तो ह्मणाला दिवाणाची आणि माझी ही आतां नुकतीच भेट झाली. पेशव्यांनीं नवीन ठेवलेल्या फौजेपैकीं कांहीं सोडली, आणि सारें स्वस्थ आहे असें त्यानें मला सांगितलें. एल्फिन्स्टन मला ह्मणाला तुह्मी काय तें सांगा. मी पुनः सारें सांगितलें, तेव्हां तो त्याला ह्मणाला ऐकिलेत ! तुह्मी सांगता त्यांतला एक शब्द सुद्धां मला खरा वाटत नाहीं. तो ह्मणाला “ मला खुद्द दिवाणानें सांगितले तें मी बोललों. रस्त्यांत स्वार आहेत ह्मणता, परंतु मला रोजचे गस्तीचे वगैरे असतात त्यांपेक्षां जास्त दिसले नाहींत. तोफखान्याचे बैल आलेले वगैरे मला माहीत नाहीं. ” ती वेळ मोठी कठीण दिसली. कारण रेसिडेन्सीवर हल्ला झाला असतां निभाव लागण्यासारखा नव्हता. रेसिडेंटाजवळ स्वारीच्या लव्याजम्यापुरते स्वार शिपाई असत; तेवढ्यांवर अशा प्रसंगीं संरक्षण होण्यासारखें नव्हतें. लष्करांत जाऊन तेथून पेशव्यावर एकदम हल्ला करावा असा त्या घाईंत विचार निघाला, परंतु मग तो बेत राहिला. एल्फिन्स्टन साहेबानें असा निश्चय केला कीं, सकाळपर्यंत कांहीं करावयाचें नाहीं; मग योग्य वाटेल तसा बंदोबस्त करतां येईल. ती रात्र काळजींत गेली. मला व त्यालाही फारशी झोंप लागली नाहीं. परंतु सुदैवानें त्या रात्रीं कांहीं गडबड झाली नाहीं. कारण कारभारीमंडळीपैकीं कांहीं असामी लढाई करूं नये असें ह्मणाले. बाजीराव जातीनें भित्रा, अगदीं भागूबाई होता. हें नेहेमीं दिसून येत होते आणि त्याला तें आपल्या तोंडानें बोलून दाखविण्याला लाज ही वाटत नसे. ती रात्र तशीच गेली. कोणीं कांहीं केलें नाहीं. सकाळीं एल्फिन्स्टनसाहेबानें छावणींतून कांही फौज आणि दोन तोफा आपल्या बंगल्या-जवळ आणून ठेवविल्या ”

तारीख १ एप्रिल रोजीं रेसिडेन्सीच्या संरक्षणाची तजवीज लावल्यावर एल्फिन्स्टनसाहेबानें बाजीरावाला सांगून पाठविलें कीं, तुह्मी जर फौज वाढवीत रहाल तर आह्मी तुमच्यावर हल्ला करूं; जर स्वस्थ बसाल तर गव्हरनरजनरलाकडून हुकूम काय येत आहे त्याची वाट पहात बसूं.

हा निरोप पोहोंचतांच बाजीराव घाबरले. आलीकडे बरेच दिवसांत त्यांनीं एल्फिन्स्टन साहेबाची भेट घेतली नव्हती. त्यानें भेटावयास येतों ह्मटलें

ह्मणजे कांहीं तरी निमित्त करून नको ह्मणत. परंतु आता उलटें त्याला एकदा भेटावयाला या ह्मणूं लागलें. त्यांच्या भाषणाचा रंगही लागलाच पालटला. एल्फिन्स्टन साहेबानें जनरल ब्रिग्ज याला आपल्या बरोबर नेलें होतें, त्यानें त्या भेटीची हकीगत लिहिली आहे ती अशी:—

' बाजीराव ह्मणाला माझ्या हातून अशी गोष्ट व्हावयाची नाहीं. तुह्मी भलतेंच मनांत आणूं नका, इत्यादि भाषणानें त्याणें एल्फिन्स्टन साहेबाला अगदीं पुरेपुरसें केलें. माझे ह्या गादीला पुनः पाय लागले, पुणें पुनः दृष्टीस पडलें आणि ह्या एवढ्या ऐश्वर्याचा उपभोग घडत आहे हे केवळ तुमचे उपकार; असें असतां मी तुमच्यावर शस्त्र धरीन असें कसें घडेल बरें ? माझ्या हातून असें कधीं व्हावयाचें नाहीं असें पुष्कळ बोलून त्याच्या प्रत्यंतरास त्यानें आपल्या नामर्दपणाच्या देखील गोष्टी सांगितल्या. तो ह्मणाला तोफेचा बार उडालेला नुसता ऐकला तर घाबरून जातों इतका मी जातीचा भित्रा. ह्मणून तुह्माला भेटण्याला बेटावर आलों तर तुह्मी ज्या सलामीच्या तोफा उडवता त्या मी दूर, अमूक ठिकाणीं, जाईपर्यंत उडवूं नका असें सांगतों. हें तुह्माला माहीत असतां असला हा भित्रा माणूस मोठ्या वीराचें सोंग आणून, शौर्याचा आव घालून, फौजेला हुकूम करावयाला तिच्या अघाडीस जाऊन उभा राहील असें तुमच्या मनांत येते तरी कसें ? अशा प्रकारच्या त्याच्या भाषणावर एल्फिन्स्टन साहेबानें एवढेंच उत्तर दिलें कीं तुह्मी ह्मणता हें सारें खरें दिसवें; परंतु ह्या भाषणाला आणि कृतीला मेळ दिसत नाहीं. तुह्मी लढाईची तयारी करीत आहा ह्मणण्याबद्दल मजजवळ हा हवा तितका पुरावा आहे. इतके दिवस बंड होऊन झालें आणि तें माजत चाललें आहे; ' अहो, तें लौकर मोडून टाका ' असा मी कंठशोष करतों आहें; परंतु तुह्मी तिकडे मुळीं लक्ष देत नाहीं याला काय ह्मणावें ? अशी एल्फिन्स्टन साहेबानें त्याची कानउघडणी बरीच केली, परंतु सारें व्यर्थ गेलें. त्रिंबकजीच्या कृत्यांत आपलें अंग किती आहे याची त्याला मनोमन साक्ष पटत असावी, कदाचित् कांहीं त्याचा अभिमान असावा आणि त्यांत स्वाभिमानाची भर पडून एल्फिन्स्टन साहेबाच्या ह्मणण्याप्रमाणें कांहीं करावयाचें नाहीं असा त्याच्या मनाचा निश्चय झाला. ”

बाजीरावाच्या आर्जवी, गोड आणि नम्रपणाच्या भाषणाला एल्फिन्स्टन कांहीं बधला नाहीं. त्याचा तारीख ६ एप्रिलचा लेख असा आहे—' गव्ह-

नेरजनरलाचा ठराव अमुक प्रकारचा येईल असें मी बाजीरावाला वचन देणार नाहीं. त्याची लढाईची तयारी करण्याची इच्छा असली तर 'नको,' जरा थांबा,' ह्मणणार नाहीं. तारीख ४ रोजीं सदाशिवरावभाऊ माणकेश्वराला भेटलों तेव्हां असेंच सांगितलें. त्रिंबकजीच्या प्रकरणीं जशी चित्ताची तळमळ होत होती तशी या प्रकरणांत होत नाहीं. पेशव्याबरोबर लढाई होईल तर बरें असें मला वाटतें आणि ह्मणूनच मी अगदीं निर्धास्त आहें. लॉर्ड मोइरा (ग. ज.) साहेब 'कसें करूं काय करूं' हा जप करीत बसतील कीं काय एवढी भीति वाटते. ३१ तारखेच्या दिवशीं देखील मला यत्किंचित् धास्ती वाटली नाहीं.'

'आतां कामामुळें मला ग्रीक वाचण्याला फुरसत नाहीं, तरी थोडेंसें वाचतों. ह्या गडबडीमुळें आणि उन्हाळ्यामुळें माझ्या मनांतले मागचे पुष्कळ विचार निघून गेले. ग्रीसदेशाला जावयाचें आतां मनांत येत नाहीं. खुद्द ग्रीसची आतां आठवणसुद्धां होत नाहीं"

बाजीरावाचें स्वरूप कळल्यावर आतां त्रिंबकजीचें बंड आधी मोडलें पाहिजे, उपेक्षा करून उपयोगीं नाहीं, असें एल्फिन्स्टन साहेबाला वाटलें आणि जागजागीं ठेवलेल्या फौजेला त्यानें हुकूम दिला. ४००० स्वारांच्या एका टोळीमागें प्रथम कर्नल स्मिथ लागला. ती नीरा, भीमा, गोदा व घाट उतरून पळत सुटली होती. अखेर विंचूरकर तिच्या पाठीस लागले, शेवटीं जामेदरी येथें तिचा अगदीं फडशा उडाला. ह्या टोळीनें पळतां पळतां बरींच अघोर कृत्यें केलीं. लेफ्टनंट बोर यास ठार मारिलें. तिचा उद्देश खानदेशांत गोधाजी डेंगळे यानें २००० ची एक टोळी जमविली होती, तिला जाऊन मिळण्याचा होता, परंतु तो सिद्धीस गेला नाहीं. लेफ्टनंट डेव्हिस यानें गोधाजी-च्या मागें लागून त्या टोळीची दाणादाण उडवून दिली होती.

बंडवाल्यांत जीव कितीसा होता तो कळला. परंतु त्रिंबकजी कांहीं हातीं लागला नाहीं आणि बाजीरावाची तयारी चाललीच होती; ह्मणून लढाईवर येतणार असें खास वाटत होतें. अवकाश कायतो गव्हरनरजनरलचा हुकूम येण्याचा होता. परंतु त्याची वाट न पहातां प्रसंग दिसेल त्याप्रमाणें करण्यास—बाजीरावास कैद करण्याससुद्धां—एल्फिन्स्टन सिद्ध होता. तारीख २७ एप्रीलचा त्याचा लेख असा आहे—'शहरांत जाऊन पेशव्याला कैद करण्याचा यत्न करण्याचे सर्व विचार मी सोडून दिले आहेत. कारण तसें करूं लागलों तर शहरच्या लोकांवर अनर्थ गुदरेल!

एप्रील महिना गेला तरी गव्हरनरजनरलाचें उत्तर आलें नाहीं. त्रिंबकजीला आमच्या स्वाधीन केलें पाहिजे; निदान आपल्या मुलखांत राहूं देतां कामा नये असें एल्फिन्स्टन साहेबांनें बाजीरावाला सांगितलें. परंतु त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं तेव्हां तारीख ६ मे रोजीं त्याणें पत्र पाठविलें. त्यांत असें लिहिलें होतें कीं आजपासून एक महिन्याच्या आंत त्रिंबकजीला धरून आमच्या स्वाधीन करावें व करतों ह्मणाल तर खात्री वाटण्याकरितां सिंहगड, पुरंदर आणि रायगड हे किल्ले २४ तासांच्या आंत आमच्या हवालीं करावे. असें न होईल तर लागलाच शहराला वेढा घालून लढाई सुरू होईल. इतकें झालें तरी बाजीरावाचा हेका सुटेना. एल्फिन्स्टन असा निकरावर येणार नाहीं असेंच त्याला वाटत होतें, आणि त्या रात्रीं त्याणें त्याची भेट घेतली. तीविषयीं एल्फिन्स्टन साहेबानें असें लिहिलें आहे-तारीख ७. गेल्या रात्रीं पेशव्यांची भेट झाली. ही कदाचित अखेरची असेल. ते पुष्कळ बोलले. बोलतांना त्यांचें चित्त स्वस्थ होतें, सल्ला करण्यास प्रवृत्त आणि सावध होते, परंतु त्रिंबकजीला स्वाधीन करतो असें कबूल करीनात. आतां निकराची वेळ आलेली आणि हे दगलबाज आहेत, तेव्हां कदाचित् मलाच धरून सिंहगडावर नेऊन टाकतील आणि ओलीस घेतल्यादाखल ठेवितील असें मला वाटलें. परंतु त्यांच्या मनांत तसें करण्याचा गंधही आलेला दिसला नाहीं. आज जिकडे तिकडे अगदीं सामसूम, फौज जालन्यास आणि पेशवे कोपरगांवास असल्यासारखें दिसतें आहे. बाजीरावानें जरी इतकीं दुष्कर्मे केलीं आहेत आणि तो जरी मोठा विश्वासघातकी आहे, तरी आपण होऊन गादीला मुकेल तर मला वाईट वाटेल.'

'तारीख ९.-किल्ले स्वाधीन करण्याला मुदत अगदीं थोडी ठेविलीत, चार पांच दिवसांची फुरसत द्या, असे बाजीरावाकडून रात्रीं निरोपावर निरोप आले. मग रायगड राहूंद्या, पुरंदर आणि सिंहगड, दोनच घ्या, असे आले. सकाळीं सात वाजतां जेव्हां फौज अगदीं शहराजवळ जाऊन ठेपली तेव्हां कबुलीचा जबाब आला. फौजेनें कूच करून शहराला वेढा छान घातला. मग दहा वाजतां दोन किल्ले स्वाधीन करण्याचा हुकूम आला. खरा मुख्य कायतो रायगड, त्याबद्दल हुकूम तीन वाजतां आला-तो जो कारकून घेऊन येत होता त्याची आणि स्वारांच्या तुकडीची चुकामूक पडली आणि त्याचें तट्टू लंगडें होतें त्यामुळें वेळ लागला. सिंहगड अगदीं रिकामा स्वाधीन झाला.'

त्यांतला पैका काढून नेण्याला वेळ लागला. रात्रीं पेशवे असे अगदीं पळत होते आणि मी त्यांना अडवण्याकरितां स्वार पळवण्याच्या घाईंत होतों मी सारा दिवस छावणींत काढला आणि संध्याकाळीं घरीं आलों. आता येथून पुढचा काळ निराळा लागणार, किंवा मागचें तेंच पुनः होणार आणि अखेर पेशवे बुडणार."

गव्हरनरजनरलाकडे एल्फिन्स्टनसाहेबानें तारीख १५ मार्च रोजीं पाठविलेल्या पत्राचें उत्तर त्याच्याकडून तारीख ७ एप्रिल रोजीं रवाना झालें होतें; तें तारीख १० मे रोजीं पुण्यास येऊन त्याच्या हातांत पडलें. तें त्याला वाटलें होतें त्याच्याहीपेक्षां कडक होतें. लढाईवर बेतलें ह्मणजे साऱ्याच गोष्टी जड जातात हें सर्वविश्रुतच आहे. बाजीरावानें लढाईची तयारी बहुतक उघडपणें चालविली असून एल्फिन्स्टनसाहेबाला उडवाउडवीचीं उत्तरें दिलीं; त्यानें पुष्कळ कानउघाडणी केली तरी जुमानलें नाहीं तेव्हां एकंदरींत त्याच्या वर्तनावरून पहातां त्यानें शत्रुत्व आरंभिलें असें दिसून येत होतें ह्मणून त्याला शासन करण्याचा व पुढें तो नीट वागेल असा बंदोबस्त करून घेण्याचा आह्माला हक्क प्राप्त झाला आहे हें अगदीं निर्विवाद आहे, असें इंग्रजांचें ह्मणणें होतें. गव्हरनरजनरलानें एल्फिन्स्टनसाहेबास असा हुकूम पाठविला कीं, पेशव्यांकडून नवा तहनामा करून घ्यावा. त्यांत कलमें अशा असावीं—पेशव्यांनीं परदरबाराशीं पत्रव्यवहार ठेऊं नये; असलेला एकदम बंद करावा; सर्व जाहागीरदारांना रजा द्यावी; आपण इंग्रजसरकारचे अगदीं ताबेदार आहों असें कबूल करावें; सर्व मराठे मंडळाचा धनीपणा त्यांच्याकडे उगाच नांवाला आहे तो सोडून द्यावा; त्याचा हक्क अगदीं सांगू नये आणि चाकरीच्या फौजेच्या (Subsidiory) खर्चाकरितां मुलूख तोडून द्यावा. त्रिंबकजीनें गुन्हा केला असे आपल्याला खास वाटतें, असें तहनाम्यांत अगदीं प्रथम कबुलीचें कलम असावें.

ह्या अटी खरोखर फार जबर होत्या. पेशव्यांबरोबर लढाई करून जय मिळाल्यावर तह झाला असता तरी त्यावेळीं सुद्धां याहून जबर करार करून कोणी मागितले नसते. केवळ तलवारीच्या धारेवर धरल्यावांचून एकादा स्वतंत्र राजा या करारांप्रमाणें वागेल असें कोणाही मुत्सद्याला वाटलें नसतें. बाजीरावाला पेशवाईच्या गादीवर कायम राखावयाचें आणि त्याच्याकडून असले लाजिरवाणे करार करून घ्यावयाचे ह्मणजे विसंगत होतें. त्यानें लढा-

ईला पुनः उद्युक्त होऊं नये असा चांगला पक्का बंदोबस्त केला नाहीं तर त्याचा परिणाम भयंकर झाल्यावांचून राहणार नाहीं असें वाटणें साहजिक होतें. *

रायगडसुद्धां स्वाधीन करण्याचा हुकूम हातीं पडला तेव्हां एल्फिन्स्टन साहेबानें लागलाच वेढा उठविला. पेशव्यांबरोबर पुनः सख्यसंबंध जमून तो सुरळीत चालण्याला गव्हरनर जनरलाकडून लिहून आलेले करार त्यांना फार अनुकूल आहेत असें एल्फिन्स्टन साहेबास वाटलें आणि ते मान्य करण्यास त्यानें सांगितलें. परंतु बाजीरावांस ते बरें कसे वाटावे ? वाईट वाटणें सहजच होतें. ह्मणून कबुली न देतां त्यांनीं लढाईची तयारी चालविली. ती इतकी कीं, तारीख १३ रोजीं रात्रीं खास स्वारी पुण्यांतून बाहेर पडून बंडवाल्यांस जाऊन मिळण्याची पुरी तयारी झाली, कांहीं करावयाचें राहिलें नाहीं. परंतु बाहेर पाऊल टाकण्यास धैर्य होईना आणि सारा बेत फिरला. आपली स्थिति काय आणि परिणाम होईल काय हें मनांत नीट आलें असावें. मग एल्फिन्स्टन साहेबाशीं करार केल्याप्रमाणें खरोखर वागण्याची उत्कट इच्छा दाखवून त्यांनीं त्रिंबकजीचे आप्तसंबंधी वगैरे लोक धरून कैद केले; बंडांत सामील असलेल्या कांहीं लोकांचीं घरेंदारें जप्त केलीं आणि त्रिंबकजीला सामील असलेले कांहीं लोक धरून आणणाराला बक्षीस व खुद्द त्याला, जिवंत अगर मेलेला, कसाही, जो कोणी आणून हजर करील त्याला दोन लाख रुपये रोख व दहा हजार रुपये दरसाल उत्पन्नाचा गांव इनाम देऊं असा जाहिरनामा लाविला आणि बंड मोडण्याचीही कांहीं तजवीज केली.

---

* गव्हरनर जनरलाच्या हुकमांत तीन प्रकार होते. ते असे—१ बाजीरावानें त्रिंबकजीला धरून स्वाधीन केलें किंवा धरण्याला खरा मनापासून प्रयत्न केला तर त्याच्याशीं पूर्ववत् वागावें. २ तो लढाईलाच सिद्ध झाला तर त्याला धरून कैद करावें आणि मुलखाचा बंदोबस्त करून राज्य चालविण्याची तूर्तातूर्त तजवीज लावावी. ३ ह्या दोहींपैकीं त्यानें कांहीं केलें नाहीं, स्वस्थ बसला, किंवा पुढें टाळाटाळ करूं लागला, तर त्याच्याकडून इतके करार करून घ्यावे.

सारें मध्यहिंदुस्थान रणांगण करून त्यावर सैन्य नाचविण्याची इंग्रजसरकारची तयारी चालली होती, अशा समयीं मराठेशाईच्या नामधारी अधिपतीला कैद करून त्याचें राज्य हिसकाऊन घेणें ह्मणजे मोठें साहस झालें असतें आणि तें फार जाचलें असतें असें कोलब्रूक ह्मणतो.

बाजीरावाचा हा केवळ जुलमाचा रामराम आहे, त्रिंबकजीला धरून आणावें हें कांहीं त्याच्या मनांत नाहीं, असेंच त्याच्या प्रजेला वाटत होतें; ह्मणून त्याला धरण्याच्या नादीं कोणी लागला नाहीं. परंतु इंग्रजसरकाराला कांहीं तसें ह्मणतां येईना. कराराप्रमाणें त्यानें केलें. एल्फिन्स्टन नव्या तहनाम्याचा मसुदा करूं लागला. तारीख २० रोजीं बाजीरावानें मोरदीक्षितास दिवाण नेमलें. तारीख २८ रोजीं एल्फिन्स्टन साहेबानें त्याला तो मसुदा वाचून दाखविला. मग दुसरे दिवसापासून ती वाटाघाट सुरू झाली. मसुद्यांत पहिलें कलम असें होतें कीं, त्रिंबकजीनें गंगाधर शास्त्र्याचा खून करविला खरा; सबब त्यास धरून इंग्रजसरकारच्या स्वाधीन केलें पाहिजे. तें करीपर्यंत त्याचीं बायकामुलें ओलीस द्यावीं. मग पुढचीं कलमें लागलीं, त्यांत करार असा कीं, कोणत्याही परदरबाराशीं संबंध ठेऊं नये—कोणाकडे वकील पाठवूं नये, आपल्याकडे कोणाचा येऊं देऊं नये—तुंगभद्रा व नर्मदा यांमधील मुलूख हें आपलें राज्य, या हद्दीबाहेर कशावर हक्क सांगूं नये; गायकवाडाकडून दरसाल चार लाख रुपये ध्यावे, त्यांत सारें आलें असें समजावें. अमदाबादचा सुभा त्याच्याकडेच मक्त्यानें ठेवावा व त्याबद्दल दरसाल साडेचार लाख रुपये ध्यावे. काठेवाडची खंडणी व गुजराथेंतील इतर बाबी वगैरे शिवाय; त्यांबद्दल कलम निराळें. वसईच्या तहनाम्यांत ५००० स्वार व ३००० पायदळ चाकरीस तयार ठेवण्याचा करार होता, त्या फौजेच्या खर्चाबद्दल चौतीस लक्षांचा मुलूख स्वाधीन करावा; अहमदनगरचा किल्ला द्यावा व नर्मदेच्या उत्तरेकडे जे काय हक्क वगैरे असतील ते सारे सोडून द्यावे. सन १८१२ मध्यें जहागीरदारांबरोबर झालेले करार कायम करावे; माधवराव रास्त्याची जहागीर सोडून द्यावी आणि निजामाच्या हद्दीवरचें भैलघट ठाणें सन १८११ मध्यें बळकावलेलें सोडून द्यावें.

बाजीरावसाहेब त्या तहनाम्यावर सही करीत नाहीं ह्मणाले. त्यांच्या सरदारांनींही तो कबूल करूं नका ह्मटलें. इतकी अप्रतिष्ठा करून घेण्यापेक्षां तलवारीचे दोन हात करावे, मग काय नशिबीं असेल तें होईल असें ते ह्मणत होते. परंतु श्रीमंतांस धैर्य होईना, हे करार मला मान्य नाहींत; परंतु माझ्या अंगीं लढण्याचें सामर्थ्य नाहीं, नाइलाज आहे; असें ह्मणून मोठ्या दुःखानें त्यांनीं तारीख १३ रोजीं त्या तहनाम्यावर सही केली.

पुढें पेशव्यांनीं कांहीं गडबड करूं नये ह्मणून एल्फिन्स्टन साहेबानें त्यांच्याकडून हा तहनामा कबूल करवून त्यांचे हातपाय अगदीं बांधून घेतले. परंतु ह्या लाजिरवाण्या करारांप्रमाणें ते वागतीलच असें त्यालाही वाटत नव्हतें. त्यानें आपला अभिप्राय असा असलेला अगदीं स्पष्ट लिहून ठेविला. तो ह्मणतो:—" आह्मीं पेशव्यांना मान खालीं घालावयाला लावून हे त्यांना लज्जास्पद वाटण्यासारखे करार करून घेतले आहेत, तर उत्तर हिंदुस्थानांतल्या गोष्टी जरा अनुकूल दिसल्याबरोबर त्यांनीं आमचे शत्रु बनून उघडपणें युद्धास सिद्ध होऊं नये ह्मणून आमची तयारी असली पाहिजे आणि तसा बंदोबस्त ठेविला पाहिजे. "

गव्हरनर जनरल लॉर्ड हेस्टिंग्ज यांचेंही मत त्यावेळीं तसेंच होतें.*

---

# भाग ११ वा.

## खडकीची लढाई. सन १८१७–१८

वसईच्या तहांत बाजीरावाचे हातपाय खूप बांधलेले होते तरी इतके दिवस त्यांना ते बरेच हालवितां येत होते. आतांच्या तहांत त्यांची अगदीं गठडीच वळली. ती तशीच कायम राहिली असती तर त्यांचें वास्तव्य पुण्यांत आणखी पुष्कळ काळपर्यंत झालें असतें. परंतु त्यांचें नशीब पुढें धांव

---

* तारीख १२ एप्रिलच्या आपल्या खलित्यांत पेशव्यांकडून असे जबर करार करून घेणें अगदीं अवश्य कां वाटावें तें लिहून लॉर्ड साहेबांनीं असें ह्मटलें आहे कीं, पेशवे आमच्यावर उठण्याकरितां कट करीत आहेत अशी आमची खात्री झाली आहे. त्यांच्या मुलखांत आमचें युद्धसामर्थ्य उत्तरोत्तर वृद्धिंगत होत जाण्याकडे आह्मी लक्ष पुरविलें पाहिजे. आमच्या हिताला केव्हां बाध येऊं नये ह्मणून अगदीं पक्का बंदोबस्त करून घेण्याच्या उद्देशानें आह्मी जे करार करून घेत आहों ते पेशव्यांच्या मनांत खचित सलत राहतील; याकरितां त्यांच्या मुलखांत आपल्यास उपयोगीं पडे अशी फौज वाढवीत जाण्याकडे, तिची सुधारणा करीत जाण्याकडे आणि तिच्याशीं त्यांचा कांहींएक संबंध नसून ती स्वतंत्रपणें आमच्या अम्मलदारांच्या ताब्यांत राहण्याकडे आमची नजर राहिली पाहिजे.

घेत होतें तें स्वस्थ बसेना. त्यानें त्यांचा मित्र मालकमूसाहेब यांची लौकरच गांठ घालून दिली. त्याला त्यांची दया येऊन त्यानें त्यांच्यावर खऱ्या मनानें उपकार केले; परंतु त्यांना आपल्या स्वभावाप्रमाणें वर्तून गादीवर आल्यापासून आरंभिलेल्या कपटनाटकाचा शेवटचा अंक रचून त्याचा प्रयोग करण्यास ती उत्तम संधि मिळाली. मालकमूसाहेबाचें करणें एल्फिन्स्टनसाहेबाला अगदीं नापसंत होतें, परंतु तो हुकमाचा ताबेदार पडला; त्याचें कांहीं चालेना. त्याच्या कीर्तिचंद्राचा उदय होण्याचा कालही समीप येत चालला होता, त्यामुळें तसतसा एक एक योग जमून येत चालला म्हटलें तरी चालेल. बाजीरावाबरोबर तह होण्यापूर्वीच त्याच्या मनांत पुण्यांतून जावें असें येऊन तो त्या उद्योगास लागलाही होता; परंतु मुक्काम होऊन थोड्याच दिवसांत त्याच्याहातून पेशवाईचा शेवट लागला आणि दक्षिणेंत इंग्रजी अमलाची स्थापना झाली. तो प्रकार आतां वर्णावयाचा.

मागें प्रसंगानुसार कांहीं स्थळीं पेंढाऱ्यांविषयीं उल्लेख झाला आहे. त्यांचा समूळ उच्छेद करावा तेव्हांच आपल्या व आपल्या दोस्तराजांच्या मुलखास स्वस्थता मिळून सुखवृद्धि होऊं लागेल हें हिंदुस्थानसरकारच्या लक्षांत केव्हांच येऊन चुकलें होतें; परंतु तें कार्य सामान्य नव्हतें म्हणून बरेच दिवस हातीं घेतां आलें नाहीं. अखेर सन १८१७ मध्यें तो योग आला.

पेशवे उत्तर हिंदुस्थानांत स्वाऱ्या करूं लागले, तेव्हांपासून पेंढारी त्यांच्या फौजेबरोबर असत. शत्रूंच्या सैन्याभोंवत्या घिरट्या घालून साधेल त्या तऱ्हेनें उपद्रव देऊन त्यांना नको नकोसें करावें, चैन पडूं देऊं नये, हें त्यांचें पहिलें काम होतें. तें करण्यांत मोठे तरबेज होऊन ते उत्तरोत्तर बळावत चालले. त्यांचे नाईक मध्यहिंदुस्थानांत थोडथोडा मुलूख मिळवून कायम ठाणीं घालून बसले. कांहीं असामींनीं कायमच्या थोड्याबहुत फौजा ठेऊन मोंगल पादशाहीच्या ऱ्हासकाळांत तिलाही धक्के दिले. असा लौकिक गाजल्यावर मग दुसऱ्याच्या पदरचे न म्हणवतां ते आपल्या जातीवर हिंमतीनें हवें तें करूं लागले. इंग्रजांशीं शिंदे-होळकरांच्या लढाया होऊन ते हतवीर्य झाले, इंग्रजांनीं आपलीं पलटणें त्यांच्या पदरीं बांधलीं. आणि पहिल्यासारखी त्यांना हालचाल करतां येईनाशी झाली, तेव्हां त्यांच्या पदरचे पुष्कळ लोक रिकामे झाले. त्यांचा पेशा शिलेदारी; अंगांत पाणी, हिंमत आणि करामत असून पोटाला घालणारा कोणी नाहीं असें झालें, तेव्हां तेही पेंढा-

ऱ्यांत शिरूं लागले. असें पेढाऱ्यांचें प्रस्थ आणि उपद्रव दिवसोंदिवस वाढत चालले. त्यात अमीरखान पठाण पुष्कळच बलाढ्य झाला, सन १८०८ मध्यें त्याची नागपुराकडे नजर फिरली, तेव्हां भोसले कसे घाबरले होते आणि इंग्रज त्याला तोंड देण्याला उभे न राहते तर त्याची काय अवस्था होत होती हें मागें सांगितलेंच आहे. कितीएक लोकांचें असें मत आहे कीं, पेंढाऱ्यांना शिंदे-होळकरांची प्रत्यक्ष मदत नसली, तरी निदान त्यांच्याकडे ते कानाडोळा करीत होते ह्मणून ते इतके बळावले. तें काय असेल तें असो, पण येवढें खरें कीं, त्यांनीं इतकी लुटालूट केली तरी त्यांना कोणी आडवें आलें नाहीं. त्यामुळें ते फुशारून अधिक अधिकच अनर्थ करूं लागले. एकदां एक मोठी टोळी गंगातीरीं इंग्रजी हद्दींतल्या मुलखांत शिरली. ते नर्मदातीरीं जमून तेथून दरसाल दूर कोणत्या मुलखावर जाऊन धाड घालावयाची ते बेत करीत आणि त्याप्रमाणें दक्षिणदेशीं शेकडों कोस दूर जाऊन लूट करीत. ते ज्या मार्गानें जात, त्यावर जागोजाग असे कांहीं अनर्थ करीत कीं, ते ऐकून अंगावर कांटा येतो. सन १८१६ च्या एप्रिलमध्यें एल्फिन्स्टनसाहेबानें आपल्या चुलत्याला पत्र लिहिलें त्यांत तो ह्मणतो, 'आतां पेंढाऱ्यांची संख्या २५००० पासून ३०००० पर्यंत आहे. त्यांचें मुख्य ठाणें मध्यहिंदुस्थानांत असून तेथून ते ५००।६०० मैल दूर पल्ला करतात. ते नुकतेच निजामाच्या मुलखांतून मद्रास इलाख्यांत शिरले होते आणि मद्रासच्या लोकांना गर्भगीळ करून सोडून निजामाच्या व पेशव्याच्या मुलखांतून माघारे गेले. हिंदुस्थानांत आमचा अम्मल चालला आहे तो आमच्या लौकिकावर—परंतु त्यांचा उपद्रव असाच सोशीत राहिलें तर तो लौकिक जाईल. त्यांचा बंदोबस्त देशभर लढाई मांडल्यावांचून होणार नाहीं; आणि अशा प्रसंगीं लॉर्ड मोइरा कामावरून निघणार अशी बातमी आहे. ती जर खरी असेल तर हें काम निदान आणखी एक वर्ष लांबणीयर पडेल.'

लार्ड मोइरा सन १८१३ च्या आक्टोबरमध्यें गव्हरनर जनरल झाला. त्यानें पेंढाऱ्यांचा दंगा मोडून टाकण्याचें मनांत ठेऊन विलायत सरकारास लिहिलें. तें मान्य होऊन तिकडून हुकूम आला. परंतु अनेक कारणांमुळें सन १८१७ पर्यंत त्याला त्या कामाला हात घालतां आला नाहीं. तिकडे नेपाळाबरोबर चाललेली लढाई संपली; इकडे पेशव्यांबरोबर तह होऊन

त्यांचे हातपाय आंवळले, तेव्हां तो निर्धास्तपणानें त्या कामास लागला. त्याला प्रथम असें दिसून आलें कीं, सन १८०५।६ मध्यें राजेरजवाड्यांबरोबर तहनामे होऊन जी व्यवस्था झाली, तींत व्यंगें आहेत तीं काढून टाकलीं पाहिजेत. शिंदे-होळकर वगैरे सर्वांशीं नवीन करारनामे केले पाहिजेत. पेंढाऱ्यांचा जमाव मोठा आहे, तेव्हां साऱ्या राजेरजवाड्यांची आपणास तितकी मदत मिळविली पाहिजे.

हिंदुस्थानांत जसे पेंढारी तसे पठाणही लुटारू झाले असून ते साऱ्यांत प्रबळ होते. त्यांचा तोफखाना उत्कृष्ट आणि पायदळही नामी होतें. होळकराच्या अगदीं पहिल्या पलटणांतले लोक मूळ त्यांत होते. त्यांचा जमाव मोठा, १५००० स्वार आणि १०००० पायदळ, असा २५००० होता. पेंढाऱ्यांत आणि त्यांच्यांत दुसरें अंतर असें होतें कीं, ते महिनेमहा कायम पगार ठरवून घेऊन पाहिजे त्याच्या पदरीं नोकरीस रहात. पगार वेळेवर पोहोंचला नाहीं ह्मणून लागलेच निघूनही जात नसत.

पेंढाऱ्यांची संख्याही वाढत वाढत २५००० झाली होती, ज्याचा शिपाई-गिरीचा धंदा दुसऱ्या कोठें चालेना, त्याने आपला घोडा आणि भाला सरसाऊन पेंढाऱ्यांत शिरावें असें झालें होतें. मोठमोठ्या मराठे सरदारांची ह्या लुटारूंना आंतून फूस आणि मदतही असे.

बाजीराव साहेबाजवळ त्रिंबकजीचे प्राबल्य फार झाल्यापासून सारें मराठे-मंडळ एक करून इंग्रजांना हांकून लावावें हा बेत चालला होता; शिंदे होळकर, भोसले, गायकवाड, वगैरे साऱ्या लहानथोर दरबारांत त्याच्या खटपटी चालल्या होत्या. त्रिंबकजी कैदेंतून पळाल्यापासून तर त्यांना अधिक चेव आला होता. इंग्रजांना तें कळत होतें. गव्हरनर जनरलानें प्रथम असें मनांत आणलें कीं, लहानथोर न ह्मणतां सर्वांबरोबर नवीन तहनामे करावे; ज्याच्याकडे जो मुलूख चालत असेल, तो त्याच्याकडे कायम ठेवावा आणि त्याचें संरक्षण करण्याचें आश्वासन द्यावे. लहानसहान संस्थानिक, जाहागीर-दार वगैरे ह्या व्यवस्थेस तेव्हांच, हंसत कबूल होण्यासारखे होते; परंतु शिंदे, भोसले वगैरे कांहीं नाकबूल होण्याचा रंग दिसत होता. शिंदे व भोसले यांचा असा करार झाला होता कीं, आपण पेशव्यांच्या हुकमांत राहून त्यांची नोकरी बजावावयाची. होळकराच्या दिवाणाला अनुकूल करून घेण्याची त्यांची खटपट चालू होती. ह्मणून त्यांना दटाऊनच तहनामे कबूल करून

घ्यावे लागतील असें दिसत होतें. पठाणांचा नाईक अमीरखान याची जाहागीर चालवून त्याचें संरक्षण करण्याचा ठराव झाला. त्यानें आपल्या मुलखाच्या बंदोबस्तापुरते लोक ठेऊन घेऊन बाकीच्या साऱ्यांस फांठा द्यावा, कोणा लुटारूशीं कांहीं संबंध ठेऊं नये, आपला सारा तोफखाना इंग्रजांस द्यावा आणि त्याच्याबद्दल योग्य पैसा घ्यावा, असा करार त्याच्या वकिलामार्फत झाला. त्याप्रमाणें त्यानें कागद सही करून द्यावयाचा, परंतु पेशव्यांकडून त्याच्याकडे वकील आला होता, त्याच्याशीं बोलणें चाललें होतें, ह्मणून पुण्यास चाललेल्या प्रकरणाचा शेवट कसा काय होतो तें पहात तो बसला होता. अखेर त्यानें सही केली.

याप्रमाणें करतां आला तितका बंदोबस्त करून पेंढाऱ्यांना आणि त्यांना सामील असतील त्यांना, चोंहींकडून कोंडून अखेर त्यांचा अगदीं चुराडा उडवून द्यावयाचा निश्चय ठरून फौजेची तयारी झाली. *साऱ्या फौजेचें आधिपत्य सर टॉमस हिस्लाप, मद्रासचे कमांडर इन् चीफ, यांजकडे देऊन तीपैकीं दक्षिणेंत पाठवावयाच्या भागाच्या पांच तुकड्या करावयाचें ठरलें. सगळें काम नीट होतें कीं नाहीं, हें पाहण्याकरितां व कांहीं कमजास्त करावें लागल्यास हुकूम देण्यास अवकाश लागू नये म्हणून गव्हरनर जनरल बंगालची फौज आपल्या हाताखालीं घेऊन स्वतः रणांगणींच उभे राहिले. दक्षिणेंतली फौज ५७००० वरच होती. तिच्याबरोबर गव्हरनरजनरलतर्फे एजंट ह्मणून मालकम साहेबाची नेमणूक झाली. शिवाय एका तुकडीचें आधिपत्यही त्याला मिळालें. शिंद्याच्या मनाची चलबिचल दिसत असल्यामुळें बुंदेलखंडाच्या उत्तरेस काय होणार आहे, याचा त्याला गंधही येऊं नये असा गुप्तपणें सारा प्रकार चालला होता. त्यानें तहनामा मुकाट्यानें कबूल करावा ह्मणून ग्वाल्हेरच्या दक्षिणेस जवळच आणि उत्तरेस ढोलपुरास पुष्कळ फौज घेऊन जाऊन त्याचा तोफखाना आणि लष्कर माऱ्यांत घेऊन बसावें असाही बेत झाला.

याप्रमाणें उत्तरेस चाललेल्या त्या मोठ्या थोरल्या मोहिमेच्या तयारीची सारी बातमी एल्फिन्स्टनसाहेबाला वेळोवेळीं कळतच होती. आपण तींत शिरावें असेंही त्याच्या मनांत होतें. बाजीरावाबरोबर जो नवा तहनामा ठरा.

---

× ह्या कामाकरितां एकंदर फौज ११६००० जमली होती. तोफा ३०० होत्या. एवढी मोठी फौज यापूर्वीं इंग्रजांनीं आपल्या मुलखांत केव्हांच जमविली नव्हती.

वयाचा होता तो त्याला कांहीं सर्वथैव पसंत नव्हता, ह्मणून तें काम दुस-ऱ्याच्या हाती गेलें तर बरें असें त्याला वाटत होतें. तारीख १५ मेचा त्याचा रोजनामा असा आहे—मी नव्या तहनाम्याचा मसुदा करूं लागलों आहें. माझी बदली लखनौस करून मालकमसाहेबाला येथें पाठविलें तर बरें होईल असें मी हुजूर लिहिलें आहे. असें झालें तर पेशव्यांचें मन कदाचित् वळवतां आलें तर येईल. फक्त एवढ्यासाठीं मी हें लिहिलें आहे. माझ्या प्रकृतीला, सुखाला वगैरे ही जागा जशी मानवते, योग्य आहे, तशी दुसरी कोणतीच कधीं असणार नाहीं हें मी जाणतों आहें. तरी मला लखनौ बरें वाटतें; कारण मला स्थलांतर आवडतें; पुष्कळ दिवसांच्या संवई मोडून जातील, तेथच्या राहण्याचा प्रकार अगदीं निराळा असल्यानें तो मला उपयोगी पडेल असें मनांत येतें; पुनः हिंदुस्थान पहावयाला सांपडेल आणि सर्वांत विशेष हें कीं, कलकत्त्यांतली जुनी मित्रमंडळी भेटेल. माझी नेमणूक लखनौस न होता दुसऱ्या कोठें होईल आणि त्या स्थळाचा मला त्रास येईल असेंही होईल. परंतु मी जी सूचना केली आहे, ती सरकारच्या बऱ्याकरितां, आपल्या सोईकरितां नव्हे. याजकरितां माझ्या मनासारखें न झालें ह्मणून उघडपणें किंवा मनांतल्यामनांत देखील कुरकुरूं नये यांतच प्रतिष्ठा आहे हें मला ध्यानांत ठेविलें पाहिजे.

पुढें मालकम साहेबाची नेमणूक मोहिमेवर झाल्याचें समजलें तेव्हां त्यानें तारीख ८ जून रोजीं असें लिहिलें आहे—' आतां होणाऱ्या मोहिमेंत रेसिडेंट निर्माल्यवत् होणार हें मनांत येऊन मला थोडेंसें वाईट वाटलें होतें; परंतु तें मनांतून गेलें. जो बेत ठरला आहे तो अगदीं उत्तम आहे आणि तो सिद्धीस नेण्याला मालकमसाहेबाची नेमणूक झाली आहे ही अगदीं यथायोग्य आहे. लखनौला जावें असें जें माझ्या मनांत येत होतें, त्याचा मला आतां बहुतेक विसर पडला आहे. ग्रीसदेश पहावयास जावयाचा आणि दुसरे जे माझे बेत होते ते सारे ह्या गडबडीमुळें आतां बाजूस राहिले. '

पेशव्याबरोबर तह झाल्यानंतर पुढें थोड्याच दिवसांत पुण्यास गोळी उडण्याचा प्रसंग आला; त्याला इंग्रजग्रंथकारांनीं मराठ्यांबरोबरचा तिसरा संग्राम असें नांव दिलें आहे. पेंढाऱ्यांचा उच्छेद करण्याकरितां युद्धाची मोठी थोरली तयारी होऊन इष्टकार्यास आरंभ झाला असतां मध्येंच हें विघ्न उभें राहिलें ह्मणावयाचें. परंतु याचा परिणाम ज्याचा त्यासच घातक झाला.

यावेळीं जे काय चार मराठे एकत्र जमले ते जमले. त्यानंतर तसा योग पुनः केव्हां आला नाहीं आणि येणारही नाहीं. आतां आपला नांवलौकिक होण्याची गोष्ट बोलावयास नको, असे ह्मणत एल्फिन्स्टनसाहेब अगदीं निराश होऊन बसल्यासारखा होता हे मागें सांगितलेंच आहे. परंतु या प्रसंगीं ज्यांची रणांगणीं कीर्ति झाली, त्या तिघांपैकीं तो एक होता. दुसरे दोघे मालकम आणि मनरो हे होत. हीं तीनही नांवे हिंदुस्थानांत सर्वतोमुख झालेलीं आहेत.

युद्धाच्या तयारीस लागल्यानंतर गव्हरनर जनरलसाहेबांनीं मालकमसाहेबास प्रथम साऱ्या दरबारांतून फिरून कोणाचें मन कसें आहे हें पहावें, साऱ्या रेसिडेंटांना भेटून त्यांची सल्लामसलत घ्यावी आणि राजेरजवाड्यांना आश्वासन द्यावें, ही कामगिरी सांगितली. लष्करी खात्याकडे त्याची नेमणूक ब्रिगेडीयर जनरल ह्या हुद्यावर झाली असून लढाईंत जी फौज अघाडीस जाईल तिच्याबरोबर अगदीं बिनीवर तुह्मांला पाठवूं असें वचन मिळालें होतें. ह्या गोष्टीचा त्याला फार आनंद झाला. त्यानें आपल्या बायकोला असें लिहिलें:—" माझी बढती झालेली पाहून गव्हरनरजनरलापासून खालीं यःकश्चित काळ्यागोऱ्या, उघड्या-नागड्या माणसापर्यंत सर्वांना आनंद झालेला दिसत आहे." एल्फिन्स्टन साहेबाची गोष्ट तशी नव्हती. त्याला वाईट वाटण्यासारखें झालें होतें आणि वाटलेंही. तारीख १६ जूनचा त्याचा लेख असा आहे—" पेंढाऱ्यांबरोबरच्या लढाईत आणि पेशव्याबरोबर आमचा तंटा होऊन युद्धावर बेतेल तर त्यांतही दक्षिणेचा एकंदर बंदोबस्त ठेवण्याच्या कामावर सर टॉमस् हिस्लॉप यांची नेमणूक झाली आहे असा तारीख १४ रोजीं मला हुकूम आला. दक्षिणेचें आधिपत्य त्याला दिल्याने मी मागें पडलों ह्मणून मला राग आला आणि प्रथम दुःख वाटलें; आणि आडामसाहेबाला पत्र लिहून याप्रमाणें मनाची स्थिति झाल्याचे त्याला थोडेसे दर्शविलें. परंतु दुसऱ्या दिवसाला तों चित्तवृत्ति अगदीं पहिल्याप्रमाणें आनंदित झाली. कांहीं झालें तरी ही अशी राखणें हेंच आपलें कर्तव्य आणि यांतच प्रतिष्ठा आहे. मला वाईट वाटते आहे असें मी केव्हांही एक अक्षर तोंडांतून काढतां कामा नये. मित्रांशीं ही गोष्ट मुळीं काढूं नये; आपल्याशीं सुद्धां कांहीं बोलूं नये; फक्त What cares Hippoclides * ' मला याची काय पर्वा आहे ' एवढेच ह्मणावें. "

---

* हिरॉडॉटस् नामक एक मोठा ग्रीक इतिहासकार होऊन गेला. त्यानें हिपॉक्लिडिसाची गोष्ट लिहिलेली आहे, तीवरून ही ह्मण पडली. एल्फिन्स्टननें

१५-१५४-२०००.

पुनः तारीख २७ रोजीं तो ह्मणतोः—तहनाम्याची गडबड संपली आणि मला आपलें सध्यांचें काम गोड वाटेनासें झालें; आणि आतां पुढे कांहीं काम करून दाखविण्याची किंवा प्रसिद्धीस येण्याची आशा नाहीं ह्मणून वाईट वाटूं लागलें. परंतु माझी जागा आणि फारकरून माझी बुद्धि ही माझी कीर्ति होण्यासारखी नाहीं. अप्राप्य वस्तूबद्दल झुरणीस लागूं नये. बहुधा कधीं पुरी होणार नाहीं असली मोठेपणाची हौस धरूं नये. आपलें काम करीत असावें. What cares Hippoclides ही जी माझी आवडती ह्मण आहे ही ह्मणत असावें ह्मणजे एखाद्या गोष्टीची निराशा झाल्यानें दुःख वाटणार नाहीं. असें मी ह्मणतो तरी माझी बदली व्हावी, गडबड, मौज आणि कीर्ति हवी असें माझ्या मनांत येतें.

पुढें तारीख ३० रोजीं तो ह्मणतो—"एडिंबरो रिव्ह्यूमध्ये लॉर्ड बायरन याचा लेख आलेला वाचला; तो मोठा शहाणपणाचा आणि गेल्या जानेवारी महिन्यांत मी आपल्या रोजनाम्यांत ज्या कांहीं गोष्टींची चर्चा केली आहे त्यांवर अगदीं समर्पक आहे, ह्मणून सध्या जरी मला असला उपदेश कोणी करावयास नको आहे तरी तो मी उतरून टेवितों.—" मनुष्यमात्राला खरोखर मागें सारून जे उच्चपद पावतात ते दुःखी असतात असें नाहीं; तर सर्वांना मागें ढकलून आपण पुढें व्हावें हा हेतु धरून जे सारखे धडपड करीत असतात तेच दुःखी होतें. त्यांना आंत हृद्रोग लागलेला असतो आणि बाहेर जरा कांहीं झालें की दुःख होतें व त्याच्या उलट कोणी गेल कीं राग येतो, असा त्यांचा स्वभाव निरुत्साह झालेला असतो. याचें कारण बहुधा असें असतें की, त्याच्या अंगांत खरे जेवढे गुण असतात त्यापेक्षां ते आपली योग्यता मोठी समजत असतात. " मोठेपणा प्राप्त होण्याच्या ज्या गोष्टी आहेत त्यांत केवळ नशिबावर हवाला देऊन रहावें यासारखा शहाणपणा नाहीं. या बाबतींत भवितव्य कधीं चुकत नसतें आणि ज्या मनुष्याची बुद्धि विशाल असते त्याला एकदा थोडा आधार मिळाला ह्मणजे तिचा विकास होण्याला योग्य अशा उच्चपदाला तो चढावयाचाच. प्राप्त होण्याला खरोखर कठीण अशी एकादी जागा जर आपल्याला मिळेना तर आपल्यांतच कांहीं तरी कमीपणा आहे असें पक्कं समजावें आणि स्वस्थ तरी बसावें

---

ती वाचल्यापासून त्याच्या तोंडीं ती कायमची बसली आणि त्याच्या लेखांत पुष्कळ ठिकाणीं आढळते. ती गोष्ट मोठ्या मौजेची आहे.

किंवा तो दोप काढून टाकण्याला लागावें, नशिबाला किंवा वरिष्ठांना शब्द ठेवावयाला लागूं नये. ”

गव्हर्नर जनरलाकडून हुकूम आल्याप्रमाणें एल्फिन्स्टन साहेबानें पेशव्यांकडून तहनामा करून घेतला ह्मणून त्याला तिकडून शाबासकी आली; पुष्कळ तारीफ झाली होती, ह्मणून तो निरुत्साह झाला नाहीं.

तारीख २१ जुलैचा रोजनामा असा आहे—“काल संध्याकाळीं मी आपलीं कांहीं जुनी, सन १८११ मधलीं, मी पहिल्यानें येथें आलो तेव्हांचीं, पत्रे वाचलीं. सहा वर्षे होऊन गेलीं; इतक्या काळांत माझे पुष्कळ बेत जागच्या जागीच नाहींसे झाले. मी होतों तसा आहें; मला पुष्कळसा पैसा मिळेल, सुख होईल, किंवा अधिकार मिळेल ही कांही मोठीशी आशा नाहीं. परंतु हा जो काळ गेला तो अगदीं फुकट गेला असें कांहीं नाहीं. कारण इतक्या अवकाशात मी त्यांवांचून न अडतां रहाण्याला शिकलो आणि मला जें काय प्राप्त करून घेतां आलें असतें त्याचें मोठेंसें महत्व नसतें असें आपल्या मनाचें शांतवनही करून घ्यावयास शिकलों. असें आहे तरी जो काल गेला त्याबद्दल मला वाईट वाटलें आणि मी थोडासा उदास झालों, परंतु तें लौकरच मनांतून गेलें. केव्हा केव्हां कांहीं कारण नसतां मला उदासीनता आली ह्मणून दुःख मानणें योग्य नाहीं. कारण ज्या गोष्टींचे स्मरण झालें असतां मला वाईट वाटावें त्याविषयीं माझ्या मनात कांहींच येत नाहीं असेंही होत असतें.

याप्रमाणें एल्फिन्स्टन आपल्या मनाचें शांतवन करीत होता; परंतु पुण्यांतून जावें अशी त्याला फार इच्छा झाली होती. मेजर जनरल ऑक्टरलोनी याची नेमणूक उत्तरेस झाली होती; त्याच्या हाताखालीं मालकम साहेबाप्रमाणें आपणही गव्हरनर जनरलाचा एजंट ह्मणून जावें असें मनात येऊन त्यानें त्याला पत्र पाठवून टेविलें. त्याचा मित्र स्ट्राचीसाहेब याजकडून त्याला असें कळलें कीं, कौन्सिलात एक जागा रिकामी होणार आहे. तेव्हा ती मिळावी ह्मणून त्यानें आपल्याला मिळालेलीं गव्हरनरजनरलाचीं सरटिफिकिटें आपल्या चुलत्याकडे पाठवून देऊन त्याला खटपट करावयास लिहिलें. नवीन ठरलेल्या तहनाम्यावर बाजीरावाची सही झाल्यावर तो गव्हरनरजनरलाच्या सहीकरितां त्यानें त्याजकडे पाठविला होता; तो पुरा होऊन तारीख २७ जुलै रोजीं परत आला. ठरल्याप्रमाणें मुलूख ताब्यांत घेण्याचें, हिशोबाचें, वगैरे काम चाललें होतें. याप्रमाणें जुलै महिना निघून गेला. बाजीरावसाहेब दरवर्षाप्रमाणे आषाढीच्या यात्रेला

पंढरीस निघून गेले. त्यांच्याबरोबर तो गेला नाहीं. तारीख २१ जुलैचा त्याचा लेख असा आहे–" सर टॉमस् हिस्लाप याची नेमणूक केल्याचा मला हुकूम आल्यापासून मी रंजिस आहे. याचें कारण चालू पुणेप्रकरण शेवटास नेण्याचें कार्य माझ्या हातांतून हिसकून घेऊन त्याच्या हातांत दिले हे आहे. हरतऱ्हेनें आपली प्रतिष्ठा वाढवावी ह्मणून मालकमसाहेबानें हे कृत्य केले असावे असे मला वाटले. मी ते काम दुसऱ्याच्या मदतीशिवाय संपविले होते ह्मणून मला पूर्ववत् आनंद व्हावयास पाहिजे होता, परंतु तसे झाले नाहीं. मला वाटते याचे बीज हे असावें कीं, माझ्यावर दुसरा कोणी असणे मला पुरवत नसावे आणि आता जी मोहीम व्हावयाची आहे तींत दक्षिणेची व्यवस्था माझ्या हातात नाहीं ह्मणून अधिकच वाईट वाटत असावे. ह्या गोष्टीचा मी पुष्कळ वेळ विचार केला आणि मालकमसाहेबाची बरोबरी करूं लागण्याला त्याच्या इतका पुष्कळ दिवसाचा अनुभव किंवा काम करण्याची योग्यता वगैरे गुणानीं त्याच्यासारखा माझा काहीएक हक्क नाहीं असे मला वाटलें. तरी कोणत्यातरी प्रकारची गव्हर्नरजनरलाच्या एजंटाची जागा मिळावी ही इच्छा मला झाली आहे आणि ही माझी चित्तवृत्ति बिघडविते, आनंदित राहू देत नाहीं. आमच्या हिंदुस्थानांतल्या राजकीय खात्यात ही गोष्ट मोठी आहे कीं, आह्माला मोठी आशा द्यावी अशी आमची स्तुति होत असते, परंतु ती आशा सफळ होण्याचा संभव नसतो. अशानें मनें बिघडतात आणि उदासीनता येते. मी आपले मागचे, सन १८०२।३ मधले रोजनामे वाचीत असतो. मला असे खचित वाटतें कीं, मी आपल्या मनाला मत्सर आणि असंतोष याचा विटाळ राहू दिला नाहीं, ते धुऊन निर्मळ केले आहे. ते द्वेष राहूं देणे ह्मणजे हलकेपणा आहे इतकेंच नव्हे, त्यांत अन्याय आणि कृतघ्नपणा आहे."

राजेरजवाड्यांचीं मनें आपल्या सरकाराशीं कशीं आहेत तें पाहण्याकरितां मालकम साहेब निघाला तो फिरत फिरत तारीख ५ आगस्ट रोजीं पुण्यास आला. त्याला बाजीराव साहेबाना भेटावयाचे होतें, परंतु ते पंढरपुराहून माघारे घरीं न येतां माहुलीस जाऊन बसले. त्यांच्याकडून उत्तर येईपर्यंत त्याचा मुक्काम झाला. तितक्या काळांत एल्फिन्स्टनसाहेबाचें व त्याचें अनेक विषयांवर संभाषण झाले. सर टॉमस हिस्लॉप याच्या नेमणुकीविषयींही बोलणें झालें. त्यात त्यालाच नेमणे योग्य होतें अशी एल्फिन्स्टन साहेबाची खात्री झाली.

'एल्फिन्स्टनसाहेबाला कांहीं तरी बक्षीस द्यावें अशी सरकारांतून शिफारस झाली आहे, तर तुम्हीही तशीच करा,' असें मालकम साहेबानें त्याच्या चुलत्याला आग्रहपूर्वक लिहिलें. त्यावर एल्फिन्स्टन ह्मणतो—"परंतु तो मला काय बक्षीस देवविणार? आणि खरें ह्मटलें तर बक्षीस देण्यासारखी माझी काय योग्यता आहे? ह्या शिफारशींनीं मला जे मिळावें असें मानण्याचा हक्क आहे तें सारें मिळेल. तें काय तर माझ्या आतांचा माझ्याविषयीं खरोखर अगदीं चांगला ग्रह होईल आणि कदाचित् त्यांच्याशिवाय आणखी कांहीं मंडळींत माझें नांव होईल. यापेक्षां आणखी कांहीं जास्त व्हावें असें मी मनांत आणीन तर माझी निराशा होईल आणि त्यांत विशेष येवढें होईल कीं, मी भलत्याच आशेस गुंतून फसलों."

मालकम्साहेब निघून गेल्यावर एल्फिन्स्टनसाहेबानें त्याच्याविषयीं असें लिहून ठेविलें—त्याच्याविषयीं माझ्या मनात जें काय काळेबेरें आलें होतें तें त्याची भेट झाल्यानें अगदी पार निघून गेलें. त्याच्यासारखा मोकळ्या मनाचा आणि आनंदवृत्ति मनुष्य नाहीं. अशा वयांत त्याची ती हौस, मनाची आणि शरीराची चपळता, अतोनात हिम्मत आणि सदा शांत स्वभाव, हे गुण खरोखर आश्चर्य करण्यासारखे आहेत. इतके गुण असून शिवाय त्याची बुद्धि पोक्त आहे आणि वाचनानें व अवलोकनानें त्याला माहिती फार झालेली आहे.'

एल्फिन्स्टनसाहेबानें ऑक्टरलोनी याला जें पत्र पाठविलें होतें त्यावर त्याच्याकडून त्याला संतोष वाटण्यासारखें उत्तर आलें. त्यानें सुचविलेली ती नव्हे, परंतु दुसरी कोणती तरी चांगली जागा मिळण्याची आशा उत्पन्न होऊन हुकूम येण्याबरोबर निघावें लागेल तर तारांबळ होऊ नये ह्मणून त्यानें आपल्या कागदपत्रांची व्यवस्था लाविली. मोठमोठ्या मजला करून अलाहाबादेला पंधराव्या किंवा सोळाव्या दिवशीं जाऊन पोंहोचेन असा त्यानें अजमास देखील करून ठेविला.

याप्रमाणें आशेवर बसून हिंदुस्थानासंबंधी माहितीची पुस्तकें देखील तो वाचीत होता. सारा आगष्ट आणि सप्टेंबर देखील गेला तरी ती आशा कांहीं सफळ झाली नाहीं. पुढें आक्टोबर सुरू झाला आणि त्याचें नशीब बसल्या जागींच खुलण्याची वेळ आली.

तहनामा झाल्यावर बाजीरावसाहेबांनीं आपली फौज—मुख्यत्वें स्वार—लागलीच कमी केली. ते पंढरपुराहून पुण्यास परत न येता कृष्णावेण्येच्या

संगमावर माहुलीस जाऊन सप्टेंबर अखेरपर्यंत तेथेंच बसले. मालकम् साहेबास भेटीला येथेच यावें असा निरोप गेल्यावरून तो तेथें जाऊन भेटला. उभतांची भेट मोठ्या प्रेमानें झाली. ते दोघे पुरुष दोन तऱ्हांचे होते. मालकम आनंदी, मनाचा मोकळा, मोटा थोर, उत्तम शिपाई आणि शिष्टाईच्या कामांत पटाईत होता. बाजीरावाच्या अंगी त्याच्या जोडीला बसण्यासारखा एकही गुण नव्हता; सारेंच उलटें होतें. परंतु एका गोष्टीत दोघांचें अगदीं साम्य होतें. आपल्या वाक्चातुर्यानेंच आपण आपला कार्यभाग उरकून घेऊ असे उभयतांसही खात्रीपूर्वक वाटत असे. मालकम साहेबानें त्याप्रमाणें आजपर्यंत पुष्कळ प्रसंगीं वाक्प्रभाव दाखविला होता आणि साऱ्या गव्हरनरजनरलांच्या चित्ताचें आकर्षण करून त्यांचा आपल्यावर विश्वास बसवून घेतला होता. परंतु या प्रसंगीं कपटपटु बाजीरावानें आपली छाप त्याच्यावर बसवून त्याला अगदीं भारून टाकलें. कंपनीसरकारची व आपली दोस्ती इतके दिवस चालत आली असून आता तिला व्यत्यय यावा आणि आपल्याकडून परवांच्या तहनाम्यांत असे विलक्षण करार करून घ्यावे, हे उचित काय? आपल्याला ह्याबद्दल फार वाईट वाटत आहे; तुह्मी मला गादीवर आणून बसविलेत, आणि आजपर्यंत संरक्षणही करीत आलेत, असे असता तुमचे ते सारे उपकार मी अगदी विसरून जाऊन कृतघ्न होईन असे तुह्माला वाटतें तरी कसे? असे अनेक प्रकारे भाषण करून त्याणे त्याला द्रव आणला आणि आपला स्नेहभाव अगदी अकृत्रिम आहे असें भासविलें. उलट पक्षीं तसें होत नसते, एल्फिन्स्टन साहेबाचा आपल्यावर विश्वास नाहीं, तो नेहमी बातम्या काढीत असतो, त्याचे गुप्त हेर चोहीकडे पसरलेले आहेत, मी पानावर बसून काय खाल्लें ही देखील बातमी त्याला असते, इतका त्याचा माझ्यावर पहारा आहे असें सांगितलें. ते ऐकून मालकम् साहेबाला वाईट वाटलें आणि त्याने त्याचें शांतवन करून ह्मटलें "असो, झालें तें झालें. परंतु आतां लाट साहेबाचा बेत पेंढाऱ्यांचा उच्छेद करावा असा आहे. ते काम मोठें आहे. तर या प्रसंगीं तुह्मी चांगलें साहाय्य करून सरकारची खात्री करून द्यावी आणि स्नेह दृढ करावा. तहामध्ये आपला जो मुलख गेला आहे तो कांहीं सुटणार नाहीं परंतु आपल्या हातून होईल तितकी मदत कराल आणि मी सांगतो याप्रमाणें वागून आपला प्रामाणिकपणा दाखविण्याची आयती संधी आलेली आहे ही साधून स्नेहाविषयीं सरकारची खात्री करून द्याल तर लाट साहेब ते लक्षांत वागवून आपल्याला बक्षीस देतील, त्यांत

झालेलें नुकसान भरून येईल. ” बाजीरावानें तें मान्य करून फार गोड भाषण केलें आणि आपले मन अगदीं मोकळे व निर्मळ आहे, कंपनी सरकाराशीं स्नेह वाढत जावा अशी आपली फार इच्छा आहे, याकरितां पाहिजे तितकी मदत करण्यास सिद्ध आहों, असें सांगितलें. भोळा बिचारा मालकम् त्या गोड मिठ्या भाषणानें अगदीं फसला. बाजीराव इंग्लिशांच्या पक्षास अगदीं मनापासून साहाय्य करील, त्याला फौज ठेवण्याला उत्तेजन दिलें आणि त्याच्यावर पूर्ण विश्वास टाकला ह्मणजे तो चांगला स्नेहानें वागेल असें त्याला वाटलें आणि त्यानें त्याला फौज ठेवण्यास सांगितलें. मालकम् साहेबाच्या चरित्रांत त्याचे एक पत्र छापलेले आहे त्यावरून असे दिसतें कीं तो कलकत्त्याहून इकडे यावयास निघाला तेव्हांच त्याच्या मनाचा ग्रह असा झाला होता कीं, बाजीराव गैरशिस्त वागणारे नव्हत, कोणा दुर्मंत्र्याच्या नादालें लागून फसले असतील इतकेंच; परंतु आतां त्यांना त्याबद्दल जें प्रायश्चित्त घडलें आहे त्याने ते ताळ्यावर आलेच असतील; आपला त्यांचा पहिल्यापासून स्नेह आहे तेव्हां आपल्या सरकाराशी नीट स्नेह संपादून वागलें तर गेलेला अधिकार थोडाबहुत परत मिळेल अशी आशा दाखविली ह्मणजे ते आपल्यास चांगलेच वश होतील. मग समक्ष भेटींत जें भाषण झाले त्यावरून तर त्याचा तो ग्रह चांगलाच दृढ झाला. माहुलीहून पुण्यास परत गेल्यावर त्याने एल्फिन्स्टन साहेबाला सारें वर्तमान सांगितलें आणि ह्मटलें तुह्मी उगाच त्याच्याविषयीं संशय धरून बसूं नका आणि तो काय करील न जाणो ह्या भीतीने विनाकारण इतकी फौज अडवून ठेऊन सरकारचे जे मोहिमेचे बेत चालू आहेत त्याना विघ्न आणूं नका.

मालकम् साहेबाचें बोलणें एल्फिन्स्टन साहेबाच्या मनाला आले नाहीं, परंतु तो मनाचा उदार पडला, त्यामुळे त्याने अगदीं नाखुषीनें कां होईना पण त्याच्या ह्मणण्याला रुकार दिला आणि पुण्याच्या संरक्षणाला शिपायांच्या तीन बलहीन पलटणी ठेऊन बाकीच्या तैनाती ( Subsidiary ) फौजेपैकीं बहुतेक भागास उत्तरेस निघून जाण्यास हुकूम झाला. आतां आपल्याला मालकम साहेबाच्या तर्फेनें बोलावयाचें ह्मटलें तर असें ह्मणतां येईल कीं उत्तरेच्या थोरल्या फौजेची वाट काय होते ते पाहून बहुधा मगच बाजीरावसाहेब पुढें पाऊल टाकतील असे त्याला वाटले असावें. तिकडे कांहीं विपरीत प्रकार घडून आल्यावांचून उघडपणें एकादें कृत्य करून

शत्रुत्व दाखविण्याची त्यांस छाती होणार नाहीं असें एल्फिन्स्टनसाहेबाला अगदीं शेवटपर्यंत वाटत होतें. परंतु जनरल स्मिथ याच्या हातखालची फौज हालली आणि पुणें उघडें पडलें असें दिसलें ह्मणजे ही संधी बरी आहे असें मनांत येऊन श्रीमंत कांहीं तरी गडबड करण्यास चुकणार नाहींत असें त्याचें मन ह्मणत होतें.

बाजीरावसाहेब माहुलीस कांहीं स्वस्थ स्नानसंध्या करीत बसले नव्हते. इंग्रजांनां घालवून लावावें हा त्यांचा फार दिवसांचा हेतु होता आणि तो सिद्धीस जावा ह्मणून त्यांची सक्त मेहेनत चालली होती. नवीन तह होतांच त्यांनीं फौज कमी केली असें मागें सांगितलें आहे, परंतु ती कमी करतांना त्यांनीं साऱ्या शिलेदारांना सात सात महिन्यांचा पगार आगाऊ देऊन आपआपल्या गांवीं जाऊन बसा, मिळतील तितके स्वार मिळवून सारे तयार असा आणि आमची सूचना होतांच हजर व्हा असें सांगून निरोप दिला होता.* त्यांची सारी तयारी अशीच गुप्तपणें चालली होती, परंतु ती पुरी झाली ह्मणजे इंग्रजावर उघडपणें चालून जावयाचें असें बापू गोखल्याच्या मसलतीनें ठरलें होतें. मी तुमच्या विचाराबाहेर वागावयाचा नाहीं असें त्यांनीं गोखल्याला शिक्के मोर्तबानिशीं, शपथपूर्वक पत्र लिहून दिलें आणि सारा अधिकार त्याच्याकडे सोंपवून फौजेच्या तयारीकरितां एक कोट रुपये खर्चास दिले. इंग्रजांना हांकून लावावयाचे असा संकल्प ठरल्यापासून त्यांनीं पुष्कळ जाहागीरदाराचे मुलूख जप्त केलेले सोडले आणि कांहीं वर्षे सर्व प्रकारच्या लहानथोर लोकांची प्रीति संपादण्याची खटपट चालविली. त्यांनीं आपला लढाई करण्याचा बेत छत्रपति महाराजांस व त्यांच्या मातुश्रीस कळवून ही गोष्ट बाहेर फोडणार नाहीं, तुह्माला मदत करूं अशी त्यांजकडून शपथ घेतली; परंतु त्यांना सकुटुंब सपरिवार वासोटा किल्ल्यावर टाकून तेथचा सक्त बंदोबस्त केला. किल्ल्यांची दागडुजी, त्यांवर दाणा, सामानसुमान, शिबंदीची वगैरे बेगमी आणि आरमाराची तयारी जारीनें चालविली. त्रिंबकजी त्यांच्यासाठीं पुष्कळ भिल्ल व रामोशी जमवूं लागला. शिंदे, होळकर, भोसले व अमीरखानपठाण, यांजकडे मुद्दाम वकील रवाना झाले. परंतु श्रीमंतांनीं स्वतः काम करण्याचें योजलें तें याहून निराळें होतें. तें कोणतें ह्मणाल तर पुण्यांतील पलटणांतले शिपाई फितुर करावयाचे आणि रेसिडेंटाचा खून करा-

---

* हें पुढें कळलें.

वयाचा. पलटणांवरचे गोरे अम्मलदारसुद्धां फितवावयाचे असा त्यांचा बेत होता आणि तें काम त्यांनीं यशवंतराव घोरपड्याला सांगण्याचें योजलें. त्याची सर्व अम्मलदारांशीं चांगली ओळख झालेली होती व त्याला महिना हजार रुपये इंग्रजांकडून पेनशन मिळत असे. श्रीमंतांनीं त्याला पुष्कळ वचनें देऊन गोष्ट बाहेर फोडणार नाहीं अशी त्याच्याकडून शपथ घेतली आणि त्याला आपला हेतु सांगितला. हें काम होणें अगदीं अशक्य आहे अशी त्याची पक्की खात्री होती तरी त्यानें करतों ह्मणून सांगून तूर्त खचास ह्मणून पन्नास हजार रुपये घेतले. शपथेप्रमाणें त्यानें तोंडाला खीळ घातली होती, परंतु तो एल्फिन्स्टनसाहेबाला फार मानीत असे; ह्मणून आतां पुढें अमुक होणार आहे एवढी बातमी सर्वांच्या आधीं नेहेमीं जाऊन त्याला सांगत असे; आणि पुढें मोठ्या मनुष्यांपैकीं उघडपणें इंग्रजांस जाऊन मिळाला असा तो एकच; परंतु त्यांच्या अत्यंत उपयोगीं पडला असा एक बाळाजीपंत नातू. * त्याची दक्षता, शहाणपणा, चिकाटीपणा, आणि निश्चय त्या प्रसंगी चांगला दिसून आला अशी त्याची ते मोठी तारीफ करतात.

बाजीराव साहेबाची फौज जमविण्याची खटपट जारीनें चाललीच होती, आणि इंग्रजी पलटणांतील शिपाई फितूर करण्याचें त्यानीं मनांत आणिलें होतें तेंही काम मोठ्या मेहनतीनें चाललें होतें; परंतु साध्य मात्र झालें नाहीं. त्यांना

---

* बाळाजीपंत नातू खंडेराव रास्त्याजवळ कारकून होते रेसिडेंटाकडे त्यांचें जाणेंयेणें पुष्कळ असे. रास्त्यांनीं मरतांना आपल्या मुलाचें पालन-पोषण करण्याचें त्यांच्यावर सोंपविलें होतें. त्याच्यासाठीं त्यांनीं पुष्कळ मेहनत केली. एल्फिन्स्टन साहेबाची त्यांच्यावर मर्जी बसली. इंग्रजसरकारचा पक्ष त्यांनीं उघडपणें स्वीकारला आणि मोठी प्रतिष्ठा मिळविली. एल्फिन्स्टन मुंबईस गव्हरनर होण्यापूर्वींच त्यांस सरकारांतून इनाम गांव वगैरे बक्षीस मिळालें. ग्र्यांटडफ् साहेबानें मुद्दाम सांगितल्यावरून त्यानीं आपल्या वेळची सारी हकीकत अगदीं बिनचूक, आधारसहित लिहिली. तें पुस्तक पुष्कळ मोठें झालें. ग्र्यांटडफ साहेबानें त्याचें भाषांतर करून घेतलें. मूळ हस्त-लिखित प्रत त्यांनीं आपल्याजवळ ठेऊन घेतली. अनेक कारणांमुळें ती दुसऱ्याच्या हातीं न देणें यांतच शहाणपण आहे असें त्यांस वाटणें योग्यच होतें.

लालूच दाखवून फितूर करण्याची कोणी गोष्ट काढली तरी कित्येक रागावत, कित्येक ती आपल्याला मानवल्यासारखें दाखवून ऐकून घेत, परंतु लगेच जाऊन ती आपल्या वरिष्ठ अम्मलदारांना कळवीत. आपल्या शिपायांच्या इमानीपणाबद्दल जरी त्यांची पूर्ण खात्री होती, तरी चोहोंकडून जेव्हां अशा बातम्या वरचेवर कानीं येऊं लागल्या आणि त्यांचीं घरेंदारें पेशव्यांच्या मुलखांत व जे शिपाई कबूल होत नाहीत, त्यांच्या आतइष्टांचे हाल हाल करण्याची त्यांना भीति घालीत आहेत व कित्येकांचे छळ होऊं लागले आहेत, अशी वार्ता येऊ लागली, तेव्हां त्यांना सहजच मोठी काळजी वाटूं लागली.

श्रीमंतांनीं आणखी एक बेत असा केला होता कीं, लढाई सुरू करण्यापूर्वीं कांहीं बोलण्याकरितां ह्मणून एल्फिन्स्टन साहेबाला बोलावून आणावें आणि ठार मारावें. परंतु ती गोष्ट बापू गोखल्याला पसंत पडली नाहीं. पलटणांतले सारे शिपाई फितूर करण्याला हरकत नाहीं, परंतु एकदोन वेळ जो आपल्या चांगला उपयोगीं पडला, जो आपला मित्र, त्याचा खून करण्याचा विचार गैर असें त्यानें सांगितलें. परंतु बाजीराव साहेबांनीं जी गोष्ट मनांत आणली ती त्यांना टाकवेना. एल्फिन्स्टन घोड्यावरून फिरावयाला बाहेर गेला ह्मणजे त्याला तेथे गांठून मारावें; ते साधले नाहीं तर त्रिंबकजीला पुष्कळ भिल्ल आणून रात्रीं एकाएकीं त्याच्या बंगल्यावर पडून काम करण्याला सांगावें आणि त्याचवेळीं इकडे छावणीवर हल्ला करावा असा त्यांचा विचार चालला होता.

श्रीमंतांची स्वारी माहुलीहून परत आल्यावर एल्फिन्स्टनसाहेबाची भेट होई, तेव्हां तेव्हां कंपनी सरकारानें आपली दोन वेळ अप्रतिष्ठा केली याबद्दल आपल्याला फार वाईट वाटत आहे असें ते बोलत आणि आपली फार दिवसांची दोस्ती असून आपल्याला पहिल्यानें मोठी आशा वाटत होती, परंतु ती व्यर्थ गेली आणि आतां अगदीं उलट स्थिति होऊन बसली आहे याचें दुःख वाटतें असें ह्मणून कष्टी होत. हें नाहींसें करून पुनः पूर्ववत् सुखांत ठेवणें तर एक कंपनी सरकारच ठेवील असेंही ते ह्मणत. एल्फिन्स्टन त्यांचें शांतवन करी. मालकम् साहेबानें आपल्याला सरकाराकडून बक्षीस कसें मिळेल तें सांगितलें आहे, तें ध्यानांत ठेऊन आतां प्रसंग जवळ आला आहे, तेव्हां आपण चांगले उपयोगीं पडावें ह्मणजे आपल्यावर पूर्ववत् विश्वास बसेल आणि आपला हेतु सिद्धीस जाईल असें सांगितलें. परंतु तें सर्व व्यर्थ गेलें.

त्याचें त्याच्याजवळ बोलणें एक आणि इकडे करणें दुसरेंच असें चाललेंच होतें. फौज जमविण्याचें काम सारखें चालू होतें. जो येईल तो शिपाई आणि त्याला मिळेल तसलें घोडें, तट्टूसुद्धां चालत होतें, अशी भरती चालली होती.

याप्रमाणें श्रीमंतांची तयारी चालली होती. तिची एल्फिन्स्टनसाहेबाला बातमी लागत नव्हती असें नाहीच. "इतकी फौज उगाच कशाला जमवीत अहां, हिची कांहीं जरूर नाहीं" असें तो ह्मणे. त्यावर मालकम साहेबानें सांगितल्याप्रमाणें पेंढाऱ्यांबरोबरच्या लढाईंत तुम्हांला मदत करण्यासाठींच ही तयारी चालली आहे; त्यांचा अगदीं बीमोड करावयाचा तर तयारी चांगलीच पाहिजे, अर्धवट कशी चालेल हें उत्तर तयार होतें तें त्याला ऐकून घ्यावें लागे. बाजीरावाला वाटले होतें त्यापेक्षां जास्त वेळ मिळाल्यानें पुष्कळ फौज जमवितां आली. जहागीरदारांच्या हाताखालीं ही फौज पुष्कळ जमली आणि ती सारी येऊन पुण्यांत भरूं लागली.

एल्फिन्स्टनसाहेबाकडून गव्हरनर जनरल साहेबाला वरचेवर खलिते जात होते, त्यांतील एकांत असें लिहिलें होतें:—"पेशव्यांची तयारी उघडपणें व उत्साहानें चाललेली पाहून, आणि त्यांचें नुकसान झालेलें माहीत असल्या- मुळें कदाचित् वाईट वाटत असेल, ह्मणून मराठेशाईचें नष्ट झालेलें वैभव कदाचित् माघारें येईल अशी आशा उत्पन्न होऊन लोक त्यांच्या पक्षाला पहिल्यापेक्षां आनंदानें मिळत आहेत. आणि तेही त्यांच्या मनाची अशीच समजूत होत जावी व आह्माविषयीं तिरस्कार वाटत जावा ह्मणून होईल तित- तकी खटपट करीत आहेत. हिंदुस्थानात सारे लोक एक होत आहेत, आमच्या फौजांचे पराभव होत चालले आहेत, आमचे मित्र आमचा पक्ष सोडूं लागले आहेत आणि आमचें सैन्य बिथरलें आहे, अशा प्रकारच्या बातम्या सक्त मेहनत घेऊन पसरीत आहेत आणि त्या लोकांना खऱ्या वाटत आहेत."

बाजीरावसाहेबांनीं पुष्कळ फौज जमविली आहे, वगैरे एल्फिन्स्टनसाहेबानें गव्हरनर जनरलाला ज्या खलित्यानें कळविलें त्यांत असें लिहिलें आहे:—"ही एवढी तयारी कशाकरिता चालली आहे, असें पेशव्यांस विचारलें तर सर जॉन मालकम् साहेबाने आपला जो बेत चालला आहे ह्मणून सांगितलें तो 'सिद्धीस नेण्याच्या उद्देशानेंच असें उत्तर देतात. परंतु सध्यां जी फौज जमली आहे, ती त्या कामाला वास्तविक जितकी लागेल तिच्या दुप्पट आहे. पेशवे आणखी ज्या कित्येक गोष्टी करीत आहेत,

त्या पेंढाऱ्यांपासून आपल्या मुलखाला उपद्रव लागूं नये ह्मणून ज्या गोष्टी करावयाच्या त्यांच्याशीं कांहीं संबंध नाहीं अशा प्रकारच्या आहेत. साताऱ्या महाराजांची मनोधारणा याच प्रकारची समजावयाची. पेशवाई स्थापन झाल्यापासून कधीं कोणाच्या मनांत आलीं नसतील इतकीं हल्लीं त्यांचीं आर्जवें चालली आहेत. बाजीराव आपले बंधु व मोठमोठे सरदार यांची ही मर्जी संपादीत आहेत. ते व त्यांच्या पदरचे मोठमोठे लोक आपली चीजवस्त पुण्यांतून बाहेर सुरक्षित स्थळीं नेऊन ठेवण्यांत गुंतले आहेत. ”

जनरल स्मिथ याला आपल्या हाताखालचीं पलटणें घेऊन हिंदुस्थानांत निघून जाण्याचा हुकूम झाला, त्याप्रमाणें तो चालता झाला; परंतु बाजीरावाची तयारी पाहून त्याला काळजी उत्पन्न झाली. आपली फौज निघून गेली ह्मणजे पेशवे निर्भय झाले, मग त्यांनीं जर कांहीं गडबड केली तर फार जड जाईल याजकरितां सारें सैन्य उत्तरेस नेऊन पिछाडी अशी मोकळी टाकणें अगदीं धोक्याचें आहे, असें एल्फिन्स्टन साहेबाला सांगून त्यानें सरकारास एक सणसणीत पत्र लिहिलें आणि तें रवाना करण्याकरितां त्याजकडे पाठविलें. एल्फिन्स्टन साहेबानें तें वाचून पाहून लागलेंच तारीख ५ आक्टोबर रोजीं त्याला उत्तर पाठविलें; त्यांत त्यानें लिहिलेल्या साऱ्या गोष्टी कबूल करून पुढें ह्मटलें, “ असें जरी आहे तरी मला खरोखर असें वाटतें कीं, हे कडक शब्द वाचून सरकारास राग आल्यावांचून राहणार नाहीं. पिछाडीचा बंदोबस्त नीट राहिलाच पाहिजे, हें तुमचें मत मान्य करून तुह्मांला अजिंक्याच्या अलीकडेच टेंवितील, परंतु त्याचा परिणाम एवढाच होईल कीं, पुढच्या मोहिमेंत तुह्मांला आपला मोठा पराक्रम दाखविण्याची संधि आलेली स्वहस्तानें घालविलीत असें होईल आणि शिवाय तिकडे त्यांचे जे मूळ बेत ठरलेले आहेत, त्यांना विघ्न आणल्याचा दोष तुमच्या माथीं ठेवितील. पेशव्यांना पाहिजे तशी फौज जमवूं देऊन आह्मी आपली ह्या मुलखांतून बाहेर जाऊं देतों, तेव्हां त्यांच्या मनात आल्यास आपलें हित साधून घेण्यास त्यांना चांगली सवड मिळेल. आह्मी होऊन आपल्यावर संकट आणून घेत आहों हें खरें, परंतु तुमची फौज न गेली, तर तुह्मांकडे नेमलेलें काम करण्यास सर टॉमस हिस्लॉप अडकून राहणार, त्या पेक्षां मला हें संकट पुरवलें. मालकम येथें असतांना आह्मी जो बेत सांगत होतों तो सर्वांनाच खरोखर उत्तम होता. परंतु माझा बेत आहे तो नीट सिद्धीस गेला तर चालेल. तुह्मांकडून पुनः

लिहून येईपर्यंत पत्र ठेऊन घेतों. नीट विचार करून लिहा ह्मणजे त्याप्रमाणें तें पुढें पाठवीन किंवा फाडून टाकीन.”

तारीख १४ आक्टोबर रोजीं एल्फिन्स्टन साहेबाची व बाजीरावाची भेट झाली तेव्हां ते पूर्वीप्रमाणें आतांच्या तहनाम्यानें आपला मुलूख गेला, अप्रतिष्ठा झाली वगैरे बोलले, तरीपण इंग्रजसरकारची व आपली पहिली दोस्ती, आपल्यावर त्यांचे उपकार आहेत व ते आपण स्मरत आहों, वगैरे बोललेच. आपली फौज सरकारच्या मदतीस सरहद्दीवर गेली पाहिजे, असें कारभाऱ्यांबरोबर तो श्रीमंतांस वरचेवर निरोप पाठवीत असे, त्यांचें उत्तर ‘ पाठवितों ’ असेंच येत असे. ह्या भेटींत त्याने ती गोष्ट पुन: काढली, तेव्हां दसरा होण्याबरोबर फौज रवाना होईल असें त्यांनीं उत्तर दिलें.

पुढें पांच दिवसांनी, तारीख १९ रोजीं, दसरा आला. त्या दिवशी श्रीमंतांच्या स्वारीचा डौल आणि फौजेचा थाट असा कांहीं उत्कृष्ट बनला होता कीं, बाजीराव साहेब गादीवर आल्या दिवसापासून तसा केव्हांच पुण्याच्या दृष्टीस पडला नव्हता; आणि त्यांत दोन गोष्टी विशेष नजरेस आल्या. रेसिडेंट साहेब आपल्या लव्याजम्यानिशीं सालाबादप्रमाणें समारंभाला आले होते, ते ह्मणजे क:पदार्थ, आपल्या खिसगणतींत नाहींत, असें बाजीरावांनीं लोकांना दाखविलें ही एक, आणि स्वारी बाहेर निघाल्याबरोबर नारोपंत आपटे आपलें पथक घेऊन जे भरधांव निघाले ते इंग्रजांचीं पलटणें उभीं होतीं त्यांच्या एका बाजूवर जाऊन पडतात असें वाटले, परंतु तसें कांहीं न करतां तेथून गर्रकर माघारे फिरले ही दुसरी. नारोपंतानें जी ही कवाईत केली तिचा उद्देश एवढाच होता कीं, पलटणांतल्या शिपायांनीं घाबरानें आणि ह्या भालेबरचीवाल्या अफाट सेनासमुद्रांत आपण बुडून जाऊं असें त्यांस वाटावें, आणि श्रीमंतांचीं गुप्त कारस्थानें चाललीं होतीं त्यांना जोर यावा. त्यांची ती फौज आणि सरदार आतां इंग्रजांना आपण सहज चिरडून टाकूं अशा मोठ्या तोऱ्यांत होते. मनांत कांहीएक अंदेशा न आणतां, स्वस्थपणें आपल्यापुढें उभ्या असलेल्या ह्या दुर्बळ तीन पलटणींपैकीं एकीच्याच हातून तीन महिन्यांच्या आंत आपली अगदीं धूळधाण उडून जाणार आहे असें एका देखील बिचाऱ्याच्या मनांत स्वप्नांतसुद्धां आलें नसेल. तसें कोणी भविष्य सांगता तर त्यांतला एक तरी कोणी तें ऐकून घेता ?

जनरल स्मिथ निघून गेल्यानंतर मुंबईहून एक गोरें पलटण पुण्यास यावयाचें ठरलें होतें, त्याप्रमाणें त्याची तयारी चालली होती. तें ऑक्टोबर संपतां संपतां येऊन पोहोंचावयाचें होतें.

तारीख २१ चा एल्फिन्स्टनसाहेबाचा रोजनामा एवढाच आहे–'परवां दसरा झाला. १०००० घोडा बाहेर निघाला होता. छान मौज दिसत होती. आह्मी पुनः मेजवान्या करूं लागलो आहों; काल रात्रीं मंडळी छान जमली होती, चांगली मजा झाली.'

तारीख २२. पेशवे लढाईची तयारी उघडपणे करीत आहेत, आणि डौलही दाखवितात. गुप्त बेत चालले आहेत, कट होत आहेत, बंडें होत आहेत, खून होत आहेत, अशा हजारों बातम्या येत आहेत आणि इशारे होत आहेत. परंतु आंत खरें पाहूं गेलें तर असे असावेसे दिसतें कीं, पेशवे-साहेबांच्या मनात परभारें लावालावी करून आमचा जरा कोठे पराभव झाला तर आपला हात साधून घेण्याला तयार असावें.

दसऱ्यापासून एक एक दिवस अधिकाधिक महत्त्वाचा होत गेला. २५ तारखेला तर चोहींकडून पुण्यांत फौज येऊं लागली; रात्रंदिवस सारखी रव लागली. आपल्या फौजेवर मोठें संकट गुदरतें असें एल्फिन्स्टन साहेबाला वाटूं लागलें. पुण्याचा बंदोबस्त नीट ठेवता यावा ह्मणून सर आर्थर वेलेस्लीनें शहराला अगदी लागून, उत्तरेच्या बाजूला प्रथम जेथें छावणी केली होती, तेथेंच ती अजून होती. परंतु तेव्हांच्या आणि आताच्या स्थितींत अंतर फार पडलें होतें; भोंवतालीं आवारें, वाडग्या, निवडुंगाचे फड वगैरे पुष्कळ अडचण होऊन हल्ल्याला आणि फितुरांना पळून जाण्याला मोठी सोय झाली होती. ह्मणून तेथून तळ उठवावा असें एल्फिन्स्टन साहेबाच्या मनांत होतें आणि त्याप्रमाणें त्याने पेशव्यांस कळविलेही होतें. परंतु ही फौज येथून काढून दूर नेलीत तर पुणें उघडें पडेल, बंदोबस्त नाहींसा होईल, असें ते ह्मणत आणि आतां विशेष आग्रहानें ह्मणूं लागले. त्यांचे थोडे थोडे स्वार आसपास जाऊन उतरूं लागले; थोड्याच दिवसांत त्यांची संख्या पुष्कळ झाली. गोसाव्यांचें एक पलटण एका बाजूस जाऊन उतरलें. विंचूरकरांची फौज, कांहीं स्वार व तोफा सुद्धां, रेसिडेन्सीच्या आणि भांबुरड्याच्या मध्येंच जाऊन बसली.

तारीख २७ चा एल्फिन्स्टन साहेबाचा रोजनामा असा आहे.––माझा जीव घेण्याचे आणि लढाई करण्याचे बेत चालले आहेत, ह्मणून सावध अस-

ण्याविषयीं मला पुष्कळ सूचना आल्या. अखेर आमचें सैन्य फितूर करण्याची खटपट पेशव्यांनीं चालविली असल्याबद्दल मला अगदीं पक्की, निरनिराळ्या बाजूंनीं बातमी लागली. फितुरीचें काम नीट सिद्धीस जावें ह्मणून आमची छावणी त्यांनीं आपल्या सैन्याकडून अगदीं बहुतेक वेढून टाकली आहे. मी हें घडूं दिलें नसतें, परंतु शिंद्याबरोबर तह ठरतो आहे, तो पुरा होईपर्यंत मला येथें अगदीं स्नेह दाखविला पाहिजे. त्रिंबकजीनें पुन्हां लढाईची तयारी चालविली आहे, आणि साऱ्या देशाला भीति उत्पन्न झाली आहे. खरोखर अशी संकटावस्था मला केव्हांही प्राप्त झाली नव्हती, त्यामुळें सहजच मोठी काळजी उत्पन्न झाली आहे. परंतु यावेळी मी दुसऱ्या कोठे असतों तर बरें होतें असें माझ्या मनांत केव्हांही येत नाहीं. पेशव्यांनीं चालविलेले सारे बेत लटपटवून टाकून मी नांव मिळवीन. आजची एक, उद्याची आणि परवांची अशा तीन रात्री पार पडतील तर आमच्यावर आतां जो हा कठीण प्रसंग गुदरला आहे यांतून मी चांगला पार पडेन आणि साऱ्यांना पार पाडीन असें मला खास वाटतें. मी आपले कांहीं गुप्त कागदपत्र जाळून टाकले. आतां कांहीं तशी फिकीर नाहीं. आज वारा आणि पाऊस याची मोठी गर्दी आहे. पेशव्यांना आमच्यावर तुटून पडण्याला आजच्या रात्री सारखी संधी मिळावयाची नाहीं."

एल्फिन्स्टनसाहेबाची काळजी दिवसेंदिवस वाढत चालली होती. मुंबईहून गोरी पलटण यावयाला निघाली आहे ती येऊन दाखल होण्यापूर्वी इंग्रजांच्या छावणीवर हल्ला करावा आणि आपलें काम फत्ते करून घ्यावें असा बाजीरावाचा आणि त्याच्या मुत्सद्दीमंडळीचा खल कितीएक रात्री चालला होता. अखेर तारीख २८ रोजी रात्रीं तसें करण्याचें ठरून तोफांना बैल जुंपले, घोड्यांवर सामानें पडलीं आणि पायदळ तयार होऊन उभें राहिलें आहे अशी मध्यान्हीच्या जरा आधीं एल्फिन्स्टन साहेबाला बातमी येऊन पोहोंचली. तेव्हां आतां कसेंही असो, निदान आपले प्राण वांचविण्याकरितां आपण तयार होऊन त्याच्यावर जाऊन पडावें कीं नाहीं, असा क्षणमात्र त्याला विचार पडला. ती घटका मोठ्या काळजीची होती. इंग्रजी छावणींत आणि रेसिडेन्सी बंगल्यांत जिकडे तिकडे सामसूम होतें. पुष्कळ दिवस शांतता असल्यामुळें लोकांना निर्वेधपणें घोरत पडण्याची संवय लागली होती, त्याप्रमाणें ते सारे स्वस्थ झोंप घेत पडले होते. एल्फिन्स्टन

साहेबाला मात्र चैन नव्हतें. पेशव्यांच्या लष्करांत शहराच्या दक्षिणेस, सारी गडबड आणि आरडाओरड चालली होती ती ऐकत तो गच्चीवर उभा राहिला होता. त्याच्याजवळ कायतो एक ग्रँटडफ साहेब होता. त्यानेंच त्या प्रसंगाचे हें वर्णन केलेलें आहे. तो ह्मणतो:—'एल्फिन्स्टन साहेबानें हा वेळपर्यंत पेशव्याच्या विश्वासघातकीपणाचा आपल्याला संशय आल्याचें यत्किंचित् चिन्ह दिसूं दिलें नव्हतें. परंतु आपण मालकम् साहेबाच्या सांगण्यावरून बाजीरावावर विश्वास ठेऊन बसलों आणि तो वाजवीपेक्षां फाजील ठेवला ही चूक केली असें त्याला बहुधा वाटलें असावें. कारण त्यामुळें आतां असा प्रसंग येऊन ठेपला कीं, आपल्या सैन्याची निजल्याजागा कत्तल उडेल; आपण शिपाई, हातांत शस्त्र घेऊन मेलो तर फिकीर नाहीं इतकी मनाची उगाच समजूत करण्याचीसुद्धां त्या बिचाऱ्यांना संधी राहिली नाहीं त्या निर्वाणीच्या प्रसंगीं त्याच्या मनांत दुसऱ्या कित्येक गोष्टी आल्या आणि पुढे काय होतें तें पहात स्वस्थ बसण्याचाच त्यानें निश्चय केला. बाजीरावाला राजेरजवाडे ओळखून आहेत, तेव्हा ते त्याच्यावर विश्वास ठेवणार नाहींत; शिंदा त्याला चांगलाच ओळखतो आहे, ह्मणून श्रीमंतांनीं आमच्याशीं लढाई उघडपणें आरंभिल्याशिवाय तो युद्धाला प्रवृत्त होणार नाहीं, अशी त्याची दृढ समजूत होती; गव्हरनर जनरलाचे बेत काय आहेत, ग्वाल्हेर मुक्काम्यानें जाऊन वेढण्याची तयारी कशी आहे हे त्याला कळलेले होतें; परंतु अनेक कारणांनीं ते विचार जरा लांबणीवर पडले असतील असें मनांत येऊन, जेणेंकरून शिंद्याबरोबर बोलणें चाललेला तह ठरण्यास हरकत येईल, किंवा त्याचे गुप्त हेर पुण्यांत आहेत त्यांना आतां येथें लढाई खास सुरू होते असें वाटेल असें दिसूं द्यावयाचें नाहीं, असा त्याचा निश्चय होता. तेवढ्या रात्रीं पलटणींना तयार व्हा ह्मणून हुकूम पाठवावा तर पुष्कळ गडबड उडणार, आपल्या हेरांकडून बातम्या येत आहेत त्यांवरून पेशवे अद्याप विचारांत गुंतले आहेत आणि रात्र तर हळु हळु निघून चालली आहे, शहराकडून गलबला ऐकूं येत होता तो थोडा थोडा कमी होऊं लागला आहे इत्यादि गोष्टी मनांत आणून आणखी कांहीं तास तरी स्वस्थ बसावयाचें, हालचाल करावयाची नाहीं असा त्याचा निर्धार झाला. मुंबईहून जें पलटण येत होतें त्यावरचा अम्मलदार मेजर उइलसन याला 'इकडे आह्मांवर कठीण प्रसंग आहे, येववेल तितकें लौकर धांवत या' असा निरोप गेलाच होता आणि त्याप्रमाणें तो घाई करीतच होता."

ती रात्र पार पडेपर्यंत एल्फिन्स्टनसाहेबाच्या जिवांतजीव नव्हता. मग धीर आला. सकाळीं त्यानें लष्करांत हुकूम पाठविला कीं, जागच्याजागीं तयार असा, परंतु यत्किंचित् गडबड दिसूं देऊं नका; मग तिसऱ्या प्रहरीं मेजर फोर्डबरोबर त्यानें बाजीरावाला सांगून पाठविलें कीं, आपले स्वार आमच्या छावणीला अगदीं येऊन भिडत आहेत, हें चांगलें नाहीं. छावणी करण्याची अशी आजपर्यंत रीत नाहीं. अशानें माणसामाणसांत सहज कटकट होईल ह्मणून आह्मी आपले लोकांस जागच्याजागीं बसावयास सांगितलें आहे, परंतु आपण आपल्यांस मागें हटवा; तेथून काढा. हा निरोप ऐकून दरबार गडबडलें. बापू गोखला ह्मणूं लागला आतां फुरसत देऊन उपयोगीं नाहीं, यावेळीं जाऊन हल्ला केला पाहिजे. पण बाजीरावाला धीर होईना. तो ह्मणूं लागला जरा थांबा, थोडी फुरसत द्या ह्मणजे इंग्रजांचीं पलटणें आमच्याकडे खचित येतात. मुंबईचें गोरें पलटण कांहीं इतक्यांत येत नाहीं, तें अजून दूर आहे; आमची फौज वाढत चाललीच आहे. याप्रमाणें बाजीरावानें प्रसंगीं भित्रेपणा धरून इंग्रजांना चांगलाच हात दाखविण्याची ती जी एक शेवटची खरोखर उत्कृष्ट संधी होती ती अगदीं फुकट घालविली. मोठी लढाई करावी न लागतां फंद फितुरानेंच आपल्याला अनायासें जय मिळेल अशी त्याच्या मनाची अगदीं शेवटपर्यंत समजूत होती. हा भित्रा माणूस आज उद्यां करीत बसणार ही त्याची गोम एल्फिन्स्टनसाहेबानें नीट ओळखिली ह्मणूनच आणखी दोन दिवस कसेतरी काढूं असा त्याला दम होता. त्याप्रमाणें तो दिवस आणि रात्र दरबारच्या विचारांतालींच गेलीं. पुढें तारीख ३० रोजीं संध्याकाळीं चार वाजतां मुंबईचें पलटण येऊन दाखल झालें, आणि एल्फिन्स्टन साहेबाची काळजी दूर झाली.

तारीख ३१ चा त्याचा लेख असा आहे—"पेशवे काय करणार हें मला माहीत नव्हतें, परतु त्यांच्यानें काय करवेल हें कळत होतें. ह्मणून तारीख २९ पर्यंत मी काळजींत होतों, आणि फौज हुशार असूंद्या असें सांगितलें आणि मुंबईच्या पलटणास लौकर बोलाविलें. आमची तयारी पाहून पेशव्यांनींही तशीच केली. आमच्यावर आतां हल्ला येतो, घटकेनें येतो, अशी सारी रात्र काळजी वाटत होती. काल गोरें पलटण आलें आणि उद्यां फौज खडकीस जाते. मग आमचे शिपाई फितविण्याचा जो उद्योग चालला आहे तो आह्माला

१६-१५४-२०००

बंद करतां येईल. जे लोक ती खटपट करीत आहेत त्यांना आणि त्यांना जे सामील झाले आहेत त्यांना कदाचित् शिक्षाही करतां येईल. २९ तारखेला जेव्हां मी आपल्या मनाचा निर्धार करीत होतों आणि साऱ्याच गोष्टी आह्मांला अगदीं प्रतिकूलशा दिसत होत्या तेव्हां शत्रूच्या सैन्याची दाणादाण उडवून दिली, बंडें मोडून टाकलीं, ह्मणजे जी कीर्ति होत असते, ती मनांत येऊन त्या विचारांत मी अगदीं दंग होऊन गेलों होतों. परंतु पेशव्यांनीं कांहींच केलें नाहीं असें जेव्हां मला दिसलें तेव्हा आतां माझे सारे बेत व्यर्थ गेले ह्मणून मला लाज वाटूं लागली. " अति उच्च पदापासून खालीं हास्यास्पद-स्थानीं येण्याला फार कांहीं लागत नाहीं; एक पाऊल चुकलें ह्मणजे झालें. "

मुंबईचें पलटण येण्याबरोबर आतां आपली छावणी येथून उठवून दोन कोस दूर खडकीस न्यावयाची असें एल्फिन्स्टन साहेबानें ठरविलें. पेशव्यांशीं बेबनाव होण्याची वेळ येईल तर छावणीला ती जागा सर्व तऱ्हांनीं चांगली असें जनरल स्मिथ यानें मागेंच सांगितलें होतें. तुमच्या स्वारांची आमच्या छावणीजवळ अगदीं गर्दी होत चालली याजकरितां आह्मीं आपलीं पलटणें तेथून काढून दूर नेतों असा बाजीरावाकडे निरोप पाठवून तारीख १ नोव्हेंबर रोजीं त्यानें त्यांना खडकीस पाठवून दिलें; आपला बंगला शहरालगत ह्मणून रक्षणाकरितां २५० शिपाई ठेवून घेतले. याप्रमाणें तयारी झाल्यावर आतां आपण कांहीं नांव काढावयाचें नाहीं, हल्ला आला ह्मणजे पहातां येईल असें ह्मणत तो स्वस्थ बसला. एक प्रबळ एक दुर्बळ अशांची जेव्हां गांठ पडते तेव्हां अशक्तानें सशक्ताच्या वाटेस जाणें ह्मणजे फार गैर, असेंच कोणी झालें तरी म्हणतें, आणि त्यांत त्याला थप्पड बसली ह्मणजे त्याचें सहजच हंसें होतें; परंतु तोच प्रकार उलटा झाला ह्मणजे विलक्षण मौज होत असते, हें ध्यानांत धरून तो बेटावरून हालला नाहीं. त्याचा खून होण्याच्या बातम्या येतच होत्या आणि त्या केवळ निराधार बकवा नव्हत्या. पण तो थोर, भ्याला नाहीं; ह्या खोट्या आहेत असेच ह्मणें. अखेरपर्यंत त्याला तसेंच वाटत होतें, हा त्याच्या मनाचा खरा थोरपणा होय.

पलटणें खडकीवर गेलीं असें पाहून श्रीमंताची फौज फुशारली आणि इंग्रज आह्मांला भ्याला असे समजून हवें तें बडबडूं लागली. तिनें त्यांची छावणी लुटली. लेफ्टनंट शॉ मुंबईला चालला होता त्याला पेशव्यांच्या हुजरातींतल्या विश्रामसिंगनामक स्वारानें गाठून दिवसा ढवळ्या लुटून

आल्यानें भोंसकलें. कारभारी मंडळी मोठ्या तोऱ्यानें बोलूं लागली. खडकीच्या आणि जुन्या छावणीच्या मध्यें जाऊन तळ द्यावयाचा ठरवून त्याप्रमाणें करण्यास कांहीं स्वार गेले. तेव्हां एल्फिन्स्टन साहेबानें श्रीमंतांस निरोप पाठविला कीं, आतां जर आपले लोक दडपीत दडपीत आमच्या फौजेच्या सरसे येतील तर आम्ही त्यांना शत्रू समजूं. श्रीमंतांनीं पलटणें फितूर करण्याचें काम चालविलें होतें तें चांगलें साधलें आहे असें त्यांना वाटत होतें, आणि त्यांचे त्या कामांतले बातमीदार त्यांना जें सांगत त्यावरून आता सारे शिपाई आपल्याला अनुकूल आहेत असा त्यांचा समज झाला व लढाईला आरंभ करण्यास हरकत नाहीं, आपला जय खास होणार असें त्यांना वाटूं लागलें.*

श्रीमंतांना आपली तयारी झाली असें वाटत होतें. तरी ते आणखी फौज येण्याची वाट पहात होते ह्मणून घाई नको ह्मणत होते. पटवर्धन आणि निपाणकर देसाई इतक्यांत येतील असें त्यांना वाटत होतें, परंतु ते येण्यापूर्वीच गोष्ट निकरावर आली. जनरल स्मिथ खानदेशांत निघून गेला होता, परंतु त्याला पुण्याची काळजी मोठी होती. हिस्लॉप साहेबाच्या हुकुमाची वाट न पाहतां त्यानें आपली फौज गोदातीरीं पुणतांब्यास एकत्र केली. पुण्यांतून जातांनाच एल्फिन्स्टन साहेबाचें व त्याचें असें ठरलें होतें कीं, इकडून कांहीं बातमी कळली नाहीं तर लढाई जुंपली असेंच समजावें. त्यानें एक सडे

---

* पलटणांतले शिपाई फितूर करण्याची खटपट फार चालली होती व खर्चही फार होत होता. परंतु कंपनी सरकाराशीं बेईमानपणा त्यांतल्या कोणी एकानेंही केला नाहीं. उलट सारी हकीगत आपल्यावरील गोऱ्या अम्मलदारांस शिपाई कळवीत होते. शेख हुसेन ह्मणून एक जमादार होता, त्याला पैशाची लालूच दाखविलेली त्यानें लेफ्टनंट बिल्मोर यास कळविली, तेव्हां त्यानें तूं होय ह्मण आणि पैसा देतील तो घेऊन ये, असें त्याला सांगितलें. मग श्रीमंतांच्या बोलावण्यावरून तो त्यांजकडे गेला. त्यांनीं मोठालीं वचनें दिलीं आणि १०००० रुपये देण्याला एका कारकुनाला सांगितलें. त्यानें त्याला निम्मेच दिले आणि निम्मे आपल्या खिशांत टाकले. तो जमादार तें ५००० एका तांदुळांच्या पोत्यांत घालून लेफ्टनंट बिल्मोर याजकडे घेऊन गेला. पुढें लागलीच लढाई सुरू झाली.

पलटण ( light battalion ) घोडनदीवर माघारें लावून दिलें होतें तें आणि मदतीच्या रिसाल्याची ( auxiliary horse ) एक तुकडी एल्फिन्स्टन साहेबानें तारीख ३ रोजीं पुण्यास बोलाविली. तें वर्तमान दुसऱ्या दिवशीं बाजीरावास कळलें तेव्हां आतां हल्ला करण्याला उशीर लावावयाचा नाहीं, असा त्यांचा निश्चय झाला; उद्यां करावचाच असें ठरलें.

तारीख ४ रोजीं श्रीमंतांचें दिवाण मोर दीक्षित मेजर फोर्ड साहेबाला भेटावयास गेले. त्याला ते आपला मित्र समजत ह्मणून त्याच्या जिवाची त्यांना काळजी पडली होती. तुमचे सारे शिपाई श्रीमंतांकडे फितले आहेत आणि सारे गोरे कापून काढावयाचे, एक माणूस सोडावयाचा नाहीं असा त्यांचा बेत आहे, तुम्ही त्यांत न शिरतां बाजूस रहाल तर तुमची चीजवस्त, मुलेंमाणसें निभावतील; असें सांगू लागले. तें ऐकून तो ह्मणाला तसें कांहीं होणार नाहीं, मी आपल्या जातभाईंत आतां जातों. 'तर तुमची आमची ही शेवटची भेट' असें अगदीं गहिंवरून ह्मणून माझ्या हातून निदान तुमच्या मुलामाणसांचें रक्षण होईल तर मी करीन, असें सांगून दीक्षित आणखी ह्मणाले लढाईचा प्रसंग मोठा कठीण, जयापजयाचा नेम काय? आह्मांवर बेतेल तर तुह्मी माझें रक्षण केलें पाहिजे. मला वचन द्या, असें त्यानें म्हटल्यावरून फोर्ड साहेबानें तत्काळ वचन दिलें.*

मेजर फोर्ड जरी रोज शहरांत जात असे आणि दरबारची स्थिति एल्फिन्स्टनसाहेबानें त्याला सांगितली होती, तरी मोर दीक्षिताच्या तोंडची बातमी कळेपर्यंत बाजीराव लढाईला प्रवृत्त होणार नाहींत असेंच त्याला वाटत होतें; ह्मणून आतां त्याला मोठें आश्चर्य आणि तसेंच भयही वाटलें. एल्फिन्स्टन साहेबाला त्यानें तें वर्तमान तत्काळ अगदीं धांवत जाऊन सांगितलें असेल यांत संशय काय?

तारीख ५ रोजीं सकाळीं सात वाजतांच श्रीमंतांची तयारी होऊं लागली. परंतु ती एल्फिन्स्टनसाहेबाला कळूं देऊं नये आणि भ्रमांत पाडावें ह्मणून

---

* दीक्षितांनीं आपल्या मित्राकडून वचन घेऊन आपल्या जिवाला अपाय होऊं नये असा बंदोबस्त करून ठेविला होता. परंतु भवितव्यता कोणाच्या स्वाधीन? ह्या स्नेह्याच्या हाताखालच्याच पलटणाबरोबरच्या एका तोफेचा गोळा लागून बिचाऱ्याचा प्राण गेला.

त्यांनीं त्याला कित्येक निरोप सांगून पाठविले. ते असे-' खडकीस तुमची फौज हत्यारबंद होऊन राहिली आहे हें ऐकून आमच्या फौजेस भीति उत्पन्न झाली आहे; आह्मी पर्वतीस दर्शनाकरितां जाणार आहों तेव्हां दुतर्फा फौज सलामीकरितां उभी रहात आहे. '--तिसऱ्या प्रहरीं सारी तयारी झाली. झाडून सारे थोरथोर कामदार वाड्यांत जमले, तेव्हां बापू गोखल्याच्या मसलतीवरून श्रीमंतांनीं खुद्द आपल्याजवळ असणाऱ्या विठोजी गायकवाडाबरोबर एल्फिन्स्टनसाहेबाला सांगून पाठविलें कीं, ' तुह्मी पुण्यांत इतकी फौज जमवीत अहा हें पाहून आह्माला फार राग आला आहे; गोरें रेजिमेंट आणलें आहे, तें माघारें लाऊन द्या; काळी फौज कमी करून नेहमीं असावयाची तितकी ठेवा आणि ती आह्मी दाखवूं त्या जागीं राहिली पाहिजे. याप्रमाणें जर न कराल तर आह्मी पुण्यांतून बाहेर जाऊं, ते मग कधीं माघारे येणार नाहीं. एल्फिन्स्टन साहेबानें तें ऐकून घेऊन त्याला सांगितलें, " आपल्या यजमानाला जाऊन असें सांग कीं, गोरें रेजिमेंट लाऊन द्या ह्मणण्याचा आपल्याला अधिकार नाहीं मी सडें पलटण (light battalion) आणलें आहे तें अशा अशा कारणाकरितां. तुह्मी वचन दिल्याप्रमाणें आपली फौज सरहद्दीवर पाठवून द्या ह्मणजे कोणालाच कांहीं बोलण्याचें कारण राहणार नाहीं. श्रीमंत निघून लष्करांत गेले, तर मीही संगम सोडून आपल्या लष्करांत जाईन." एल्फिन्स्टनसाहेबाबरोबर पुष्कळ बोलत बोलत विठोजी बराच वेळ राहिला. कारण त्याला बोलण्यांत गुंतवावें ह्याच उद्देशानें तो आला होता. अखेर ' तुह्मीं श्रीमंतांचें ऐकिलें नाहीं तर परिणाम चांगला होणार नाहीं. ' असें सांगून तो निघून गेला. इकडे तितक्या वेळांत श्रीमंतांनीं वाड्यांत जमलेल्या कामदार मंडळींस लष्करांत लाऊन दिलें आणि खासा स्वारी पर्वतीवर जाऊन बसली; विठोजी निघून जातो इतक्यांत एल्फिन्स्टन साहेबाला बातमी आली कीं, शहरच्या पश्चिमबाजूकडून पेशव्यांची फौज बाहेर पडून चालून येत आहे. आपल्या बंगल्याचें संरक्षण करावें असें त्याच्या मनांत होतें, परंतु विचाराअंतीं चारचौघांचे मतें तें होणें अशक्य दिसलें. तेव्हां सारे असामी स्वार होऊन आतां खडकी गांठावी असें ह्मणून निघाले, आणि नदी उतरून पार झाले. मुळानदी खडकीकडून S अशावळणानें येऊन मुठेला मिळाली आहे. रेसिडेंटाचा संगमावरचा बंगला आणि खडकी तिच्या एकाच बाजूस, परंतु पल्ला दूर; जवळच्या मार्गानें जाणें तर नदी दोनदां

उतरली पाहिजे. पैकीं खडकी गावाजवळ पूल होता ह्मणून पुनः उतरण्याची काळजी नव्हतीच, आणि मागून अंगावर चालून येणाऱ्या फौजेला अंतरही पुष्कळ पडलें. शहरांतून जाणारी फौज रेसिडेन्सी बंगल्यांतून दिसत नव्हती आणि तिचा बेत त्या बंगल्याच्या आणि खडकीवरच्या लष्कराच्या मध्येंच अचानक जाऊन उभें रहावें असा होता, ह्मणून त्यांनीं तेथपर्यंत जाईतों कोणाला कांहीं इजा केली नाहीं. संगमावर जाऊन पहातात तर बंगला रिकामा, आंत कोणी नाहीं असें दिसलें तेव्हां त्यांनीं त्याला आग लाविली आणि एल्फिन्स्टन साहेबाचीं बुकें, कागदपत्र, चीजवस्त, सामानसुमान वगैरे जें काय होतें त्याची होळी उडविली. त्याच्या अंगावर कपडे होते तेवढे कायते त्याच्या बरोबर गेले होते.

एल्फिन्स्टन नदी उतरून पार झाला, तेव्हां त्याच्या बरोबरची कांहीं मंडळी शत्रूंची टेहळणी करण्याकरितां जवळच्या टेंकडीवर गेली. तेथून तें खालचें सारें मैदान त्यांना मोठें विचित्र दिसलें. त्याच्या पश्चिमेस ती लहान लहान टेंकड्यांची रांग लागत गेलेली, पूर्वेस पुणें शहर आणि लहान लहान टेकड्या असून त्यांच्यावर कांहीं पायदळचे लोक उभे होते; मध्यें शेतें असून पीक तयार उभें होतें. तें बहुतेक मैदान स्वारांनीं अगदीं फुलून गेलें असून शहरांतून साऱ्या वाटांनीं आणखी स्वारांचे लोटच्या-लोट येत होते. ग्रांट डफ् साहेबानें तो अफाट सेनासमुद्र डोळ्यांनीं पाहिला होता. तो ह्मणतो—"पेशव्यांच्या सैन्याचा जो लोट आला तो माझ्या डोळ्यांना कसा दिसला त्याचा बरोबर तर्क खंबायतच्या अखातांतला घोडा * ज्यांनीं पाहिला असेल आणि ती भरती कशी फोफावत येते ते ज्यांनीं नीट लक्ष लाऊन पाहिलें असेल त्यांना मात्र करतां येईल. त्या दिवशीं उष्मा फार असून तिसऱ्या प्रहरची वेळ झालेली होती; जिकडे तिकडे अगदीं सामसूम होतें. घोड्यांच्या दौडा, टापा, खिंकाळणें आणि तोफांच्या गाड्यांच्या चाकांचा धडघडाट, या-शिवाय कांहीं ऐकूं येत नव्हतें. तो सेनासागर अकस्मात् पसरूं लागलेला पाहून शेतांत निर्वेधपणें कामकाज करीत असलेले शेतकरी हातचें काम टाकून पळूं लागले; जुंपलेले बैल मानेवरील जूं मोडून फेकून देऊन धाऊं लागले, हरणें

* भरतीच्या वेळेस एक मोठी प्रचंड लाट येऊन पसरते तिला घोडा (Bore) ह्मणतात. खंबायतशिवाय कलकत्त्याजवळ हुगळीमध्यें मात्र ही येत असते.

रानांत खुशाल झोंप घेत पडलेली दचकून उठून घाबरून चौखुर भरधांव पळत सुटली आणि थोडें दूर गेल्यावर क्षणमात्र मागें मुरडून हा काय अनर्थ येत आहे ह्मणून पाहूं लागली, ती तर मोठी मौज दिसत होती." फौजेचा जो लोट आला तो शेतांचे कुंप, आंतलें उभें पीक वगैरे कशाकडे न पहातां जें पुढे आलें तें चटसारें तुडवीत गेला."

एल्फिन्स्टन साहेबानें खडकी गांवापुढची जागा स्वतः पाहून समर करण्यास हें अंगण ठीक आहे असें ठरविलें होतें. प्रसंग आल्यास केव्हांही मराठ्यांवर आपण चालून जाण्यांत विशेष फायदा आहे असें आपल्याकडील साऱ्या वीरांना त्यानें अगदीं पढवून ठेविलें होतें. संगमावरून निघाल्याबरोबर त्यानें आपला सेनापति लेफ्टनंट कर्नल बूर याला हल्ला करण्यास सांगून पाठविलें आणि आपणही जाऊन त्याला मिळाला. बाजीरावसाहेब पर्वतीवर बसून दुरून चमत्कार पहात होते, परंतु तेथेंच त्यांचे हातपाय गळाले. त्यांचा सेनापति बापू गोखला महावीर, स्फुरण पाऊन मोठ्या आवेशानें फौज पुढें घेऊन चालला आहे इतक्यांत श्रीमंतांनीं आपल्या ब्रीदास शोभे असा,—लढाई सुरू करूं नको असा,—त्याला निरोप पाठविला. हरकारा दृष्टीस पडतांच तो येऊन काय सांगणार हें गोखल्यानें ओळखिलें आणि आतां पाऊल माघारें घेणें अशक्य, हें जाणून तोफांची तत्काळ सरबत्ती केली. त्याबरोबर लढाई जुंपली. परंतु तो जें अफाट सैन्य घेऊन आला होता, त्याचा इंग्रजांच्या त्या एवढ्याशा फौजेनें थोडक्याच वेळांत पराभव करून त्याला पळवून लाविलें.

ह्या लढाईची तपशीलवार साद्यंत हकीगत ग्र्यांट डफ् साहेबानें आपल्या मराठ्यांच्या इतिहासांत दिली आहे ती जिज्ञासूंनीं वाचावी. तारीख ३१ आक्टोबरचा एल्फिन्स्टन साहेबाच्या रोजनाम्यांतला लेख मागें दिला आहे तेथून पुढची हकीगत त्यानें लिहिलेली आहे ती पुढें देतो.

"मी मनांत आणल्याप्रमाणें लष्कर काढून दुसरीकडे नेलें तेव्हां पेशव्याच्या लोकांना अतिशय आनंद झाला आणि ते उद्धट झाले. त्याच दिवशीं संध्याकाळीं गणेशखिंडींत एकानें शॉ साहेबाला लुटून भाल्यानें जखमी केलें. आमच्या छावणीला ते हव्या त्या तऱ्हेनें उपद्रव देऊं लागले, परंतु त्यांचें सरकार त्यांना कांहीं बोलेना. पेशव्याचे स्वार धांवत येऊन संगमाजवळ कवाईत करूं लागले. आह्मांला घाबरवण्याकरितां कीं काय मात्र नकळे. सारें काम अगदीं बंद पडलें, आणि दरबारचें भाषण व वर्तन मगरुरीचें, बहु-

तेक शत्रुत्वाचें दिसूं लागलें. त्यांची अशा प्रकारची वागणूक आणि आमची फौज दूर गेलेली पाहून आम्ही निर्बळ झालों असें वाटून लोक फुशारले आणि आमच्या लोकांना त्रास देऊं लागले. इतक्यांत मोर दीक्षितानें फोर्ड साहेबाला सूचना दिली, ती आणि दुसरीं चिन्हें दिसलीं तीं मनांत आणतांना पेशव्यांचा बेत आमच्यावर अकस्मात् तुटून पडण्याचा आहे, याविषयीं कांहीं शंका उरली नाहीं. मी इतका वेळ दम धरला होता, तो शिंद्याबरोबर तह झाला ह्मणजे सर्व कांहीं आपोआप बंदोबस्त होईल ह्या आशेवर. परंतु माझा गरीबपणा पाहून ते कुरापत काढूं लागलेसें दिसलें, तेव्हां मी सामोपचारानेंच तसें न करण्यास सांगितलें आणि सडें पलटण ( light battalion ) बोलाविलें. जनरल स्मिथ आपल्याच मतानें पुणतांब्यास फौज एकत्र करूं लागला; तें पेशव्यास कळलें, तेव्हां आमच्यावर लागलाच हल्ला करण्याचें त्यानें ठरविलें. तारीख ५ रोजीं सकाळपासून त्याची तयारी अगदीं जारीनें सुरू झाली, परंतु मला ती ऐकावयाची संवयच झालेली असल्यामुळें मीं तिकडे दुर्लक्ष केलें. संगमावर कांहीं तयारी नव्हती आणि तेथें जी बायकामंडळी जमली होती ती स्वस्थ होती. परंतु कांहीं गोष्टी कळल्या, त्यांवरून स्थिति भयंकर वाटूं लागली आणि मेजर पिंटोचें पलटण आमच्या आणि जुन्या छावणीच्या मध्यें, संगम तोफांनीं उडवून देतें असें वाटण्यासारखें जेव्हां येऊन उतरलें, तेव्हां दोन प्रहराला तों पेशव्यांचा हेतु बरा नसावा असा जबर संशय येऊं लागला. त्यामुळें मोठी काळजी वाटूं लागली. गोष्ट निकरावर आणावी अशी माझी इच्छा नव्हती, ह्मणून मी दीड वाजेपर्यंत अगदीं स्वस्थ राहिलों. त्यावेळीं विठोजी नाईक येऊन म्हणाला, तुम्ही आपली फौज पहिली होती तेवढी ठेवा, बाकीची कमी करा. तसें न कराल तर पेशवे लष्करांत निघून जातील. मी अर्थातच फौज कमी करीत नाहीं असें सांगितलें. तेव्हां तो ह्मणाला, श्रीमंत निघून गेले. संगम सोडून जाणें ह्मणजे अगदीं निकरावर येईल तेव्हांची, अखेरची गोष्ट; ती होतां होईल तोंपर्यंत करूं नये, आपल्यावर हल्ला झाला तर आपला बचाव करण्याचा विचार पहावा असा माझा हा वेळपर्यंत निश्चय होता."

"आतां पेशव्याचा निश्चय ठरला तेव्हां मी विठोजीला सांगितलें, ते शहर सोडून गेले ह्मणजे मला संगम सोडला पाहिजे. तरीदेखील पेशव्यांना लढाई आरंभण्याला धीर होणार नाहीं, अशा समजुतीवर मी जावें न जावें

ह्या विचारांतच होतों. परंतु बायकामंडळीची रवानगी करून दिली आणि छावणींतून फौज बाहेर काढली. ती येऊन पोहोंचते तों छावणीकडे आह्माला जाऊं देऊं नये ह्मणून शत्रूचें सैन्य भारी येऊं लागले, तेव्हां आह्माला बाहेर पडावे लागले; दुसरा इलाजच राहिला नाही. आपले घोडे, पुस्तकें, कागदपत्र, अंगावर होते तेवढे कपडे शिवाय करून बाकी सारें, यांचें आतां काय होईल तें होवो असें ह्मणून तें जागच्या जागीं टाकून आह्मीं क्लीलंडच्या बंगल्याजवळ नदीपार झालों."

"'आमची फौज येण्याला थोडा वेळ लागला. ती येईपर्यंत मी आणि दुसरे कांहीं गृहस्थ शत्रूची टेहेळणी करीत होतों. ते गणेश खिंडीकडून टेंकड्यांच्या अगदीं जवळ आले. ग्र्यांटसाहेब लेण्याजवळच्या टेंकडीवर चढला. तेथून त्याला ते शहराबाहेर पडून नदीच्या आणि डोंगराच्या मधल्या साऱ्या मैदानभर पसरत असलेले दिसले. तो सारा सेनासमुद्र अगदीं शांत होता, फक्त घोड्यांच्या टापा आणि खिंकाळणें ऐकूं येत होतें. अखेर आह्मीं नदीपलीकडे झालो आणि सारी फौज छावणीकडे चालली. ती गांठण्यापूर्वींच अगदीं निकराची लढाई होईल असें आह्मांला वाटत होतें, पण तसा कांहीं प्रकार घडला नाहीं. आह्मी त्यांच्या दृष्टीस पडलों नाहीं असें दिसलें आणि त्यांच्या व आमच्यामध्यें नदी असल्यामुळें आह्मी पुलाकडे सावकाश गेलों. आह्मी चाललों असतां त्यांच्याकडील कांहीं असामी येऊन नदी उतरूं लागले तेव्हां कांही गोळया उडाल्या, परंतु कांहीं अपाय झाला नाहीं. पुलाजवळ जातों तों आह्माला कुमक आलेली भेटली. मग जे मागे होते त्यांच्या संरक्षणाची तजवीज लाऊन मी मुख्य फौजेजवळ घोडा टाकीत गेलों. संपलें."

ही त्रुटित हकीगत एका रोजनाम्याच्या शेवटच्या पानावर दाट लिहिलेली आहे. कर्नल बूरच्या फौजेची व त्याची गांठ पडली, तेथपर्यंतची ही झाली. पुढची त्यानें आपला मित्र क्याप्टन क्लोज, शिंद्याच्या दरबारचा रेसिडेंट, यास पाठविलेल्या पत्रांत आहे, त्यावरून देतों.

खाजगी व गुप्त.
( क्याप्टन क्लोज यांस. } छावणी खडकी, ता. ११ नोव्हेंबर १८१७.

माझे प्रिय क्लोज साहेब—माझें फार दिवसांत पत्र नाहीं असें पाहून तुह्माला आश्चर्य वाटत असेल यांत कांहीं शंका नाहीं. तुह्मांला कदाचित् असेंही वाटत असेल कीं माझा खून झाला असावा, किंवा इकडचा रस्ता अगदीं बंद पडला असावा परंतु तसें कांहीं झालेलें नाहीं. खरी गोष्ट अशी आहे कीं, मला आपल्या गुप्त मजकुराचीं पत्रें तुमच्या डांकेंत निर्धास्तपणें टाकवेनात; कदाचित् तीं वाटेंत कोणी धरील आणि तो मजकूर बाहेर फुटला तर शिंद्याचे ठराव कायम राहणार नाहींत अशी भीति पडली होती. परंतु आतां गुप्त असें कांहीं राहिलेंच नाहीं, ह्मणून मी लिहितों. आपल्याला मालकमसाहेबानें फौज जमा करण्यास सांगितलें आहे, असें निमित्त करून पेशव्यानें पुण्याजवळ सुमारें २५००० स्वार आणि त्याच्या निम्मे पायदळ असें भलें मोठें सैन्य जमविलें. त्याची छावणी गारपिरावर होऊन तें आमच्या सैन्याला दडपीत अगदीं बहुतेक वेष्टीत चाललें. पेशव्यानें आमच्या सैन्यांत फितूर करण्याचें काम फार दिवसांपासून चालविलें होतें आणि अधिकाधिक जोरानें व उघडपणें रेटारेटी चालविली. सारांश, चोहींकडून बेबनाव होण्याचीं चिन्हें दिसूं लागली, तेव्हां आतां लढाई केव्हां जुंपते हें टपून पहात बसणें भाग पडलें. मुंबईचें गोरें रेजिमेंट आल तेव्हां मी छावणी हालवून ती ह्या रम्यस्थळीं घेऊन आलों. ती येथें सुस्थिर झाली तेव्हां माझी काळजी दूर झाली. परंतु तिकडे शहरच्या लोकांचा समज असा झाला—आणि बापू गोखला तो तसा होण्याची भारी खटपट करीत होता—कीं, श्रीमंतांचा अजिंक्य शस्त्रप्रभाव पाहून फिरंगी पळाले आणि आणि आतां लौकरच ते ह्या देशांतून अगदीं पार निघून जातील. यांना तें खरें वाटून ते अगदीं उद्धटपणानें वागूं लागले; त्यांनीं आमची छावणी लुटली; गणेशखिंडींत एका गृहस्थाला जखमी करून त्याचा घोडा हिसकावून घेतला. आमच्या जुन्या आणि नव्या छावणीच्या दरम्यान एखाद्या अम्मलदारानें घोड्यावरून फिरणें कठीण झालें. मोर दीक्षितानें फोर्ड साहेबाला असें सांगितलें कीं, "सावध रहा, आतां तुमच्यावर लौकरच हल्ला होणार आणि तुमचे सारे शिपाई तुह्मांला सोडून जाणार, तुह्मी दापुडीस स्वस्थ रहाल तर मी तुमच्या जिवाचें संरक्षण करीन" आमच्या पहिल्या जाग्यांत तुमचे लोक आमच्या फार जवळ येतात ते येऊं देऊं नका, असें मी पेशव्याला सांगितलें होतें, तरी मी जे निरोप पाठवीं ते सारे तो अगदीं तुच्छ करी. आह्मी बाहेर पडतों न पडतों इतक्यांत संगमाच्या आणि गोसावी-

बागेच्या दरम्यान लटकी लढाई करून दुरून गोळया टाकण्याकरितां विंचूरकरानें १५०० स्वार पाठविले. मदनसिंग पेंढारी ७००|८०० स्वार घेऊन कबरस्थानाजवळ आला आणि अर्धा तासपर्यंत स्वस्थपणें संगमाची टेहेळणी करीत होता. त्यावेळीं आह्मी उपहार करीत होतों. बापू गोखल्यानें २०००० फौज आणून गारपिरासमोर नदीतीरीं छावणी देण्याचा घाट घातला. हें सर्व सहन करावें तर अधिक अपमान होणार. ह्मणून मी मोठ्या शहाणपणानें त्यांना असें करूं नका ह्मणून सांगितलें आणि घोडनदीहून सडें पलटण(Light battalion) आणविलें. त्याच सुमारास जनरल स्मिथ यानें आपण होऊन पुणतांब्यास फौज एकत्र केली.

कांहीं एक अडचण न पडतां आपली सारी तयारी होईल अशी कदाचित् बापू गोखल्यानें पेशव्यास भर दिली असेल. त्याप्रमाणें तयारी झाली, तेव्हां आतां पांघरूण टाकून आपलें खरें स्वरूप प्रकट करावें असें त्याला वाटलें आणि त्यानें मला असा दटावणीचा निरोप पाठविला कीं, आह्मी दाखवूं त्या जागीं तुह्मी आपली छावणी करा; काळया पलटणींतले लोक कमी करा; आणि गोरे लोक माघारे लावून द्या. जर याप्रमाणें न कराल तर तह राहणार नाहीं. मी ते कांहीं कबूल केलें नाहीं. शांतता रहावी अशी माझी इच्छा फार आहे असें सांगून पाठविलें. मी नदी उतरून पुण्याकडे येणार नाहीं, परंतु जर तुमची फौज आमच्या फौजेकडे आली तर आह्मी तिच्यावर हल्ला करूं असें सांगितलें. यापुढें एक तास लोटला नाहीं तों ते मोठ्या तयारीनें बाहेर आले. आह्मांला अंगावरच्या तेवढ्या कपड्यांनिशीं संगम सोडून फक्त जावयास वेळ मिळाला. क्लोलंडच्या बंगल्याजवळ उतार होता तेथें नदी उतरून आह्मी पलीकडे झालों आणि पुलाकडे धांव घेतली. तेव्हां थोडीशी चकमक उडाली, परंतु खरी लढाई कांहीं झाली नाहीं. थोड्याच वेळांत संगमावरचा बंगला, त्यांतलें सारें दप्तर, माझीं सारीं पुस्तकें, रोजनामे, पत्रें, हस्तलिखित कागद, वगैरे साऱ्याची होळी झाली. आह्मी खडकीच्या पुलावर सुखरूप पोहोचलों आणि लौकरच लष्करांत दाखल झालों. आमची मंडळी व बरोबरचीं माणसें नदी उतरत होतीं, तितक्या अवकाशांत आह्मीं शत्रूंची टेहेळणी करण्याला गेलों. नदीच्या भरतीप्रमाणें पुण्यांतून जो जो सेनापूर बाहेर येत होता तो मोठा मजेदार दिसत होता. ग्रांटसाहेब दारूखान्यावरल्या टेंकडीवर चढले आणि तो पाहून याला

खंबायतच्या अखातांतल्या घोड्याची उपमा शोभते ह्मणाले. सारें अगदीं सामसम होतें. घोड्यांचीं पात्रलें आणि खिंकाळणें याशिवाय कांहीं ऐकूं येत नव्हतें आणि नदीला पूर यावा त्याप्रमाणें तें सारें खोरें फौजेनें अगदीं भरून गेलें. मी कर्नेल बूर याला नेहमीं सांगत असें कीं, लढाई जुंपण्याचें ठरलें ह्मणजे आपण पुढें चाल करून जाऊन आपलें नांव राखलें पाहिजे. आपण हिंमतीनें पुढें सरसावलें तर आपल्या फौजेला ईर्षा येऊन ती खंबीर राहते आणि शत्रु कच खातात. या प्रसंगीं पेशवा लढाईला सिद्ध झाला आहे येवढेंच कर्नेल बूर यास कळवून न राहतां तुह्मीं त्याच्यावर एकदम हल्ला करा असा त्याला हुकूम पाठविला. ही चूक केली, परंतु सुदैवानें ती हितावह झाली. कारण पुढें त्यानें मला असें सांगितलें कीं, मी हुकमावांचून क्वचित जागेवरून हाललों नसतों. तो पुढें निघून आला, आह्मी त्याला मिळालों, दापुडीचें पलटणही येऊन मिळालें; त्याला नाइलाजास्तव थोडा उशीर लागला. नाल्याच्या समोर आल्यावर, केळीचा बाग असे त्या ठिकाणीं, तोफा सुरू कराव्या ह्मणून आह्मीं जरा थांबलों. ( मला वाटतें ते शहाणपणानें नव्हे ) आणि त्याच क्षणीं शत्रूंनींही सुमारें बारा पंधरा तोफा सुरू केल्या. नंतर लौकरच त्यांच्या स्वारांचा सारा जमाव, मोठ्या उत्कृष्ट तऱ्हेनें आमच्यावर भरधांव चालून आला. तो घोड्यांचा झपाट्यानें येण्याचा वेग, त्यांचा दणदणाट, निशाणांचा फडफडाट, भाल्यांचा लखलखाट, वगैरे सारा थाट अगदीं अवर्णनीय होता, परंतु अगदीं पोकळ, त्यांत कांहीं जीव नव्हता. परंतु गोखला, मोर दीक्षित व आणखी कांहीं असामी यांनीं आमच्या डाव्या बाजूला आणि पिछाडीस एक मोठी टोळी जमविली. आमच्या डाव्या बाजूस मेजर पिंटो आला होता, त्यावर सातव्या रेजिमेंटाची पहिली पलटण ( 1st—7th ) मोठ्या आवेशानें चालून निघाली होती आणि बाकीच्या गोऱ्या पलटणापासून अगदीं अलग राहिली होती. गोखल्याबरोबरच्या लोकांनीं मोठ्या आवेशानें हल्ला केला आणि तें पलटण व गोरें पलटण यांच्या मधून फळी फोडून निघाले. त्यावेळीं बाकीची सारी फौज ही गोळीबार चांगला करीत होती, तोड्यांच्या बंदुका चांगल्या सुटत होत्या व बाणांचा मार सर्वांत अधिक होत होता. त्यावेळीं आमचा पराभव होण्याचा चांगला संभव आहे असें मला वाटलें हें मी कबूल करतों. पहिल्या ( 1st—7th )पलटणीजवळचा दारूगोळा सरून गेला होता, तरी पण ती त्या हल्ल्यांतून निभावली. कर्नेल बूर तिला मुख्य फौजेंत घेऊन आला. त्यानें अत्यंत

शहाणपणा आणि धैर्य दाखविलें. मग आणखी थोडीशी चकमक झडली आणि थोडासा हल्ला झाला. आमच्या उजव्या बाजूस गणेशखिंडींतल्या लहानशा टेंकडीकडे कांहीं तुकड्या वेगळ्या करून काढल्या आणि मग सूर्यास्त होऊन गेल्यावर बऱ्याच वेळानें पहातों तर समरांगणीं आम्ही अगदीं एकटे. माझ्या मनांत पहिल्यानें असें आलें कीं, गोसावीबागेजवळ नदीपर्यंत पुढें जावें, परंतु माघारें छावणींत जावें हें बरें असें मंडळी ह्मणू लागली तें मीं मान्य केलें. जर पहिल्यानें आम्ही चालून गेलों नसतों तर पेशव्याच्या फौजेला मोठी हिम्मत आली असती, आमची फौज अगदीं भिऊन जाती आणि तिच्या इमानीपणाचा आम्हाला संशय येता. आमच्यावर तोफांचा भडिमार होता, आमच्या छावणीवर बाण पडते आणि आमच्या चौक्यांच्या आंत स्वार येऊन फिरूं लागते. पण जें झालें तें बरें झाले. पेशव्याची फौज शहरांत माघारें निघून जावयास सांपडलें म्हणून आनद मानीत आहे आणि आम्ही दिल्लीस ( Retee ) रेतीवर छावणींत असल्यासारखे बहुतेक स्वस्थ आहों. आमचें माणूस एकंदर शंभरांच्या आंतच मेलें आणि आम्ही आपलें नांव पुन: पहिल्यासारखें गाजविलें. आम्ही येथें आनंदांत आहों. कोठें कांहीं कट होत नाहींत, कांहीं काळजी नाहीं; उगाच रिकामे दुर्बिणी लावून पहात असतों. पुनः लढाई होईल असें वाटतें. जनरल स्मिथ १४ तारखेला येथें येईल, त्याच्या आंत पेशवा लढाईला उभा राहणार नाहीं असें म्हणवत नाहीं; परंतु मराठ्यांचा कांहींच नेम लागत नाहीं. पेशव्यांनीं लढाईंत तोफा थोड्या आणल्या होत्या; परंतु त्यांच्याजवळ पुष्कळ आहेत, तेव्हां निदान त्या आणतील आणि आम्हांवर दुरून गोळे टाकतील आणि स्वार तयार ठेऊन आमची कांहीं धांदल झाली तर आह्मांवर घोडे घालतील. आम्ही इकडे पेंचांत पडलों असें पाहून तिकडे शिंदा गडबड न करो ह्मणजे झालें. थोडेसे वेढे घालून आह्मी सारा बंदोबस्त करतों. हें पत्र ऑडाम् साहेबांकडे पाठवा. त्यांना माझें पोहोंचलें नसेल. मोरदीक्षित ठार झाला. गरीब बिचारा !

मौ० एल्फिन्स्टन.

याप्रमाणें खडकीची लढाई झाली. तिची हकीगत लिहिणारानें स्वत: त्या रणांगणीं जें कृत्य केलें, त्याबद्दल आत्मस्तुति किंवा अतिशयोक्ति अगदीं केलेली नाहीं. तो जो पहिल्यानें मोहिमेवर गेला तो वेलिंगटन साहेबाच्या

हातांखालीं; तेव्हां त्याचा शिष्य ह्या नांवाला शोभे असें ह्या प्रसंगीं त्यानें जें व्यूहचातुर्य, धैर्य आणि न गडबडतां विचार करण्याचें सामर्थ्य दाखविलें तें पाहून आश्चर्य वाटल्याशिवाय रहातच नाहीं.

युद्धसंग्रामाच्या इतिहासांत खडकीच्या लढाईची गणना मोठ्यांत नाहीं. त्या रणांगणीं इंग्रजांची फौज सारी ३००० च्या आंत असून त्यांपैकीं मेले सुमारें २० व जखमी झाले सुमारें ९० मिळून ११० च्या आंतच. पेशव्यांची फौज समारें १८००० स्वार आणि ८००० पायदळ अशी २६००० होती ह्मणतात आणि त्यांचे शेकडों लोक मेले असा अदमास आहे. त्यांत मोरदीक्षित हा मोठ्यांपैकींच होता. परंतु ह्या जखमी व मेलेल्यांच्या संख्येवरून ज्या गोष्टी मनांत यावयाच्या, त्यांपेक्षां प्रत्यक्ष परिणाम फारच निराळ्या तऱ्हेचा झाला. इंग्रजांत पराक्रम काय आहे असें जें लोकांच्या मनांत भरलें होतें ते चट सारें जाऊन ते आपल्याला अजिंक्य आहेत असें वाटूं लागून त्यांचा दरारा तेव्हांच बसला.

एल्फिन्स्टन साहेबाच्या बरोबरीच्या त्यावेळच्या सर्व लोकांनीं त्या दिवशींच्या साऱ्या यशाचा तो एकटा मालक असें ठरविलें; आणि त्यांचा तो अभिप्राय बरोबर नाहीं असें ह्मणण्याला कांहीं कारण दिसत नाहीं. तो रेसिडेंट पदाधिकारी असल्यानें फौजेवर हुकूम त्याचा होता आणि लढाईच्या पूर्वींची सर्व व्यवस्था त्याच्या मसलतीनें चालली होती. खडकीचें रणांगण त्यानेंच आंखून दिलें. फौज पुढें चालून आली ही चूक झाली, परंतु ती पथ्यावर पडली असें तो ह्मणाला, त्याप्रमाणे ती " हितावह चूक " असो किंवा लढाई सुरू झाली ह्मणजे आधीं आपण चालून गेले पाहिजे असा तो जो पूर्वीपासून उपदेश करीत असे त्याचे फळ असो, एवढी गोष्ट खचित आहे कीं इंग्रजांना त्या दिवशीं जो जय मिळाला तो त्यांच्या त्या एवढ्याशा फौजेच्या धारिष्टामुळे व त्यांचे शिपाई फार इमानानें वागले, त्यांना फितूर करण्याची विलक्षण खटपट झाली, तरी त्यानी आपलें इमान गाजवलें, ह्मणून. लढाई जुंपल्यावर फौज कोणीकडे किती न्यावी आणावी ह्या खटपटींत तो पडला असेल असें मानण्याचें कारण नाहीं व तसा संभवही नाहीं. कोणाची कोणाशीं स्पर्धा नव्हती.

---

# भाग १२ वा.

## मराठ्यांचा व इंग्रजांचा शेवटचा संग्राम. ( तिसरा ).

### पेशवाईची समाप्ति. सन १८१७।१८.

एल्फिन्स्टनसाहेबानें जनरल स्मिथ यास ताबडतोब निघून येण्याविषयीं लिहिलें होतें, तें पत्र खडकीची लढाई झाली त्या दिवशीं रात्रीं त्याला पोहोंचलें; त्याबरोबर निघून आठव्या दिवशीं ह्मणजे तारीख १३ नोव्हेंबर १८१७ रोजीं तो आपल्या फौजेनिशीं पुण्यास येऊन दाखल झाला. वाटेनें मराठ्यांच्या फौजेनें त्याला त्रास दिला ह्मणून येण्यास इतका वेळ लागला. लढाईनंतर पेशव्यांची फौज आपली पहिली जागा सोडून रेसिडेन्सीच्या खालच्या बाजूस नदीतीरीं गारपिराजवळ इंग्रजांच्या पहिल्या छावणीच्या जागीं येऊन राहिली. तिच्यावर तारीख १५ रोजीं सकाळीं हल्ला करावयाचा असें जनरल स्मिथ यानें ठरविलें, परंतु कांहीं अडचणी अकस्मात् उद्भवल्यामुळें त्या दिवशींचा तो बेत राहिला. दुसऱ्या दिवशीं संध्याकाळीं स्मिथसाहेबानें एक पलटण घोरपडीवर पाठविलें. नदी उतरून येतांना पेशव्यांची थोडीशी फौज त्याला आडवी गेली, परंतु थोडीशी चकमक उडून अखेर ती तिच्या पूर्वेस येऊन उतरली. रात्रीं तिच्या वाटेस कोणी गेला नाहीं. तारीख १७ रोजीं सकाळीं स्मिथ येऊन पहातो, तर पेशव्यांची ती कित्येक मैलपर्यंत पसरलेली सारी छावणी रिकामी पडली आहे. श्रीमंतांनीं रात्रीच साताऱ्याकडे पलायन केलें. त्यांनां पुनः पुण्याचें दर्शन घडलें नाहीं.

लढाई सुरू झाल्यापासून पेशव्यांच्या लोकांनीं क्रूर कर्में करण्यास आरंभ केला. त्यांनीं एल्फिन्स्टन साहेबाचा संगमावरचा बंगला जाळला हें मागें सांगितलेंच आहे. त्यांनीं त्याचा एक दगड देखील जागेवर राहूं दिला नाहीं; बागा मोडून टाकल्या, त्यांतलीं झाडें उपटून टाकलीं; आणि थडगीं उकरून टाकलीं. एका एंजिनीअराला ठार मारलें. वाघन आडनांवाचे दोघे भाऊ भाऊ तळेगांवाजवळ सांपडले, त्यांना *बाजीपंत

* बाजीपंताला कैद करून लांकडी पिंजऱ्यांत घालून सिंहगडावर ठेविलें होतें. बाघनांना मारण्याला मीं सांगितलें नाहीं असें बाजीराव ह्मणाले. रेसिडेंटाचा बंगला जाळण्याला हुकूम दिला होता असें त्यांनीं कबूल केलें.

गोखल्यानें फांशीं देवविलें. ह्या गोष्टी बापू गोखल्याला कळून, त्याच्या मंजुरीनें, अशा झालेल्या नव्हत्या; परंतु बाजीरावानें सर्व अधिकार त्याच्याकडे सोंपविलेला होता, ह्मणून संधी सांपडतांच एल्फिन्स्टनसाहेबानें त्याला असें कळविलें कीं, कोणी कितीही थोर मनुष्य असो, त्यानें कोणा गोऱ्या कैदीचा प्राण घेण्याचा हुकूम केला तर त्याचा जिवास जिव घेऊं.

मद्रास खात्यांतले दोन अम्मलदार पुण्यास येत होते, त्यांना कैद करून वासोटा किल्ल्यावर नेऊन टाकलें होतें. रेसिडेंटाच्या मुनशीनें आपल्या घरीं एक आरबांची टोळी पगार देऊन ठेविली होती; तिनें त्याचें रक्षण बरेच दिवस केलें. अखेर बापू गोखल्यानें त्याला बोलावून नेलें आणि इंग्रजांच्या छावणींत जात असलास तर जाऊं देतों असें सांगितलें. त्या उभयतांचें भाषण पुष्कळ लोकांदेखत झालें. त्या वेळीं बाजीरावानें आपल्याला सर्व राज्यावर पूर्ण अधिकार दिला आहे, असें बोलून बापूनें पेशव्याचें तें पत्रच त्याला दाखविलें आणि मग असें ह्मटलें कीं, तुझा यजमान माझा फार दिवसांचा दोस्त आहे ह्मणून मी तुझें संरक्षण करतों. आतां आम्ही शत्रु झालों आहों. आमचा जो एक हात (ह्मणजे तारीख ५ ची लढाई) होऊन गेला, त्यांत मला यश येईल असें वाटलें होतें; परंतु आलें नाहीं म्हणून कांहीं हरकत नाहीं; आह्मी आणखी लढणार असें त्याला सांग. आम्ही तोंडावरून बुरखे घेतले असते, परंतु हातांत तरवारी घेऊन मारतां मारतां मरूं असा संकल्पच केला आहे.

पेशव्याच्या लोकांनीं पलटणांतल्या शिपाई लोकांचें नुकसान पुष्कळ केलें होतें; खडकीच्या लढाईच्या दिवशीं त्यांच्या बायका हातीं सांपडल्या त्यांची कत्तल केली. जनरल स्मिथ याच्या पलटणांतला एक शिपाई हातीं सांपडला होता त्याचे तुकडे उडवले; आणखी पुष्कळ अशींच नामर्दपणाचीं कृत्यें केलीं होतीं, त्यामुळे ते फार संतापलेले होते आणि याचा सूड केव्हां घेऊं असें त्यांना झालें होतें. आतां सारें पुणें मोकळें होऊन त्यांच्या हातीं पडतें असें दिसलें, तेव्हां त्याचा ते अगदीं सत्यनाश उडवितील आणि आपण शहरांत आपला अम्मल बसवावयाला चाललों असतां जर शहरचे लोक किंवा शिबंदी वगैरे कोणी अडथळा करण्यास उभे राहतील तर ते अनावर होऊन अनर्थ करून सोडतील अशी जनरल स्मिथ यास मोठी भीति पडली, व एल्फिन्स्टनसाहेबाच्या मनांत शहराचा नाश होऊं देऊं नये असें होतें, म्हणून त्यांनीं

तह्राच्यीं निशाणांत दोन पत्रें घालून एक श्रीमंतांकडे आणि बापू गोखल्याकडे पाठविलें. त्यांनीं त्याचें उत्तर पाठवितों असें म्हटलें परंतु पाठविलें नाही. दुसरें पत्र शनवारच्या वाड्यावर जो अंमलदार होता त्याच्याकडे उघडेंच पाठविलें. त्यानें दोनप्रहरपर्यंत उत्तर पाठवितों असें म्हटलें, परंतु पाठविलें नाहीं. त्या पत्रांत असें लिहिलें होतें कीं, तुम्ही शहर सोडून जाल तर त्याचें आम्ही रक्षण करूं, परंतु लढण्यास उभे रहाल तर परिणाम असे असे होतील. आतां इंग्रज शहरांत येतात असें दिसलें तेव्हां हरीराव ह्मणून एक सावकार होता, तो कांहीं मंडळी बरोबर घेऊन एल्फिन्स्टनसाहेबाकडे गेला आणि त्याला ह्मणाला, आह्मी सावकार, दुकानदार, व्यापारी, उदमी मंडळी आहों यांचें संरक्षण करा, आह्मी तुमचे चौकीपहारे शहरांत बसवून देतों. त्यानें बरें आहे ह्मटलें. मग सांगण्यासारखा कांहींएक अडथळा न होतां पेशव्यांच्या मुख्य चार कचेऱ्यांवर आणि शनवारच्या तटबंदी वाड्यावर पहारे बसले. वाड्यांत नासधूस कांहींएक होऊं नये असा जनरल स्मिथ यानें उत्तम बंदोबस्त केला. शहराचा-ही बंदोबस्त चांगला केला. सांगण्यासारखें कोणाचें कांहीं नुकसान झालें नाहीं. ही एकदर हकीगत गव्हर्नर जनरल साहेबांस लिहितांना एल्फिन्स्टन साहेबानें असें ह्मटलें आहे कीं, साऱ्या गोष्टी मनांत आणल्या ह्मणजे असें ह्मणावें लागतें कीं, आमच्या फौजेनें या प्रसंगीं जें सौम्यपणाचें वर्तन केलें तें फार तारीफ करण्यासारखें आहे. जनरल स्मिथ याला पुण्याचें रक्षण करतां आल्यानें आमचा फार नफा झाला. तो असा कीं आधीं आमची देशभर जी कीर्ति झालेली आहे ती कायम राहील, ह्या लढाईंत आमच्याशीं जे स्नेहभावानें राहिले त्यांचीं मनें बिघडणार नाहींत आणि फौजेच्या खर्चा-करितां आह्माला जो पैसा व सामानसुमान लागणार तें मुबलक मिळण्याचा मूळ आधार कायम राहिला.

याप्रमाणें तारीख १७ नोव्हेंबर सन १८१७ इसवी रोजीं पुण्यांत पेशवाई बुडून इंग्रजी अम्मल बसला. जनरल स्मिथ यानें पांच दिवस तेथें मुक्काम केला. तितक्या वेळांत त्यानें मुंबईकडची रहदारी बंद झाली होती, ती नीट सुरू केली आणि सिंहगडाकडे एक टोळी पाठविली, तिनें किल्ल्याखालीं कांहीं तोफा घेतल्या. पुण्यावर कांहीं संकट आलें ह्मणजे शहरचे लोक आपली चीजवस्त घेऊन सिंहगड, पुरंदर, वगैरे आसपासच्या किल्ल्यांचा आश्रय करण्यास

जात असत, त्याप्रमाणें ह्या प्रसंगींही पुष्कळ लोक चालले होते. ते त्या टोळीच्या तावडीस सांपडले. त्यांना त्यांनीं लुटलें. लूट लढाईतली ह्मणून माफ झाली.

पुण्यांत कठीण प्रसंग आहे हें वर्तमान लॉर्ड हेस्टिंग्ज यास आक्टोबर महिन्याच्या अखेर समजलें. तेव्हां त्यानें सर टॉमस हिस्लॉप यास असा हुकूम केला कीं, तुमची प्रसंगानुसार वागण्याची तयारी असूं द्या. जनरलप्रिट्झलर दक्षिणेंत शिलकी फौज घेऊन होता, त्याला लढाई सुरू झाली असतां जनरलस्मिथ यास जाऊन मिळावें असा हुकूम केला आणि जशी वेळ येईल तसें तुह्मी वागावें असा एल्फिन्स्टनसाहेबाला पूर्ण अधिकार दिला. परंतु हा हुकूम त्याच्या हातीं येऊन पडण्यास पुष्कळ दिवस लागले. त्यामुळें अमुक तऱ्हेनें लढाई चालवावी असा स्मिथसाहेबास हुकूम करण्यास त्याचें मन प्रथम साशंकित होतें. पुण्यावर हल्ला करण्यापूर्वीं तारीख १५ रोजीं त्यानें आपला मित्र आडॉम साहेब याला पत्र पाठविलें त्यांत तो ह्मणतो—"पेशव्याविषयीं आमचा अद्याप कांहींच बेत ठरला नाहीं. सर टॉमस हिस्लाप यांजकडून मला अजून कोणताच हुकूम नाहीं. लॉर्ड हेस्टिंग्जसाहेबाचीं पत्रें येण्याला जितके दिवस लागतात, तितके त्याचीं येण्याला लागतात. तो मालकमसाहेबाचा विचार घेतल्याशिवाय कांहीं लिहीत नाहीं. त्याच्याकडे पत्रें जाऊन येण्याला पुनः तितके दिवस लागतात; आणि इतकेंही होऊन इकडची खरी स्थिति काय आहे हें त्या दोघांतून एकालाही कळत नाहीं. मला जर आपल्या अंगावर घेऊन काम करतां येईल तर मी जनरल स्मिथ यास आग्रहानें असें सांगेन कीं, पेशव्याच्या फौजेवर चालून जाऊन तिचा पराभव करा; बाजीराव ज्या किल्ल्यांत जाऊन बसेल त्याला वेढा घाला आणि मग तो दीन होऊन शरण आला ह्मणजे त्याच्याशीं काय करार करावयाचे ते करा; परंतु ते मालकमसाहेब जिला Confidence System (विश्वास ठेऊन वागण्याची पद्धति) ह्मणतात, तिच्या पुष्कळ अंशीं अगदीं उलट अशा प्रकारचे करा. बाहेर कोठें दुसरें कांहीं प्रकरण उपस्थित झालें नाहीं, पेंढाऱ्यांच्या धामधुमीसारखी एकादी पीडा आली नाहीं, तर मला वाटतें हें काम तीन महिन्यांत पुरें होईल. परंतु आतां दक्षिणेंतून सारी फौज गेलेली दिसली ह्मणजे हें एक निर्भय स्थान आहे असें समजून सारे पेंढारी बहुधा इकडे धांव घेतील, परंतु त्यांचें मोठेंसें भय बाळगावयास नको. फौज परत आणून त्याचा समाचार घेतां येईल. शिंदा स्वस्थ बसो ह्मणजे झालें. तुमच्याजवळ

फौज छान आहे आणि सारा अधिकार एकहाती आहे. येथें पुष्कळ तऱ्हेनें सारें विस्कळित झालेलें आहे. ”

बाजीराव आपल्या राज्यांत कोठेंतरी एकादा मजबूत किल्ला धरून बसतील असें प्रथम वाटत होतें, म्हणून स्मिथसाहेब त्यांच्यामागें लागण्यास निघाला तेव्हां त्यानें आपल्याबरोबर मोठाल्या तोफा घेतल्या. त्या त्याच्या गळ्यांत लोढणें बांधल्यासारख्या झाल्या. लढाई पाहिजे तशी करण्याचा एल्फिन्स्टनसाहेबाकडे पूर्ण अधिकार आला त्याबरोबर त्यानें जनरल प्रिट्झलर यास पंढरपुरावर आणि जनरल मनरो यास मिरजेवर येण्यास लिहिलें. मनरोला त्यानें आणखी असें लिहिलें कीं, पेशवे आणि गोखले यांच्याकडे जो मुलूख असेल तो शत्रूचा असें समजावें. इतर जाहागीरदार हे आपले मित्र आहेत असें समजावें. पेशव्यांचें कृत्य पाहून निजामाच्या मुलखांतही तशीच गडबड होण्याचा संभव आहे, असें हैदराबादेहून रेसिडेंटाकडून लिहून येईल तर तिकडे फौज इकडच्यापेक्षां थोडी आहे, हें ध्यानांत ठेऊन तुम्ही तिकडे लक्ष द्याल तर बरें होईल. तेथें दंगा झाला तर तो लौकर मोडीत बसण्यापेक्षां आधीं मुळीं होऊंच देऊं नये हें चांगलें.

जनरल स्मिथ यास त्यानें असें लिहिलें—“ लढाई लौकर पुरी करण्याचा उपाय म्हटला म्हणजे पेशव्यांचे किल्ले घ्यावे, मुलूख घ्यावा किंवा त्याच्या एकेका सरदाराचा मोड करून त्याला जर्जर करावें, ह्यापेक्षां खुद्द त्याच्यावर हात टाकावा, हें बरें. जर बाजीराव कैद झाला किंवा चोहींकडून कोंडल्यामुळें आतां कांहीं उपाय नाहीं असें वाटून शरण आला तर आम्हांला त्याच्याकडून हवे ते करार करून घेतां येतील. त्याच्या पाठीस लागून आमच्या हातून इतकें सारें जरी झालें नाहीं, तरी त्याची शक्ति कमी होईल आणि कीर्ति नाहींशी होईल; असा जर्जर झाला म्हणजे पुष्कळ अंशीं वरच्यासारखेंच आमचें कार्य झाल्याप्रमाणें होईल. ”

हें पत्र तारीख ६ दिसेंबर रोजीं लिहिलेलें. त्यानें जो लढाईचा बेत योजला तो पुढें दोन महिन्यांनीं ते दोन्ही जनरल एकत्र जमेपर्यंत सिद्धीस नेतां येईना. जनरल स्मिथ तारीख २२ नोव्हेंबर रोजीं पुणें सोडून बाजीरावाचा पाठलाग करण्यास निघाला. एल्फिन्स्टन साहेबानें कर्नल बूर यास पुण्याच्या बंदोबस्तास ठेविलें आणि आपणही बाहेर पडला.

बाजीराव साहेब पुण्याहून पळाले ते माहुलीस गेले. तेथून त्यांनीं नामधारी छत्रपति महाराज, त्यांच्या मातुश्री, बंधु वगैरे सर्व वासोट्यावर होतीं त्यांना आणावयास पाठविलें. परंतु तीं येण्यापूर्वीं स्मिथ साहेब आपल्याकडे येत आहे, असें कळतांच त्यांची वाट न पाहतां पळ काढून त्यांनीं पंढरपुरचा मार्ग धरला. परंतु तेथें मुक्काम फार न करतां स्वारी तारीख ६ रोजीं करकंब्यास गेली. वासोट्यावरून महाराज आले त्यांची वाटेंत गांठ पडली. त्यांना त्यांनीं आपल्याबरोबर चालविलें. ते करमाळ्यावरून पूर्वेकडे जातील असें वाटत होतें, परंतु तसे न जातां उत्तरेकडे वळले आणि जुन्नरावरून लग घाटानें जाऊन ब्राम्हणवाडीस छावणी देऊन राहिले. स्मिथ साहेब पाठीस लागला होता, तो ते पुण्याच्या पार झाले असें समजलें तेव्हां घोडनदीस गेला आणि जडभारी सामान तेथें ठेऊन विसावा खाऊन निघाला. तो नगरावरून संगमनेरास जाऊन दाखल झाला.

एल्फिन्स्टन साहेब जनरल स्मिथ याच्या स्वारीबरोबरच होता. त्याचा तारीख ७ चा लेख असा आहे,—'रात्रीं होमरचें काव्य वाचलें; शिवाय ऑर्मकृत हिंदुस्थानचा इतिहास वाचला; तो दररोज रात्रीं वाचीत असतों'— यावरून तो किती विद्याव्यासंगी होता एवढें लक्षांत घ्यावयाचें. तारीख १२ रोजीं त्याचा मुक्काम भीमातीरीं टाकळी येथें होता. त्या दिवशींचा लेख असा आहे, 'काल रात्रीं स्मिथ साहेबानें पेशव्यावर पडण्याचा बेत केला होता, परंतु तो सोडून दिला. मला वाटतें तें शहाणपण केलें. गोखला अजून आमच्या जवळ आहेसें दिसतें, परंतु तो आमच्या रसदीवर हल्ला करीत नाहीं. आम्ही पुष्कळ चुका केल्या, परंतु बाजीरावानें त्या साऱ्या सुधारून दिल्या लढाई सुरू झाल्यापासून आमच्या इतक्या चुका झाल्या.—' तारीख ५ रोजीं ह्मणजे खडकीच्या लढाईच्या दिवशीं, तसेंच पुढें दडपीत गेलों नाहीं, तारीख ६ रोजीं हल्ला केला नाहीं; जनरल स्मिथ तारीख ११ रोजीं आला तेथपर्यंत हल्ला केला नाहीं तर नसो, परंतु त्या दिवशींही केला नाहीं, आणि दुसऱ्या दिवशींही केला नाहीं. ( हें तर फारच वाईट केलें. ) तारीख १६ रोजीं हल्ला अर्धवट केला, त्यामुळें निकाल लागला नाहीं; बरोबरचा तोफखाना पुणेशावळीजवळ कोठें तरी ठेवावा तो ठेवला नाहीं; अकस्मात् मनांत आल्या तसतशा गोष्टी केल्या; निष्कारण अवडंबर माजवलें आणि शत्रूचा बाऊ मोठा मानला.—मला वाटतें आतां तोफखाना टाकून दिला म्हणजे आमचें बरें

चालेल. परंतु मला अशी भीति वाटते कीं, आमच्यावर केव्हां काय संकट येईल याचा नेम नाहीं. असें नेहमी होईल."

जनरल स्मिथ घोडनदीहून निघाल्यावर पुढें बाजीरावानें कोठें दडी मारली त्याचा त्याला कांहीं पत्ता लागेना. एल्फिन्स्टनसाहेबानें रोजनाम्यांत असें लिहिलेलें आहे.—"पेशव्याची बातमी नाहीं; शत्रु नाहीं; कुचाच्या वाटेनें शिकारीशिवाय दुसरी कांहीं मौज नाहीं."—संगमनेरास गेल्यावर त्यांना असें कळले कीं, आपण पुढें आलों, बाजीराव मागें राहिले. ते तेथून दहा कोसां-वर केतूल येथें होते. तो प्रदेश फार डोंगराळ असल्यानें तोफा नेण्याला फार कठीण पडत होतें, मजल मारतां येईना. आपण उत्तरेला आणि जनरल प्रिट्झलर दक्षिणेकडून येत आहे. दोघे दोहींकडून गांठतात असें दिसलें ह्मणजे बाजीराव घांट उतरून कोकणांत जातील तर तिकडे मुंबईकडची जी थोडीशी फौज आहे तिच्या मदतीला आपली पाठविली पाहिजे असें वाटून जनरल स्मिथ यानें कर्नल बूर याला तसें लिहिलें.

स्मिथसाहेब संगमनेरास आला असें कळतांच बाजीरावानें तोंड फिरविलें आणि आतां जाऊन पुणें घेतों अशी आवई उठवून दक्षिणेचा मार्ग धरला. जनरल स्मिथ यास तें खरें वाटून तो त्याच्या पाठीवर निघाला. कर्नल बूर यासही तसेंच वाटलें म्हणून त्यानें घोडनदीहून आपल्या मदतीकरितां पलटन पुण्यास जलद बोलाविलें. तें तारीख ३१ दिसेंबर रोजीं टाकोटाक निघालें आणि सारी रात्र चालून तारीख १ जानेवारी १८१८ रोजीं सकाळीं दहा वाजतां कोरेगांवास पोहोचलें. त्या पलटणांत सुमारें पांचशें शिपाई होते; कांहीं जास्त असले तर असतील. त्याच्याबरोबर दोन तोफा होत्या त्या चालविणारे २४ गोरे गोलंदाज होते आणि त्यांवर दोन अम्मलदार होते. शिवाय त्यांच्याबरोबर ३०० नवीनच ठेविलेले बेकायदा (Irregular) स्वार होते. सर्वांवर मुख्य अम्मलदार क्याप्टन फ्रान्सिस स्टांटन हा होता. तो गांवाजवळच्या उंचवट्यावर आला आणि पहातो तर भीमेच्या पैलतीरास पेशव्यांची फौज २५०००, सारे स्वार आहेत. परंतु तो न दबकतां तसाच नदीतीराजवळ चालला. तो नदी उतरून आपल्यावर चालून येणार असें पेशव्यांच्या फौजेला वाटलें, परंतु तो तसें न करतां गांवांत जाऊन बसला. पेशव्यांचें पायदळ सुमारें ५००० बोरघांटाकडे चालतें झालें होतें तें त्यांनीं तावडतोब माघारें आणविलें. मग निवडक निवडक आरब,

गोसावी आणि व कायदा ( Regular ) पायदळचे शिपाई मिळून ६०० लोकांची एक टोळी अशा तीन टोळ्या करून, दोन तोफा बरोबर घेऊन, ते त्या पलटणावर तीन वाटांनीं जाऊन तुटून पडले. पाठीमागून स्वारांनीं व पायदळानें गांवाला गराडा घातला. तें पलटण आधींच दमून आलेलें, त्याला अन्न नाहीं पाणी नाहीं अशी स्थिति झालेली आणि तशांत असा प्रसंग गुदरला तेव्हां मोठया निकराचें युद्ध झालें. कोणी जिवाची आशा बाळगलीच नाहीं. संध्याकाळीं तर त्याची अगदींच निराशा होऊन गेली. परंतु रात्र पडत चालली तसतसा हल्याचा जोर कमी होत गेला आणि त्यांना थोडें पाणी मिळवतां आलें. मध्यरात्रीला तों गोळी बंद झाली आणि पेशव्याचे लोक गांवांतून बाहेर पडले. दुसऱ्या दिवशीं सकाळीं ते पुनः गांवाभोंवते घिरट्या घालू लागले, तेव्हां स्टांटन साहेबानें तोफ सुरू केली आणि सारा दिवस तेथें काढून रात्रीं कूच केलें व दुसऱ्या दिवशीं सकाळीं घोडनदी गांठली. त्याचे लोक मेले व जखमी झाले मिळून १७५ त्यांत २० तर तोफखान्याकडचेच होते. शिवाय स्वारांपैकीं गयत मयत मिळून एकतृतीयांश नाहीसे झाले. पेशव्यांकडचे ५००।६०० लोक कामास आले. बापू गोखला, आपा देसाई आणि त्रिंबकजी हल्यांत होते. त्रिंबकजी तर एकदां गांवांत शिरला होता. स्वतः श्रीमंत तेथून दूर, दोन मैलांवर नदीपलीकडे, फुलशहराजवळ एका टेंकडीवर, सरदार मंडळी सभोंवती घेऊन बसून तेथून लढाई पहात होते. त्यांना चैन पडेना आणि वरचेवर खवळून उठून सरदारांना म्हणत इंग्रजाचा फडशा पाडतों म्हणत होतेत, ती बडबड कोठें गेली ? आतां एका पलटणाचा सुद्धां तुमच्या हातून मोड कां होईना ! सातारचे महाराज त्यांच्याजवळच बसलेले होते, त्यांच्या डोक्यावर अफ्तापगीर धरलेली होती. बाजीरावांनीं महाराजांनां विनंती करून ह्मटलें एवढी दूर करवावी; नाहींतर हेंच निशाण धरून इंग्रज येथें तुमच्या आमच्यावर तोफेतून गोळा टाकतील.

याप्रमाणें ही कोरेगांवची लहानशी लढाई फार तुंबळ झाली. तिचें साद्यंत वर्णन पाहिजे असल्यास ग्रॅांटडफ्कृत इतिहासांत वाचावें.

जनरल स्मिथ तारीख २ रोजीं चाकणास आला. त्या रात्रीं कर्नल बूर याचें पत्र एल्फिन्स्टन साहेबाला पोहोचलें, त्यावरून कोरेगांवास अनर्थापात झाला असावा, तें पलटण शत्रूस शरण गेलें असावें किंवा त्याची अगदीं

कत्तल उडाली असावी असें त्याला वाटलें. तारीख ३ रोजीं मोठ्या पहांटे उठून कूच करून ते कोरेगांवास पोहोंचले तेव्हां सारी हकीगत समजली. स्मिथसाहेब येत आहे असें कळतांच पेशवे पळाले ह्मणून शिल्लक राहिलेल्या लोकांस तेथून कूच करतां आलें. एल्फिन्स्टन साहेबानें गांवांत जाऊन जिकडे तिकडे मुरदे पडलेले, प्रेतें अर्धवट पुरलेलीं वगैरे ती भयानक स्थिति पाहिली आणि मग आतां लढाई पुढें कशी चालवावी हा विचार त्याच्या मनांत घोळूं लागला. त्या दिवशींच्या रोजनाम्यांत असा लेख आहे.—" पुढें युद्ध कसें चालवावें ते बेत मी आज रात्रीं ठरवीत आहें. आतां मी सारा अधिकार जनरल स्मिथ या एकट्याकडे सोंपवितों. मला वाटतें एक असामी मुक्त्यार असावा हेंच उत्तम; आणि तो तो जनरलच नेमला पाहिजे. त्याला योग्य वाटेल तसें करण्याला मी पूर्ण मुक्त्यारी देईन. आमचा हेतु सिद्धीस न गेला तर लढाईची तऱ्हा पालटण्याचा अधिकार मात्र मी आपल्या हातीं ठेवीन."

तेथून कूच करून तारीख ६ रोजीं एल्फिन्स्टन घोडनदीस पोहोंचला. त्या दिवशींचा त्याचा लेख असा आहे.—वाटेंत पुष्कळ पत्रें पोहोंचलीं. त्यांपैकीं एकात जी गोष्ट लिहिलेली आहे, ती वरून माझ्या व सर्वांच्या स्थितींत मोठा बदल होणार आहे.'—क्याप्टन स्टान्टनची व इतर अम्मल-दारांच्या भेटी होऊन त्याला सारी हकीगत कळली ती अशी कीं, शत्रूकडचे आरब लोक मोठे उत्कृष्ट निशाण मारणारे होते. तोफांवरचे जे गोरे लोक मेले त्या सर्वांच्या डोक्यांत गोळ्या लागलेल्या होत्या. अखेर शिपायांच्यानें पाऊल पुढें टाकवेना. ते शरण जावें असें ह्मणूं लागले. काळे अम्मलदार फार वाईट वागले आणि शिपायांना लाथा बुक्या मारल्या तरी देखील ते जीव वांचविण्याला सुद्धां उठून जमून उभे राहीनात. ते भुकेनें, तहानेनें आणि श्रमानें अगदीं व्याकुळ होऊन गेले होते. निराशेनें त्यांचे हातपाय अगदीं गळले. एल्फिन्स्टन साहेब म्हणतो मी जितक्यांजवळ ही गोष्ट काढून असें खरें का म्हणून विचारलें तितके सारे 'चुकलों, माफ करा' अशा आशयाचें बोलूं लागले; आणि 'तुम्ही मोठी लढाई मारलीत, फार उत्कृष्ट लढलेत असें समजतें' असे म्हटलें तें ऐकून त्यांना आश्चर्य वाटलें. परंतु याहून निकराचें, तुंबळ युद्ध खरोखर क्वचितच झालें असेल. याचें स्मरण झालें असतां मोठें स्फुरण येऊन कधीं निराश होऊं नये असें वाटेल.

जनरल स्मिथ बाजीरावाच्या पाठीस लागत पुनः घोडनदीस आला तों जनरल प्रिट्झलर अदवानी ( Adoni )—कडून विजापुरावरून पंढरपुरास आला. जनरल स्मिथ यास येऊन मिळण्याविषयीं एल्फिन्स्टनसाहेबानें त्याला पत्र पाठविलें होतें, त्याप्रमाणें तो यावयास निघाला इतक्यांत बाजीराव दक्षिणेकडे वळल्याची त्याला बातमी लागली; त्याबरोबर तो शहाणपणानें पश्चिमेकडे फिरला. त्याच्याबरोबर सुमार १६००० बैल सामानसुमानानें लादलेले होते ते संभाळून घेऊन जाणें जड पडत होतें तरी तारीख ६ जानेवारी १८१८ रोजीं पेशव्यांचा माग काढून तो लागलाच दक्षिणेकडे वळला आणि सालप्याचा घांट चढला. बाजीराव फुलशहराहून निघाले ते पुण्याजवळून जाऊन दक्षिणेकडे वळून माहुलीस गेले. तारीख ८ रोजीं प्रिट्झलर यानें त्यांच्या स्वारांची टोळी गांठली आणि तींतले ६० असामी जखमी केले, पैकीं कांहीं मेले. शिवाय ३० घोडे आणि ६ मनुष्यें त्याच्या हातीं लागलीं. बाजीराव तो आला असें ऐकतांच पळत सुटले आणि मिरजेवरून जाऊन येडुराजवळ कृष्णा उतरले. मग लढाईला उभें रहावें असें त्यांच्या मनांत आले असावें असें लोकांस वाटूं लागलें; कारण येतेवेळीं साताऱ्याजवळ त्यानीं तोफा टाकल्या होत्या त्या आणविल्या. परंतु तो बेत लौकरच फिरला असावा असें दिसतें; कारण त्यानीं त्या तोफा आणि बहुतेक पायदळ निपाणीस पाठवून दिलें आणि गोकाकेचा मार्ग धरला. पण तेथेंही दम निघेना. घटप्रभेवर जाऊन पहातात तर आपल्या राज्यांत इंग्रजाचा अम्मल बसला आहे. सन १८१७ च्या तहनाम्याप्रमाणें मिळालेल्या मुलखावर मनरोसाहेबाची कमिशनर ह्मणून नेमणूक झाली होती. तिकडचे लोक प्रथम जसे टिपूला कंटाळले होते, तसे पुढें मराठ्यांनाही कंटाळले असल्यामुळें इंग्रजांचा अम्मल तेव्हांच बसला. तिकडे कर्नाटकांत कांहीं थारा मिळण्याची आशा नाहीं आणि जनरल मनरोही कदाचित् अंगावर येईल असें दिसलें तेव्हां स्वारी उलटली. परंतु इकडे प्रिट्झलर लगट करीतच होता, ह्मणून पूर्वेकडे वळून गलगल्याजवळ पुनः कृष्णा उतरले आणि तिच्या तीरानें आंथणीकडे चालले. प्रिट्झलर यानें एकाएकीं गांठूं नये आणि आपल्याला पळतां यावें ह्मणून त्याला हुलकावणी दाखवून अडविण्याकरितां सड्या स्वारांची एक टोळी त्यांनीं आपल्या मागें त्याच्या तोंडावर ठेविली होती. जनरल स्मिथ पाठीस लागला होता, तेव्हां पळतांना श्रीमंत हीच युक्ति करीत होते. त्या टोळीपासून प्रिट्झलर याला कांहीं फारसा उपद्रव

पोहोंचला नाहीं; परंतु तारीख १७ रोजीं त्यांचा जमाव मोठा, सुमारें १०००० आहे, असें पाहून त्यानें आपल्या सैन्याच्या तीन टोळ्या करून त्यांच्यावर हल्ला केला आणि त्यांची अगदीं दाणादाण उडवून दिली. तेव्हांपासून ते त्याच्या फारसे दृष्टीस पडले नाहींत.

जनरल स्मिथ आपल्या बरोबरचें तोफा वगैरे जडभारी सामान घोडनदीस टाकून अगदीं सडा होऊन तारीख ८ रोजीं तेथून निघाला. एल्फिन्स्टनसाहेब त्याच्या बरोबरच राहिला. तो दक्षिणेकडे वळून प्रथम भीमातीरीं पेडगांवास जाऊन शंभुमहादेवाच्या पूर्वेकडून घांट उतरून आंथणीकडे वळला. त्याचा बेत बाजीराव माघारा उत्तरेकडे येत असल्यास त्याला अडवावें आणि जरूर पडल्यास प्रिट्झलर साहेबास मदतही करावी असा होता. तारीख २१ रोजीं आंथणीच्या आलीकडे एक मुक्काम असतां त्याला बातमी कळली कीं, पेशवे आज आंथणीस आहेत आणि आतां पश्चिमेस जाणार. तें साधूं देऊं नये ह्मणून त्यानें लागलेंच मिरजेकडे कूच केलें आणि तीस मैलांची मजल मारून कृष्णातीरीं उगार गांठलें, परंतु बाजीरावांची गांठ-पडली नाहीं. त्यांचा मुक्काम आदल्या दिवशीं रात्रीं तेथें होता, परंतु त्या दिवशीं कूच झालें होतें. त्यांनीं कृष्णा उतरून निपाणीस जाऊन तोफा व पायदळ पूर्वीं पाठविलेलें होतें, तेथें जाऊन सामन्याला उभें रहावयाचें अशी हूल घातली. परंतु एकाएकीं उत्तरेकडे वळून कृष्णेच्या उजव्या बाजूनें जात जात साताऱ्याचा मार्ग धरला. स्मिथसाहेबाला त्यांचा तो रोख कळतांच तो माघारा उलटला आणि त्यांला पश्चिमेकडे सोडूं नये ह्मणून कृष्णेच्या डाव्या बाजूनें उत्तरेकडे चालला. तारीख २३ रोजीं तासगांवच्या दक्षिणेस कवठ्यास दाखल होऊन तो पुढें कऱ्हाडाकडे निघाला, तों पेशव्यांच्या साऱ्या सड्या फौजेनें त्याला गांठलें. ( एल्फिन्स्टन साहेब ह्मणतो, ती किमान पक्ष १५००० असावी. तींत बापू गोखले, निपाणकर, त्रिंबकजी, विंचूरकर व पटवर्धन मंडळी हे सरदार होते. ) स्मिथसाहेबानें बाजीरावाची अगदीं लगट केली आहे, असें कळतांच ते टाकोटाक त्याला सोडविण्याकरितां आले होते. स्मिथसाहेबाच्या लष्करांतले २००।२२५ लोक एका गांवांत दाणा घेण्यास गेले होते, त्यांना गांठून त्यांनी अडकाविलें. पुढें बाजीरावानें त्यांना सोडून देण्यास हुकूम केला आणि दरएकास आठ आठ आणे खर्चास देऊन आपल्या लष्करांत जा ह्मणून सांगितलें. बाजीराव तारीख २३ रोजींच

कऱ्हाडास जाऊन बसले आणि जनरल स्मिथ आपल्याला जाण्याला वाट अडचणीची, तींत ओढे नाले पुष्कळ, असें पाहून तितकाच थांवला आणि पाठीवरच्या शत्रूंना पळवून लावण्याच्या विचारास लागला. परंतु ते नेहमींपेक्षां जास्त उमेदीनें जागा धरून उभे राहिले. त्यानें त्यांच्यावर सहासहा पौंडाच्या गोळ्यांच्या पांच तोफा आणि एक जजेल रोंखून गोळयांचा भडिमार सुरू केला तसे ते मागच्या मागें फांकले. त्यांचे नुकसान बरेंच झालें. तो पुढें चालला असतां ते मागून त्याच्या अंगावर बाण वगैरे टाकीत, त्यांनीं कांहीं असामी जखमीही झाले, परंतु ते पहिल्या इतकी धिट्टाई करीनातसे झाले. त्यांचा त्रास सोशीत स्मिथ तारीख २७ रोजीं पुसेसावळीस जाऊन पोहोंचला. त्यावेळीं बाजीराव माहुलीपासून सहा मैलांवर होते. तारीख २८ रोजीं तो माहुलीपासून सहा मैलांवर संध्याकाळला येऊन ठेपला. बाजीराव दोनप्रहरींच मुक्कामास उतरले होते, ते मध्यरात्र होतांच तेथून जे निघाले ते निरेच्या पुलापासून सहा मैलांवर हनबाद येथें पोहोंचेपर्यंत कांहीं थांबले नाहींत. परंतु तेथें जातात तों त्यांच्या विनीची आणि स्मिथ साहेबाच्या हाताखालचा कर्नल बोल्स याच्या तुकडीची गांठ पडली. त्याबरोबर पुष्कळ थकलेलीं घोडीं, माणसें, तशींच तेथें सोडून ते जे उलटले ते रात्रीं आठ वाजतां फलटणास दाखल झाले. तेथें सारा दोन तास मुक्काम करून पुनः पळत पुसेसावळीकडे निघाले. सोळा मैल मजल काटल्यावर त्यांनीं जरासा विसावा घेऊन दम टाकला. ( याप्रमाणें चोवीस तासांत त्यांनीं ८० मैल मजल मारली. ) अशा पळापळींत स्वारीचा लवाजमा बरोबर कसा टिकणार? तो सारा मागें पडला. मग खासा स्वारी आग्नेयीकडे वळून तारीख ३० रोजीं नातेपोत्यास पोहोंचली. जनरल स्मिथ तारीख २९ रोजीं साल्प्यास दाखल झाला होता, त्याच्याजवळून कोरेगांवावरून जवळच्या वाटेनें जाऊन लौकर बाजीरावास मिळावे ह्मणून बापू गोखल्यानें खटपट केली, परंतु ती कांहीं साधली नाहीं. मग तो खांबटकीच्या घाटानें गेला. बाजीराव नातेपोत्याहून उठले ते सोलापुराकडे गेले. स्मिथ तारीख ३० रोजीं लोणंद येथें जाऊन कर्नल बोल्स यास मिळाला आणि आतां ही धांवाधांव पुरे ह्मणाला. त्यानें ४० दिवसांत ५०० मैल मजल मारली; तितक्या वेळांत फक्त तीन मुक्काम केले. जनरल प्रिट्झलर कृष्णातीरानें जात जात विजापूर जिल्ह्यांत गलगल्यापर्यंत गेला होता तो त्याच वाटेनें परत आला. त्यानें १८ दिवसांत ३०० मैल मजल केली आणि २३ दिवसांत मुळींच

मुक्काम केला नाहीं. त्याच्या बरोबरचीं जनावरें अगदीं थकून गेलीं. आतां उभयतां जनरलांनीं एका ठिकाणीं जमावें असा विचार होऊन स्मिथ तारीख ४ फेब्रुवारी रोजीं पुनः दक्षिणेस वळला आणि तारीख ६ रोजीं रहिमतपुरास जाऊन प्रिट्झलर याची वाट पहात बसला. तो दक्षिणेकडून येत येत त्याला तेथे भेटला.

बाजीरावाबरोबर लढाई सुरू झाली, तेव्हांच एल्फिन्स्टन साहेबानें गव्हरनर जनरलाला असें लिहिलें कीं, आतां आमच्या फौजेनें पेशव्याचा मुलूख घेत बसण्यापेक्षां खुद्द त्याला धरण्याची खटपट करावी हें बरें. जनरल स्मिथ यालाही त्यानें तेच सांगितलें आणि त्याप्रमाणें तो तें करण्याला झटतही होता, परंतु अखेर थकून बसला. बाजीराव पळणारा* जबर पडला, रोज चाळीस चाळीस मैल देखील पळे; त्यामुळे त्याच्यानें त्याला गांठणें देखील होत नसे. त्याचा पाठलाग एकंदर ८५० मैल झाला, पण तो बहाद्दर कांहीं कोणाच्या हातीं लागला नाहीं. त्या पळापळीखालीं पावणेदोन महिने गेले; मेहनत पुष्कळ झाली आणि त्या मानानें फळ कांहीं आलें नाहीं. बाजीराव पळत सुटले आहेत, असा मुलूखभर डंका वाजला एवढाच पुरे, असें ह्मणून अखेर एल्फिन्स्टन साहेब दुसऱ्या विचारास लागला.

हा वेळपर्यंत तो जे काय करीत होता तें आपल्याच विचारानें; गव्हरनर जनरलाचा हेतु काय आहे हें त्याला कांहीं समजलें नव्हतें. त्यानें आपल्याकडून असें लिहिलें होते कीं, बाजीरावाबरोबर पुनः तह करणे झालें तर अमुक अमुक प्रकारें जबर करार करून घेतले तरच उपयोग. त्याला गादीवरून काढून त्याच्या घराण्यापैकीं दुसऱ्या कोणास पेशवाईच्या गादीवर बसविण्याचा विचार झाल्यास त्याच्यापासून कसे कसे करार करून घ्यावे तेंही त्यानें सुचविले होतें. परंतु बाजीराव जेव्हां त्रिंबकजी डेंगळ्याला उघडपणें मिळाला, तेव्हां आतां त्यानें काय हवें ते कबूल केले तरी त्याला पुनः गादीवर येऊं देणें ह्मणजे आपल्याला लांछन आहे आणि आपल्या राजकारणासही घातक आहे असें त्याला वाटलें. मग त्यानें असें लिहिलें कीं, आतां जहागीरदार मंडळीकडून बाजीरावाचा

---

* बाजीरावाचे वडील राघोबादादा जबर मजला करणारे होते. त्या गुणावरून त्यांना राघोबा भरारी असें नांव पडलें होतें. परंतु पितापुत्रांत अंतर इतकेंच कीं, ते शत्रूला अकस्मात गांठावें ह्मणून दौड ठोकीत आणि हे त्याला टाळावें ह्मणून पळत.

पक्ष सोडविण्याची खटपट करावी आणि दुसरा कोणी तरी राजा उभा करून इंग्रजांच्या मनांत मराठी राज्य राखावयाचें आहे असें दाखवावें ह्मणजे बाजीरावाचा पक्ष लोक सोडतील व त्यांना त्या नव्या दरबारात आश्रय मिळण्याची सोय होईल.

ह्यावरून एवढें उघड दिसतें कीं, जानेवारी महिना लागेपर्यंत एल्फिन्स्टन साहेबाच्या मनांत पेशव्यांचें राज्य घ्यावें असें आले नव्हतें, व आलें असलें तरी तसें करण्याला त्याच्या जवळ जी फौज होती ती पुरेल असें त्याला वाटत नव्हतें. कारण इंग्रजांना नाराज असलेले सारे लोक बाजीरावाला येऊन मिळत आहेत, मध्य हिंदुस्थानांत आपला जय झाल्यानें जे शिलेदार वगैरे हत्यार धरणारे लोक रिकामे झाले, त्यांची बाजीरावाच्या फौजेंत सारखी भरती होत आहे, आणि याहीपेक्षां विशेष जड गोष्ट ही कीं, पेशव्यांचा मुलुख किल्ल्यांनीं भरलेला असून ते अद्याप लढणार आहेत हें तो जाणून होता. परंतु गव्हरनर जनरलानें पेशवाई बुडविण्याचा निश्चय करून त्याप्रमाणें त्याला हुकूम लिहिला. तारीख ६ च्या रोजनाम्यांत त्याणें जें संदिग्ध लिहिलेलें आहे तें तो हुकूम हातांत पडला तेव्हां त्यास अनुलक्षून. त्या हुकमांत असें लिहिलें होतें कीं, साताऱ्च्या महाराजांस डामडौलानें सुखांत रहातां येईल एवढा मुलूख तोडून देऊन गादीवर बसवावें व बाकीचा पेशव्यांचा सारा मुलूख कंपनीच्या राज्यांत सामील करावा; तो जिंकून घेऊन त्याची व्यवस्था लावण्याचा तुह्मांस पूर्ण अधिकार दिला आहे, व तुह्मांस त्यावर कमिशनर नेमिलें आहे; जनरल स्मिथ व प्रिट्झलर यांच्या हाताखालीं दक्षिणेंत जी फौज आहे ती सर टामस् हिस्लॉप यांच्या हाताखालून काढून तुमच्या ताब्यांत दिली आहे.

हा हुकूम एल्फिन्स्टन साहेबाच्या हातीं आला तेव्हां ती वेळ मोठ्या गडबडीची होती ह्मणून कांहीं दिवस तो अगदीं दाबून ठेवावा आणि पुढें आपला काळ जरा बरा दिसूं लागला, आतां इंग्रजांबरोबर लढण्यांत कांहीं अर्थ नाहीं, आपला निभाव लागणार नाहीं, असें लोकांना वाटण्याचा रंग दिसला ह्मणजे तो बाहेर काढावा हें बरें असें त्याला वाटलें आणि त्यानें त्याप्रमाणें केलें. तारीख १० जानेवारी रोजीं त्यानें सर टॉमस् हिस्लॉप यास असें लिहिलें—"गव्हरनर जनरलाकडून मला जसा हुकूम आला आहे तसा तुह्माला जाऊन पोंहोचलाच असेल, तर तो अगदीं गुप्त ठेवा एवढी माझी विनंति आहे. पोंहोंचला असल्यास तुह्मी तो अगदीं गुप्त ठेवलाच असेल; त्याविषयीं मला

शंका नाहीं. पेशव्याला फक्त घाबरवून त्याच्याकडून सामान्य करार करून घेणें आणि हुकमांत लिहिल्याप्रमाणें साऱ्या गोष्टी करणें यांत अंतर फार आहे. त्या सिद्धीस नेण्याला आह्मांला जितकी फौज जमा करवेल तितकी केली पाहिजे. आह्मांला ज्या फौजेच्या पाठीस लागावयाचें तींत सारे घोडेस्वार असून इतर ठिकाणीं ज्यांना चाकरी नाहींशी होत आहे ते सारे लुचे इकडे येऊन भरत आहेत. नागपूर शांत झालें, आतां डोव्हेटन साहेब मोकळे झाले असतील; अशीरगडही लौकरच हातीं येईल. त्यांच्या हाताखालची बरीच फौज मोकळी होईल ती इकडे आली असतां चांगली उपयोगीं पडेल. जनरल मनरोचे बेत उत्तम आहेत; ते सिद्धीस नेण्याला त्यांच्या मदतीला आह्मांला जरी एकच पलटण पाठवितां आलें तरी बरें होईल."

एल्फिन्स्टनसाहेबानें त्याच दिवशीं क्याप्टन सीडनह्याम यास पत्र पाठविलें त्यांत कोणतें पलटण कोठें आहे व कोठें जाणार तें लिहून पुढें असें ह्मटलें कीं आतां तुह्मांला सांगावयाची ती अगदीं मनांतली गोष्ट एवढी कीं नागपुराकडून जे आरब पेशव्याकडे यावयास पाहतील त्या साऱ्यांनां धरावयाची खटपट करा आणि धरून मुंबईला रवाना करतां येईपर्यंत कैदेंत ठेवा. त्या लुच्चांना इकडे खालीं येतां येऊं नये अशी तुमच्यानें होईल तशी तजवीज करा. ते आले तर वेढ्यांत आमचे युरोपियन अचुक मारतील.

एल्फिन्स्टनसाहेबाला कमिशनर होऊन पेशव्यांचा मुलुख घेण्याचा हुकूम पोहोंचल्यापासून तो काळजींत पडला. एवढ्या थोरल्या मुलखाचें राज्य घेण्याच्या तयारीस लागणें ह्मणजे साहस आहे असें त्याला वाटलें. कारण त्यांतला अर्धा अधिक मुलुख जाहागीरदारांकडे होता आणि इंग्रजांची फौज जेवढ्या जागेवर होती तेवढी जागा त्याकडे सरासरी होती. ही बाजीरावावरची मोहीम विलक्षणच झाली. खरें पाहिलें तर तींत अव्वलपासून अखेरपर्यंत इंग्रजांची सारी फौज वेढ्यांत सांपडल्यासारखी होती. बाहेर मुलखाशीं त्यांचा सारा संबंध, रहदारी, अगदीं बंद पडली होती; फक्त हरकाऱ्यांबरोबर काय चिठ्याचपाट्या जात तेवढ्याच. त्यांना आपला जीव मुठींत धरून शत्रूंच्या हद्दींतून त्यांची नजर चुकवून जावें लागत असे. यावेळीं एल्फिन्स्टन साहेबाहेबानें पत्रें पुष्कळ लिहिलीं परंतु तीं सारीं कागदाच्या लहान लहान तुकड्यांवर, अगदीं बोट बोट चिठ्या असत; आणि त्यांच्या सुरळ्या करून त्या लिहिण्याच्या पेनांच्या नळ्यांत घालून किंवा दुसऱ्या

अशाच कांहीं तऱ्हेनें ते जासूद अगदीं छपवून नेत; * आणि त्यांचीं उत्तरेंही तशींच आणीत. असल्या त्या साऱ्या चिठ्या जमवून त्यांचीं बुकें बांधून ठेविलेलीं आहेत. तीं त्या मोहिमेचीं विलक्षण स्मारकेंच आहेत.

एल्फिन्स्टनसाहेबाच्या हातांत हुकूम पडतांच तो नवीन राज्यव्यवस्था करण्याच्या तयारीस लागला. त्यानें प्रथम मनरो साहेबास पत्र लिहून त्याचा अभिप्राय घेतला. टिपूसुलतानाबरोबर सन १७९२ मध्यें लढाईनंतर प्रथम तह होऊन आणि पुढें सन १७९९ मध्यें तो लढाईंत मेल्यावर त्याच्या राज्यापैकीं जो मुलूख इंग्रजांनीं घेतला त्याची व्यवस्था लावण्याचें काम सरकारानें मनरोसाहेबावर सोंपविलें होतें व तें चांगलें केल्याबद्दल त्याची कीर्ति झाली होती.

---

* वारनहेस्टिंग्ज काशीस जाऊन तेथचा राजा चेत्‌सिंग याला छळूं लागला. तेव्हां त्याच्यावर जो अकस्मात् प्रसंग गुजरला त्याची बातमी त्यानें याच युक्तीनें बाहेर पाठवून मदत आणविली आणि आपली सुटका करविली. सन १८५७ च्या बंडांत नानासाहेब पेशव्याकडून दक्षिणेतल्या सरदारांना अशींच पत्रें येत असावीं असा आपल्याच कृतीवरून इंग्रजांना संशय येणें सहजच होतें. बेळगांवचे कमिशनर ब्रिगेडियर जनरल ली ग्यॉट जेकब यांनीं कैलासवासी आपासाहेब व आबासाहेब कुरुंदवाडकर यांस तुह्माला अशा अशा तऱ्हेनें गुप्त पत्रें येत असतील असें बोलून दाखविलें. त्यांनीं त्यांना उत्तर द्यावयाचें तें दिलें, तेव्हां गप्प बसले आणि त्यांची तारीफ करूं लागले.

लॉर्ड डलहौसीनें पंजाब खालसा केला तेव्हां कोहिनूर हिरा रणजित सिंहाच्या बच्च्यापासून घेतला; परंतु तो लाहोराहून न्यावा कसा ही मोठी पंचाईत पडली. तेव्हां त्यानें तशीच युक्ति केली. लेडी डलहौसीनें एक लांब पिशवी विणून तींत तो पक्का बसवून दिला. लॉर्डसाहेबांनीं तिची लंगोटी घालून वर विजारी चढविल्या आणि संकटांतून पार पडले. अशा तऱ्हेनें तें तेजःपुंजरत्न समुद्रांपलीकडे जाऊन विलायतेस राजमंदिरीं प्रकट झालें आणि व्हिक्टोरियामहाराणी साहेबांच्या मस्तकीं आरूढ होऊन चमकत राहिलें. अशा कठीण प्रसंगींच्या गुप्त व्यवहारांच्या अनेक गोष्टी आहेत त्या कोणी ग्रथित करील तर तें एक मनोहर पुस्तक होईल.

एल्फिन्स्टनसाहेबाचा त्याच्याशीं जो पत्रव्यवहार झाला त्यांत मराठेशाई मोडून ह्या मुलखांत इंग्रजी अम्मल झाला ह्मणजे मोठमोठे जाहागीरदार, इनामदार वगैरे लोकांशीं संबंध कसा ठेवावा ह्या मोठ्या बिकट प्रश्नापासून तों राज्यव्यवस्थेंतील बारीक सारीक गोष्टींपर्यंत अनेक प्रकरणांवर चर्चा झालेली आहे. एल्फिन्स्टनसाहेबानें आजपर्यंत रेसिडेंट असतांना जें काम केलें त्यांत त्याला असल्या गोष्टींचा विचार करण्याचें कारणच पडलें नव्हतें; ह्मणून आतां तें एकाएकीं अंगावर पडल्यानें त्याला जरा जडसें वाटणें साहजीकच होतें. परंतु तो कांहीं गडबडला नाहीं. आपल्याला मोठा थोरला अधिकार मिळाला आहे, आतां हवें तें करूं असें ह्मणून अभिमानग्रस्त झाला नाहीं आणि गर्वानें ताठला नाहीं. आतां आपण काय केलें पाहिजे याच विचारांत निमग्न होऊन त्यानें कांहीं दिवस तसेच जाऊं दिले; पेशव्यांची पळापळ आणि धराधर चालली होती ती तशीच चालूं दिली, आणि अखेर त्या उभयतां जनरलाची गांठ पडली तेव्हां गव्हर्नरजनरलाचा हुकूम बाहेर काढून पुढे काय करावयाचें तें सांगितलें.

मराठेशाईची मुख्य गादी साताऱ्यास, तेथचा किल्लाही चांगला व छत्रपतीविषयीं मराठ्यांची पूज्यबुद्धि मोठी; ह्मणून तें स्थान आधीं हस्तगत करावें असें एल्फिन्स्टनसाहेबानें ठरविलें आणि रहिमतपुराहून तळ उठवून सारी फौज साताऱ्याकडे चालविली. तारीख १० फेब्रुआरी रोजीं सकाळीं किल्ल्याची टेहळणी होऊन दरवाजावरून गोळे आंत पडूं लागतांच पांढरें निशाण फडकूं लागलें आणि एक वकील बाहेर आला. त्यानें येऊन सांगितलें कीं किल्लेदार किल्ला स्वाधीन करण्यास कबूल आहे. आंतल्या शिबंदीच्या लोकाना आपली चीजवस्त, हत्यारपात्यार व बायकामुलें घेऊन खालीं उतरूं द्यावें एवढेंच त्याचें ह्मणणें आहे. एल्फिन्स्टन साहेबानें तें मान्य केलें. वकिलानें आंत जाऊन किल्लेदाराला कळवितों आणि खुणेचेबार करतों असें सांगितलें, परंतु तो गेल्यावर दरवाजा लागला. सूर्यास्त झाला तरी तो उघडेना तेव्हां जनरल स्मिथ यानें एक टोळी दरवाज्याजवळ पाठविली परंतु काळोख पडला तेव्हां ती माघारी बोलाविली आणि त्या वकिलाला फांशीं देतों ह्मटलें. परंतु ते खालीं येतात तों एकामागून एक तीन बार झाले आणि किल्ला स्वाधीन झाला. त्यांना संतोष झाला.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं ह्मणजे तारीख ११ फेब्रुआरी रोजीं सूर्योदया बरोबर एल्फिन्स्टन साहेब फौजेसह किल्ल्यावर चढला आणि वरचे लोक खालीं उतरले. मग दोन प्रहरीं त्याणें आपलें निशाण क्षणमात्र चढवून येथें इंग्रजी अम्मल झाला असें दाखविलें आणि तें लागलेंच खालीं उतरलें. मग छत्रपति महाराजांचा भगवा झेंडा वर चढवून तोफांची सरबत्ती केली व आजपासून येथें त्यांचा अम्मल चालेल, त्यांची ही राजधानी, त्यांना सुखानें राजवैभवांत राहतां येईल इतका मुलुख स्वाधीन करून येथें आणून गादीवर बसवं असें प्रसिद्ध केलें.

एल्फिन्स्टन साहेबानें वर जातांच आधीं सारा किल्ला फिरून कोठें काय आहे, कोणती जागा माऱ्याची वगैरे सारें पाहिलें. तें लिहून पुढें आणखी असें ह्मटलें आहे.—" येथें तिसांवर तोफा आहेत परंतु बहुतेक निरुपयोगींच आहेत. राजाचें राहतें घर लहान पण नीट नेटकें आहे. त्यांत एक दिवाणखाना सुरेख आहे. त्यांत राजाचें सिंहासन ठेविलेलें आहे. तें शिवाजीचें असें तेथले लोक ह्मणाले. परंतु नव्हे, तें रायगडावर आहे असें मला पुढें समजलें. शाहूचें सिंहासन पेठ्यांत आहे आणि तेथें त्याची पूजा होत असते. हें लांकडी, रंगीत आहे. वर एक मोठा किनखाबी लोड ठेवलेला आहे. हे घर नऊ वर्षांपूर्वी बाजीरावानें बांधविलें, परंतु तें पुरें झालेलें नाहीं; खर्च लागतो ह्मणून काम तसेंच सोडून दिलेलें आहे. राजाचें पहिलें घर याच्यापेक्षां फारच लहान आहे. बाजीरावानें पेशवाईचीं वस्त्रें जेथें दरबार भरून घेतलीं ती जागा ह्मणजे ठेंगणी पडवी आहे. तिचे खांब धुरकटलेले आहेत. राजा कैद झाल्यापासून येथें राहतो, पूर्वी खालींच रहात असे असें कळतें."

संध्याकाळीं महाराजांची सर्व आप्त इष्ट मंडळी एल्फिन्स्टन साहेबाला भेटावयास गेली, तेव्हां त्यांचें स्वागत करून इंग्रज सरकारचे विचार काय आहेत तें त्यानें त्यांना सांगितलें आणि म्हटलें आतां आम्ही बाजीरावाबरोबर तह कधीं करणार नाहीं.

तारीख १२ रोजीं एल्फिन्स्टन साहेबानें साताऱ्यास दरबार भरविला. त्यास महाराजांचे आप्त इष्ट, पदरचे कामदार व पेठ्यांतले थोर थोर रहिवासी, शेट सावकार वगैरे लोकांस बोलाविलें होतें. ते जमल्यावर महाराजांना बाजीरावाच्या हातून सोडवून आणून येथें गादीवर बसविण्याचा इंग्रजसरकारनें निश्चय केला आहे असें सांगून दक्षिणेंतील तमाम लोकांस कळण्याकरितां म्हणून

मराठींत लिहिलेला जाहिरनामा वाचून दाखविला. त्यांत बाजीराव पुणें सोडून पळाले होते, परंतु वसईचा तह होऊन इंग्रजांच्या कृपेनें पुनः त्यांचे गादीला पाय लागले वगैरे हकीगत लिहून पुढें असें म्हटलें होतें कीं, बाजीराव पुनः स्वस्थानापन्न झाले तेव्हां लढाईनें आणि दुष्काळानें मुलूख उजाड झाला होता, लोक कंगाल होऊन गेले होते आणि सरकाराला काळीचा वसूल क्वचितच येत होता. मामलती मक्त्यानें देण्याची वहिवाट होती आणि बाजीरावाचे कामदार लोक रयतेपासून जुलमानें पैसा घेत, तरी तेव्हांपासून इंग्रजसरकार राज्याचें संरक्षण करीत असल्यामुळें मुलूख चांगला आबाद झाला व बाजीरावानें पुष्कळ पैसा सांठविला आणि आतां त्या उपकारकर्त्यांवर उठून तो तो उडवीत आहे. इंग्रजसरकार नुसतें पेशव्याच्या मुलुखाचें संरक्षण करूनच राहिलें नाहीं. त्यानें त्याचे जे बाहेर मुलखीं हक्क होते ते देखील कायम राखले होते. मग गंगाधरशास्त्र्याच्या खुनाविषयीं लिहून त्रिंबकजीला शिक्षा करावी, असें सरकारचें ह्मणणें असल्याचें लिहून पुढें असें ह्मटलें होतें कीं इंग्रजसरकारानें आपल्या ह्मणण्याप्रमाणें करावयास लावण्याकरितां फौज आणली तेथपर्यंत बाजीराव त्याला शिक्षा करण्याला नाकबूलच होते. तरी सरकारानें त्यांच्यावळ फौजेचा खर्च भरून मागितला नाहीं व त्यांनीं खुनी मनुष्यास पाठीशीं घातलें ह्मणून शिक्षा केली नाहीं; फक्त गुन्हेगाराला आमच्या स्वाधीन करा येवढें ह्मटलें आणि तेवढें बाजीरावानें मान्य करण्याबरोबर त्याच्याशीं पूर्ववत स्नेहानें वागण्यास सुरवात केली. दोस्तींत काडीइतकें अंतर ठेविलें नाहीं. सरकार असें उदारपणानें वागत असतां बाजीरावानें लागलींच दुसरीं कारस्थानें मांडलीं आणि हिंदुस्थानांतील साऱ्या राजेरजवाड्यांनीं इंग्रजावर उठावें ह्मणून ह्यातून झाली तितकी खटपट केली. अखेर दंगा करण्यास व खुद्द आपल्या राज्यांत बंडावा माजवण्यास इशारा दिला आणि बंडखोरांस उघडपणें आश्रय देण्याची तयारी केली तेव्हां इंग्रजसरकारास हत्यार उचलण्यावांचून दुसरा मार्गच उरला नाहीं. मग सरकारची फौज बाजीरावाच्या मुलखांत चोहींकडून घुसली आणि त्यानें ज्यांच्याशीं कारस्थानें केलीं होतीं त्यांनीं हत्यारें उपसण्यापूर्वींच त्या फौजेनें त्याला त्याच्या राजधानींत घेरलें. बाजीरावाचा जीव इंग्रजसरकारच्या मुठींत सांपडला होता परंतु मागें तुह्मी मजवर जे उपकार केलेत ते मी स्मरतों आहें, तुमचा ऋणी आहें, तुह्मी जें सांगाल तें मला मान्य आहे, असें तो तोंडानें ह्मणत होता ह्मणून सरकारास

१८-१५४-२०००.

दया येऊन त्याला पुनः अशा विश्वासघात करतां येऊं नये म्हणून त्याच्या कडून जसे योग्य वाटतील तसे करार करून घेऊन त्याच्याकडे गादी चालवावी असा आणखी एकवार सरकारानें निश्चय केला. बाजीरावानें सरकारचें म्हणणें मान्य केलें तेव्हां सरकारानें त्याच्याशीं पुनः दोस्ती केली आणि पेंढाऱ्यांचा बंदोबस्त करण्याचें काम हातीं घेतलें. हिंदुस्थानच्या स्वस्थ राहणाऱ्या प्रजेला त्यांच्यापासून फार दिवस अतिशय उपद्रव होत होता. खुद्द पेशव्यांच्या प्रजेला तो जितका होत होता तितका दुसऱ्या कोणालाच होत नव्हता. थोर सरकाराला शोभण्यासारख्या अशा ह्या कठीण कामीं आपण मोठ्या हौसेनें मदत करण्यास सिद्ध आहों असें वरोपचारी दाखवून बाजीरावानें पुष्कळ फौज जमा केली. वर तोंडानें तो असें बोलत होता, परंतु आंतून हिंदुस्थानच्या राजेरजवाड्यांकडे संधान लाऊन त्यांनीं इंग्रज सरकारावर उठावें ही खटपट अतिशय मेहेनत करून व अतोनात द्रव्य खर्चून त्यानें चालविली होती, आणि इंग्रजसरकारची फौज पेंढाऱ्यांच्या झुंडीवर रवाना होतांच ती संधी साधून कांहीं एक न बोलतां, कुरकुरीला कांहीं एक निमित्त न सांगतां अकस्मात् लढाई आरंभिली. बाजीरावानें ब्रिटिश रेसिडेंटाच्या घरावर हल्ला करून तें जाळलें. सर्व राष्ट्रांचे कायदे याच्या अगदीं उलट आहेत. हिंदुस्थानांत ही अशी वहिवाट नाहीं. मार्गानें निमूटपणें जाणाऱ्या वाटसरांना धरून लुटलें आणि कैदेंत टाकलें आणि दोन इंग्रज अम्मलदार ठार मारले. हें फार क्रूर कर्म आपण करविलें असें बाजीरावाला कबूल करणें जड वाटलें; परंतु तें करणारांना अद्याप त्यानें कांहीं शिक्षा केली नाहीं, ते त्याच्या फौजेंत आपआपल्या अधिकारावर आहेत, तेव्हां त्यांच्या गुन्ह्यांबद्दल तो अपराधी आहे. गंगाधरशास्त्र्याच्या खुनासंबंधानें आपल्याला कांहीं माहिती नाहीं असें बाजीराव म्हणत होता, परंतु लढाई सुरू झाल्यावर तो खून करणारा जो त्रिंबकजी डेंगळा तो आणि बाजीराव एक झाले. यावरून त्या कृत्यांत आपण शामील होतों असें त्यानें कबूल केले असें होतें. बाजीरावानें याप्रमाणें विश्वासघाताचीं आणि क्रूरत्वाचीं कृत्यें केल्यानें इंग्रजसरकाराला त्याला गादीवरून काढून लाऊन त्याचें राज्य जिंकून घेणें भाग पडलें. आतां त्याचा किंवा त्याच्या वंशाचा दक्षिणेच्या राज्याशीं कांहींएक संबंध रहावयाचा नाहीं.

याप्रमाणें पेशवाईची परिसमाप्ति झाल्यावर पुढें राज्य कसें चालावयाचें त्याविषयीं जाहिरनाम्यांत असें लिहिलें होतें—पेशव्याच्या राज्यापैकीं थोडासा

मुलूख साताऱ्च्या राजाकरितां वगळून ठेऊन बाकीचा ऑनेरबल कंपनी आपल्या ताब्यांत घेईल. त्याचा वसूल सरकार घेईल, परंतु लोकांच्या स्थावर जंगम, सर्व जिनगीचें संरक्षण करील. सर्व वतनें, इनामें, नेमणुका, वर्षासनें देवस्थान व धर्मादाय खर्च कायम राखले जातील. कोणत्याही धर्माच्या लोकांस आपआपल्या मतांप्रमाणें वागण्यास हरकत होणार नाहीं. त्यांच्या चालीरीति राखल्या जातील. हें जितकें न्यायाचें आणि योग्य असेल तितकें होईल. मामलती मक्त्यानें देण्याची वहिवाट बंद केली आहे. इंग्रजसरकातर्फे माफक व वेळच्यावेळीं सारा वसूल घेण्याकरितां, न्याय करण्याकरितां व जमिनीच्या लागवडीस उत्तेजन देण्याकीरतां कामदारांच्या ताबडतोब नेमणुका होतील. त्यांना देशकालवर्तमान पाहून त्याप्रमाणें सूट देण्याचाही अधिकार देण्यांत येईल.

या जाहिरनाम्यांत आणखी असें लिहिलें होतें कीं, वतनदार इनामदार वगैरे जे लोक आजमित्तीस बाजीरावाबरोबर असतील त्यांनीं त्याची नोकरी सोडून दोन महिन्यांच्या आंत आपआपल्या घरीं जाऊन स्वस्थ बसावें. तसें न केल्यास त्यांचीं वतनें व इनामें खालसा होतील. वंशपरंपरेचे गांव–कामदार, देशमुख, देशपांड्ये वगैरे ज्या लोकांकडे वसुलाचा पैसा असेल त्यांनीं तो तसाच ठेवावा; नाहींतर त्यांना तो भरून द्यावा लागेल. त्यांनीं किंवा दुसऱ्या कोणी वतनदारानीं पदच्युत झालेल्या पेशव्याला पैसा दिला किंवा कांहीं मदत केली तर त्यांचीं वतनें खालसा होतील.

ह्या जाहिरनाम्यांत जाहागीरदार लोकांसंबंधानें कांहीं लिहिलें नव्हतें. तें प्रकरण कांहीं लहान नव्हतें. ह्मणून ते पेशव्यांचा पक्ष धरूनच राहतात किंवा सोडून इंग्रजसरकारला येऊन मिळतात तें पाहण्याकारितां कांहीं दिवस जाऊं द्यावे असा एल्फिन्स्टनसाहेबाचा विचार होता. आपण बाजीरावाचा पक्ष सोडून द्यावा आणि आपआपल्या जागीं येऊन स्वस्थ बसावें ह्मणजे आपली खराबी होणार नाहीं व आपलें चालत आल्याप्रमाणें चालवूं अशा अर्थाचीं त्यानें त्यांना पत्रें पाठविलीं; त्यांतील एक दोन मासल्याकरितां खालीं देतों. जहागिरी कायम राखल्या ह्मणजे आपल्या राज्यास बळकटी येईल असें त्याचें मत होतें.

रावसाहेब मुषफक् मेहेरबां कर्मफर्माय दोस्तां त्रिंबकरावजी सलामत.

छ अजीसबब हनराबल मौंट इष्टवारीट ईलफीसतन साहेब बहादूर बाद सलाम खैरयत अब्याम अंकें येथील खैरयत जाणून हेमषा खत किताबत

पाठवून दिल आराम करीत असलें पाहिजे. दिगर वसईच्या तहनाम्यापासून गंगाधरशास्त्री मारले गेले तोंपर्यंत श्रीमंत राव पंडत प्रधान बहादूर यांचे सरकारची व कंपनीसरकारची दोस्ती बे किलाफ चालली. कंपनीसरकारची ख्वायश होती कीं, श्रीमंतांचे सरकारचे दौलतीची बढती असावी हें तमाम लोकांस जाहीर आहे. गंगाधरशास्त्री मारल्यावर त्रिंबकजीस हवालीं केल्यामुळें कंपनीसरकारांतून कांहींएक जाबसालाची दरखास न करितां दोस्ती पहिली होती तशीच चालली. पुढें श्रीमंतांचे सरकारांतून बंड उभें करवून तमाम हिंदुस्थान व दक्षिणेचे सरदारांस लिहून चोहींकडून कंपनीसरकारावर गर्दी करावी असें केलें त्यामुळें दोस्तीस खलेल आला होता. त्यावर पुढें तहनामा झाला, तेव्हांपासून पांच महिने दोस्ती सुरळीत चालत होती; त्यांत कांहीं एक जाबसालाची तक्रार नसतां एकाएकीं तहनामा तोडून कंपनीसरकारासी बिघाड केला. त्यावरून कंपनी सरकारची फौज पुण्यास जमा होऊन जो अहवाल जाहला तो आमेहेरबानास समजलाच असेल. पुण्यांत कंपनीसरकारचा अम्मल बसला आहे. श्रीमंत लष्करसुद्धां पुणें सोडून निघून गेले. आतां श्रीमंतांचें लष्कर बहुत दिवस मैदानांत राहील असें दिसत नाहीं. कंपनीचे सरकाराशीं व सरदारांशीं बिघाड नाहीं. गंगाधरशास्त्री यांस त्रिंबकजीनें मारलें हा अपराध मोठा केला असतां त्या त्रिंबकजी करितां श्रीमंतांचे सरकारांतून कंपनीसरकाराशीं बिघाड करावा हे लाजम नवतें. त्यास आमेहेरबानाची व कंपनीसरकारची दोस्ती पहिल्यापासून चालत आली. हालीं अशा मोकदम्यांत सरदारांनीं सरीख व्हावें हें चांगलें नाहीं. याजकरितां कलमी केलें आहे तरी आमेहेरबानानीं आपले जाग्यावर कायम राहून आपलें लष्कर आपले जवळ बोलाऊन घ्यावें. आमेहेरबानाकडील जाबसाल कराराप्रमाणें अमलांत येण्यास हरकत कोणीकडून पडत होती तें समजण्यांत असेलच, त्याचे मजबुदीकरितां आलीकडील तहनाम्यांत एक कलम लिहिलें होतें, त्यास वर लिहिल्याप्रमाणें आमेहेरबानांकडून जाहलें असतां राज्याचा बंदोबस्त कोणतेही तऱ्हेनें जाहला तत्राप आमेहेरबानांकडील जैसें चालत आहे त्यांत कांहींएक कमती होणार नाहीं. येविशीं आमेहेरबानांची खातरजमा असावी. ज्यादा काय लिहिणें प्यार मोहबत असो दीजे हे किताबत.

मौं. एल्फिन्स्टन.

ह्या पत्रावर तारीख नाहीं. दुसरें असेंच आहे तें पहा:—

रावसाहेब मेहेरबां कर्मफर्माय दोस्तां

त्रिंबकरावजी सलामत.

७९ अजी सबब इनराबल मौंट इष्टोवार्ट इलफिष्टीन साहेब बहादर सलाम खैरयत अज्याम येथील खैरयत जाणून हमेषा खत किताबत पाठवून दिल ताजा करीत गेलें पाहिजे. दिगर त्रिंबकजीनें गंगाधरशास्त्री यास मारलें, त्या त्रिंबकजीस श्रीमंत बाजीरावसाहेब षरीख जाहले असतां आमेहेरबान त्याचे हमरा राहून कंपनी सरकाराशीं लढत आहेत, यामुळें पंढरपूरचे मुक्कामीं करार जाहला होता तो बरबाद जाहला. इतक्यावरही आ मेहेरबान बाजीराव साहेब यांजकडे लक्ष न ठेवितां वेगळे होऊन फौजसुद्धां आपले जाग्यावर जाऊन कंपनी सरकाराचे सल्हेमाफक चालले असतां पहिले करारासारखा ज्यांत आ मेहेरबानांचें नुकसान न होय असा नवा करार होऊन त्याप्रमाणें आ मेहेरबानांकडे चालेल. कसेंही जाहालें तत्रापि बाजीराव साहेबांचा दावा आ मेहेरबानांवर राहाणार नाहीं. याप्रमाणें पेशजीं आ मेहेबानांस कलमी केलें आहे. त्यास इजानेब बमै कंपनी सरकारची फौज बाजीरावसाहेब यांचे मागें जात असों. आ मेहेरबानास जैसा जबाबसाल करणें असेल तो जनराल मनरोसाहेब याजपाशीं करावा. बाजीरावसाहेब त्रिंबकजी षरीख जाहले असतां सरदारांनीं त्यांचे हमराह राहून त्रिंबकजी बरोबर चाकरी करावी हें मुनासब दिसत नाहीं. याजकरितां आ मेहेरबानांनीं बाजीरावसाहेब यांजकडे लक्ष न ठेवितां वेगळें होऊन तूर्त आपले जाग्यावर राहून कंपनी सरकारचे सले माफक चालोन जनरल मनरोसाहेब याजवळ जबाबसाल जाहल्यानें कंपनीसरकारांत बहुत खुषी हासील होईल. नाहीं तर हरतऱ्हेनें कर्नाटकचे मुलुखाचा बंदोबस्त करावा लागेल. ज्यादा काय लिहिणें प्यार महबत असो दीजे हे किताबत. मौं. एल्फिन्स्टन.

पेशवाईची परिसमाप्ति होऊन दक्षिणेंत इंग्रजी झाली असें प्रसिद्ध केल्यावर आतां पुढें लढाई कशी चालवावी, कोणास कोणतें काम सांगावें, हा विचार चालला. त्यांत आधीं सारें आधिपत्य कोणाकडे असावें हा मुख्य प्रश्न निघाला. जनरल स्मिथ ह्मणाला, मी वरिष्ठ (Senior), तेव्हां सारा अधिकार माझ्याकडे असावयाचा. जनरल प्रिट्झलर ह्मणाला, मी वरिष्ठ. परंतु एल्फिन्स्टन साहेबानें तो वाद मोठ्या शहाणपणानें, युक्तीनें

मिटवून टाकला आणि स्मिथ साहेबाला मुख्य ठरविलें. मग कामाची वांटणी झाली, तींत स्मिथ साहेबानें बाजीरावाच्या पाठीस लागून त्याचा कायतो शेवट लावण्याचें पत्करलें आणि प्रिट्झलरसाहेब पुण्याच्या दक्षिणेकडील किल्ले घेण्यास निघाला. एल्फिन्स्टन त्याच्याबरोबर राहिला. साताऱ्याहून निघून तो प्रथम सिंहगडावर चालून गेला. तेथच्या किल्लेदारानें किल्ला लढविण्याचा आव चांगला घातला. वेढा येण्याबरोबर शत्रूवर छापा घालण्याकरितां शिबंदी घेऊन तो बाहेरही पडला व त्यांनें लढाईची तहकुबी करण्याकरितां खुणेचीं निशाणें उभारलीं तरी ऐकिलें नाहीं. मग एक दिवस तोफांचा भडिमार चालून तट ढांसळूं लागला, तेव्हां तो किल्ला स्वाधीन करतों ह्मणाला. किल्ल्यावरच्या शिपायांत एकदेखील मराठा नव्हता. १०० आरब, ६०० गोसावी आणि ४०० कोंकणी लोक होते. किल्लेदार ह्मणावयाचा तो अकरा वर्षांचा मुलगा होता. खरें काम करणारा त्याच्या तर्फेचा आपाजीपंत शेवडे ह्मणून एक क्षुल्लक कारकून होता. किल्ल्यावर पैसा व चीजवस्त पुष्कळ होती, परंतु त्यापैकीं तो जें जें आपलें ह्मणाला, तें सर्व प्रिट्झलरसाहेबानें त्याला घेऊं दिलें आणि शिबंदीशींही सढळपणें वागून तिला खालीं लाऊन दिलें.

याप्रमाणें इकडे हा प्रकार चालला होता, तेव्हां बाजीरावसाहेब सोलापुराजवळ होते. त्यांनीं सदाशिवरावभाऊ माणकेश्वराच्या कारकुनापासून पुष्कळ पैसा जबरीनें घेतला जनरल स्मिथ तारीख १३ रोजीं साताऱ्याहून निघाला, तो तारीख १९ रोजीं येल्लापुरास पोहोंचला. तेथें त्याला असें समजलें कीं, बाजीराव सोलापुराहून पंढरपुराकडे जाण्यास निघाले आहेत. तेव्हां त्यांना वाटेंत गांठावें ह्मणून त्यानें सारी रात्र मजल केली. सूर्योदयापूर्वींच त्याला आणखी असें समजलें कीं, बाजीरावानें उत्तरेचा मार्ग धरला आहे, आणि रात्रीं आष्टीस छावणी होती. हा गांव पुण्यापासून सुमारें १०० मैलांवर थेट पूर्वेस आहे. मग तो तसाच रिसाला आणि घोड्यावरचा तोफखाना बरोबर घेऊन बाकीच्या फौजेला मागोमाग येण्याला सांगून जो तडक निघाला, तो साडेआठ वाजतां आष्टींत जाऊन पोहोंचतो तों पेशवे तळ हालवून कूच करण्याच्या लगबगींत होते. इंग्रज आला असें कळण्याबरोबर श्रीमंतांनीं बापू गोखल्यावर संतापून तूं त्यांना आज्ञाला असें अकस्मात् गांठूं कसें दिलेंस ह्मणून विचारावयास पाठविलें तेव्हां त्यानें सांगून पाठविलें कीं आपण चलावें, कांहीं काळजी करूं नये; मी पिछाडी संभाळतों. तें ऐकून ते पळाले, आणि तो ५०० स्वार

बरोबर घेऊन शत्रु येण्याची वाट पहात उभा राहिला. आपा देसाई निपाणकर याजवळ सुमार ४००० फौज होती, ती घेऊन आपल्या कुमकेस येण्याला त्याला त्यानें सांगितलें होतें. जनरल स्मिथ रिसाल्याचीं तीन पलटणें घेऊन बापूच्या अंगावर चालून येतो आहे असें दिसलें, तेव्हां त्याच्या मित्रांनीं त्याला सांगितलें, येवढ्या फौजेपुढें आपला निभाव लागावयाचा नाहीं; याकरितां पाऊल मागें घेऊन चांगली तयारी करून सामन्याला उभें राहावें. परंतु त्यानें तें कांहीं ऐकिलें नाहीं. "व्हावयाचें असेल तें येथें होऊन जाऊं दे" एवढा जबाब दिला, आणि घोडा ढकलला. त्याच्याबरोबर तीनशें स्वारांची एकदम मांड हालली. त्यांनीं इंग्रजी रिसाल्याच्या सातव्या पलटणाची बरीच त्रेधा उडविली. इतक्यांत बाविसावें करोल पलटण मध्यें शिरलें आणि त्यानें त्यांची दाणादाण केली. बापूला जखम लागली होती तरी तो मोठ्या शौर्यानें अखेरपर्यंत सारखा लढत होता आणि पूर्वीं प्रतिज्ञा केल्याप्रमाणें खरोखर हातांत तलवार घेऊन मारतां मारतां मेला. * गोंविंदराव घोरपडे आणि आनंदराव बाबर हे दोन मातबर मनुष्य त्याच्याबरोबर पडले आणि लढाई संपली. मग पळापळ सुरू झाली. तींत कितीएक हत्ती, कित्येक घोडे व पुष्कळ सामानसुमान स्मिथ साहेबाच्या हातीं लागलें. परंतु सर्वांत मोठा लाभ साताराचे राजे प्रतापसिंह महाराज, त्यांचे बंधु, मातुश्री, व इतर मंडळी सांपडली हा झाला. तेणेंकरून स्मिथ साहेबाला सहजच मोठा हर्ष झाला. महाराज इंग्रजांच्या हातीं लागूं नयेत, असा बाजीरावाचा फार हेतु होता. परंतु तो सफळ व्हावा कसा ?

जनरल स्मिथ साताऱ्याहून निघाल्यापासून आठव्याच दिवशीं मराठ्या महावीराची आणि त्याची समरांगणीं गांठ पडून जो हा युद्धप्रसंग झाला तो पेशवाईतला शेवटचा. दोहींकडे सारखी फौज असून मोठ्या निकराची, पुष्कळ वेळ लढाई चालली, असें कांहीं झालें नाहीं; परंतु बापू गोखला पडला, त्याबरोबर सारें संपलें. मग बाजीरावाला खरा कोणाचा आधार उरला नाहीं.

---

* बापू गोखला धारातीर्थीं पतन पावला, परंतु ती गोष्ट त्याच्या कुटुंबाला खरी वाटत नव्हती. तीं बाई ती खोटी म्हणे आणि त्यानें घरीं परत यावें म्हणून तुळशीला ऊन पाणी व उलट्या प्रदक्षिणा घाली. ती सौवळी झाली नाहीं.

जनरल स्मिथ बाजीरावाच्या पाठीस लागत पुढें जाणार होता, म्हणून त्याला अगदीं सडें रहावयास पाहिजे होतें; परंतु महाराज बरोबर असल्यानें अडचण पडणार, सबब त्यांना घेऊन जाण्याविषयीं त्यानें एल्फिन्स्टन साहेबाला पत्र लिहिलें तें असें:—

छावणी आष्टी.

तारीख २० फेब्रुवारी १८१८ इ.

आम्हांला जय प्राप्त झाला, त्याच्या हकीगतीचें खासगी दाखल पत्र मी पाठविलें आहे. कारण सरकारी रीतीप्रमाणें रिपोर्ट करण्याला मला खरोखरच फुरसत मिळाली नाहीं. राजाचें कुटुंब मजजवळ राहिलें आहे आणि बिचाऱ्या गोखल्याचें दहन आज संध्याकाळीं सर्व सन्मानपूर्वक व्हावयाचें आहे. कारण तो खरोखर शिपायाप्रमाणें लढला. राजाच्या कुटुंबाची मला अडचण झाल्यासारखी आहे. आम्हांला सोडून जाऊं नका असा त्यांचा आग्रह आहे आणि त्यांना जवळ बाळगून मला कांहीं चांगलें काम करतां येत नाहीं. त्यांच्यामुळें माझा वेळ फुकट जाणार. त्यांची इच्छा तुम्हांला भेटावें अशी फार आहे, याजकरितां साधण्यासारखें असेल तर कृपा करून पुण्याच्या वाटेला मला भेटा. डेव्हिबरोबरचा किंवा दुसरा कोणताही खात्रीचा वाटेल तो रिसाला बरोबर आणा, यांना घेऊन जाऊन मला जितक्या लौकर मोकळा करवेल तितका करा.

सिंहगड घेऊन पुढें पुरंदरावर स्वारी चालली असतांना हें पत्र हातीं पडलें. त्याबरोबर एल्फिन्स्टन साहेब निघाला. तारीख ४ मार्च रोजीं स्मिथ साहेबाची व त्याची गांठ पडली. त्या दिवशींचा त्याचा रोजनामा असा आहे:—“ दोन वाजतां जनरल स्मिथ याच्या छावणींत पोहोचलों. आमचें बहुतेक काम संध्याकाळापावेतों उरकलें. शिवाय तारीख २० रोजीं झालेल्या लढाईतल्या पुष्कळ गोष्टी बोललों. पाठीमागें कुमकेकरितां कांहीं स्वार राखून ठेवल्यावांचून रिसाल्यानें केव्हांही हल्ला करूं नये. राजाला भेटलों. त्यानें आपला राजेपणाचा डौल राखला. उठला नाहीं. सलाम केला नाहीं. परंतु त्याच्या भाषणांत व रीतीभातींत सभ्यपणा व विनय होता. त्याचें वय सुमारें २० वीस असावें. तो सुंदर नाहीं, परंतु सुस्वभावाचा आणि मोकळ्या मनाचा आहे. त्याचे बंधु बहुतेक तशाच स्वभावाचे आणि रूपानें त्याच्यापेक्षां कांहीं बरे आहेत. त्याची वृद्ध मातुश्री चांगली बाई आहे. ती सुंदर आहे. तिचे डोळे अद्याप फार छान आहेत. तिची रीतभात चांगली आहे आणि ती चांगली हुशार

आहे असें ह्मणतात. सध्या राजाचा तंबु वाईट आहे आणि चाकरमाणसें थोडीं आहेत. तो स्मिथ साहेबाचे आपल्यावर मोठे उपकार झाले ह्मणतो आणि आपली सुटका झाली ह्मणून त्याला जसा खरा आनंद झाला आहे, तसें तें ह्मणणें खरें मनापासून आहे. तें पाहून आनंद वाटतो."

दुसऱ्या दिवशीं राजाला आपल्यीं ताब्यांत घेऊन एल्फिन्स्टन साताऱ्याकडे जाण्यास निघाला. तारीख ६ रोजीं सकाळीं महाराज देवदर्शनास गेले, तेव्हां तो रिकामा असल्यामुळें एकटाच फिरत फिरत एका डोंगरावर चढला आणि आसमंतांतला प्रदेश, तें विस्तीर्ण मैदान, त्यावरचे ते डोंगर, झाडें, वगैरे तो मनोहर देखावा पाहून त्याच्या मनांत अनेक तरंग आले. त्या दिवशींच्या रोजनाम्यांत त्यानें असें लिहिलें आहे—"ह्या प्रदेशांत मला आणखी कांहीं महिने फिरावयास सांपडेलसें दिसतें. लढाई चालली आहे, राज्य काबीज होत आहे, मला पुढें काय प्राप्ति होणार याचा कांहीं नेम नाहीं, इत्यादि गोष्टी मनांत येऊन मागें जशी माझ्या मनाची स्थिति झाली होती तशी कांहीं विलक्षण होऊन आनंद वाटला. ही लढाई संपली ह्मणजे मी रिकामा होईन आणि बहुतकरून मिसर व ग्रीस देशांतून घरीं जाईन."—त्याची नवीन घेतलेल्या मुलखावर कमिशनर ह्मणून नुकतीच नेमणूक झाली होती, परंतु त्याचें सारें लक्ष घराकडे गुंतलें होतें, असें या लेखावरून उघड दिसतें. असो. स्वगृहाची प्रीति ह्मणजे असेंच आहे.

एल्फिन्स्टनसाहेब तेथून पुरंदर किल्ल्याकडे गेला. प्रिट्झलर तो घेण्याकरितां जाऊन वेढा घालून बसलाच होता. थोडीशी गोळागोळी होऊन तारीख १६ रोजीं तो काबीज झाला. मग एल्फिन्स्टन दुसऱ्या दिवशीं तेथून निघून पुण्यास गेला. लढाई सुरू झाली, तेव्हां तो जो जनरल स्मिथबरोबर बाहेर पडला तो ह्या दिवशीं परत आला. त्या तारखेच्या त्याच्या रोजनाम्यांतला लेख असा आहे—"कर्नल ह्यूएट आणि एक टोळी ( शिपायांची ) बरोबर घेऊन आज सकाळीं मी घोड्यावरून येथें आलों. माझ्याबरोबर स्वार थोडेच होते, आणि पेशव्याच्या पेंढाऱ्यांपैकीं कांहीं असामी आह्माला वाटेंत भेटणार नाहींत असें नाहीं असें मला वाटलें. मी राजवाड्यांत उतरलों आहें. आणि पेशव्याच्या एकांताच्या खोलींत बसलों आहें आतां पुढें काय करावयाचें याविषयीं आमचा पहिला विचार येथें झाला. मी आतां दरवाजा लावीत आहें. शेट्याला (सावकाराला) आंत येऊं देऊं नये ह्मणून हा लावला होता;

तेंच बहुधा पुढील सर्व गैरसमज उत्पन्न होण्याला मूळ कारण झालें* असावें. पेशव्याच्या थोरल्या दिवाणखान्यांत आतां मी मंडळीच्या भेटी घेतों आणि खालीं जेथें आह्मी भेटत असूं तेथें भोजन करतों. पुण्याजवळजवळ आलों तरी त्यांत दिसण्यांत कांहीं फेरबदल झालेला नजरेस येत नाहीं. परंतु आमच्या साऱ्या घरांचा नाश होऊन गेलेला दिसला ह्मणजे मनाची सारी स्वस्थता आणि 'घर' ही बुद्धि नाहींशी होते; हिंदुराज्य बुडालेलें पाहून मन उदास होतें आणि त्यामुळें प्रत्येक गोष्ट विपरीत दिसूं लागते. ह्या स्थळाविषयीं आमच्या मनांत जी काय आदरबुद्धि होती ती नष्ट झाली आहे आणि जो बदल झाला आहे, तो पाहून वाईट वाटतें. आमच्या मनाची स्थिति जर अशी होते तर खुद्द येथच्या लोकांना काय वाटत असेल बरें !

एल्फिन्स्टनसाहेबानें यावेळीं पुण्यांत कांहीं फार दिवस मुक्काम केला नाहीं. पुढच्या आठवड्यांत आणखी पांचसहा मोठमोठे किल्ले काबीज करून जनरल प्रिट्झलर साताऱ्याजवळ जे फार मजबूत गड आहेत ते घेण्यास निघाला. एल्फिन्स्टन साहेबानें तारीख २९ मार्च रोजीं राजाची रवानगी साताऱ्यास केली. त्या दिवशींच्या रोजनाम्यांतला लेख असा आहे.—"सातारा खोऱ्याच्या खालच्या भागांतून घोड्यावरून गेलों. वरच्या भागापेक्षां हा भाग चांगला आहे. हिरव्या गार आंबराया, घाटांवर फार करून न आढळणारीं नारळमाडांचीं झाडें, कृष्णेच्या तीरीं देवळांजवळ कोठें पिंपळ, कोठें चिंच, वगैरे वृक्षांची दाट छाया आणि आसपास सभोंवार चित्रविचित्र डोंगर, इत्यादिकांच्या योगानें हा प्रदेश साऱ्या हिंदुस्थानांतला नसो, परंतु पेशव्यांच्या राज्यांतला अत्यंत उत्कृष्ट भाग आहे. बाजीराव नागपुराला निघून गेले. जनरल स्मिथ आणि डोव्हटन त्यांचे मागें लागलेले आहेतच. परंतु फार दूर आहेत. राजा आमच्या हातीं सांपडला असें कळलें, ह्मणजे बाजीराव कोणीकडे वळेल याचा कांहीं तर्क होत नाहीं. राजाची स्वारी साताऱ्यांत डामडौलानें गेली. त्याला शाळेंतल्या मुलासारखा आनंद झाला होता."

पुरंदर घेतल्यावर प्रिट्झलर वासोटा घेण्यास गेला. हा किल्ला कोयनाखोऱ्यांत फार बिकट जागीं असून पुरंदर व सिंहगड यांपेक्षां फार उंच आहे.

---

* हे शेट कोण, त्यांना आंत घेतलें नाहीं तें कां व कधीं आणि त्यामुळें गैरसमज कोणता झाला वगैरे गोष्टी फारच महत्वाच्या असाव्या, परंतु त्या समजण्यास कांहीं मार्ग दिसत नाहीं.

त्याच्या आसपासच्या वनश्रीचा देखावा फार उत्तम आहे. इतरांप्रमाणें हाही लौकर हातीं येईल असें वाटत होतें. परंतु किल्लेदाराला सामोपचारानें सांगितलेलें तो कांहीं ऐकेना, तेव्हां तोफा सुरू झाल्या; तरी तो वळणीस येईना. एल्फिन्स्टन साहेब ह्मणतो, "त्याचा निग्रह पाहून आम्हांला आश्चर्य वाटलें." महाराजांच्या राण्या व हंटर आणि मॉरिस हे दोन इंग्रज त्या किल्ल्यांत कैदेंत होते. आतां दोन मोठाल्या लोखंडी तोफा आणल्या पाहिजेत, असें वाटूं लागलें आणि त्याप्रमाणें त्या आणण्याची तयारी सुरू झाली. परंतु तारीख ६ रोजीं किल्लेदारानें महाराजांमार्फत निरोप पाठविला कीं, मी किल्ला स्वाधीन करतों. ( साताऱ्याहून महाराज स्वारींत गेले होते. ) दुसऱ्या दिवशीं सकाळीं एल्फिन्स्टन साहेब व जनरल प्रिट्झलर वर गेले आणि आपल्या त्या दोघां देशबांधवांना भेटले. ते प्रथम कांगुरीच्या किल्ल्यांत होते; तेथें त्यांचे हाल होत होते. परंतु बापू गोखल्यानें त्यांना येथें पाठवून दिलें आणि यांची व्यवस्था नीठ ठेव असें किल्लेदाराला स्वहस्तें लिहिलें होतें. ग्र्यॅंट डफ ह्मणतो, "बाजीराव जीं क्रूर कर्में करीत असे त्यांत बापूचें अंग नसे असें सिद्ध करण्यास जीं उदाहरणें आहेत, त्यांपैकींच हें होतें." ह्मणून त्याचें स्मरण त्यावेळीं होऊन वाईट वाटलें. कैद केलेल्या गोऱ्या अम्मलदारांना काळ्या शिपायांनीं बहुतेक प्रसंगीं दयेनेंच वागविलें आणि त्यांच्यावर ध्यानांत ठेवण्यासारखी, कांहीं कारण नसतां, ममता केली.

किल्ला ताब्यांत घेतल्यावर तेथची सर्व व्यवस्था लागली तीविषयीं एल्फिन्स्टन साहेबानें असें लिहिलें आहे—किल्लेदार, शिबंदी, बक्षीस वांटणारे मुखत्यार (Prize agents) पहारेकरी, लूटवाले, वगैरे साऱ्यांना विल्हेस लावतांना भारी त्रास झाला."

वासोट्यावरून स्वारी जयजयकार करीत निघाली, ती साताऱ्यास दाखल झाली. तेथ एल्फिन्स्टन साहेबानें तारीख १० एप्रिल रोजीं राजाला मोठ्या समारंभानें गादीवर बसविलें आणि राज्यकारभार चालविण्याकरितां ग्र्यॅंट डफ् साहेबाला मुकत्यार नेमण्यास सांगितलें. महाराजांनीं सिंहासनारूढ होतांच दोन जाहिरनामे प्रसिद्ध केले. पहिल्यांत कंपनीसरकाराशीं आपला संबंध कसा असणार तें लिहून बाजीराव पेशव्यापासून आपल्याला कसा कसा त्रास होत होता तें लिहिलें होतें. महाराजांच्या कुटुंबाचीं मनुष्यें इंग्रजांच्या हातीं लागूं देण्यापेक्षां मेलेलीं पुरवलीं, याकरितां त्यांना ठार मारावें असा वासोट्याच्या

किल्लेदाराला त्यानें हुकूम पाठविला होता. त्याचाही त्यांत उल्लेख केला होता. दुसऱ्यामध्यें सर्व राज्याधिकार ग्रँट डफ् साहेबाकडे सोंपविला आहे, असें लिहिलें होतें. महाराजांविषयीं ग्रँट डफ् साहेबानें आपल्या इतिहासांत असें लिहिलें आहे—' राजा प्रतापसिंह ( किंवा सिंग ) त्याला त्यावेळीं २७ वें वर्ष चालू होतें. तो जात्या हुशार आणि चांगल्या स्वभावाचा होता, परंतु कारस्थानांत लहानाचा थोर झालेला आणि वाईट चालीच्या मनुष्यांनीं घेरलेला होता. दरबारचा डामडौल व रीतभात याशिवाय दुसऱ्या कशाचीही त्याला माहिती नव्हती. आपण ह्मणजे कोणी अद्वितीय मनुष्यें आहों, असें त्याच्या कुटुंबांतल्या साऱ्या मनुष्यांना वाटत होतें आणि आतां आपल्या त्या योग्यतेनुरूपच आपल्याला वैभवप्राप्ति होईल असेंही वाटत होतें; त्यामुळें इंग्रज सरकारच्या कृपाप्रसादानें त्याना जो लाभ झाला, तो केवढा मोठा होता हें कांहीं काळपर्यंत त्यांच्या नीटसें लक्षांत आलें नाहीं.

महाराजांस राज्याधिकार मिळून तो मुखत्यारमार्फत सुरळीत चालू लागल्यावर बरेच दिवसांनीं, तारीख २५ सप्टंबर सन १८१९ रोजीं, त्यांच्याबरोबर तहनामा झाला. त्यांत करार असे होते कीं, त्यांनीं आपण इंग्रज सरकारचे ताबेदार आहों असें मान्य करावें; त्याच्या परवानगीशिवाय आपली फौज वाढवूं नये आणि कमीही करूं नये. एक मुख्य कलम असें होतें कीं, त्यांनीं आपल्या प्रजेशिवाय बाहेरच्या कोणाही मनुष्याशीं संबंध ठेऊं नये. अशा कोणा परक्याशीं बोलणें झाल्यास आपल्या दरबारीं असणाऱ्या रेसिडेंटामार्फत बोलावें. त्यांच्या मुलखाचें संरक्षण करण्याचा पत्कर कंपनीसरकारानें घेऊन त्यांना व त्यांच्या लोकांना राज्यकारभार कसा करावा हें समजूं लागेपर्यंत तो करण्याकरितां ग्रँट डफ् साहेबास मुक्त्यार नेमून दिलें. त्यानें राज्यव्यवस्थेंत एकदम फेरफार न करतां पहिलीच रीत कायम राखून तींत सुधारणा केली आणि इंग्रजसरकारचा हात कारभारांतून निघाला ह्मणजे काम तसेंच सुरळीत पुढें चालण्यास हरकत पडूं नये अशा धोरणानें काम चालविलें. त्यानें महाराजांना असें सांगितलें कीं आपल्या अंगांत काम करण्याची लायकी दिसेल त्या मानानें आपल्या हातीं अधिकार येईल. तें लक्षांत ठेऊन आपल्या पदरच्या एखाद्या यःकश्चित् कारकुनाप्रमाणें ते मेहेनतीनें काम करूं लागले. त्यांची लायकी दिसून आली तेव्हां सन १८२२

मध्यें तारीख ५ एप्रिल रोजीं सर्व राज्यकारभाराची पूर्ण मुक्त्यारी त्यांस मिळाली, तेव्हां त्यांना, त्यांच्या आप्त इष्टांना व सर्व लोकांना खरोखर आनंद झाला.

महाराजांना गादीवर बसवून तेथची सर्व व्यवस्था लाऊन दिल्यावर एल्फिन्स्टनसाहेबाच्या मनांत साताऱ्यास फार दिवस रहावयाचें नव्हतें. परंतु कांहीं नडीमुळें त्याचा मुक्काम लांबला. तरीख २२ रोजीं संध्याकाळीं महाराजांनीं त्याला मेजवानी केली. ती आटोपल्यावर निरोप घेऊन जातेवेळीं त्यानें त्यांना नीट वागण्याविषयीं उपदेश केला. त्या त्रिवर्ग बंधूंचें सख्य, साधेपणा, व मातुश्रीवर प्रेम, वगैरे गृहस्थिति पाहून त्याला फार आनंद वाटे.

आपण लावलेल्या ह्या राजवृक्षाची वाढ चांगली होऊन त्याला सुगंध पुष्पें आणि मधुर फळें यावीं अशी एल्फिन्स्टन साहेबाची इच्छा होती ती पूर्ण होण्याचीं चिन्हें दिसलीं तेव्हां त्याला केवढा आनंद झाला असेल त्याचें अनुमान त्याच्या लेखावरून करावें. तारीख ५ दिसेंबर सन १८२२ रोजीं त्यानें आपला मित्र स्ट्राचीसाहेब याला पत्र लिहिलें त्यांत तो ह्मणतो:—

सातरचा तरुण राजा किती छान मनुष्य आहे तें तुह्मांला सांगितलें पाहिजे. त्यानें माझ्या भेटीकरितां बराच मोठा, चांगला दरबार भरविला होता. त्यांत आह्मी दोघे एक शब्दही न बोलतां दोहों मसनदींवर बसलों होतों. परंतु तेथून उठून खिलवतींत (खासगी बसण्याच्या खोलींत) जाण्याबरोबर त्यानें आपलीं दिवाणी फौजदारी खटल्यांचीं नोंदबुकें, जमिनीचे आकारबंद, गेल्या तिमाहीचीं वसूल बाकी पत्रकें, शिलकबंद, वगैरे काढून एकाद्या नव्या तरण्या कलेक्टराप्रमाणें आपल्या ताब्यांतील मुलखाची स्थिति कशी आहे तें तो उत्सुकतेनें मला फोडून सांगूं लागला. तो नेहेमीं न्यायाधिशींत (कचेरींत) बसतो आणि आपलें काम अतिशय नियमानें करतो. मीं त्याचा निरोप घेतला त्या दिवशीं त्याच्याबरोबर शिकारीला गेलों होतों. एक तरुण गृहस्थ— साताऱ्चा दुसरा असिस्टंट मिस्टर मॉरीस—असा माझ्यापुढें पुढें चालला असतां घोड्यावरून पडला आणि अगदीं मेल्यासारखा निश्चेष्ट झाला. मी दौडत आलों आणि पाहतों तर एक स्वार घोड्यावरून खालीं उतरून त्याचें डोकें सांवरून धरून बसला आहे. मी जवळ जाऊन पहातों तर तो राजा, आपला घोडा सोडून देऊन त्याला उपचार करण्याकरितां धांऊन गेला होता. तें पाहून मला मोठें आश्चर्य वाटलें. हा राजा इतका चांगला निघाला याचें श्रेय मुख्यत्वें करून तेथचा रेसिडेंट क्यापृटन ग्र्यॉटडफ् यास आहे.

हा पूर्वी ग्रिनेडियर पलटणीचा आडजुटंट होता आणि आतां मराठी सार्वभौम राज्याचा इतिहासकर्ता ह्मणून प्रसिद्ध आहे.

सन १८२६ मध्यें तारीख १५ नोव्हेंबर रोजीं त्यानें मिसेस ग्यार्केंझी हिला पत्र लिहिलें त्यांत तो ह्मणतो—आजपर्यंत जे मराठे माझ्या पहाण्यांत आले त्यांत सातारचा राजा हा अत्यंत सुधारलेला आहे. त्यानें आपल्या मुलखाची व्यवस्था उत्तम ठेविली आहे, आणि रस्ते, पाट, वगैरे हरएक गोष्ट एकाद्या युरोपीयनाला वाहवा मिळेल अशा उत्कृष्ट तऱ्हेनें केली आहे. त्याची खासगी बसण्याची खोली पाहून मला साताऱ्यांतल्या इतर सर्व गोष्टींपेक्षां तिचे अधिक आश्चर्य वाटलें. तींत एकच टेबल आहे. त्यावर हिरवी मखमाल घातलेली आहे आणि त्याच्या जवळ हा शिवाजीचा वंशज खुर्चीवर बसून स्वहस्तानें आपलीं नित्यकृत्यें ( रोजनिशी ) व पत्रें लिहितो. त्या मूळपुरुषानें आपला हा इतका शांत वंशज पाहिला तर त्याला काय वाटेल मला कळत नाहीं. शिवाजीनें मोगल सेनापतीला ( अफझुलखानाला ) आलिंगन देतांना विश्वासघातानें त्याच्या पोटांत जीं वाघनखें खुपसून त्याचा जिव घेतला आणि मग त्याच्या फौजेचा विध्वंस केला, तींच वाघनखें मी 'आतां येतों' ह्मणून निघालों तेव्हां त्यानें मला दिलीं. हीं फार भयंकर पोलादी आंकडे, असून त्यांची धार फार तीक्ष्ण आहे. तीं दोन आंगठ्यांना अडकविलेलीं आहेत. त्या आंगठ्या बोटांत घालून मूठ मिटली ह्मणजे तीं बाहेर मुळींच दिसत नाहींत.*

आतां आपण पुनः बाजीरावाकडे वळूं. आष्टीची लढाई होण्यापूर्वी मराठे सरदारांच्या मनांत सारे एकत्र जमून होळकराकडून रामदीन आला ह्मणजे एकत्र उभे राहून युद्ध करावें असें होतें. त्याप्रमाणें त्यांचा निश्चय होऊन श्रीमंतांनीं निपाणीस जी फौज ठेविली होती ती आणि तोफा टाकल्या होत्या त्या सुद्धां आणविल्या. त्या कऱ्हाडास येऊन दाखल झाल्या, इतक्यांत इकडे बापू गोखल्यावर प्रसंग गुदरला. श्रीमतांबरोबर असलेल्या सरदारांत त्यांचा सारा भरंवसा काय तो त्याच्यावर होता आणि तो त्यांच्यासाठीं आपली शिकस्त

* एल्फिन्स्टनसाहेब राजाकडे परत भेटीस गेला होता त्या वेळीं त्यानें ही वाघनखें त्याला दिलीं. त्याचा मानीव पुत्र Godson सर एम. इ. ग्यॅंट याच्याजवळ हल्लीं तीं आहेत. कांहीं दिवस हा हिंदुस्थानचा अंडर सेक्रेटरी होता; पुढें मद्रासचा गव्हरनर झाला होता.

करीतही होता, तो गेला त्या बरोबर सारें संपलेंच. साऱ्यांचे हातपाय थंडगार झाले ह्मणावयाचें. जनरल स्मिथ महाराजांना एल्फिन्स्टन साहेबाच्या हवालीं करून घोडनदीस जरा विसावा खाऊन पुनः बाजीरावाच्या मार्गें लागावयास निघाला. पटवर्धनमंडळी कशीबशी तेथपर्यंत त्याच्या जवळ होती. परंतु तेथून त्यांनीं पाय काढला आणि घरची वाट धरली. श्रीमंतांनीं तेथून चांदोरची वाट धरली. त्यांच्या मनांत पुढें नागपुराकडे जावयाचें होतें; परंतु तिकडून सर टॉमस हिस्लॉप येत आहे अशी बातमी कळली, त्या बरोबर माघारे फिरून पुनः कोपरगांवास गेले, तों जनरल स्मिथ येतो आहे असें समजलें तेव्हां तसेच बिडाकडे वळले आणि तेथून पूर्वेकडे फिरून चांद्याकडे चालते झाले. हिस्लापसाहेबाच्या मनांत त्यांना वाटेंत गांठावें अथवा अडवावें असें होतें, परंतु पल्ला फार दूर असें पाहून तो तो नाद सोडून पुण्याकडे चालता झाला. जनरल स्मिथ आणि डव्हटन हे दोघे दोन वाटांनीं त्याच्या पाठीस लागले. अखेर तारीख १८ एप्रिल रोजीं सिवनी येथें श्रीमंत शत्रूच्या तोंडांत सांपडल्यासारखे झाले आणि त्यांच्याबरोबरचे बरेच लोक मृत्युमुखीं पडले. पुष्कळ जाहागीरदार ह्या प्रसंगापूर्वीच त्यांना सोडून गेले होते आणि ही संधी साधून आणखी पुष्कळ आपआपल्या घरांकडे चालते झाले. श्रीमंतांचे बंधु चिमणाजीआपा दक्षिणेकडे पळाले ते जनरल स्मिथ याच्या स्वाधीन झाले. बाजीराव पळतां पळतां सहा दिवस फारच बेजार झाले. अखेर बरीशी संधि साधून इंग्रजांच्या जनरलाच्या स्वाधीन व्हावें अशी त्यांनीं इच्छा धरली. एल्फिन्स्टन साहेबाची त्यांनीं पुष्कळ वेळ विनवणी केली, परंतु त्या बोलण्यांत आपल्याबरोबर तह व्हावा असला अर्थ ध्वनित केलेला असल्यामुळें तें कांहीं जमेना. त्यानें साफ सांगितलें कीं, शरण आलों असें स्पष्ट म्हणाल तर तेवढें एक मात्र ऐकूं. त्यांनीं पुनः त्याच्याकडे व नागपूरच्या रेसिडेंटाकडे वकील पाठविले, परंतु पळ चाललाच होता. त्यांचा बेत नर्मदा उतरून जाण्याचा होता, परंतु तिकडून मालकम साहेबानें सारे मार्ग रोखले आहेत आणि तो खचित धरतो असें दिसलें तेव्हां त्यांची अगदीं निराशा झाली. आतां त्याच्याच स्वाधीन व्हावें हें बरें असें मनांत आणून त्यांनीं अशीरगडाजवळ ढोलकोट येथें मुक्काम करून आनंदराव चंदावरकर याजबरोबर पत्र देऊन त्याला इंदुराजवळ मोहोच्या छावणींत त्याच्याकडे पाठविलें. गव्हरनर जनरलाकडून एल्फिन्स्टन साहेबाला जो हुकूम गेला होता, त्याची नक्कल मालकम्

साहेबाच्याही हातांत दिलेली होती. वकीलाबरोबर आलेलें बाजीरावाचें पत्र पाहून त्याच्याबरोबर बोलणें सुरू करावें असें त्यास वाटलें आणि त्यानें आपल्या हाताखालचे दोन अम्मलदार त्याजकडे पाठविले. त्यांनीं त्याला असें कळविलें कीं, दक्षिणेंतील राज्यावर माझा व माझ्या घराण्याचा कांहीं एक हक्क नाहीं, तिकडे मी माघारा जाणार नाहीं, त्रिंबकजीला आणि वाघन साहेबांना मारणारांना स्वाधीन करतों, असें कबूल करीत असाल, रामदिनाला आतां घालवून लावाल व कोणाही बंडखोराशीं किंवा पेंढाऱ्याशीं कांहीं संबंध ठेवणार नाहीं असें कबूल करीत असाल, तर आपल्याला मालकम साहेबाच्या भेटीला घेऊन जाऊं. भेट झाल्यावर मग ते सरकाराजवळ मध्यस्थी करून आपल्याला चांगली नेमणूक करून देवावितील, ती घेऊन आपल्या मर्जीस येईल त्या पुण्यक्षेत्रीं आपण कायमचा वास करावा. त्रिंबकजीला स्वाधीन करण्याची तेवढी गोष्ट शिवायकरून बाकीच्या बाजीरावानें कबूल केल्या, आणि तारीख ३ जून रोजीं तो मालकम्‌साहेबाच्या स्वाधीन झाला. त्यानें त्याला सालिना आठ लक्ष रुपयांची नेमणूक करून देववितों असें वचन दिलें व आणखीही कांहीं गोष्टी त्याच्या हेतूप्रमाणें करण्याचें कबूल केलें. बाजीरावाबरोबर असे भलतेच करार करून त्याला नसतें मोठेपण दिलें ह्मणून मालकम्‌साहेबावर गव्हरनर जनरलाचा रोष झाला, परंतु त्यानें त्याचें बोलणें मंजूर केलें आणि कानपुराजवळ गंगातीरीं ब्रह्मावर्त येथें रहावें असें ठरून श्रीमंतांची लागलीच तिकडे रवानगी झाली.

याप्रमाणें श्रीमंतांची वाट लागण्यास आदिकारण जो त्रिंबकजी तो कांहीं काळपर्यंत खानदेशांत लपूनछपून, लोक जमवून दिवस काढीत होता; परंतु अखेर अहिरगांव येथें कैद झाला आणि तेथून बंगाल्यांत चुनारगडावर रवाना झाला. एल्फिन्स्टन साहेबानें हीच जागा योग्य असें त्याला ठाण्यास पाठवितेवेळींच सांगितलें होतें. परंतु सगळया राज्याचें वाटोळें झाल्यावर मग तो तेथें जावा असा ईश्वरी संकेत होता, तदनुसार घडलें.

पेंढाऱ्यांचा उपद्रव फार झाला, ह्मणून त्यांचा समूळ उच्छेद करून देशांत शांतता करावी ह्या उद्देशानें प्रथम गव्हरनरजनरलानें मोहीम आरंभिली. परतु त्याच्या ध्यानींमनीं नव्हतें अशी तिची विलक्षण समाप्ति झाली. बाजीरावाची आणि मालकम् साहेबाची गांठ पडली नसती, तर त्याला भलतेभलते चाळे करण्याला सवडच मिळाली नसती. एल्फिन्स्टनसाहेब त्याचा बंदोबस्त

चांगला ठेवता; परंतु त्याचें कांहीं न चालल्यामुळें बाजीरावाला हिंदुस्थानांत हीं कारस्थानें करावयास फावलें. त्यांचा परिणाम काय झाला तें अगदीं थोड- क्यांत सांगून टाकूं.

शिंद्याच्या लष्करासभोंवतें इंग्रजाचें सैन्य पसरलें होतें, त्यामुळें दहशत पडून ह्मणा किंवा मालकम् सहेबाच्या वकिलीकरामतीनें मन वळून ह्मणा, परंतु त्यानें कांहीं गडबड केली नाहीं एवढी गोष्ट खरी. नागपुरास भोंसल्याच्या दरबारीं पुण्यांतल्या सारखाच प्रकार पुढें थोड्याच काळांत झाला. राजाच्या सर्व फौजेनें मिळून सितावरडीवर रेसिडेंट जेंकिन्स याजवर अकस्मात् हल्ला केला. त्यावेळीं त्याच्याजवळ सारे १४०० तर कमीच शिबंदीचे लोक होते. त्यांची प्रथम दाणादाण उडाली; परंतु मद्रासच्या काळ्या पल्टणी स्वारांनीं शौर्यानें हल्ला करून अखेर त्यांचा बचाव केला. आपासाहेब गादीस मुकून त्याच्या जागीं रघोजीनामक एक बाळराजा झाला आणि तो थोर होइपर्यंत सर्व राज्यकारभार रेसिडेंटाच्या हातां गेला मध्यहिंदुस्थानांत थोडक्याच काळांत चांगलीच झटपट उडाली. होळकर अल्पवयस्क बाळ होता, परंतु त्याच्या सरदारांनीं कंबर बांधून नशिबाची परीक्षा पाहिली. महिदपूरच्या लढाईंत त्यांचा मोड चांगलाच झाला आणि मालकम्साहेबाचा प्रताप नीट गाजला. पुढें जो तहनामा झाला, त्यांत होळकराचे बाहेरचे प्रांत व रजपूत राजांवरचे हक्क गेले; तरी माळव्यांत सर्वांत श्रेष्ठ तोच राहिला.

खुद्द पेंढाऱ्यांकडे पाहिलें तर त्यांचा नाश व्हावयाला प्रथम वाटत होता तसा कांहीं प्रयास पडला नाहीं. त्यांच्यांत फार प्रबळ जो अमीरखान पठाण तो सामोपचाराचें बोलणें सुरू होतांच तें शहाणपणानें कबूल करून टोंक संस्थान कायम करून घेऊन स्वस्थ बसला. तें त्याच्या घराण्यांत चाललें आहे. बाकीच्याचा फौजफांटा होता तो थोड्यांत मोडला. त्यांच्यांत मुख्य नाईक करीमखान आणि छट्टू ह्मणून होते. त्यांतला करीमखान तारीख १५ फेब्रुआरी रोजीं मालकम्साहेबाला शरण गेला. त्याच्या मागून लहानसान आणखी असामी शरण गेले. छट्टू कांहीं दिवस रानावनांत हिंडत होता, त्याला अखेर अशिरगडाजवळ वाघानें मारून खाल्लें. बाजीरावाची पळापळ संपपर्यंत पेंढाऱ्यांचें नांव थोडेंबहुत होतें, परंतु तें अगदीं नाहींसें करून मध्य हिंदुस्थानांत शांतता करण्याचे कामीं मालकम्साहेबानें पुढें बारा महिने हैरान परिश्रम करून आपलें नांव लोकांनीं गावें असें केलें.

१६-१५४-२०००.

सातारच्या महाराजांस गादीवर बसवून त्यांच्या व तेथच्या किल्ल्याच्या संरक्षणाकरितां ५०० शिपायांचें एक पलटण व ५०० स्वार ठेऊन बाकीच्या फौजेपैकीं कांहीं पुण्याच्या उत्तरेकडील किल्ले घेण्याचें काम चाललें होतें तिकडे गेली; व कांहीं आपल्याबरोबर घेऊन जनरल प्रिट्झलर जनरल मनरो याच्या हाताखालीं कर्नाटकांत गेला त्या वीराजवळ फौज थोडीच होती, तरी त्यानें मोठमोठाले पुष्कळ किल्ले काबीज केले. बादामीचा किल्ला फार मजबूर, परंतु तोही हल्ला करून घेतला. त्यानें नवा फौज ठेऊन तिकडचा मुलूख सर केला आणि ही मदत जाऊन पोहोंचतांच उत्तरेकडे वळून गणपतराव पानशे सुमार ४५०० पायदळ बरोबर घेऊन विजापूरच्या आसपास निजामहद्दींत खंडण्या घेत होता त्यावर चाल केली. मनरो येतो असें ऐकण्याबरोबर त्यानें जाऊन सोलापूरच्या किल्ल्याचा आश्रय केला. त्याने येऊन त्याची दाणादाण उडवून तोही घेतला. त्याची फौज बिनकाइतीची असून 'टामस मनरो बहादूरकी जय' असें ह्मणत शौर्यानें लढत, गड, कोट, घेत, ठाणीं काबीज करीत चालली.

बाजीरावानें घांट उतरून कोंकणांत शिरूं नये असा बंदोबस्त मुंबईसरकारानें फौज पाठवून केला होता व तो प्रांत त्या फौजेनेंच जिंकून घेतला. त्याच्या पुढच्या व्यवस्थेंतही एल्फिन्स्टनसाहेबानें हात घातला नाहीं. त्या प्रांतांतला मोठा मजबूद व विकट किल्ला रायगड शिवाजीच्या गादीचें मुख्य स्थान ह्मणून फार प्रसिद्ध होता. जसा युरोपांत जिब्राल्टर, तसा महाराष्ट्रांत हा गड मोठ्या कठीण जागीं असून अजिंक्य असल्यासारखाच आहे, परंतु तो लढवण्यास तसाच शूर योद्धा असेल तर त्याचें नांव कायम राहणार. असो. बाजीरावाची वडील बायको वाराणसीबाई त्या किल्ल्यांत होती. त्याला वेढा पडून तोफेचे गोळे आंत पडूं लागले आणि त्यांतला एक तिच्या घरावर पडून तें जळलें तेव्हां तिनें तेथच्या किल्लेदाराला आतां लढूं नको, किल्ला इंग्रजाला दे, असें सांगितलें त्याप्रमाणें त्यानें तारीख ७ मे रोजीं तो स्वाधीन केला. वाराणसीबाईस त्यांनीं जाऊं दिलें. ती कृष्णातीरीं वांईक्षेत्रीं जाऊन राहिली. नऊ दहा महिने तेथें तिचा मुक्काम होता. परंतु ती तेथें असल्यानें बाजीरावास इकडच्या लोकांशीं संबंध ठेऊन कारस्थानें चालविण्यास सवड मिळते, असें नजरेस आल्यावरून सरकारानें तिच्याबरोबर योग्य लवाजमा देऊन तिची ब्रह्मावर्तास यजमानांकडे रवानगी करून दिली.

बाजीरावाचे बंधु चिमणाजीराव आपासाहेब सिवनीच्या प्रसगांत जनरल स्मिथ साहेबाच्या हातीं लागले होते, ते कांहीं दिवस फुलशहर येथें येऊन राहिले होते. एल्फन्स्टनसाहेब तेथें जाऊन त्यांना भेटला आणि ते काशीक्षेत्रीं कायमचा वास करण्याकरितां निघून गेले. तिसरे बंधु अमृतराव. त्यांना बाजीरावापूर्वींच आठ लक्षांची नेमणूक ठरली होती. ते चित्रकोटास जाऊन राम राम ह्मणत बसले. याप्रमाणें पेशव्यांच्या कुटुंबांतलीं सर्व माणसं हिंदुस्थानांत निघून गेल्यावर दक्षिणेंत त्यांचें नांव उरलें नाहीं.

इतिहासकार ग्रँट डफ साहेब ह्मणतो, सिंहगड, पुरंदर, वासोटा, वगैरे किल्ले मोठे मजबूद, परंतु त्यांना शोभे असा एकसुद्धां लढला नाहीं. तसेंच अहंमदनगराकडील पहाडी किल्लेही कांहीं सामान्य नव्हत, त्यांतील कित्येक जगांतल्या मोठमोठ्या नामांकित किल्ल्यांच्या बरोबरीचे असून त्यात गोळ्यांचा केवढाही वर्षाव झाला तरी शिबंदीला मुळींच भीति बाळगण्याचें कारण नाहीं, अशा त्यांत खडकांत बसावयास जागा केलेल्या आहेत अगदीं थोडे लोक असले, तरी ते नटदार आणि हिम्मत बाळगणारे असतील तर बाहेरून शत्रु पाहिजे तेवढी मोठी फौज घेऊन चढाई करून आला ह्मणून तिला दाद देणार नाहींत. परंतु ते असले असले मजबूत गड मे महिना लागतो तों इंग्रजांची थोडीशी फौज त्यांच्यावर जातांच तिच्या स्वाधीन झाले. एक मालेगांवचा किल्ला बरा लढला आणि अशिरगड वास दिवस लढला. परंतु अखेर दोन्ही स्वाधीन झाले.

आष्टीच्या लढाईनंतर युद्धाचे नांव राहिलेंच नाहीं ह्मटलें तरी चालेल. अल्पकाळांतच सारा दक्षिण देश इंग्रजांच्या स्वाधीन झाला. तो घेण्यास त्यांना फार प्रयास पडले नाहींत.

शिवाजीमहाराज, राजाराम, बाजीराव, चिमणाजीआपा, यांच्यासारखे तरवारबहाद्दर, मुत्सद्दी पुरुष मुख्यस्थानापन्न होते, तोंपर्यंत मुसलमानांपासून मुलूख सोडवावा आणि हिंदुस्थानभर हिंदूंचें राज्य करावें, हा साऱ्या मराठेवीरांना निदिध्यास लागलेला होता. तोंपर्यंत त्यांच्या हातून कशीं आश्चर्य करण्यासारखीं स्वामिभक्तीचीं व स्वदेशसेवेचीं कृत्यें घडत होतीं, तें त्यांच्या इतिहासांत प्रसिद्धच आहे. पुढें स्वार्थदृष्टि प्रबळ होत चालली त्याबरोबर विपरीत परिणाम घडूं लागले. तरी नाना फडणवीस, हरीपंत फडके, त्रिंबकरावमामा वगैरे मंडळीनें एकएक राजकारण कसें केलें आणि मराठेशाईच नांव कसें गाजविलें, तें पाहिलें ह्मणजे ह्या शेवटच्या रावबाजीच्या कारकीर्दीतल्या

स्थितीचें चित्र पाहून अल्प काळांत असा परिणाम कशानें झाला असावा हा प्रश्न उत्पन्न होतो. त्याचें उत्तर आह्मांला तर "राजा कालस्य कारणं" यावांचून कांहीं सुचत नाहीं. ह्याच्या पोटांत बाकीचीं सारीं येतात.

सातारच्या महाराजांस गादीवर बसवून आतां पेशवाईची समाप्ति झाली, 'बाजीरावाचे पाय पुनः पुण्याला लागतील असें कोणी मनांत आणूं नये' असें प्रसिद्ध केल्यावर एल्फिन्स्टनसाहेबानें मुलूख काबीज करण्यास फौज रवाना केली; परंतु पहिल्याप्रमाणे तो तिजबरोबर गेला नाहीं. त्याचें काम निराळें होतें. तो तेथन पुण्यास गेला आणि सर टामस हिस्लॉप येणार होता त्याची वाट पहात राहिला. कालक्रमण आनंदानें चालले होतें. त्याच्या तारीख २५ च्या रोजनाम्यांत लेख असा आहे.—"आम्ही पेशव्याचे बाग पहावयाला गेलों. सन १८०२ मध्यें गोपाळरावानें सर बॉरी क्लोज याला आणि सन १८१५ मध्यें गोखल्यानें मला मेजवानी केली, तेव्हां मोतीबाचा बाग पाहून मी चकित होऊन गेलों तेव्हांपासून आजपर्यंत किती उलटा-पालटी झाल्या! फार मागच्या गोष्टींचें स्मरण होऊन मला वाईट वाटलें. बिचारा सर बॉरी क्लोज मरून गेला आणि तो जी पद्धत सुरू करण्याला झटत होता* ती कधींच लयास गेली!"

हिस्लाप साहेबाचें आदरातिथ्य करून त्याच्याशीं राज्यप्रकरणीं काय बोलावयाचें होतें तें बोलून त्याची रवानगी केल्यावर एल्फिन्स्टन साहेबानें पुण्यांत फार दिवस मुक्काम केला नाहीं. जनरल मनरो येणार होता, त्याला भेटण्याकरितां तो साताऱ्याकडे जाण्यास निघाला. त्यावेळीं मुलुखाची स्थिति कशी होती व कामाचा त्रास किती होता त्याबद्दल त्यानें तारीख २४ मेच्या रोजनाम्यांत असें लिहिलें आहे.—"मागें लिहिलें तेव्हांपासून (तारीख २५ एप्रिल) कामाची दगदग सारखी चालली आहे. पेशव्याच्या सैन्याची दाणादाण झाल्यानें पुष्कळ लोक शरण येत आहेत आणि त्यामुळें दगदग विशेष होत आहे. चलाख, अनुभवी, कसलेला, अशा जनरल स्मिथबरोबर वादविवाद करण्यांत वेळ पुष्कळ जातो. माझें पुण्यांत राहणें, मुलुखाच्या निरनिराळ्या भागांशीं रहदारी पुनः सुरू, आसपास जिकडे तिकडे अगदीं स्वस्थता आणि सुरक्षितपणा, ह्या गोष्टींवरून आतां खचित शांतता झाली असें निर्विवाद सिद्ध होतें. खरोखर खेडेगांवांत लढाईचीं चिन्हें कधींच दिसत नव्हतीं. शेत,

* ती पद्धत (System) कोणती तें कांहीं कळत नाहीं.

काम पहिल्याप्रमाणें चाललें आहे. तें यापेक्षां चांगलें कधींच चालावयाचें नाहीं. पेशव्याचा बंधु आपासाहेब फुलशहरास आहे. तो काशीस जाणार आहे. आह्मी बहुतेक शांततेंतल्या काळाप्रमाणेंच प्रवास करीत आहों."

जनरल मनरोची व एल्फिन्स्टनसाहेबाची सातान्यास भेट होऊन तो तारीख२९ मे रोजीं निघून गेला, तेव्हां त्याच्या विषयीं त्यानें रोजनाम्यांत असें लिहून ठेविलें—" मला जनरल मनरोपासून पुष्कळ गोष्टी कळल्या, त्याचा व्यवहारांत उपयोगी पडणारा असा मोठा चांगला समंजसपणा, साधेपणा, मनाचा मोकळेपणा, अगदीं उत्तम स्वभाव आणि आनंदवृत्ति, मनुष्याचा कंटाळा मुळींच नसून उलट त्यांवर उपकार करण्याची खरी बुद्धि, त्याची चपलता आणि मनाचा खरेपणा, कोणतीही गोष्ट पाहून सहज संतोष होणें आणि एकंदरींत ज्या गोष्टींपासून तरुण मनुष्यांशिवाय दुसऱ्या कोणाच्या मनाला ज्यांत कांहीं मौज वाटत नाहीं अशांपासून आनंद होणें, इत्यादि प्रकार पाहून मला मोठा आनंद झाला. त्याचें रूप उग्र आणि दृष्टि प्रखर असून त्याच्या अंगीं हे वर सांगितलेले गुण असल्यानें ते अधिकच शोभतात."

मनरो गेल्यावर एल्फिन्स्टन माघारा पुण्यास गेला. तेथें पंधरा दिवस राहून तो पुनः बाहेर पडला आणि खानेदशांत गेला. तिकडे चालला असतां तारीख ११ जुलैच्या रोजनाम्यांत त्यानें जें लिहून ठावलें आहे, त्यावरून त्यावेळीं त्याच्या मनांत काय काय बेत चालले होते तें चांगलें कळतें. सबब तो लेख खालीं देतों.

" माझे विचार आणि बेत आतां अगदीं पालटले आहेत; त्यांत पहिल्यापेक्षां फार अंतर पडलें आहे. सातान्यास जाण्यापूर्वीं मला असें वाटत होतें कीं, हा देश सोडून जाण्यापूर्वीं आपण येथें राज्य स्थापावें; ह्या कामाला वर्ष दीड वर्ष लागेल. जनरल मनरो ह्मणाला, कांहीं झालें तरी तुह्माला दोन किंवा तीन वर्षांच्या आंत जातां कामा नयेच. तेव्हां दोन वर्षें रहावें असा मी प्रथम मनांत संकल्प केला. परंतु हा प्रदेश आपल्या ताब्यांत केव्हां येईल, अशी मुंबईसरकाराला अगदीं उतावीळ झालेली दिसली आणि त्यामुळें मी ज्या गोष्टी योजीन त्या तें टिकूं देणार नाहीं असें खास वाटलें ह्मणून व आणखी कांहीं कारणांमुळें आतां आपण रिकामी दगदग करीत बसूं नये असें मला वाटलें. मग मी असा निश्चय केला कीं, आपल्या हातून होईल तर सहा महिन्यांत सारें काम आटोपावें आणि खुष्कीच्या मार्गानें विलायतेस निघून जावें.

येथें राहून दोन वर्षांत जितका पैसा शिल्लक टाकतां येईल तितका, येथें मी जी कामगिरी बजाविली आहे तिजबद्दल बक्षीस व काबूलच्या वकिलीवर गेल्यावेळीं जें माझें नुकसान झालें आहे त्याबद्दल मिळून, असें ह्मणून जितका पैसा मिळेल तितका घ्यावा आणि कौन्सिलांत सभासदाची किंवा गव्हरनराची जागा मिळवून माघारें यावें. मी येथें जास्ती दिवस राहिलों तर माझा तितका कोळ मात्र फुकट जाईल, पैसा मिळणार नाहीं व कीर्तिही होणार नाहीं, हें अगदीं उघड आहे, हें मी कधींपासून जाणून आहें. परंतु आपलें कर्तव्य आपण केलें पाहिजे हें स्मरून व हातांतलें काम अर्धेंच टाकणें बरोबर नाहीं हें मनांत आणून मीं राहण्याचा विचार केला मनांत एकदां असे विचार घोळूं लागून त्यांचें प्राबल्य झालें आणि लौकर जाऊन विलायत पहावी ही इच्छा उत्पन्न झाली असल्यानें मनरो व मालकम् यांचीं पत्रें आलेलीं वाचून मी अगदीं निरुत्साह झालों आहें. कारण त्यांवरून असें वाटतें कीं, मला येथें अडकून रहावें लागल. परंतु अद्याप तें कांहीं निश्चयांतलें नाहीं."

खानदेश घेण्यास कर्नल म्याकडोनल्ड याची नेमणूक झाली होती, त्याप्रमाणें तो किल्ले वगैरे घेत होता. एल्फिन्स्टनसाहेबाचा तिकडे जाण्याचा उद्देश तेथची राज्यव्यवस्था लावावी हा होता. तो प्रांत फारच मागसलेला होता. मराठ्यांनीं तो कोणत्या स्थितींत ठेविला होता त्याविषयीं त्याच्या रोजनाम्यांत उल्लेख पुष्कळ ठिकाणीं आहेत. तो गोदावरीजवळ गेला तेव्हां तेथची स्थिति पाहून तो ह्मणतो:—"खेडीं मोडलेलीं आणि बहुतेक ओसाड पडलेलीं आहेत. जी काय लागवड झालेली आहे ती गांवाशेजारींच. ह्या भागांत लागवड अधिक आणि हें (विरापूर) शहर मोठें असून भरभराटींत आहेसें दिसतें. गोदावरीच्या दोहीं बाजूचा प्रदेश लागवड करण्याला फारच योग्य आहे, परंतु सन १८०३ सालच्या दुष्काळापासून पड आहे. मी जे प्रदेश हिंडलों त्यांत इतर भागांपेक्षां ह्यांत दुष्काळाचे परिणाम अधिक स्पष्ट नजरेस येत आहेत."

खानदेशाकडून फिरून सप्टेंबर महिन्यांत एल्फिन्स्टन साहेब परत आला. तारीख ५ रोजीं त्याचा मुक्काम कोरेगांवास होता. तो ह्मणतो:—"मी आपल्यापुढें शिल्लक असलेलें सारें काम संपवून टाकलें आणि आतां पुण्यांत गलों ह्मणज नव्या कामाला हात घालण्याला तयार आहें."—तारीख १५ रोजचा पुणें मुक्कामचा लेख असा आहे:—"आज सकाळच्या वेळीं हवा थंड आणि आकाश निरभ्र असल्यानें आनंद वाटत आहे. पर्जन्यकाळ संपत आल्याची

कधीं कधीं हीं चिन्हें असतात. ढग अगदीं थोडे आहेत आणि ते खूप उंच आहेत. पुन: एकवार संगम दृष्टीस पडूं लागला आहे. विलायतेहून आलेलीं वर्तमानपत्रे आतां नुकतींच माझ्या हातांत पडलीं. त्यांत आह्मा हिंदुस्थानांत केलेल्या लढायांविषयीं लेख येण्यास सुरवात झाली आहे. आतां पुढें थांबर मौजेचा वादविवाद होईल, अशी आह्मां सर्वांना आशा लागली आहे. परंतु तवढा एकदां होऊन गेला ह्मणजे मग आह्मी पुनः नेहमींप्रमाणें अंधारांत पडूं; आमची कोणाला आठवण व्हावयाची नाहीं, आणि आमचें नांव कोणी घेणार नाहीं. मी पुण्यांत आल्यापासून थोडासा आळशी झालों आहें आणि नवीं घरें व बाग करण्याचे बेत करीत आहे. मी आपल्या वेळाचे नियम बांधून टाकूं लागलों आहें ते बांधून तसा वागूं लागलो ह्मणजे मला मागच्यापेक्षा अधिक फुरसत मिळेल."

आतां हें प्रकरण येथें इतकेंच पुरें करूं आणि काबीज केलेल्या नवीन मुलखाची व्यवस्था एल्फिन्स्टनसाहेबानें कशा लावली तें पुढच्या भागांत सांगूं.

लढाई सुरू झाल्यापासून फक्त सरकारी कामाखेरीज इतर मजकुराचीं पत्रें लिहिण्याला एल्फिन्स्टनसाहेबाला फुरसत मुळींच मिळत नव्हती. लढाईचा प्रकारही विलक्षण असल्यामुळे कांहीं महिनेपर्यंत सरकारी पत्रव्यहार देखील कोणत्या प्रकारें चालवावा लागत होता आणि किती कठीण पडत होतें ते मागें सांगितलेंच आहे सातारा काबीज झाल्यावर त्याचा आपल्या मित्रमंडळीशीं पत्रव्यवहार होऊं लागला. त्यांतल्या पुष्कळ पत्रांत नव्या मुलखाच्या राज्यव्यवस्थे-संबंधानें त्याचे जे काय बेत होते, ते दुसऱ्यांना कळवून त्यांचे अभिप्राय तो घेत होता. त्यानें लिहिलेल्या पत्रापैकीं कांहींतील मजकूर पुढें देतों.

क्याप्टन क्लोज याला छावणी मुत्री मुसा येथून तारीख १६ एप्रिल सन १८१८ रोजीं पाठविलेल्या पत्रांत असें आहे:—"तुह्माला आधीं राजकीय गोष्टीविषयीं ऐकण्याची आवड असेल ह्मणून त्या सांगतों, ऐका. एथच्या लोकांनीं आमचा अम्मल आनंदानें पत्करला नसेल तर नसो, परंतु तो त्यांनीं अगदीं मुकाट्यानीं मान्य केला. आमच्याविषयीं त्यांच्या मनांत कांहीं इतका वांकडपणा नाहीं. असें होण्याचें कारण कांहीं अंशीं आमच्याशीं विरोध करून निष्फळ होणार अशी त्यांची खात्री असावी हें एक व कांहीं अंशीं आतां राज्य चांगलें होईल असें वाटूं लागलें असावें आणि शांतता केव्हां होईल ही उत्कंठा लागली असावी हें एक असें वाटतें. बाजीराव पेशवे

चांद्यास गेले आणि तसेच पुढें उत्तरकेडे जातील तर मला वाटतें शिंदा त्यांना सामील होईल. थोरली फौज मोडली याजबद्दल वाईट वाटतें. पेशवे तिकडे न जातां हैदराबादेकडे वळले तर तेथें बंड होणार नाहीं असें नाहीं. परंतु आडाम, स्मिथ किंवा डोव्हटन यांतून कोणा त्यांना हात दाखवला— आणि बहुतकरून ते दाखावर्तील- तर बाकीचे सरथानिक त्यांना मिळण्याचा संभव उरणार नाहीं. त्यांचें बहुतेक सैन्य बहुधा इकडे मला त्रास द्यावयाला येईल; मग तें लुटारूसारखें टोळ्याटोळ्यांनीं येवो किंवा आमच्या शिबंदींत चाकरीस राहण्यास येवो. असल्या कांहीं लुटारू टोळ्यांचा निःपात करावा तेव्हां ह्या मुलखांत शांतता होईल. परंतु एकंदरींत मला वाटतें, एका वर्षाच्या आंत जिकडे तिकडे शांतता होईल आणि फार तर आणखी एक वर्ष लोटलें ह्मणजे हा मुलुख मुंबई सरकारच्या ताब्यांत देतां येईल. मग मला कांहीं काम नाहीं ह्मणून विलायतेस गेलेंच पाहिजे. तेथें जाऊन आनंदांत मजा मारीत रहावें वगैरे तुम्ही म्हणता तें खरें, परंतु तुम्हांला जसें वर्षास १००० पौंडाचें उत्पन्न आहे तसें साऱ्या दुनियेला नाहीं येवढें तुम्ही विसरतां. माझे पुढें बेत काय होतील तें कांहीं सांगतां येत नाहीं आणि सध्याच्या माझ्या स्थितींत मला जें सुख वाटत आहे तें पुष्कळ अंशीं त्यामुळेंच. हा स्थिति खरोखर मोठी मौजेची आहे; सध्या कामांत आणि आनंदांत दिवस जात आहेत; पुढें कसे येतील हें कांहीं खात्रीनें सांगतां येत नाहीं, परंतु चांगले येतील ही आशा आहे. ह्यांत मजा ही आहे का, मागे जरी माझ्या मनांत होतें तरी चांगली जागा सोडून गेलें तर परिणाम वाईट होईल ह्या भयानं माझ्यानें ती सोडवेना आणि आतां मला जागाच नाहीं तर गमावतों काय, ह्मणून निघून जावें यांतच शहाणपणा आहे. घरीं जाईपर्यंत तुमच्या भेटीचा कांहीं आशा नको. × × × × असो. पुनः राजकीय प्रकरणाकडे वळूं. येथें घडलेल्या गोष्टी चांगल्या आहेत असें माझ्या मनानें घेतलें आहे. आणि मला वाटतें तेंच खरें आहे. परंतु आह्मी भराभर सारें राज्य आटपीत चाललों आहों हें बरें नाहीं; यांत कांहीं तरी भयावह आहे. एकादा देश अगदीं सारा जिंकून घेण्याचा आह्मीं पूर्वीं कधीं प्रयत्न केला नाहीं म्हैसूर सुद्धां आह्मीं सारें घेतलें नाहीं. तेथ एक राजा उभा करून ठेवला; येथे तसेंच करीत आहों आणि नागपुरासही तसेंच करणारसें दिसतें. आह्मांला जय आला तर सारें ठीकच आहे, परंतु जर घसरलों तर शिंदा लढाईला उठेल, होळकर

बंड करील, शीख आणि गुरखे त्यांत जाऊन मिळतील; हैदराबादेस दंगा होईल. असा वणवा पेटला तर तो आमच्या मुलखांत शिरेल, कोठें तरी एखाद्या नाजुक ठिकाणीं शेंकेल आणि आमचें राज्य काड्यांचा डोल्हाऱ्या सारखें धाड करून तो ठेल. असें होणें अगदीं अशक्य नाहीं, आणि जर-ना असें घडून आलें तर मला वाटतें ' इतके दिवस तरी लोटले कसे, हें मागेंच कसें झालें नाहीं' ह्याच आश्चर्यांत आह्मी पडूं. तेथपर्यंत मी अशी आशा करतों कीं तो दिवस फार दूर असो आणि तो दूर रहावा ह्मणून मी यथाशक्ति प्रयत्न करीन; तो हाच कीं ह्या देशाची राज्यव्यवस्था लावावयाची आहे ती फार बेतानें लावीन."

एल्फिन्स्टन साहेबानें जनरल मनरो यास तारीख ३ मे सन १८१८ रोजीं पत्र पाठविलें तें असें—" तुमच्या जाण्यानें जी जागा रिकामी पडणार ती कशी भरून निघणार हें मला खरोखर कळत नाहीं. तुमचे रणांगणांतले पराक्रम आणि कर्नाटक प्रांताची पूर्ण व्यवस्था लावलीत ती बाजूस असो, साताऱ्या व कोल्हापूरच्या राजाशीं व सर्व जाहागिरदारांशीं जे नवे संबंध झाले आहेत आणि ज्या नव्या नव्या गोष्टी घडल्या आहेत त्यांमुळें जे अनेक प्रकारचे राजकीय प्रश्न उत्पन्न होत आहेत तेही बाजूस असोत, बाकीच्या मुलखाची व्यवस्था करण्यांत तुह्मांकडून घेण्यासारख्या पुष्कळ गोष्टी कळतील ह्या आशेवर मी होतों. मग त्या खासगी पत्रांनीं कळत्या किंवा तुमचें लढाईचें काम आटोपल्यावर बाकीचीं कामें संभाळून मजबरोबर जोडादार कमिशनर ह्मणून नेमणूक होऊन बसावयाला सवड असल्यास तसें होऊन कळत्या तरी हरकत नव्हती. परंतु आतां पाहतों तर कृष्णेच्या उत्तरे कडील मुलखाच्या व्यवस्थेस असा आरंभ होणार तों तुह्मी येथून निघालां. ज्या कामाच्या बरेवाईटपणावर पुष्कळ गोष्टी अवलंबून असणार तें मला एकट्याला अंगावर घ्यावें लागणार याजबद्दल मला खरोखर थोडें कसेंसेंच वाटतें. मिस्टर म्याक्डोनेल ह्याला तुह्मीं ज्या गोष्टी सांगाल आणि इतर ठिकाणीं तुह्मीं जी पद्धति सुरू केली आहे तिचा त्याला जो अनुभव आहे त्याचा मला उपयोग करून घेतां येईल अशी सुद्धा मी अजून पुष्कळ आशा धरून आहें. नवीन मुलखाची व्यवस्था लावण्याच्या कामीं मला अनुभव अगदींच थोडा आहे, ह्मणून तो मुलुख जिंकण्याबरोबर ज्या इलाख्यांत कायमचा रहावयाचा आहे त्याच्या स्वाधीन करून सोडून हें काम आपल्या

अंगावरून काढून टाकणें सोपें आहे, परंतु तें करणें उपयोगी नाहीं अशी माझी खात्री झालेली आहे. आम्ही आजपर्यंत केव्हांही एकादा देश एकदम सारा घेतलेला नाहीं. आमचें राज्य ज्यांना बरें वाटत नसेल त्यांना बाहेर जाऊन राहण्याला आधार असावा ह्मणून घेतलेल्या मुलखांत एक संस्थान नेहमीं अगदीं स्वतंत्र राखून ठेवीत असतों. आह्मीं जे थोडथोडे मुलुख घेतले आहेत त्यांत सुद्धां पेशव्यांच्या राज्याप्रमाणें, कांहीं जाहागीरदारांना वांटून दिलेला व कांहीं प्रांत स्वतंत्र राजाच्या ताब्यात असलेला अशा प्रकारचा, आमच्या ताब्यांत आलेला नाहीं. ह्या कारणामुळे मला असें वाटतें कीं कांहीं मुदतपर्यंत तूर्त ह्मणून निराळें राज्य असावें आणि त्यात तूर्त ह्मणूनच अशी पद्धत सुरू करावी कीं आमच्या बाकीच्या राज्यांत ते जेव्हां सामील करावयाचें तेव्हा त्यात चालू असलेली पद्धत ह्यांत सहज सुरू करता यावी. अशा दृष्टीने पाहिलें तर मुलकी कामाची चालू वहिवाट माहीत नसणें आणि आमच्या कायद्यांपेक्षां मराठ्यांचें अधिक माहीत असणें हेंच विशेष हितावह आहे. हें काम करण्याची लायकी येण्याला मनुष्याच्या अंगीं हे दोन्ही गुण असावे. परंतु असें क्वचितच घडणार; नवीन घेतलेल्या मुलखांत जे कलेक्टर आणि जज्ज जाणार त्यांच्या अंगांत ह्या गुणांचा अभाव असण्याचा संभव अधिक. ह्या कारणांकरितां हा मुलुख मुंबई सरकारच्या हवालीं करण्यापेक्षां आपणच यांत कायमची व्यवस्था लावण्याचा प्रयत्न करावा हें मला बरें वाटतें, आणि जर माझा मीच मुक्त्यार राहिलो तर निदान आणखी एक वर्ष तरी मी हा हातचा सोडणार नाहीं."

त्यानें मालकम साहेबाला तारीख ११ जुलै सन १८१८ रोजीं पत्र पाठविलें तें असें-" तुह्मी तारीख ३ चें आडामसाहेबाला पत्र पाठविलेंत तें आणि युद्धप्रकरणीं मजकुराचें यंगसाहेबाला पाठविलेंत तेंही पाहाचलें. मला वाटतें तीं दोन्ही शहाणपणाचीं आणि गहन विचारांचीं आहेत. आपल्याला पचेल त्यापेक्षां जास्त खाणें ही गोष्ट खरोखर फार वाईट आहे. जेंकिन्ससाहेबाला प्रत्यक्ष हात घालावा लागत आहे, हें पाहून मला वाईट वाटतें. तो अजून पाऊल मागे घेवो. बेकन साहेबानें एका ठिकाणीं असें लिहिलें आहे कां आपल्यावर दुर्दैवाचे जे काय घाले येतील ते सोसण्याला आपल्या शेजारीं एक दुर्बळ असावें असें प्रत्येक बलाढ्य राजानें इच्छावें हे योग्य आहे. ह्या वचनाची सत्यता जशी आमच्या स्थितींत अगदीं बरोबर

दिसून येते तशी दुसऱ्या कोठेंच आली नाहीं. आह्मी जी रीति सुरू केलेली आहे तीप्रमाणें राज्य सुरळीत चांगलें चालावें, तींत कोठें बिघाड होऊं नये अशी जर आमची इच्छा आहे तर हिंदुस्थानांत जे बदमाष लोक भरलेले आहेत ते आमच्या राज्यांतून बाहेर पडण्याला आह्माला कांहीं तरी मार्ग काढलाच पाहिजे पर्जन्य संपल्यावर आह्माला लहान लहान लढाया कराव्या लागतील त्याचें मला फारसें भय वाटत नाहीं. अशा लढाया कराव्या लागणार असें मला नेहमीं वाटत होतें आणि सन १८१५ मध्यें मी लॉर्ड हेस्टिंग्ज यांस पेंढाऱ्यांसंबंधानें जें पत्र लिहिलें त्यांत एक मोहीम थोरल्या थोरल्या राजांना जिंकण्याला आणि एक लुटारू बंडखोराच्या टोळ्यांची पिच्छा पुरवण्याला अशा दोन कराव्या लागतील असें लिहिल्याचें मला स्मरतें. अजूनही माझें हेंच मत आहे; आणि पहिल्या मोहिमेंत आह्मीं जें काय काम केलें तें पाहून आश्चर्य वाटतें. खरोखर आह्मांला आतां सईल सोडतां कामा नये. बंडाळी मोडावी हा आमचा हेतु होता, परंतु इतकीं संस्थानें बुडविल्यानें व लहान लहान केल्यानें बंडाळी होण्याचीं जीं मूळ कारणें तीं आह्मीं वाढविलीं आहेत. ह्याच्या बदला ह्या बंडाळ्यांचा प्रतिकार करण्याला आह्मांला उत्कृष्ट स्थळें मिळालीं आहेत हा जो फायदा झाला आहे ह्याचा जर आतां नीट उपयोग करून घेतला नाहीं तर आह्माला नुकतेच जे जय आले त्यांपासून फायदा न होता नुकसान झालें असे होईल. दोन किंवा तीन वर्षांचें तुर्तचें जें राज्य आहे तें मीं पत्करलें ह्मणून तुह्मी आणि मनरो यांनीं जें लिहिलें आहे तें वाचून मला कांहीं मोठासा संतोष वाटला नाहीं. हा प्रदेश आपल्या हातीं येणें ह्मणजे स्वर्गप्राप्ति होण्यासारखें वाटत असून तें एकदां केव्हां घडेल अशी मुंबईसरकाराला मोठी घाई सुटली आहे, आणि त्यांत ज्या कांहीं गोष्टी कायम स्थापलेल्या दिसतील त्या अगदीं उलथून पाडावयाच्या अशा त्यांचा संकल्प असल्याचें उघड दिसून आल्यानें माझ्या सर्व गर्वाचा अगदीं परिहार होऊन गेला आहे. जर ते कृतसंकल्प आहेत तर आपण कोणतीच पद्धत सुरू करूं नये, त्यांच्या मनास

येईल तसें करण्याला अगदीं मोकळीक ठेवावी हेंच बरें. शिवाय दुसरें असें कीं, मला एकदां घरीं केव्हां जाईन असें झालेलें आहे. तेथल्या लोकांत मिसळून तेथच्या रीतिभातीप्रमाणें वागण्याला अगदीं नालायक झालों नाहीं तोंपर्यंत जावें असें माझ्या मनांत आहे. ही इच्छा पूर्ण व्हावी असें एकदां मनानें पक्कें घेतलें असल्यामुळें मीं आपली सहज अशी समजूत घातली आहे कीं, घरीं जाऊन येणें हें माझ्या हिताला अनुसरूनच आहे, कारण मला जाण्याची इच्छा असून सढळ हातानें खर्च करीत ( वर्षास २००० किंवा २५०० पौंड ) दोन वर्षेंपर्यंत राहण्यास पुरेल इतका पैसा मजजवळ आहे.



# याच ग्रंथकारानें केलेले इतर ग्रंथ.

## विद्यमान एतद्देशीय राज्यें, संस्थानें व जहागिरी

## यांचा इतिहास.



ह्यास दक्षिणाप्राईझ कमिटीनें २५० रुपये बक्षिस दिले.

**मुंबई व वऱ्हाड येथील मे० डायरेक्टर ऑफ पब्लिक इन्स्ट्रक्शन यांनीं शाळांस व लायब्ऱ्यांस बक्षीस देण्यास पसंत केलें.**

सर्व लोकांस विनयपूर्वक कळविण्यांत येतें कीं, आम्ही हा ग्रंथ मोठ्या मेहनतीनें तयार करून छापला आहे. मनुष्यास स्वदेशाचा इतिहास माहीत असणें किती अवश्य आहे, हें सांगावयास नकोच. हिंदुस्थानास आतां जरी अगदीं पारतंत्र्य आलें आहे, तरी थोड्या काळापूर्वीं बऱ्याच भागास स्वातंत्र्य होतें; तें प्राप्त झालें कसें आणि पुढें गेलें कसें, इंग्रज लोक येथें राज्य कमाऊं लागल्यापासून आजपर्यंत जीं राज्यें बुडालीं व आज जीं कायम आहेत, तीं स्थापणाऱ्या पुरुषांनीं व त्यांच्या वंशजांनीं काय पराक्रम केले; शौर्य, धैर्य, युक्ति, राजकारण, राजनीति, न्यायबुद्धि, देशाभिमान, कुलाभिमान, धर्माभिमान, इत्यादि गुण त्यांच्या ठायीं कसे वसत होते, हें जाणण्याची ज्यास बुद्धि होणार नाहीं, असा पुरुष विरळा. त्यांतही निजाम, गायकवाड, शिंदे, होळकर इत्यादि जीं लहान थोर राज्यें चालू आहेत, त्यांची इंग्रजांशीं गांठ पडल्यापासून कशी स्थिति होत आली आहे, व अशीं एकंदर राज्यें आहेत तरी किती, हें पाहण्याची ज्यास एकदां देखील इच्छा होणार नाहीं, असा मनुष्य मिळणारच नाहीं, अशी कल्पना करून आह्मी हा ग्रंथ तयार केला. तो द. प्रा. कमिटीस फार पसंत पडला. कमिटीचे सेक्रेटरी ह्मणतात "असा ग्रंथ मराठींत नाहीं, ही मोठी अडचण वाटत होती, ती आतां दूर झालेली पाहून लोकांनां खरोखर मोठा संतोष होईल. मराठी ग्रंथसमूहांतही मोठी भर पडेल. ग्रंथाची भाषा शुद्ध आणि साधी आहे." कमिटीचे मेंबर रा०

ब० महादेव गोविंद रानडे, नारायण भाई दांडेकर, डॉ० रामकृष्ण गोपाळ भांडारकर, रा० रा० गोपाळ गणेश आगरकर यांनींही पुष्कळ प्रसंशा करून आमच्या मानानें बक्षिस मोठें नाहीं असें ह्मटलें. ज्ञानप्रकाश, ज्ञानचक्षु, सुधारक महाराष्ट्रकोकिळ, व मराठी शालापत्रक यांनीं फार प्रशंसा केली आहे. तर आतां मराठी वाचकांनीं ही सेवा मान्य करून घ्यावी. शाळामास्तरांनीं तर हें पुस्तक वाचल्याशिवाय राहूंच नये अशी विनंति आहे. लायब्ररींयांनीं ही याचा संग्रह अवश्य करावा.

पुस्तक डेमी अष्टपत्री सांच्याचें, व पृष्ठें ४३२ आहेत. कागद सफेत, जाडा, चिवट, अक्षर उत्तम, बांधणी सुरेख, किंमत २ रुपये, बंगीखर्च ३ आणे. पांच प्रती घेतल्यास टपालखर्च पडणार नाहीं. रोख पैसे पाठविल्यास अगर व्हाल्यु पेएबल मागविल्यास पुस्तक रवाना होईल. पत्रावर पत्ता—'कुरुंदवाड भाऊनाना छापखान्याचे म्यानेजर यांस द्यावें' असा लिहावा. नाटपेड पत्र घेतलें जाणार नाहीं.

कुरुंदवाड. कृ० ब० गोडबोले.

---

# संस्कृत गद्यात्मक रामायण.

आपला हा हिंदुस्थान देश ह्मणजे सकलविद्यांचें माहेरघर अशी याची पूर्वापार ख्याति असून आमच्या पूर्वजांची जी प्रौढ संस्कृत भाषा तिचें रमणियत्व तर अवर्णीय आहे. आमच्या देशी पंडितांचे पालनकर्ते राजेरजवाडे कालवशेंकरून लोपत चालले, तेव्हां गीर्वाणभाषाध्ययनही कमी कमी होऊं लागलें; आणि तसाच क्रम गेल्या पन्नास वर्षांत चालू असता, तर आजला स्थिति काय झाली असती तिचें अनुमान करणेंही कठीण आहे. परंतु तिचा मंजुल ध्वनि पाश्चात्य पंडितांच्या श्रवणीं पडतांच ते तल्लीन होऊन तिचे निस्सीम भक्त बनत चालले, तसें तिचें नष्टचर्य संपून पुन: गौरव होऊं लागले. हल्लीं मोठमोठ्या सरकारी शाळांतून तर संस्कृत शिकविणारे स्वतंत्र गुरु असतात. शिकणारांची संख्याही फार मोठी आहे; पूर्वापार चालत आलेल्या शिकविण्याच्या रीतींतही फार अंतर पडलें आहे, व विद्यार्थ्यांस अल्पायासानें ज्ञान व्हावें ह्मणून सुलभ ग्रंथ होतें आहेत. परंतु एकंदरींत पाहतां अद्यापि गद्यग्रंथांची कमतरता फार आहे व त्यांची

अवश्यकता तर मोठी आहे. हें मनांत आणून आह्मी अध्यात्मरामायणावरून श्रीरामकथा गद्यरूपानें लिहून तयार केली; ती कांहीं विद्वान् गृहस्थांनीं पाहून विद्यार्थ्यांस फार उपयोगीं पडण्यासारखें पुस्तक होईल असें ह्मटल्यावरून छापविली आहे. मूळग्रंथाची भाषा सुलभ व मनोहर आहे, तीच होतां होईल तेथपर्यंत कायम ठेवण्याचा प्रयत्न केला आहे. रचना मात्र बदलली आहे. त्यायोगानें तिचें प्राचीन स्वरूप विकृत न होतां जसेंच्यातसेंच स्पष्ट दिसत आहे.

अध्यात्म हा विषय स्वभावतःच गहन ह्मणून तो अजी गाळला आहे. तसेंच पौराणिक कथा ह्मटली ह्मणजे तींत कोठें पाल्हाळ, कोठें द्विरुक्ति, इत्यादि असावयाचें, तें सर्व गाळून व कथाभागही संक्षेपानेंच लिहिला आहे. त्या योगानें वीर, करुण, अद्भुत, इत्यादि रसभरित; अरण्य, पर्वत, समुद्र, इत्यादि स्थलवर्णनयुक्त व पुत्रप्रेम, उत्तम बंधुप्रीति, भक्तवात्सल्य इत्यादि अनेक मनोधर्मवर्णनयुक्त हें लहानसें पुस्तक प्रेक्षणीय झालें आहे.

पुस्तकाची किंमत १२ आणे. शिवाय टपालखर्च १ आणा. पाठविलें असतां पुस्तक रवाना होईल. १० किंवा त्यांहून जास्त प्रती घेणारास टपालहांशील पडणार नाहीं.

हें पुस्तक संस्कृत शिकणाऱ्या विद्यार्थ्यांस फार उपयोगाचें आहे व कितीएक हायस्कुलांतील विद्यार्थी हल्लीं तें शिकत आहेत. यावर खालीं लिहिलेले गृहस्थांकडून अभिप्राय आले आहेत. त्यांत ते हें विद्यार्थ्यांस फार उपयोगीं असें, लिहितात.

डॉक्टर रा० गो० भांडारकर. प्रोफेसर डेक्कन कॉलेज.

वे० शा० सं० रा० राजारामशास्त्री बोडस } महामहोपाध्याय
,, ,, भीमाचार्य झळकीकर } एल्फिन्स्टन कॉलेज.
,, ,, गोविंद शंकर शास्त्री बापट, एल्फिन्स्टन हायस्कूल.
,, ,, गणेशशास्त्री रुकडीकर, राजाराम कॉलेज.
,, ,, गोविंद वामन पांध्ये, सोलापूर हायस्कूल.
,, ,, वासुदेव शास्त्री खरे, मिरज हायस्कूल
रा० रा० शिवराम बापूजी परांजपे, संस्कृत प्रोफेसर राजाराम कॉलेज.
,, ,, नारायण बाळकृष्ण गोडबोले, दक्षिणा प्राईज कमिटीचे से०

,, ,, गणेश व्यंकटेश जोशी. बी. ए. संस्कृत टीचर ए. हायस्कूल.
,, ,, अण्णाजी रामचंद्र अत्रे, हेडमास्तर मिरज हायस्कूल.

---

## मासल्याकरितां एक लहानसा उतारा खालीं दिला आहे तो पहावा.

### युद्धकांडात्

तदा कुंभकर्णो रावणं प्राह । राक्षसेश्वर यत्कर्म त्वयारब्धं तत्केवलमात्मनाशाय । सीताहरणकाले त्वं भाग्याद्रामेण न दृष्ट आसीः । यदि स त्वामिदानीं पश्यति त्वं न जीवसि । रामो न मानुषः । असौ साक्षान्नारायणः सीता भगवती लक्ष्मीः । सा त्वया राक्षसानां विनाशायानीता । महामीनो विषपिंडं निगीर्य यथा पश्चात्तप्यति तथा त्वं रामपत्नीमानीयाद्य किंवा भविष्यतीति पश्चात्तप्यसे । अजानता त्वया यद्यप्यनुचितं कर्म कृतं तथापि तवानुसयाहं रामेण संधास्ये । स्वस्थचित्तो भव ॥

कुंभकर्णवचः श्रुत्वा दशग्रीवो भ्रुकुटीविकटानन आसनादुत्पतन्निव जगाद त्वं सुबुद्धिमानिति ज्ञानबोधाय न मया प्रार्थ्यसे । मया कृतमंगीकृत्य यदि रोचते युद्ध्यस्व नोचेन्निद्रावशो भव । अधुना त्वां निद्रा बाधते । रावणं रुष्टं ज्ञात्वा कुंभकर्णस्तूर्णं युद्धाय निर्ययौ । महापर्वतसन्निभः स राक्षसः प्राकारं लंघयित्वा महास्वनेन समुद्रमभिनादयन्वानरान्रुषा भक्षयन्बाहुभ्यां पीडयामास । हरिवाहिन्यां कालांतकमिव भ्रमंतं मुद्गरेण हरींस्ताडयंतं पाणिपादेन चूर्णयंतं भक्षयंतं च दृष्ट्वाखिला वानरा दुद्रुवुः । गदापाणिर्बिभीषणस्तं दृष्ट्वा महामते भ्रातरि दयां कुरु तवानुजोऽहमित्युक्त्वा चरणौ ननाम । तस्य वृत्तांतं श्रुत्वा तं समालिंग्य कुंभकर्णोऽब्रवीद्वत्स राक्षसानां कुलसंरक्षणार्थं त्वं रामाश्रयेण जीव । त्वं महाभागवतोऽसीति मया पुरा नारदाच्छ्रुतम् । तातेदानीं गच्छ मदमत्तविलोचनस्य मे स्वकीयपरकीयविवेकोऽधुना नष्टः । इत्युक्तोऽश्रुमुखो बिभीषणो भ्रातुःपादावंभिवंद्य रामपार्श्वमुपागत्य चिंतापर उपस्थितः । कुंभकर्णोऽपि कराभ्यां चरणाभ्यांच हरीन्पेषयन्गंधहस्तिवद्वानरीं सेनां नाशयामास । राघवस्तं दृष्ट्वा क्रुद्धस्ताभिन्वायव्यास्त्रं चिक्षेप तेन तस्य समुद्गरो दक्षहस्तश्चिच्छिदे । स हस्तोऽनेकान्कपीनर्दयन्भूमौ पतितः । अथ वानरा भयवेपमाना रामकुंभश्रवणयोर्युद्धं पश्यंतस्तूर्ष्णीं बभूवुः

---

## समासचूडामणिः

संस्कृत शिकणाऱ्या विद्यार्थ्यांस हें पुस्तक अत्युपयोगी असल्यानें अगदीं अवश्य लागणारें आहे. किंमत अर्धा आणा. दहा प्रती घेतल्यास टपाल खर्च पडणार नाहीं.

---

## राबिनहुड चरित्र.

इंग्लंड देशांत फार दिवसांमागें राबिनहुड नामक एक विलक्षण मनुष्य होऊन गेला. त्याचें नांव माहीत नाहीं असा मनुष्य विलायतेंत मिळणारच नाहीं. त्याचे पवाडे लहानथोर सर्व मनुष्यांचे तोंडीं आहेत. त्याचें चरित्र वाचून लहान मुलें आणि मोठीं मनुष्येंही आनंद पावतात. अशा गाजलेल्या व्यक्तीचें नांव, गुण, व कर्म आमच्या देशबांधवांस माहीत असणें अगदीं अवश्य असल्यानें आम्ही एका इंग्रजी ग्रंथावरून हें पुस्तक तयार केलें. तें डे. व्ह. ट्रा. सोसायटीस पसंत पडून तिणें ७५ रुपये बक्षीस देण्याचें ठरविलें, पुस्तकाची किंमत ८ आणे. टपाल खर्च १ आणा.

---

## अनाथ पांडुरंग.

**दक्षिणा प्राईझ कमिटीनें ३०० रुपये बक्षीस दिले.**

**मे० डायरेक्टर ऑफ पब्लिक इन्स्ट्रक्शन यांणीं शाळांस व लायब्रऱ्यांस बक्षीस देण्यास पसंत केलेलें पुस्तक**

सर्व लोकांस विनयपूर्वक कळविण्यांत येतें कीं आह्मी अनाथपांडुरंग नांवाची ऐतिहासिक कादंबरी इंग्रजीग्रंथाधारें तयार करून छापिली आहे; तर महाराष्ट्रभाषाभिज्ञ रसिक जनांनीं तिची गोडी अनुभवून पहावी.

आजपर्यंत महाराष्ट्रभाषेमध्यें कादंबऱ्या पुष्कळ प्रसिद्ध झाल्या, परंतु त्यांत इंग्रजींतील ऐतिहासिक कादंबऱ्यांचे धर्तीवर हिंदुस्थानच्या इतिहासांतील कांहीं गोष्टी घेऊन त्यांवर रचलेल्या अशा फार थोड्या हें पाहून आह्मी हा यत्न

केला तो कसा काय सिद्धीस गेला तें रा० ब० महादेव गोविंद रानडे व कविराज श्री० राजश्री गणपतराव हरिहर ऊर्फ बापूसाहेब कुरुंदवाडकर या उभय विद्वानांचे अभिप्राय खालीं दिले आहेत ते अवलोकन केले असतां सहज ध्यानांत येईल.

"हें पुस्तक रा० रा० कृ० ब० गोडबोले यांणीं केलेलें समग्र वाचून पाहिलें चांगलें साधलें आहे. भाषा सरळ, सुबोध, अस्सल मराठी * * गोष्ट चांगली जुळलेली आहे. अद्भुत व चमत्कारीक प्रसंग सर्वच ठिकाणीं दाखविण्यांत आले आहेत त्यामुळें गोष्टीचे खरेपणा विषयीं शंका उत्पन्न होते तथापि त्या योगानें रस अधिक घडला आहे.

पेंढारीलोकांची चाल, रीत, अनुभव, वगैरे प्रकार ह्या ग्रंथांत चांगले उतरले आहेत.

एकंदरींत पुस्तक फार मोठें झालें आहे, तथापि आलीकडे जीं आपल्या भाषेंत लहान मोठी नाव्हेल्स (कादंबऱ्या) झालीं आहेत, त्यांपेक्षां ह्या ग्रंथाची रचना, भाषा व रस, हे गुण अधिक साधले आहेत.

रा. गोडबोले आपल्या खर्चानें ग्रंथ छापित असल्यास विशेष खर्चाचें काम आहे. परंतु कांहीं दिवसांनीं तरी ग्रंथाची प्रसिद्धि होऊन लोकाश्रयास पात्र होईल असें वाटतें."

म. गो. रानडे.

---

"अनाथपांडुरंग" नांवाची कादंबरी आह्मी दोन वेळ समग्र वाचली. पेशवाईच्या अखेरचा जो धांदलीचा काळ तो दाखविण्याच्या उद्देशानें कवीनें ही लिहिली असावी.

सर्वमान्य विद्वान रा. ब. आनरेबल म. गो. रानडे यांणीं अभिप्राय दिला आहे त्यांत ते ह्मणतात तसेंच अगदीं बराबर आमचेंही मत आहे.

मुख्यत्वें करून या कादंबरींतिल संविधानकें जागोजाग चमत्कारिक रीतीनें जुळविलीं असल्यामुळें वाचतांनां आनंद होतो. पेंढारी वगैरे हलक्या लोकांचें वर्तन तर हुबेहुब मजेदार लिहिलें आहे. या कादंबरींत दोषास जागा थोडी असून गुणास फार आहे यांत संशय नाहीं, ह्मणून ही सर्वांनी संग्राह्य आहे.

ग. ह. कुरुंदवाडकर.

---

दक्षिणा प्राईझ कमिटींचे सेक्रेटरींनीं आपल्या रिपोर्टांत असें लिहिलें आहे–ह्या पुस्तकाची भाषा शुद्ध, अस्सल मराठी आहे. अलीकडे छापखान्यांतून जीं वरचेवर नवीन पुस्तकें बाहेर पडत असतात त्यांच्यासारखी नाहीं. सोन्याच्या समया, अत्तराचे दिवे, रत्नांची रेलचेल, असल्या अतिशयोक्तिवर्णनपूरीत निवळ कल्पित गोष्टीं पेक्षां ऐतिहासिक कादंबरी वाचणें पुष्कळ अधिक उपयोगीं आहे. या पुस्तकाची भाषा पाहून मला अतिशय आनंद झाला, हिला मी खरी मराठी ह्मणतों. मराठींत जीं पुस्तकें प्रसिद्ध होत आहेत त्यांत अशी क्वचितच दृष्टीस पडते. ह्या पुस्तकास २५० पासून ३०० पर्यंत बक्षीस द्यावें.

कमिटीचे मेंबर रा. बा. गोपाळराव हरी देशमुख. नारायण भाई दांडेकर. डा० रा० गो० भांडारकर व रा० रा० गो० ग० आगरकर या सर्वांनीं चांगले अभिप्राय देऊन ३०० बक्षीस देण्याचें ठरविलें.

---

आजपर्यंत मराठींत ज्या कादंबऱ्या छापून प्रसिद्ध झाल्या आहेत त्यांत एवढी मोठी एक ही नाहीं. ( हिचीं पृष्ठें काव्येतिहासाच्या सांच्याचीं ४२० आहेत ) एवढा मोठा ग्रंथ अंगावर छापण्याचें काम रावबहादुरांनीं ह्मटल्या प्रमाणें फारच खर्चाचें असल्यामुळें बहुत काल पर्यंत अशक्यच वाटत होतें, परंतु कांहीं सवड निघाल्यानें छापून झालें, प्रथम किमत ३॥ रुपये ठेविली होती परंतु ३०० रुपये मिळाल्यानें आतां २ रुपये किंमत ठेविली आहे. बंगी खर्च तीन आणे. व्हाल्यु पेएबलनें मागाविलें असतां रवाना होईल.

---

## आह्मांकडे खालीं लिहिलेलीं पुस्तकें विक्रीस तयार आहेत.

| | रु. | आ. | ट. ह. आणे. |
|---|---|---|---|
| संस्कृत गद्य रामायण ... ... | ० | १२ | १ |
| संस्कृत गणेशविजय काव्य सर्ग ६ पर्यंत.... | ० | ८ | ६पै |
| भट्टवंश काव्य सर्ग पहिला .... | ० | १ | ६पै |
| विनायक महात्म्य आर्या, मल्हारी महात्म्य आर्या व ऋक्संहितेच्या अष्टकांची पदसंख्या | ० | ८ | १ |
| ध्रुवाख्यान अभंग टपालहांशीलसह | ० | १ | |
| कृष्णा माहात्म्य संस्कृत | १ | ४ | ४ |
| ,, प्राकृत | | ५ | १ |

दत्तमाहात्म्य प्राकृत ओवी बद्ध किंमत २ रुपये. ट. ह. ४ आणे,

दत्त स्तोत्र प्राकृत ओवी बद्ध किंमत १ आणा. ट. ह. अर्धा आणा,

कुरुंदवाड कृष्णाजी बल्लाळ गोडबोले.